॥ श्री ॥

# सार्थ उपनिषत्संग्रह.

## भाग पहिला

संपादक

रा. रा. हरि रघुनाथ भागवत.

आवृत्ति दुसरी.

अष्टेकर आणि मंडळी. पुणें.

शके १८३८. सन १९१६ इसवी.

किंमत अडीच रुपये.

# अनुक्रमणिका.


| उपनिषदाचें नांव. | |
|---|---|
| १ ईशावास्योपनिषत्. ... ... ... | १– ४ |
| २ केनोपनिषत्.... ... ... ... | ५– ११ |
| ३ कठोपनिषत्... ... ... ... | १२– ३७ |
| ४ प्रश्नोपनिषत्... ... ... ... | ३८– ५४ |
| ५ मुंडकोपनिषत्. ... ... ... | ५५– ७० |
| ६ मांडूक्योपनिषत्. ... ... ... | ७१– ७३ |
| ७ तैत्तिरीयोपनिषत्. ... ... ... | ७४–१०२ |
| ८ ऐतरेयोपनिषत्. ... ... ... | १०३–१११ |
| ९ छांदोग्योपनिषत्. ... ... ... | ११२–२६२ |
| १० बृहदारण्यकोपनिषत्. ... ... ... | २६३–४०८ |

| | |
|---|---|
| मांडूक्योपनिषदावरील गौडपादांच्या कारिका. | ४०९–४४१ |
| पहिल्या भागांतल्या दहा उपनिषदांवरील टीपा. | ४४२–४५६ |

# स्वामी रामतीर्थ यांचे समग्र ग्रंथ.

संपादक–भास्कर विष्णु फडके, बी. ए; रामकृष्ण वासुदेव बर्वे, बी. ए.

श्रीमत् परमहंस स्वामी रामतीर्थ हे विसाव्या शतकांतील **अवतारी पुरुष** होत. स्वामींनी आपल्या ग्रंथांत अर्वाचीन भौतिक शास्त्रांच्या प्रकाशांत वेदान्ताच्या सिद्धान्तांचें श्रेष्ठत्व सर्व जगाच्या निदर्शनास आणलें असून, सध्यांच्या जीवनकलहांत आपण कसें वागावें, प्रपंचांत राहूनच आपणांस परमार्थ कसा साधतां येईल, याचें फारच मार्मिक, मुद्देसूद व हृदयंगम विवेचन केलें आहे. धार्मिक, सामाजिक, नैतिक अशा अनेक प्रचलित प्रश्नांवर स्वामींनीं अगदीं नवा प्रकाश पाडला असून समाजाच्या विचाराला अत्यंत **श्रेयस्कर** असें नवीन वळण लावलें आहे. स्वामींचे समग्र ग्रंथ जो सावधान चित्तानें वाचील, किंवा श्रवण करील, तो इहलोकीं सुख भोगून अंतीं मोक्षाला जाईल, असें स्वामींचें प्रतिज्ञोत्तर आहे. अशा या प्रासादिक ग्रंथांचा महाराष्ट्रीय बंधुभगिनींस लाभ घडावा ह्मणून स्वामींचीं समग्र व्याख्यानें, लेख, कविता, संवाद, वगैरे **समग्र ग्रंथ मराठींत** प्रसिद्ध केले आहेत. क्राऊन सोळा पेजी सांच्याच्या सुमारे दीडशें पृष्ठांचा एक भाग असे अकरा भाग काढून स्वामींचे **समग्र ग्रंथ** पुरे केले आहेत. स्वामींच्या उपदेशाबरोबर स्वामींच्या दर्शनाचा नित्य लाभ घडावा ह्मणून निरनिराळ्या पेहेरावांतील स्वामींचा **एकेक फोटो** दर भागांत दिला आहे. **समग्र ग्रंथांच्या** अकरा भागांची किंमत प्रत्येकीं **कागदी बांधणी** बारा आणे, व **कापडी बांधणी** एक रुपया. (शिवाय ट. ख.)

**जेव्हां सूर्योदय होईल !** गुप्त पोलिसाच्या चातुर्याची **मनोरंजक व बोधप्रद** कादंबरी. (लेखक—भास्कर विष्णु फडके, बी. ए.) आवृत्ति दुसरी. दोन सुंदर चित्रे. किं. बारा आणे, व्ही.पी.नें चौदा आणे.

**दिशाभूल !** ( लेखक–भास्कर विष्णु फडके बी. ए. ) नवीन सचित्र सामाजिक कादंबरी. हींत आधुनिक **स्त्रीशिक्षणाच्या प्रश्नाचें अनुभवाच्या प्रकाशांत** सुंदर विवेचन केलें आहे. किं. १२ आणे. व्ही.पी.नें १४ आणे.

पत्ता—**भास्कर विष्णु फडके**, हिरजी आसूची वाडी, पोष्ट माटुंगा, मुंबई.

## GENERAL LITERATURE.

| | Rs. As. |
|---|---|
| ATLAS OF THE WORLD. | 0–8 |
| AVIATION. | 0–8 |
| LITERATURE OF GERMANY. | 1–0 |
| RUSSIAN LITERATURE. | 1–0 |
| FRIEDRICH NIETZSCHE. | 0–8 |
| LIFE OF NAPOLEAN BONAPARTE. | 1–0 |
| WELLINGTON AND WATERLOO. | 0–8 |
| DUTIES OF MAN. By Joseph Mazzini. | 1–0 |
| LIFE OF MAZZINI. By B. King. | 1–0 |
| ARISTOTLE'S POLITICS. | 1–0 |
| CARLYLE'S FRENCH REVOLUTION. | 2–0 |
| EMERSON'S ESSAYS. | 1–0 |
| Tolstoi—TALES AND PARABLES. | 1–0 |
| " —WAR AND PEACE. | 3–0 |
| SHIVAJI THE MARATHA. by H. G. Rawlinson. | 2–3 |
| Voltaire's LIFE OF CHARLES XII. | 1–0 |
| BACON'S ESSAYS. | 1–0 |
| THE KORAN. Translated by Rodwell. | 1–0 |
| LAMB S TALES FROM SHAKESPEARE. | 1–0 |
| FREEMAN'S GENERAL SKETCH OF EUROPEAN HISTORY. | 3–1 |
| THE SCOTTISH CHIEFS. | 2–0 |
| Scott's IVANHOE. | 1–0 |
| NATIONALITY AND EMPIRE. by Bipinchandra Pal. | 4–0 |
| Reminiscences of the late Mr. G. K. Gokhale. by. D. E. Wacha. | 0–6 |
| INDIA: A NATION. by ANNIE BESANT. | 0–10 |
| INDIA'S POLITICAL EVOLUTION. By Mr. Ambikacharan MUJUMDAR. | 2–0 |
| SPEECHES OF VIVEKANANDA. | 2–0 |
| JACK'S ENCYCLOPAEDIA. | 2–0 |
| NELSON'S ENCYCLOPAEDIA. 25 Vols. | 25–0 |
| Pear's CYCLOPAEDIA. | 1–0 |

NOTE—We supply all kinds of English, Sanskrit and Marathi books.

ASHTEKAR & Co.

*Book-Sellers and Publishers. POONA CITY.*

# उपयुक्त मराठा पुस्तकं.

| पुस्तकाचें नांव. | किंमत रु. आ. |
|---|---|
| आयर्लंडचा इतिहास (लेखक रा. न. चिं. केळकर). | १–४ |
| एकनाथचरित्र (रा. ल. रा. पांगारकर). | ०–५ |
| एकनाथी भागवत. ,, ,, | ४–८ |
| ऐतिहासिक गोष्टी भाग १. | ०–१२ |
| ,, ,, भाग २. | ०–१२ |
| ऐतिहासिक पोवाडे. | १–८ |
| कहाण्या भाग १. | ०–३ |
| ,, भाग २. | ०–५ |
| गुरुचरित्र रेशमी बांधणी मोठा टाईप. | १–८ |
| ग्यारीबाल्डीचें चरित्र (रा. न. चिं. केळकर). | १–४ |
| चरकसंहिता सार्थ (कै. शं. दा. पदेशास्त्री). | ५–० |
| जर्मनीची उत्क्रांति (रा. ना. कृ. आगाशे). | १–८ |
| ज्ञानेश्वरचरित्र (रा. ल. रा. पांगारकर). | ०–१२ |
| तुकारामाचा गाथा (बारीक टाईप). | १–० |
| ,, ,, (मोठा टाईप). | २–० |
| धर्मसिंधु सार्थ. | २–८ |
| नवविधा भक्ति. | ०–४ |
| नानांचा अधिकारयोग. | ०–१० |
| नानाफडणीसांचें चरित्र (रा. वा. वा. खरे). | १–८ |
| नारदभक्तिसूत्रें. | ०–५ |
| नित्यक्रमस्मरणी. | ०–४ |
| नेपोलियन बोनापार्टचें चरित्र (बापट). | ०–१२ |
| ,, ,, (मुंडले). | ०–१२ |
| परमार्थविचारमाला (गोविंदसुत). | १–८ |
| परमार्थसाधन. | १–८ |

# प्रकाशकांचे दोन शब्द.

सार्थ उपनिषत्संग्रहाची ही दुसरी आवृत्ति वाचकांच्या हातांत पडत आहे. पहिली आवृत्ति सन १९१४ सालीं प्रसिद्ध होऊन वर्ष सहा महिन्यांच्या आंत तिच्या सर्व प्रती संपून गेल्या. सदर आवृत्तीच्या आह्मीं एकंदर चार हजार प्रती छापविल्या होत्या, यांपैकीं तीन हजार प्रती ग्राहकांस अवघ्या सहा आणे किंमतीला दिल्या व बाकीच्या एक हजार आठ आणे किंमतीला दिल्या. ग्रंथाचें स्वरूप पहातां इतक्या अल्प किमतीला मराठी भाषेमध्ये कोणतेंहि पुस्तक मिळालेलें आमच्या पहाण्यांत किंवा ऐकण्यांत नाहीं. इतकेंच नव्हे तर, पुस्तकांच्या खर्चाच्या मानानें एवढी अल्प किंमत ही किंमत नाहीं असेंच ह्मटलें पाहिजे, हें कोणीहि पुस्तकांचा माहितगार कबूल करील. आह्मी ही गोष्ट गर्वानें नमूद करतों असें नव्हे. कारण ईशावास्यादि दहा उपनिषदे मराठी भाषांतरासह ग्राहकांस जवळ जवळ फुकट देण्याच्या हेतूनेंच आह्मीं या कामाला हात घातला होता. या कामीं आह्मांस कोणाकडून तरी मदत मिळाली असावी अशी पुष्कळांची समजूत झाली होती व अद्यापहि ती कायम आहे असें समजतें, परंतु तसा कांहीं प्रकार नव्हता व नाहीं. उलटपक्षीं कांहीं जणांना आमचा हा फसवेगिरीचा धंदा असला पाहिजे असे वाटले. परंतु ज्या तीन हजार ग्राहकांनीं आगाऊ नांवें नोंदविलीं होतीं त्यांच्या पदरांत जेव्हां केवळ सहा आण्यांमध्यें दहा उपनिषदें पडलेलीं लोकांना प्रत्यक्ष दिसलीं तेव्हां त्यांचा हा गैरसमज दूर झाला, व आपणहि जर आगाऊ नांव नोंदविलें असतें तर चांगलें झालें असतें असें वाटूं लागलें. आमची मात्र या बाबतींत अगदीं निराशा झाली ही गोष्ट येथें नमूद करणें भाग आहे. कारण दहा उपनिषदें अशा तऱ्हेनें आह्मी केवळ सहा आण्यांस (व त्याबरोबर सार्थ गीतेची एक प्रत फुकट) देण्यास तयार झालों असतां आह्मांस कमींत कमी पंचवीस हजार तरी ग्राहक

मिळतील अशी आमची समजूत होती. परंतु उपनिषदांची थोरवी कितीहि मोठी असली, पाश्चात्य देशांतले ज्ञानी उपनिषदांच्या तत्वज्ञानावर कितीहि लुब्ध झालेले असले, आज मित्तीस पाश्चात्य तत्वज्ञानानें मारलेल्या भरारीपेक्षां देखील जास्त भरारी आमच्या उपनिषत्कालीन ऋषींनीं जरी मारलेली असली, तरी त्या उपनिषदांचा,—व्यासंग तर बाजूलाच राहिला पण,—नुसता संग्रह करण्याची देखील बुद्धि आज आमच्या लोकांमध्ये फारशी उरलेली नाहीं असें आमच्या प्रत्यक्ष निदर्शनास येऊन आह्मांस त्याबद्दल खेद उत्पन्न झाला. असल्या ग्रंथाला तीन हजारांहून अधिक आगाऊ ग्राहक तेव्हां मिळाले नाहींत; कदाचित् आमच्यावर अविश्वास असल्यामुळें आगाऊ ग्राहक कमी मिळाले अशी कल्पना करून आह्मी आठ आणे किमतीला हा ग्रंथ मिळेल अशा जाहिराती दिल्या; तथापि देखील तोच अनुभव आला. सहा महिने केसरीसारख्या पत्रांत व इतरत्राहि जाहिराती देऊन आह्मांस एक हजाराहून अधिक ग्राहक मिळाले नाहींत. याप्रमाणे पहिल्या आवृत्तीच्या चार हजार प्रती आह्मी छापल्या होत्या त्या संपल्या. यानंतर पुनः एकदां शेवटचा प्रयत्न करण्याचें ठरविलें व गेल्या सालच्या सप्टेंबर महिन्यांत आह्मी पुनः एकदां उपनिषदांसंबंधाच्या जाहिराती दिल्या. या खेपेस तर आह्मी पूर्वीपेक्षांहि जास्त सवलत ठेवलेली होती. ३.वघ्या सहा आण्यांत मराठी भाषांतरासह वीस उपनिषदें आणि गीतापंचरत्नासारखें तीनशे पानांचें पुस्तक देण्यास आह्मी तयार झालों; या खेपेस आमच्या अविश्वासाची सबब नव्हती; शिवाय पूर्वीपेक्षां देखील अधिक नुकसान सोसण्यास आह्मी तयार झालों होतों. तरी देखील आह्मांस अडीच हजारांहून अधिक ग्राहक मिळाले नाहींत. या खेपेस आह्मीं जाहिरातीच्या खर्चाची शिकस्त केली होती, तथापि तिचा कांहीं उपयोग झाला नाहीं. आमच्या इच्छेप्रमाणे आह्मांस ग्राहक न मिळतां खर्चाचा बोजा तेवढा अंगावर पडला. असो; इतक्यांत युरोपांत सांप्रत चाललेल्या युद्धा-

मुळें पुस्तकें छापण्याची परिस्थिति बरीच बदलली. कागद पूर्वीपेक्षां अडीच-पटीनें महाग झाला. त्यामुळें ग्राहकांस रफ कागदावर व बारीक टाईपांत उपनिषदें छापून देण्याचें आम्हांस ठरवावें लागलें व त्याप्रमाणें छापण्याचें काम सध्यां चालू आहे. छापण्याचें काम अशा अडचणीमुळें जरा सावकाश चाललें आहे, हें सांगावयास नकोच. पुस्तकें छापून झालीं म्हणजे आगाऊ ग्राहकांकडे रवाना करण्यांत येतील.

या खेपेस दुसरी एक गोष्ट नजरेस आली ती नमूद केल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं. कांहीं थोड्या सद्गृहस्थांनीं गीतापंचरत्नाची मागणी करते वेळेस आम्हांस पत्रद्वारें लिहिलें होतें कीं, उपनिषदांसारखे पवित्र ग्रंथ आपण फुकट देत असलां तरी ते तसे घेणें आपणास प्रशस्त वाटत नाहीं; याकरितां आमच्याकडून कांहीं तरी किंमत घ्यावी. चालू युद्धामुळें बदललेल्या परिस्थितींत कोणी आपखुषीनें अशी मदत केली तर ती घ्यावी असा आम्हीं विचार ठरविला; मात्र ही गोष्ट केवळ देणाराच्या खुषीवरच आम्हीं ठेवली आणि त्यासंबंधीं व इतर एक दोन गोष्टींसंबंधीं छापील पत्रें पुण्याबाहेरच्या सर्व ग्राहकांकडे उत्तराच्या तिकीटांसह पाठवून दिलीं. आमच्या या पत्रांचा व दिरंगाईचा कांहीं कायदेबाज लोकांनीं विपर्यास करून आमच्याकडे अशीं धमकीचीं उत्तरें पाठविलीं कीं मुकाट्यानें आम्हांस अमुक दिवसांच्या आंत पुस्तकें पाठवा, नाहीं तर तुमच्यावर आम्ही कायदेशीर इलाज करूं. वास्तविक पाहिलें असतां एखाद्या गृहस्थानें कायद्याच्या कोर्टांत आम्हांस खेंचलें असतें तर चांगलेंच झालें असतें, कारण आम्हीं वचन दिल्याप्रमाणें तीन हजार प्रती लोकांना दिलेल्या आहेत, व हल्लींच्या आवृत्तीच्या प्रती देखील छापण्याचें काम चालू आहे ही गोष्ट जाहीर रीतीनें लोकांपुढें आली असती व आमचा अविश्वास वाटत असलेल्या लोकांना आपोआपच कळली असती. परंतु आमच्या दुर्दैवानें या बाबतींत आमच्यावर अद्याप कोणीं फिर्याद केली नाहीं. आतां उपनिषदें

जेव्हां ग्राहकांच्या हातांत पडतील तेव्हां तरी क्रुद्ध झालेले ग्राहक शांत होवोत ह्मणजे झालें. असो; वर उल्लेख केल्याप्रमाणें आमच्या अडीचहजार ग्राहकांपैकीं कांहीं जणांनीं कोणीं रुपया, कोणीं चार आणे, कोणीं दोन आणे कोणीं एक आणा, अशा प्रकारें मदत ह्मणून व्ही. पी.त आकारण्याविषयीं आह्मांस कळविलें. या त्यांच्या उदारपणाबद्दल आह्मी त्यांचे जाहीर रीतीनें येथें मनःपूर्वक आभार मानतों. या सर्व रकमांची बेरीज सुमारें शंभर रुपये होत आहे; परंतु सदर सद्‌गृहस्थांस आह्मी येथें नम्रतापूर्वक कळवितो कीं, मदतीची रकम व्ही. पी.मध्यें आकारावी हे आह्मांस बरें वाटत नाहीं; याकरितां ज्यांची इच्छा असेल त्यांनीं आमचे पुस्तक पोंचल्यानंतर आह्मांस जें काय पाठवावयाचें असेल तें पाठवावें. असो; मात्र आह्मांकडे केवळ निरपेक्ष बुद्धीनें ज्यांनीं या पूर्वीच आपली मदत पाठविली आहे त्यांच्या नांवांचा येथे. कृतज्ञतापूर्वक उल्लेख केल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं. सातारचे प्रसिद्ध वेदान्ती रा. रा. वामन परशुराम फणसळकर यांनीं पहिल्या प्रथम पांच रुपये आमचेकडे मनीआर्डरीनें पाठवून दिले. यानंतर आमचे मित्र रा. रा. त्र्यंबकराव गणेश पटवर्धन कागवाडकर यांनीं मुद्दाम समक्ष येऊन मदतीदाखल एक रुपया दिला. तिसऱ्या एका गृहस्थानीं आपलें नांव प्रसिद्ध करूं नये असे सांगून आठ आणे आणून दिले. याबद्दल आह्मी या सर्वांचे येथे आभार मानतो. वर लिहिल्याप्रमाणें आगाऊ ग्राहकांस आह्मी रफ कागदावरची प्रत फुकट देणार आहों हें निश्चित आहेच; त्याच्या अगोदर प्रस्तुतची गुळगुळीत कागदावरची व मोठ्या टाइपाची प्रत छापण्याचें काम आह्मी सुरू केलें होतें. ही प्रत आगाऊ ग्राहकांस कांहीं तरी सवलतीनें मिळावी याकरितां तिच्या दोन्ही भागांची मिळून आगाऊ ग्राहकांना दीड रुपया किंमत ठेवलेली आहे. या प्रतीमध्यें परिशिष्टरूपानें मांडूक्योपनिषदावरील गौडपादाचार्यांच्या कारिका भाषांतरासह दिल्या असून शेवटीं दहा उपनिषदांवर विशेष माहितीच्या थोड्याशा टीपाहि

दिलेल्या आहेत. या प्रतीमध्यें हा विशेष आहे.

सध्यांच्या परिस्थितींत या प्रतीच्या पहिल्या भागाची किंमत अडीच रुपये व दुसऱ्या भागाची किमत सव्वा रुपया ठेवणें भाग पडलें आहे. नवीन ग्राहकांना हे भाग कमी किंमतींत देणें शक्य नाहीं. फक्त आगाऊ ग्राहकांनाच—ह्मणजे ज्यांचा साधी प्रत फुकट मिळण्याचा हक्क आमच्याकडे दाखल झालेला आहे त्यांनाच—साधी प्रत नको असेल तर उंची प्रतीचे दोन्ही भाग मिळून दीड रुपया किंमतीला मिळतील. सरतेशेवटीं आणखी एका गोष्टीचा उल्लेख येथें करणें आह्मांस अवश्य वाटतें. आह्मीं एकंदर तीन प्रकारच्या उपनिषत्संग्रहाच्या सवलतीसंबंधानें आज दोन तीन वर्षे जाहिराती दिल्या. यामुळें आमचीं पुस्तकें खपत नाहींत किंवा कांहीं तरी युक्ति काढून आपलीं पुस्तकें कशींबशीं लोकांच्या गळ्यांत बांधावयाचीं, अशाकरितां आह्मी हा उद्योग करतों अशी कांहीं जणांस शंका येते. पुस्तकें छापण्यास खर्च किती लागतो, त्यांच्या जाहिरातींना खर्च किती येतो, व अखेरीस लेखकाच्या व प्रकाशकाच्या पदरांत काय पडतें याविषयींचा ज्यांनीं अनुभव घेतला आहे, अथवा ज्यांना थोडीबहुत कल्पना आहे ते आमच्यावर असला आरोप कधींहि करीत नाहींत. उलटपक्षीं त्यांना आमच्या या उद्योगाचें अत्यंत आश्चर्य वाटतें. या सर्वांस आह्मी येथें उघडपणें कळवितों कीं, आजपर्यंत उपनिषदांच्या इतक्या प्रती आह्मीं नुकसान सोसून मुद्दाम छापविल्या. यामध्यें उपनिषदांचा प्रसार व्हावा एवढाच आमचा उद्देश होता व तो आमच्या शक्तीबाहेर झीज सोसून आह्मीं इतपत तडीस नेला. यापुढे उपनिषदें सवलतीनें देणें आह्मांस शक्य नाहीं.

प्रकाशकांची प्रस्तावना याहून अधिक काय असणार ? प्रकाशक या नात्यानें सार्थ उपनिषत्संग्रहासंबंधाची वस्तुस्थिति लोकांपुढें केव्हां तरी मांडणें जरूर होतें व तें काम आह्मीं येथें केलें आहे. या ग्रंथाला संपादकाची प्रस्तावना जोडलेली नाहीं याचें कारण असल्या ग्रंथाची प्रस्तावना हा एक

स्वतंत्रच ग्रंथ होईल.

सार्थ उपनिषत्संग्रहाचा दुसरा भाग याच पुस्तकाच्या नमुन्यावर छापण्याचें काम चालू आहे व तोहि लवकरच तयार होईल. त्यानंतर राहिलेल्या उपनिषदांपैकीं कांहीं निवडक उपनिषदें मराठी भाषांतरासह याच नमुन्याप्रमाणें प्रसिद्ध करण्याचा आमचा विचार आहे.

श्रीगणेशाय नमः ॥

# सार्थ उपनिषत्संग्रह.

## ईशावास्योपनिषत् ॥१॥

ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते ॥ पूर्णस्य पूर्णमादाय पूर्ण मेवावशिष्यते ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

ॐ ईशावास्यमिदꣳ सर्वं यत्किंच जगत्यां जगत् ॥ तेन त्यक्तेन भुंजीथा मा गृधः कस्यस्विद्धनम् ॥१॥ कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतꣳ समाः ॥ एवं त्वयि नान्यथेतोऽस्ति न कर्म लिप्यते नरे ॥२॥ असुर्या नाम ते लोका अन्धेन तमसावृताः ॥ ताꣳस्ते प्रेत्याभिगच्छन्ति ये के चात्महनो जनाः ॥३॥ अनेजदेकं मनसो जवीयो

## ईशावास्योपनिषत्.

जे (ब्रह्म) पूर्ण आहे, हें (ब्रह्म) पूर्ण आहे. पूर्णापासून जें उत्पन्न होतें तेंहि पूर्णच. पूर्णामधून पूर्ण वजा केलें असतां बाकीहि पूर्णच रहातें.

या पृथ्वीवर ज्याला ह्मणून जीव आहे, तें हें सर्व परमात्म्यानें अधिष्ठित आहे अशा त्यागानें (या सर्वांचा) उपयोग कर. कोणाच्याहि धनाची आकांक्षा धरूं नकोस.१. या लोकीं याप्रमाणें ईश्वरार्पण बुद्धीनें कर्मे करीतच शंभर वर्षे जगण्याची इच्छा करावी. याप्रमाणें कर्म करीत राहिला ह्मणजे मनुष्याला कर्माचा बंध लागत नाहीं; (कर्मबंध टाळण्यास) दुसरा मार्ग नाहीं.२. (हें परमात्मस्वरूप न ओळखणारे) जे आत्मघातकी पुरुष ते मरणानंतर अंधकाररूपी अज्ञानानें आच्छादिलेले जे आसुर [=असुरांचे] लोक त्या लोकीं गमन करतात.३. (हें आत्मतत्त्व कसें तें सांगतात—) हे

नैनद्देवा आप्नुवन्पूर्वमर्शत् ॥ तद्धावतोऽन्यानत्येति तिष्ठत्तस्मिन्नपो मातरिश्वा दधाति ॥४॥ तदेजति तन्नैजति तद्दूरे तद्वन्तिके ॥ तदन्तरस्य सर्वस्य तदु सर्वस्यास्य बाह्यतः ॥५॥ यस्तु सर्वाणि भूतान्यात्मन्येवानुपश्यति ॥ सर्वभूतेषु चात्मानं ततो न विजुगुप्सते ॥६॥ यस्मिन्सर्वाणि भूतान्यात्मैवाभूद्विजानतः । तत्र को मोहः कः शोक एकत्वमनुपश्यतः ॥७॥ स पर्यगाच्छुक्रमकायमव्रणमस्नाविरꣳ शुद्धमपापविद्धम् ॥ कविर्मनीषी परिभूः स्वयंभूर्याथातथ्यतोऽर्थान्व्यदधाच्छाश्वतीभ्यः समाभ्यः ॥८॥ अन्धं तमः प्रविशन्ति येऽविद्यामुपासते ॥ ततो भूय इव ते तमो य उ विद्यायाꣳ रताः ॥९॥ अन्यदेवाहुर्विद्ययान्यदाहुरविद्यया ॥

कधीं बदलत नाहीं; हें सर्वदा एकरूप आहे; हे मनापेक्षां अधिक वेगवान् अर्थात् इंद्रियांना मागें टाकणारें असल्यामुळें इंद्रियांना कधीं प्राप्त होत नाहीं; स्वतः न धांवतांच आपल्या मागें धांवणाऱ्या इंद्रियांच्या पलीकडे हें जातें. या अविकाररूप आत्मतत्त्वाच्या आश्रयानें प्राणधारक वायु कर्में करतो.४. तें कंप पावतें, कंप पावत नाहीं; तें दूर आहे, समीप आहे; या सर्व विश्वाच्या तें आंत आहे, या सर्व विश्वाच्या तें बाहेर आहे.५. सर्व भूतमात्र जो आपल्या ठिकाणीं पहातो आणि सर्व भूतांचे ठिकाणीं आत्मस्वरूप पहातो, तो कधीं मोह पावत नाहीं.६. ज्याला सर्व भूतमात्र आत्मस्वरूपच झाले त्या सर्व एकरूप पहाणाऱ्या विद्वानाला शोक आणि मोह कोठें उरला? ७. हा आत्मा सर्वव्यापी, दीप्तिमान्, सूक्ष्म शरीरानें वर्जित, ज्याला क्षतें नाहींत व शिरा नाहींत [स्थूल शरीरानें वर्जित], अविद्यारूपी मलानें रहित, पापरहित, सर्वज्ञ, स्वतंत्र, सर्वव्यापी व स्वयंभू आहे. या आत्म्यानें ह्मणजे ईश्वरानें नित्य अशा संवत्सरनामक प्रजापतींना योग्यतेप्रमाणें कर्तव्यें विभागून दिलीं आहेत.८. (ज्ञानरहित होत्साते) जे केवळ कर्मांचें अनुष्ठान करतात ते घोर अंधकारामध्यें प्रवेश करतात. जे केवळ ज्ञानामध्यें रत होऊन कर्मांचा त्याग करतात, ते त्यापेक्षांहि घोर अशा अंधकारामध्यें

इति शुश्रुम धीराणां ये नस्तद्विचचक्षिरे ॥१०॥ विद्यां चाविद्यां च यस्तद्वेदोभयꣳ सह ॥ अविद्यया मृत्युं तीर्त्वा विद्ययामृतमश्नुते ॥११॥ अन्धं तमः प्रविशन्ति येऽसंभूतिमुपासते ॥ ततो भूय इव ते तमो य उ संभूत्याꣳ रताः ॥१२॥ अन्यदेवाहुः संभवादन्यदाहुरसंभवात् ॥ इति शुश्रुम धीराणां ये नस्तद्विचचक्षिरे ॥१३॥ संभूतिं च विनाशं च यस्तद्वेदोभयꣳ सह ॥ विनाशेन मृत्युं तीर्त्वा संभूत्यामृतमश्नुते ॥ ॥१४॥ हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम् ॥ तत्त्वं पूषन्नपावृणु सत्यधर्माय दृष्टये ॥१५॥ पूषन्नेकर्षे यम सूर्य प्राजापत्य व्यूह रश्मीन्समूह ॥ तेजो यत्ते रूपं कल्याणतमं तत्ते पश्यामि योऽसावसौ

प्रवेश करतात.९. ज्ञानाचें फळ वेगळें आहे आणि कर्माचें फळ वेगळें आहे, असें आह्मी बुद्धिमान् जनांपासून श्रवण केलें आहे. या बुद्धिमान् आचार्यांनींच आह्मांला ज्ञान व कर्म यांची फोड करून सांगितली.१०. ज्ञान आणि कर्म या दोहोंचा समुच्चय पाहिजे असें जो जाणतो तो कर्मानें संसार तरून ज्ञानानें अमृतत्वाची प्राप्ति करून घेतो.११. (ज्ञानरहित होत्साते) जे केवळ कर्माचें अनुष्ठान करतात ते घोर अंधकारामध्यें प्रवेश करतात. जे केवळ ज्ञानामध्यें रत होऊन कर्माचा त्याग करतात ते त्यापेक्षांहि घोर अशा अंधकारामध्यें प्रवेश करतात.१२. ज्ञानाचें फळ वेगळें आहे आणि कर्माचें फळ वेगळें आहे असें आह्मी बुद्धिमान् जनांपासून श्रवण केलें आहे. त्यांनींच आह्मांला ज्ञान व कर्म यांची फोड करून सांगितली.१३. ज्ञान आणि कर्म या दोहोंचा समुच्चय पाहिजे असें जो जाणतो तो कर्मानें संसार तरून ज्ञानानें अमृतत्वाची प्राप्ति करून घेतो.१४. सुवर्णाप्रमाणें चकाकणाऱ्या पात्रानें ब्रह्माचें मुख झांकलेलें आहे. ब्रह्म हाच ज्याचा धर्म आहे असा जो मी त्या मला ब्रह्माची उपलब्धि होण्याकरितां, हे सूर्या, तूं तें झांकण दूर सार.१५. जगाचें पोषण करणाऱ्या, एकटा गमन करणाऱ्या, सर्वांचें संयमन करणाऱ्या, प्रजापतीच्या पुत्रा सूर्या, तूं आपले किरण

पुरुषः सोऽहमस्मि ॥१६॥ वायुरनिलममृतमथेदं भस्मान्तꣳ शरीरम् ॥ ॐ क्रतो स्मर कृतꣳ स्मर क्रतो स्मर कृतꣳ स्मर ॥१७॥ अग्ने नय सुपथा राये अस्मान्विश्वानि देव वयुनानि विद्वान् ॥ युयोध्यस्मज्जुहुराणमेनो भूयिष्ठां ते नम उक्तिं विधेम ॥१८॥

ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते ॥ पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

इति शुक्लयजुर्वेदीयवाजसनेयिसंहितांतर्गतेशावास्योपनिषत्समाप्ता ॥

पसर आणि तेज एकत्र कर. जें तुझें अत्यंत कल्याणकारक रूप तें माझ्या दृष्टीस पडो. तें असें कीं, आदित्यमंडलस्थ जो पुरुष तोच मी.१६. (ज्ञान आणि कर्म यांच्या योगानें संस्कार पावलेला असा माझा हा) प्राण [वायुः] सर्वव्यापी [अनिलं] सूत्रात्मा [अमृतं] होवो. शरीराचें तर अखेरीस भस्मच व्हावयाचें. हे संकल्प करणाऱ्या प्राण्या, स्मरण करण्याला योग्य असें जें अग्निस्वरूपी ब्रह्म त्याचें स्मरण कर. केलेल्या कर्माचें स्मरण कर.१७. सर्व प्रकारचें कर्म आणि ज्ञान जाणणाऱ्या देवा अग्ने. (पुन्हा गमन आणि आगमन यांनीं वर्जित अशा) चांगल्या मार्गानें आह्मांला संपत्तीप्रत ह्मणजे अमृतत्वाप्रत ने. आह्मांला शत्रुरूपी असलेलें जें पाप त्याचा नाश कर. तुला आह्मी पुष्कळ नमस्कार करतों.१८.

# केनोपनिषत् ॥२॥



ॐ आप्यायन्तु ममांगानि वाक् प्राणश्चक्षुः श्रोत्रमथो बलमिंद्रियाणि च ॥ सर्वाणि सर्वं ब्रह्मोपनिषदं माहं ब्रह्म निराकुर्यां मा मा ब्रह्म निराकरोदनिराकरणमस्त्वनिराकरणमस्तु तदात्मनि निरते य उपनिषत्सु धर्मास्ते मयि सन्तु ते मयि सन्तु ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

**ॐ केनेषितं पतति प्रेषितं मनः केन प्राणः प्रथमः प्रैति युक्तः ॥ केनेषितां वाचमिमां वदन्ति चक्षुः श्रोत्रं क उ देवो युनक्ति ॥१॥ श्रोत्रस्य श्रोत्रं मनसो मनो यद्वाचो ह वाचꣳस उ प्राणस्य प्राणश्चक्षुषश्चक्षुरतिमुच्य धीराः प्रेत्यास्माल्लोकादमृता भवन्ति ॥२॥ न तत्र**

## केनोपनिषत्.



माझें शरीर, वाणी, प्राण, चक्षु, श्रोत्र, बल, (इतर) सर्व इंद्रियें वृद्धि पावोत. हे सर्व (विश्व) उपनिषदांत वर्णिलेलें ब्रह्म आहे. ब्रह्माचा तिरस्कार माझ्याकडून न होवो, ब्रह्म माझा तिरस्कार न करो. तिरस्कार न होवो, तिरस्कार न होवो. ब्रह्मात्मस्वरूपीं रत झालेला जो मी त्या माझे ठायीं उपनिषद्गत धर्म राहोत.

(आपल्या विषयाप्रत जाण्याला) प्रेरणा केलेलें मन आपल्या विषयाप्रत कोणाच्या प्रेरणेनें गमन करतें? इंद्रियांमध्ये श्रेष्ठ जो प्राण तो कोणाच्या प्रेरणेनें आपल्या विषयाप्रत गमन करतो? कोणीं प्रेरणा केलेली ही वाणी लोक बोलतात? कोणचा बरें देव, चक्षु आणि श्रोत्र यांना प्रेरणा करतो? १. श्रोत्राचें जो श्रोत्र आहे, मनाचें जो मन आहे, वाचेची जो वाचा आहे, प्राणाचा जो प्राण आहे, चक्षूचा जो चक्षु आहे, तो यांना प्रेरणा करतो. इंद्रियांचा इंद्रियभाव जे बुद्धिमान् जन टाकून देतात ते पुत्रमित्रकलत्ररूपी या लोकीं मेल्यावर अमृतत्व ह्म० मोक्ष

चक्षुर्गच्छति न वाग्गच्छति नो मनो न विद्मो न विजानीमो यथै-
तदनुशिष्यादन्यदेव तद्विदितादथो अविदितादधि ॥ इति शुश्रुम पूर्वेषां
ये नस्तद्व्याचचक्षिरे ॥३॥ यद्वाचानभ्युदितं येन वागभ्युद्यते ॥ तदेव
ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ॥४॥ यन्मनसा न मनुते येनाहु-
र्मनो मतम् ॥ तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ॥५॥ यच्चक्षुषा
न पश्यति येन चक्षूंषि पश्यति ॥ तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदि-
दमुपासते ॥६॥ यच्छ्रोत्रेण न शृणोति येन श्रोत्रमिदꣳ श्रुतम् ॥ तदेव
ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ॥७॥ यत्प्राणेन न प्राणिति येन

पावतात.२. इंद्रियांचें इंद्रियरूप जे ब्रह्म त्याप्रत चक्षु जाऊं शकत नाहीं, वाचा जाऊं शकत नाहीं, मन जाऊं शकत नाहीं. ह्मणून आह्मांला तें ब्रह्म जाणतां येत नाहीं; शिष्याला तें समजावून देतां येईल अशा रीतीनें तें आह्मांला समजलेलें नाहीं. जे जें ह्मणून ज्ञात व जें जें अज्ञात, त्या सर्वांहून निराळें हें ब्रह्म आहे. ज्या प्राचीन आचार्यांनीं आह्मांला हें समजावून दिले त्यांजकडून आह्मीं असें ऐकलें.३. जें वाणीनें बोलतां येत नाहीं, पण ज्यानें वाणी बोलली जाते, तेंच ब्रह्म असे तूं जाण; ज्या उपाधिभेदविशिष्ट अनात्म्याची ब्रह्म समजून उपासना करतात तो ब्रह्म नव्हे.४. जें कधीं मनानें मनन करीत नाहीं, ज्यानें मनाचें मनन करतां येतें असें ब्रह्मवेत्ते सांगतात, तेंच ब्रह्म असें तूं जाण; ज्या उपाधि-भेदविशिष्ट अनात्म्याची ब्रह्म समजून उपासना करतात तो ब्रह्म नव्हे.५. जें चक्षूनें पहातां येत नाहीं, ज्यानें चक्षु दिसतात, तेंच ब्रह्म असें तूं जाण; ज्या उपाधिभेदविशिष्ट अनात्म्याची ब्रह्म समजून उपासना करतात तो ब्रह्म नव्हे.६. जें कधीं श्रोत्रानें श्रवण केलें जात नाहीं, पण ज्यानें श्रोत्राचें श्रवण करतां येतें, तेंच ब्रह्म असे तूं जाण; ज्या उपाधिभेदविशिष्ट अनात्म्याची ब्रह्म समजून उपासना करतात तो ब्रह्म नव्हे.७. ज्याचा प्राणानें श्वास घेतां येत नाहीं, पण जें प्राणाचा श्वास घेतें, तेंच ब्रह्म

प्राणः प्राणीयते ।। तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ॥८॥
इति प्रथमः खंडः ॥१॥

यदि मन्यसे सुवेदेति दभ्रमेवापि नूनं त्वं वेत्थ ब्रह्मणो रूपं यदस्य त्वं यदस्य च देवेष्वथ नु मीमांस्यमेव ते मन्ये विदितम् ॥१॥ नाहं मन्ये सुवेदेति नो न वेदेति वेद च ॥ यो नस्तद्वेद तद्वेद नो न वेदेति वेद च ॥२॥ यस्यामतं तस्य मतं मतं यस्य न वेद सः ॥ अविज्ञातं विजानतां विज्ञातमविजानताम् ॥३॥ प्रतिबोधविदितं मतममृतत्वं हि विन्दते ॥ आत्मना विन्दते वीर्यं विद्यया विन्दतेऽमृतम्

असें तूं जाण; ज्या उपाधिभेदविशिष्ट अनात्म्याची ब्रह्म समजून उपासना करतात तें ब्रह्म नव्हे.८.

'मला या ब्रह्माचें स्वरूप उत्तम प्रकारें समजलें' असें जर तुला वाटलें तर खरोखर या ब्रह्माचें जें स्वरूप तें तुला अल्प समजलें आहे. 'मला या ब्रह्माचें अधिदैवत स्वरूप समजलें' असें जर तुला वाटेल तर तें देखील तुला अल्पच समजलें. मला वाटतें, पुन्हां तूं ब्रह्माचें ज्ञान करून घे. (शिष्यानें पुन्हां विचार करून सांगितलें,) 'समजलें.१. मला ब्रह्म नीटपणें समजलें नाहीं ही गोष्ट मला समजली. ब्रह्म समजलें नाहीं असें नाहीं, समजलें असेंहि नाहीं. आमच्यापैकीं ज्याला हें माझें ह्मणणें [नो न वेदेति वेद च] कळलें त्याला (माझ्या मतें) ब्रह्म समजलें.'२. ज्याला वाटतें, मला ब्रह्म समजलें नाहीं, त्याला ब्रह्म समजलें. ज्याला वाटतें, मला ब्रह्माचें ज्ञान झालें, त्याला ब्रह्माचें ज्ञान झालें नाहीं. आपल्याला ब्रह्माचें ज्ञान झालें असें ज्यांना वाटतें त्यांना मुळींच ज्ञान झालेलें नाहीं. आपल्याला ब्रह्माचें मुळींच ज्ञान झालें नाहीं असें ज्यांना वाटतें त्यांना ब्रह्माचें ज्ञान झालें असें समजावें.३. सतत सारखें रहाणारें जें ज्ञान तें खरें ज्ञान होय. कारण त्यानें अमृतत्वाची प्राप्ति होते. (इतर साधनांनीं कांहीं) सामर्थ्य प्राप्त झालें तर तें (या देहामध्यें) या स्वरूपामध्यें असेपर्यंतच काय

॥४॥ इह चेदवेदीदथ सत्यमस्ति न चेदिहावेदीन्महती विनष्टिः ॥
भूतेषु भूतेषु विचित्य धीराः प्रेत्यास्माल्लोकादमृता भवन्ति ॥५॥
इति द्वितीयः खंडः ॥२॥

ब्रह्म ह देवेभ्यो विजिग्ये तस्य ह ब्रह्मणो विजये देवा अमहीयन्त त ऐक्षन्तास्माकमेवायं विजयोऽस्माकमेवायं महिमेति ॥१॥ तद्धैषां विजज्ञौ तेभ्यो ह प्रादुर्बभूव तन्न व्यजानन्त किमिदं यक्षमिति ॥२॥ तेऽग्निमब्रुवञ्जातवेद एतद्विजानीहि किमेतद्यक्षमिति तथेति ॥३॥ तदभ्यद्रवत्तमभ्यवदत्कोऽसीत्यग्निर्वा अहमस्मीत्यब्रवीज्जातवेदा वा अहमस्मीति ॥४॥ यस्मिंस्त्वयि किं वीर्यमित्यपीदꣳ सर्वं दहेयं यदिदं पृथि-

तें प्राप्त होतें. पण ज्ञानाने मनुष्य मृत्यूचाच नाश प्राप्त करून घेतो.४. या लोकीं जर आत्मस्वरूपाचें ज्ञान झालें तर त्यामध्यें सार्थकता आहे; या लोकीं जर आत्मस्वरूपाचें ज्ञान झालें नाहीं तर महान् नाश आहे. चराचर भूतमात्राचे ठिकाणीं आत्मतत्त्व ब्रह्म आहे हे जाणणारे बुद्धिमान् जन या मृत्युलोकामधून गेल्यावर अमृतत्व पावतात ह्म० ब्रह्मच होतात.५.

ब्रह्मानें देवांना (असुरांवर) जय मिळवून दिला; त्या ब्रह्मानें मिळवून दिलेल्या विजयानें देवांना महिमा प्राप्त झाला. देवांना वाटलें कीं, आमचाच हा विजय आहे, आमचाच हा महिमा आहे.१. ब्रह्मानें देवांचें हें मिथ्या ज्ञान जाणलें आणि देवांच्या पुढें ब्रह्म प्रकट झालें. तेव्हां हा पूजनीय महान् प्राणी कोण आहे हे देवांनीं ओळखलें नाहीं.२. देव अग्नीला ह्मणाले, "हे जातवेद [सर्व जाणणाऱ्या], हे काय आहे ते जाण; हे पूजनीय आहे काय?" अग्नीनें उत्तर केलें, "बरें आहे."३. अग्नि ब्रह्माकडे गेला. ब्रह्मानें विचारलें, "तूं कोण आहेस?" अग्नि ह्मणाला, "मी अग्नि आहें; मी जातवेद या नांवानेंहि प्रसिद्ध आहें."४. ब्रह्म ह्मणालें, "अशा नांवांनीं प्रसिद्ध असलेल्या तुझ्यामध्यें कोणतें सामर्थ्य आहे?" अग्नि "हें जे पृथिवीमध्यें आहे तें सर्व मी दहन करूं शकतो."५.

**त्र्यामिति ॥५॥ तस्मै तृणं निदधावेतद्दहेति तदुपप्रेयाय सर्वजवेन तन्न शशाक दग्धुं स तत एव निववृते नैतदशकं विज्ञातुं यदेतद्यक्षमिति ॥६॥ अथ वायुमब्रुवन्वायवेतद्विजानीहि किमेतद्यक्षमिति तथेति ॥७॥ तदभ्यद्रवत्तमभ्यवदत्कोऽसीति वायुर्वा अहमस्मीत्यब्रवीत् मातरिश्वा वा अहमस्मीति ॥८॥ तस्मिंस्त्वयि किं वीर्यमित्यपीदꣳ सर्वमाददीयं यदिदं पृथिव्यामिति ॥९॥ तस्मै तृणं निदधावेतदादत्स्वेति तदुपप्रेयाय सर्वजवेन तन्न शशाकादातुं स तत एव निववृते नैतदशकं विज्ञातुं यदेतद्यक्षमिति ॥१०॥ अथेंद्रमब्रुवन्मघवन्नेतद्विजानीहि किमेतद्यक्षमिति ॥ तथेति तदभ्यद्रवत्तस्मात्तिरोदधे ॥११॥ स तस्मिन्नेवा-**

ब्रह्मानें अग्नीच्या पुढें तृण ठेविले व सांगितलें, "हें दहन कर." अग्नि आपल्या सर्व वेगानें त्या तृणाकडे धांवला, पण त्याचें दहन करण्याला समर्थ झाला नाहीं. तेव्हां त्या ब्रह्मापासून तो माघारा देवांकडे गेला आणि ह्मणाला, "हे पूजनीय आहे किंवा काय तें मी जाणूं शकलों नाहीं."६. नंतर देव वायूला ह्मणाले, "वायो हे काय आहे तें जाण; हे पूजनीय आहे काय?" वायूनें उत्तर केले, "बरें आहे."७. वायु ब्रह्माकडे गेला. ब्रह्मानें विचारलें, "तूं कोण आहेस?" वायु ह्मणाला, "मी वायु आहें; अंतरिक्षांत गमन करणारा ह्मणून मातरिश्वा या नांवानेंहि मी प्रसिद्ध आहें."८. ब्रह्म ह्मणालें, "अशा नांवांनीं प्रसिद्ध असलेल्या तुझ्यामध्यें कोणतें सामर्थ्य आहे?" वायु ह्मणाला, हे जे पृथिवीमध्यें आहे तें सर्व मी घेऊं शकतो."९. ब्रह्मानें वायूच्या पुढें तृण ठेविलें व सांगितलें "हे घे." वायु आपल्या सर्व वेगानें त्या तृणाकडे धांवला, पण त्याचें ग्रहण करण्याला समर्थ झाला नाहीं. तेव्हां त्या ब्रह्मापासून तो माघारा देवांकडे गेला आणि ह्मणाला, "हें पूजनीय आहे किंवा काय तें मी जाणूं शकलों नाहीं."१०. नंतर देव इंद्राला ह्मणाले, "मघवन्, हें काय आहे तें जाण; हे पूजनीय आहे काय?" इंद्रानें उत्तर केलें, " बरें

**काशे स्त्रियमाजगाम बहुशोभमानामुमां हैमवतीं ताꣳ होवाच किमेतद्यक्षमिति ॥१२॥ इति तृतीयः खंडः ॥३॥**

**सा ब्रह्मेति होवाच ब्रह्मणो वा एतद्विजये महीयध्वमिति ततो हैव विदांचकार ब्रह्मेति ॥१॥ तस्माद्वा एते देवा अतितरामिवान्यान्देवान्यदग्निर्वायुरिंद्रस्ते ह्येनं नेदिष्ठं पस्पर्शुस्ते ह्येनत्प्रथमो विदांचकार ब्रह्मेति ॥२॥ तस्माद्वा इंद्रोऽतितरामिवान्यान्देवान्स ह्येनन्नेदिष्ठं पस्पर्श स ह्येनत्प्रथमो विदांचकार ब्रह्मेति ॥३॥ तस्यैष आदेशो यदेतद्विद्युतो व्यद्युतदा३ इतीति न्यमीमिषदा३ इत्यधिदैवतम् ॥४॥ अथाध्यात्मं यदेतद्गच्छतीव च मनोऽनेन चैतदुपस्मरत्यभीक्ष्णं संकल्पः ॥५॥ तद्ध**

आहे.'' इंद्र ब्रह्माकडे गेला. इंद्रापासून ब्रह्म अंतर्धान पावलें.११. इंद्र त्याच जागीं स्तब्ध राहिला. (तेथें) सुवर्णाप्रमाणें दिसणारी व अतिशय शोभणारी अशी दिव्य स्त्री उमा प्रादुर्भूत झाली. इंद्र तिला ह्मणाला, ''आतां अंतर्धान पावलेलें तेंच पूजनीय (ब्रह्म) का?''१२.

उमा ह्मणाली, ''तें ब्रह्म आहे. ब्रह्माच्या विजयानें तुह्मांला हा महिमा प्राप्त झाला आहे.'' तेव्हां इंद्राला समजलें, हें ब्रह्म आहे.१. ज्या अर्थी अग्नि, वायु व इन्द्र या देवांनीं अति समीप जाऊन ब्रह्माला स्पर्श केला व ज्या अर्थी त्यांनीं 'हे ब्रह्म' असें प्रथम जाणलें, त्या अर्थी हे इतर देवांहून श्रेष्ठ आहेत.२. ज्या अर्थी इंद्रानें अति समीप जाऊन ब्रह्माला स्पर्श केला व ज्या अर्थी त्यानें 'हें ब्रह्म' असें प्रथम जाणलें त्या अर्थी इंद्र इतरांहून [अग्नि व वायु यांहून] श्रेष्ठ आहे.३. या ब्रह्माला उपमा द्यावयाची ह्मटली ह्मणजे जसें विजेचें चमकणें व अन्तर्धान पावणें त्याप्रमाणें हें आहे. ही देवताविषयक उपमा झाली.४. या ब्रह्माला आत्मविषयक उपमा द्यावयाची ह्मटली ह्मणजे जसे मनाचें सर्वत्र जाणें त्याप्रमाणें हे आहे. या मनाचेंच 'मी ब्रह्म आहे' असा निरंतर संकल्प करितां येतो.५. तें ब्रह्म तद्वन ह्मणजे प्राणिमात्रानें पूजन करण्याला योग्य असें आहे. 'पूजन करण्याला योग्य' या गुणानें

तद्वनं नाम तद्वनमित्युपासितव्यं स य एतदेवं वेदाभि हैनं सर्वाणि भूतानि संवांछन्ति ॥६॥ उपनिषदं भो ब्रूहीत्युक्ता त उपनिषद्ब्राह्मीं वाव त उपनिषदमब्रूमेति ॥७॥ तस्यै तपो दमः कर्मेति प्रतिष्ठा वेदाः सर्वांगानि सत्यमायतनम् ॥८॥ यो वा एतामेवं वेदापहत्य पाप्मानमनन्ते स्वर्गे लोके ज्येये प्रतितिष्ठति प्रतितिष्ठति ॥९॥ इति चतुर्थः खंडः ॥४॥

ॐ आप्यायन्तु ममांगानि वाक्प्राणश्चक्षुः श्रोत्रमथो बलमिन्द्रियाणि च ॥ सर्वाणि सर्वं ब्रह्मोपनिषदं माहं ब्रह्म निराकुर्यां मा मा ब्रह्म निराकरोदनिराकरणं मेऽस्त्वनिराकरणं मेऽस्तु तदात्मनि निरते य उपनिषत्सु धर्मास्ते मयि सन्तु ते मयि सन्तु ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

इति सामवेदीयतलवकारोपनिषद्परपर्यायकेनोपनिषत्समाप्ता ॥

विशिष्ट अशी त्या ब्रह्माची उपासना केली पाहिजे. ब्रह्माची जो अशी उपासना करतो ह्म० जाणतो त्याला सर्व प्राणी (ब्रह्माप्रमाणेच) भजतात.६. "मला उपनिषदांचें रहस्य सांग" अशी तूं प्रार्थना केल्यावरून तुला उपनिषत् सांगितली. ब्राह्मी ह्मणजे ब्रह्माचें ज्ञान जीमध्ये सांगितले आहे अशी उपनिषत् मीं सांगितली.७. त्या उपनिषद्रूपी पुरुषाचे तप, दम व कर्म हे पाय आहेत, वेद हे सर्व शरीर, आणि सत्य हें आधारस्थान होय.८. जो या ब्रह्मविद्येला वर लिहिलेल्या प्रकारे जाणतो त्याच्या पापाचा नाश होऊन नाशरहित व सर्वांत श्रेष्ठ अशा सुखात्मक ब्रह्मामध्ये तो कायमचा रहातो.९.

# कठोपनिषत् ॥३॥

ॐ सह नाववतु । सह नौ भुनक्तु । सह वीर्यं करवावहै ॥ तेजस्वि नावधीतमस्तु मा विद्विषावहै ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

ॐ उशन् ह वै वाजश्रवसः सर्ववेदसं ददौ ॥ तस्य ह नचिकेता नाम पुत्र आस ॥१॥ तꣳह कुमारꣳ सन्तं दक्षिणासु नीयमानासु श्रद्धाविवेश सोऽमन्यत ॥२॥ पीतोदका जग्धतृणा दुग्धदोहा निरिंद्रियाः ॥ अनन्दा नाम ते लोकास्तान्स गच्छति ता ददत् ॥३॥ स होवाच पितरं तत कस्मै मां दास्यसीति ॥ द्वितीयं तृतीयं तꣳ

## कठोपनिषत्.

आह्मी (दोघांनीं) एकत्र रहावें, एकत्र सेवन करावें, एकत्र सामर्थ्य संपादन करावें. आमचें अध्ययन आह्मांला तेजस्वी करणारें असावें. आमच्याकडून एकमेकांचा द्वेष न घडो.

अशी आख्यायिका आहे कीं, वाजश्रवस् याचा पुत्र वाजश्रवस यानें (विश्वजित् नामक यज्ञ करून त्या यज्ञामध्यें) सर्व धन दान केलें. त्याला नचिकेतस् नांवाचा पुत्र होता. १. ऋत्विजांना दक्षिणा ह्मणून देण्याकरितां आणीत असलेल्या गाई तो पहात असतां, त्या अल्पवयस्क मुलाच्या मनांत श्रद्धा उत्पन्न झाली. तो विचार करूं लागला, कीं ज्यांच्यामध्यें पाणी पिण्याची अथवा तृण खाण्याची देखील आतां शक्ति राहिलेली नाहीं, ज्यांच्या दुधाचें दोहन होऊन गेलेलें आहे, ज्यांचीं इंद्रियें जीर्ण झालीं आहेत, अशा गाई दान देणारा यजमान अनंद (ह्मणजे सुखविरहित) लोकांप्रतच जाणार. २.३. (याप्रमाणें खेद पावून) नचिकेता आपल्या पित्याला ह्मणाला, "हे तात, कोणत्या ऋत्विजाला आपण मांझ दान करणार?" (पित्यानें उत्तर दिलें नाहीं ह्मणून) त्यानें दुसऱ्यानें व तिसऱ्यानें हाच प्रश्न केला. (तेव्हां

होवाच मृत्यवे त्वा ददामीति ॥४॥ बहूनामेमि प्रथमो बहूनामेमि मध्यमः ॥ किंस्विद्यमस्य कर्तव्यं यन्मयाद्य करिष्यति ॥५॥ अनुपश्य यथा पूर्वे प्रतिपश्य तथापरे ॥ सस्यमिव मर्त्यः पच्यते सस्यमिवाजायते पुनः ॥६॥ वैश्वानरः प्रविशत्यतिथिर्ब्राह्मणो गृहान् ॥ तस्यैतां शान्तिं कुर्वन्ति हर वैवस्वतोदकम् ॥७॥ आशाप्रतीक्षे संगतं सूनृतां चेष्टापूर्ते पुत्रपशूंश्च सर्वान् ॥ एतद्वृंक्ते पुरुषस्याल्पमेधसो यस्यानश्नन्वसति ब्राह्मणो गृहे ॥८॥ तिस्रो रात्रीर्यदवात्सीर्गृहे मेऽन-

क्रुद्ध होऊन) पिता ह्मणाला, "मी तुला मृत्यूला देणार आहें."४. (हें ऐकून नचिकेता आपल्या मनाशीं विचार करूं लागला,) पुष्कळांपेक्षां चांगल्या प्रकारानें (ह्मणजे शिष्यरूपानें) मी मृत्यूकडे जात आहे; निदान पुष्कळांच्या मानानें मध्यम प्रकारानें तरी मी मृत्यूकडे जात आहें; (अधम प्रकारानें ह्मणजे पापकर्मांचीं फळें भोगण्याकरितां मी जात नाहीं); (मी गेल्यावर) यम आतां माझ्याकडून काय बरें करवील?५. (नचिकेता आपल्या पित्याला ह्मणतो,) पूर्वी होऊन गेलेले लोक पहा किंवा सांप्रतचे लोक पहा; मनुष्य तृणाप्रमाणें नाश पावतो आणि तृणाप्रमाणेंच पुन्हां उत्पन्न होतो. (ह्मणून यमाकडे मी आनंदानें जातों).६. (नचिकेता यमाकडे गेला. यम यमलोकीं नव्हता, तो तीन दिवसांनीं आला. तोंपर्यंत नचिकेताला यमाचे द्वारीं थांबावें लागलें. यम आल्यावर त्याला नचिकेता ह्मणाला—) ब्राह्मण अतिथि गृहामध्यें वैश्वानराप्रमाणें (ह्मणजे जणूं काय गृह दहन करीत) प्रवेश करतो. याकरितां लोक पाद्य आसनादि देऊन या अतिथीची शान्ति करतात. ह्मणून हे वैवस्वता, मजकरितां उदक आण.७. ज्या अल्पबुद्धि पुरुषाच्या घरीं ब्राह्मण अतिथि उपाशीं रहातो त्याच्या, आशा [कनकाचलादिकांसारखी अनिर्ज्ञेय वस्तु प्राप्त होण्याची इच्छा], प्रतीक्षा [राज्यादिकांसारखी प्रत्यक्ष ज्ञात वस्तु प्राप्त होण्याची इच्छा], देवताध्यानाचें फल, सत्य भाषण, यज्ञादिकांपासून प्राप्त होणारें स्वर्गादि फल, आरामादि क्रियांपासून

अन्ब्राह्मणातिथिर्नमस्यः ॥ नमस्तेऽस्तु ब्रह्मन्स्वस्ति मेऽस्तु तस्मात्प्रति त्रीन्वरान्वृणीष्व ॥९॥ शान्तसंकल्पः सुमना यथा स्याद्वीतमन्युर्गौतमो माभिमृत्यो ॥ त्वत्प्रसृष्टं माभिवदेत्प्रतीत एतत्त्रयाणां प्रथमं वरं वृणे ॥१०॥ यथा पुरस्ताद्भविता प्रतीत औद्दालकिरारुणिर्मत्प्रसृष्टः ॥ सुखं रात्रीः शयिता वीतमन्युस्त्वां ददृशिवान्मृत्युमुखात्प्रमुक्तम् ॥११॥ स्वर्गे लोके न भयं किंचनास्ति न तत्र त्वं न जरया बिभेति ॥ उभे तीर्त्वाशनायापिपासे शोकातिगो मोदते स्वर्गलोके ॥१२॥ स त्वमग्निꣳ स्वर्ग्यमध्येषि मृत्यो प्रब्रूहि तꣳ श्रद्दधानाय मह्यम् ॥ स्वर्गलोका

मिळणारें पितृलोकादि फल, पुत्र, पशु इत्यादि सर्व वस्तु नाश पावतात.८. यम नचिकेताला ह्मणाला, हे ब्राह्मणा, ज्या अर्थी वंदन करण्याला योग्य असा तूं अतिथि तीन अहोरात्र माझ्या घरीं उपाशीं राहिलास, त्या अर्थी हे ब्रह्मन्, तुला मी नमस्कार करतों. माझें कल्याण असावें याकरितां प्रत्येक दिवसाबद्दल एक याप्रमाणें तीन वर माझ्यापाशीं माग.९. (नचिकेता संतुष्ट होऊन ह्मणाला,) हे मृत्यो, माझा पिता गौतम माझ्या संबंधानें शान्तचित्त, प्रसन्नहृदयी व विगतक्रोध होवो; आणि तूं परत पाठविल्यावर माझी ओळख पटून तो मजबरोबर नीट भाषण करो. हा मी तीन वरांपैकीं पहिला वर मागतों.१०. यम ह्मणाला, तुझा पिता अरुणकुलोत्पन्न औद्दालकि माझ्या आज्ञेनें पूर्वी होतास तोच तूं असें तुला ओळखील. मृत्युमुखापासून मुक्त झालेल्या तुला पाहिल्यानंतरहि (भीति न वाटतां) तो रात्रीं सुखानें झोंप घेणारा व विगतक्रोध असा होईल.११. नचिकेता ह्मणाला, स्वर्गलोकामध्यें कोणतेंहि भय नाही; तेथें तुझा प्रभाव नाहीं, ह्मणून जरा प्राप्त झाली असतां इहलोकावर जसे लोक भय पावतात तसे स्वर्गामध्यें भय पावत नाहींत. क्षुधा आणि पिपासा या दोहोंच्या व शोकाच्याहि पलीकडे गेल्यामुळें स्वर्गलोकामध्यें मनुष्य आनंद पावतात.१२. हे मृत्यो, अशा स्वर्गाला नेणारा जो अग्नि त्याचें ज्ञान तुला आहे. (स्वर्गाची इच्छा करणारा) श्रद्धावन्त जो मी त्या मला तूं अग्नीचें ज्ञान कथन कर.

अमृतत्वं भजन्त एतद्द्वितीयेन वृणे वरेण ॥१३॥ प्र ते ब्रवीमि तदु मे निबोध स्वर्ग्यमग्निं नचिकेतः प्रजानन् ॥ अनन्तलोकाप्तिमथो प्रतिष्ठां विद्धि त्वमेतन्निहितं गुहायाम् ॥१४॥ लोकादिमग्निं तमुवाच तस्मै या इष्टका यावतीर्वा यथा वा ॥ स चापि तत्प्रत्यवदद्यथोक्तमथास्य मृत्युः पुनरेवाह तुष्टः ॥१५॥ तमब्रवीत्प्रीयमाणो महात्मा वरं तवेहाद्य ददामि भूयः ॥ तवैव नाम्ना भवितायमग्निः सृंकां चेमामनेकरूपां गृहाण ॥१६॥ त्रिणाचिकेतस्त्रिभिरेत्य सन्धिं त्रिकर्मकृत्तरति जन्ममृत्यू ॥ ब्रह्मजज्ञं देवमीड्यं विदित्वा निचाय्येमा॑

स्वर्गफलप्राप्तीची इच्छा करणारे यजमान अग्नीच्या योगानें देवत्व पावतात. हें अग्नीचें ज्ञान मी दुसऱ्या वरानें मागतों.१३. यम ह्मणाला, हे नचिकेता, स्वर्ग प्राप्त करून देणारा अग्नि जाणणारा मी ते अग्निज्ञान तुला सांगतों. एकाग्र होऊन ऐक. अग्नि अंतरहित अशा स्वर्गलोकाची प्राप्ति करून देणारा आहे, अग्नि (सर्व जगताचा) आधार आहे. अग्नीचें मी तुला जें ज्ञान सांगतों आहें तें अति गूढ आहे.१४. सर्व लोकांमध्यें प्रथम उत्पन्न झालेला जो अग्नि त्याबद्दल यमानें नचिकेताला सर्व ज्ञान सांगितलें. इष्टका कोणत्या आहेत, किती आहेत व त्यांनी अग्नि कसा उत्पन्न करावयाचा इत्यादि ज्ञान सांगितलें. यमानें जसें सांगितलें तसा त्याचा नचिकेतानें पुनरुच्चार करून दाखविला. तेव्हां यम संतुष्ट होऊन नचिकेताला पुन्हा पुढील भाषण बोलता झाला.१५. नचिकेतावर संतुष्ट होत्साता तो महात्मा ह्मणाला, मी तुला आतां आणखी एक वर देतों तो हा– हा अग्नि तुझ्या नांवानें यापुढें प्रसिद्ध होईल (ह्मणजे या अग्नीला आतां नाचिकेत अग्नि असें ह्मणतील). अनेक रूपांनीं युक्त अशी ही शब्दवती रत्नमयी माला घे.१६. माता, पिता व आचार्य या तिघांची सेवा करून ज्याने त्यांजकडून शिक्षण संपादन केलें आहे, नाचिकेत अग्नीचें विज्ञान, अध्ययन व अनुष्ठान ज्यानें केलें आहे, आणि इज्या, अध्ययन व दान हीं तीन कर्मे ज्यानें केलीं आहेत असा मनुष्य

शान्तिमत्यन्तमेति ॥१७॥ त्रिणाचिकेतस्त्रयमेतद्विदित्वा य एवं विद्वांश्चिनुते नाचिकेतम् ॥ स मृत्युपाशान्पुरतः प्रणोद्य शोकातिगो मोदते स्वर्गलोके ॥१८॥ एष तेऽग्निर्नचिकेतः स्वर्ग्यो यमवृणीथा द्वितीयेन वरेण ॥ एतमग्निं तवैव प्रवक्ष्यन्ति जनासस्तृतीयं वरं नचिकेतो वृणीष्व ॥१९॥ येयं प्रेते विचिकित्सा मनुष्येऽस्तीत्येके नायमस्तीति चैके ॥ एतद्विद्यामनुशिष्टस्त्वयाहं वराणामेष वरस्तृतीयः ॥२०॥ देवैरत्रापि विचिकित्सितं पुरा न हि सुविज्ञेयमणुरेष धर्मः ॥ अन्यं वरं नचिकेतो वृणीष्व मा मोपरोत्सीरति मा सृजैनम् ॥२१॥ देवैरत्रापि

जन्ममृत्यु तरून जातो, आणि हिरण्यगर्भापासून उत्पन्न झालेल्या. ज्ञाता, प्रकाशमान् व पूज्य अशा या अग्नीचें त्याला ज्ञान होऊन आत्मरूपानें दर्शन झालें ह्मणजे मग अत्यंत श्रेष्ठ अशी शान्ति त्याला प्राप्त होते. १७. यज्ञाच्या इष्टकांचें ज्ञान होऊन जो हे जाणून तीन वेळां नाचिकेत अग्नीचें अनुष्ठान करतो, तो जिवंतपणींच मृत्यूच्या पाशांचा नाश करून शोकरहित होत्साता स्वर्गलोकीं आनंद पावतो. १८. हे नचिकेता. तूं दुसरा वर ह्मणून जो मागितलास तो स्वर्गसाधनरूप असा अग्नि मी तुला सांगितला. या अग्नीला (आतां) लोक तुझ्या नांवानें ओळखतील. नचिकेता, आतां तिसरा वर माग. १९. नचिकेता ह्मणाला, मनुष्य मरण पावला ह्मणजे (शरीर, इंद्रिय, मन. बुद्धि यांहून व्यतिरिक्त व दुसऱ्या देहाशीं संबंध जोडणारा असा) आत्मा आहे असें कोणी ह्मणतात. असा आत्मा नाहीं असेंहि कोणी ह्मणतात. हा एक संशय आहे. तूं समजावून सांगितलेंस ह्मणजे मला याचें ज्ञान होईल. माझ्या वरांपैकीं हा तिसरा वर आहे. २०. यम ह्मणाला, यासंबंधाचा संशय देवांना देखील पूर्वी आला होता. हा आत्मा नांवाचा धर्म [पदार्थ] सूक्ष्म आहे; याकरितां (प्राकृत जनांना हा) चांगल्या प्रकारें समजत नाहीं. हे नचिकेता, तूं दुसरा वर पसंत कर. (हा वर देण्याचा) मला तूं आग्रह करूं नकोस. मला हा वर सोडून दे. २१. नचिकेता

विचिकित्सितं किल त्वं च मृत्यो यन्न सुविज्ञेयमात्थ ॥ वक्ता चास्य त्वादृगन्यो न लभ्यो नान्यो वरस्तुल्य एतस्य कश्चित् ॥२२॥ शतायुषः पुत्रपौत्रान्वृणीष्व बहून्पशून्हस्तिहिरण्यमश्वान् ॥ भूमेर्महदायतनं वृणीष्व स्वयं च जीव शरदो यावदिच्छसि ॥२३॥ एतत्तुल्यं यदि मन्यसे वरं वृणीष्व वित्तं चिरजीविकां च ॥ महाभूमौ नचिकेतस्त्वमेधि कामानां त्वा कामभाजं करोमि ॥२४॥ ये ये कामा दुर्लभा मर्त्यलोके सर्वान्कामाᳶश्छन्दतः प्रार्थयस्व ॥ इमाः रामाः सरथाः सतूर्या न हीदृशा लंभनीया मनुष्यैः ॥ आभिर्मत्प्रत्ताभिः परिचारयस्व नचिकेतो मरणं मानुप्राक्षीः ॥२५॥ श्वोभावा मर्त्यस्य यदन्तकैतत्सर्वेन्द्रियाणां जरयन्ति तेजः ॥ अपि सर्वं जीवितमल्पमेव तवैव वाहास्तव

ह्मणाला, हे मृत्यो, ज्या अर्थी देवांना देखील याविषयीं संशय पडला होता, आणि ज्या अर्थी हा चांगल्या प्रकारें समजत नाहीं असे तूं सांगतोस, त्या अर्थीं हा आत्मधर्म समजावून देणारा तुझ्यासारखा दुसरा कोणी मिळणें शक्य नाही आणि या वरासारखा दुसरा वरहि नाहीं."२२. यम ह्मणाला, शंभर वर्षे जगणारे पुत्र, पौत्र माग; हत्ती, घोडे वगैरे पुष्कळ पशु, पुष्कळ सुवर्ण माग; पृथ्वीवर विस्तीर्ण राज्य माग; आणि इच्छा असेल तितकीं वर्षे तूं जग.२३. यांसारखा दुसराहि एखादा वर तुला वाटत असेल तर माग; संपत्ति माग; दीर्घायुष्य माग; हे नचिकेता, विस्तीर्ण अशा भूमीवर तूं राजा हो. इच्छेनुसार सर्व इच्छा भोगणारा असा मी तुला करतों.२४. जे जे मनोरथ मृत्युलोकामध्यें दुर्लभ असतील ते ते सर्व तुझ्या इच्छेप्रमाणें मजपाशीं माग. या अशा नितंबवती आणि हातांमध्यें तूर्य वाद्य धारण करणाऱ्या दिव्य स्त्रिया आहेत. मनुष्यांना अशा मिळणें शक्य नाहीं. मी (मृत्युलोकीं) यांना पाठवितों; तूं त्यांच्याकडून सेवा करून घे. हे नचिकेता, (पण) मरणासंबंधाचा प्रश्न विचारूं नकोस.२५. नचिकेता ह्मणाला, हे मनुष्यांचा अंत करणाऱ्या मृत्यो, हे सर्व भोग आज आहेत आणि उद्यां नाहींत अशा

नृत्यगीते ॥२६॥ न वित्तेन तर्पणीयो मनुष्यो लप्स्यामहे वित्तमद्राक्ष्म चेत्त्वा ॥ जीविष्यामो यावदीशिष्यसि त्वं वरस्तु मे वरणीयः स एव ॥२७॥ अजीर्यताममृतानामुपेत्य जीर्यन्मर्त्यः क्वधःस्थः प्रजानन् ॥ अभिध्यायन्वर्णरतिप्रमोदानतिदीर्घे जीविते को रमेत ॥२८॥ यस्मिन्निदं विचिकित्सन्ति मृत्यो यत्सांपराये महति ब्रूहि नस्तत् ॥ योऽयं वरो गूढमनुप्रविष्टो नान्यं तस्मान्नचिकेता वृणीते ॥२९॥ इति प्रथमा वल्ली ॥१॥

अन्यच्छ्रेयोऽन्यदुतैव प्रेयस्ते उभे नानार्थे पुरुषꣳ सिनीतः॥

प्रकारचे (क्षणिक) आहेत. हे भोग सर्व इंद्रियांचें तेज क्षीण करतात. (मला तूं दीर्घायुष्य देणार ह्मणतोस तर) जेवढें ह्मणून (प्रत्यक्ष ब्रह्मदेवाचें देखील) आयुष्य तेवढें सर्व अल्प आहे. तुझ्या नितंबवती अप्सरा राहोत आणि त्यांचीं तीं नृत्यगीतेंहि राहोत.२६. धनानें मनुष्याची तृप्ति होत नाहीं. तुझें दर्शन असलें ह्मणजे मला (पाहिजे असेल तितकें) धन मिळेल. जोंपर्यंत तूं मरणाचा नियन्ता आहेस तोंपर्यंत मला आयुष्यहि मिळेल. (पण) मला तोच वर मागावयाचा आहे.२७. जरा व मरण यांनीं युक्त असलेला, खालीं पृथ्वीवर रहाणारा, कोणता प्राणी गायन [वर्णः], रति व यांपासून होणारा आनंद हीं सर्व (नाशयुक्त आहेत असें) जाणल्यावर, आणि अजर व अमर अशा देवांकडे जाऊन (यांहून उत्कृष्ट प्राप्तव्य आहे असें) ज्ञान प्राप्त झाल्यावर, अतिदीर्घ जीवितामध्यें रममाण होईल?२८. हे मृत्यो, ज्या आत्म्याविषयीं (शाश्वत आहे कीं अशाश्वत आहे) अशा प्रकारें चिकित्सा करतात, त्या आत्म्याचें महत्त्वाच्या [महति] अशा परलोकासंबंधाचें [सांपराये] जें (निर्णायक ज्ञान) तें मला सांग. गहन विवेचनाचा विषय झालेला जो हा वर त्याहून दुसरा वर मी नचिकेता मागत नाहीं.२९.

श्रेय [कल्याणप्राप्ति] वेगळें आहे आणि प्रेय [प्रियप्राप्ति] वेगळें आहे. हीं दोन भिन्न अर्थ प्राप्त करून देणारीं आहेत. या दोघांनीं मनुष्य बद्ध

तयोः श्रेय आददानस्य साधु भवति हीयतेऽर्थाद्य उ प्रेयो वृणीते ॥१॥ श्रेयश्च प्रेयश्च मनुष्यमेतस्तौ संपरीत्य विविनक्ति धीरः ॥ श्रेयो हि धीरोऽभिप्रेयसो वृणीते प्रेयो मन्दो योगक्षेमाद्वृणीते ॥२॥ स त्वं प्रियान्प्रियरूपाꣳश्च कामानभिध्यायन्नचिकेतोऽत्यस्राक्षीः ॥ नैतां सृंकां वित्तमयीमवाप्तो यस्यां मज्जन्ति बह्वो मनुष्याः ॥३॥ दूरमेते विपरीते विषूची अविद्या या च विद्येति ज्ञाता ॥ विद्याभीप्सिनं नचिकेतसं मन्ये न त्वा कामा बह्वोऽलोलुपन्त ॥४॥ अविद्यायामंतरे वर्तमानाः स्वयं धीराः पंडितंमन्यमानाः ॥ दंद्रम्यमाणाः परियन्ति मूढा अंधेनैव नीयमाना यथांधाः ॥५॥ न सांपरायः प्रतिभाति बालं

आहे. या दोहोंपैकीं श्रेयाचा स्वीकार करणाराचें कल्याण होतें; जो प्रेयाचा स्वीकार करतो त्याला परमार्थप्राप्ति होत नाहीं. १. श्रेय आणि प्रेय हीं दोन मनुष्यापुढें प्राप्त झालेलीं आहेत. बुद्धिमान् मनुष्य त्यांची योग्य परीक्षा करून त्यांचें पृथक्करण करतो. बुद्धिमान् मनुष्य प्रेयाहून श्रेय पसंत करतो; आणि मंद मनुष्य योगक्षेमाला साधन ह्मणून प्रेय पसंत करतो. २. (पण) हे नचिकेता, प्रिय असलेल्या आणि प्रिय वाटणाऱ्या इच्छांचा तूं विचारपूर्वक त्याग करीत आहेस. अनेक मनुष्यांना बुडविणाऱ्या या वित्तरूपी मार्गाला [सृंकां] तूं गेला नाहीस (सारांश तूं मंद नसून बुद्धिमान् आहेस). ३. (हीं श्रेय आणि प्रेय) ज्यांना (अनुक्रमें) विद्या व अविद्या ह्मणतात तीं (एकमेकांपासून फार) दूर, विरुद्ध (प्रकारचीं) आणि भिन्न फल देणारीं [विषूची=भिन्न गति असलेलीं] आहेत. हे नचिकेता, (ज्या अर्थीं) नानाप्रकारचे काम तुला लुब्ध करूं शकले नाहींत (त्या अर्थीं) तूं विद्येची [श्रेयाची =मोक्षसाधनाची] इच्छा करणारा आहेस हें मीं जाणलें. ४. अविद्येच्या मध्यें (गुरफटून) असलेले, स्वतःला बुद्धिमान् आणि शास्त्रकुशल समजणारे, नानाप्रकारच्या मार्गांनीं जाणारे [दंद्रम्यमाणाः] मूढ लोक (जन्ममरणादि अनेक दुःखांभोंवतीं) घिरट्या घालतात. आंधळ्यांनींच आंधळ्यांना मार्ग दाख-

प्रमाद्यन्तं वित्तमोहेन मूढम् ॥ अयं लोको नास्ति पर इति मानी पुनः पुनर्वशमापद्यते मे ॥६॥ श्रवणायापि बहुभिर्यो न लभ्यः शृण्वन्तोऽपि बहवो यं न विद्युः ॥ आश्चर्यो वक्ता कुशलोऽस्य लब्धाश्चर्यो ज्ञाता कुशलानुशिष्टः ॥७॥ न नरेणावरेण प्रोक्त एष सुविज्ञेयो बहुधा चिन्त्यमानः ॥ अनन्यप्रोक्ते गतिरत्र नास्त्यणीयान्ह्यतर्क्यमणुप्रमाणात् ॥८॥ नैषा तर्केण मतिरापनेया प्रोक्तान्येनैव सुज्ञानाय प्रेष्ठ ॥ यां त्वमापः सत्यधृतिर्बतासि त्वादृङ्नो भूयान्नचिकेतः प्रष्टा ॥९॥ जानाम्यहꣳ शेवधिरित्यनित्यं न ह्यध्रुवैः प्राप्यते हि ध्रुवं तत् ॥

विला असतां त्यांची जशी स्थिति होते तद्वत्.५. प्रमादशील आणि वित्तमोहानें मूढ झालेल्या विवेकहीन मनुष्याला [बालं] परलोकाच्या प्राप्तीचें साधन [सांपरायः] दिसत नाहीं. हाच लोक आहे, दुसरा नाहीं, असें मानणारा तो (मूढ) पुन्हां पुन्हां माझ्या तावडींत सांपडतो.६. (कारण) हा (आत्मा व ज्याविषयीं तूं मला विचारीत आहेस ते तद्विषयक ज्ञान) पुष्कळांना श्रवण करण्यास देखील मिळत नाहीं; श्रवण करणारांपैकीं पुष्कळांना याचे ज्ञान होत नाहीं. (याचें ज्ञान) सांगणारा एखादाच असतो; त्यांतून याचें चांगलें ज्ञान प्राप्त झालेला क्वचित्च सांपडावयाचा. (कारण) याविषयीं पूर्ण ज्ञान असलेल्या ज्ञात्यानें उपदिष्ट असा ज्ञाता एखादाच आढळतो.७. नानाप्रकारांनीं ज्याचा विचार करतात अशा या आत्म्याविषयीं सामान्य बुद्धीचा मनुष्य जें कांहीं सांगतो त्यानें याचें बरोबर ज्ञान होणें शक्य नाहीं. केवळ सामान्यच मनुष्याच्या विचारांना येथे वाव नाहीं; कारण हा अणूपेक्षांहि सूक्ष्म असल्यामुळें तर्कानें जाणणें शक्य नाही.८. (आत्म्याविषयींचें) हें ज्ञान तर्कानें प्राप्त होणे शक्य नाहीं. हे प्रियतमा, (तार्किकाहून) इतर अशा ज्ञात्यानेंच हें ज्ञान सांगितलें असतां चांगलें समजतें. हें ज्ञान तुला प्राप्त होत आहे. खरोखर तूं सत्यनिष्ठ आहेस. हे नचिकेता, तुझ्यासारखा विचारणारा (शिष्य) मला असावा.९. हे नचि-

ततो मया नाचिकेतश्चितोऽग्निरनित्यैर्द्रव्यैः प्राप्तवानस्मि नित्यम् ॥१०॥
कामस्याप्तिं जगतः प्रतिष्ठां क्रतोरानन्त्यमभयस्य पारम् ॥ स्तोमं मह-
दुरुगायं प्रतिष्ठां दृष्ट्वा धृत्या धीरो नचिकेतोऽत्यस्राक्षीः ॥११॥ तं
दुर्दर्शं गूढमनुप्रविष्टं गुहाहितं गह्वरेष्ठं पुराणम् ॥ अध्यात्मयोगाधिगमेन
देवं मत्वा धीरो हर्षशोकौ जहाति ॥१२॥ एतच्छ्रुत्वा संपरिगृह्य
मर्त्यः प्रवृह्य धर्म्यमणुमेतमाप्य ॥ स मोदते मोदनीयँ हि लब्ध्वा
विवृतँ सद्म नचिकेतसं मन्ये ॥१३॥ अन्यत्र धर्मादन्यत्राधर्मादन्य-
त्रास्मात्कृताकृतात् ॥ अन्यत्र भूताच्च भव्याच्च यत्तत्पश्यसि तद्वद ॥१४॥

केता, (कर्मफलरूपी) निधि सर्व अनित्य हे (आतां) मला समजलें. कारण तो नित्य निधि (परमात्मा) या अनित्य साधनांनीं प्राप्त होत नाहीं. मी अनित्य द्रव्यांनी अग्नीचें हवन केले ह्मणून मला (हें अनित्य पद) काय-मचें प्राप्त झाले.१०. हे नचिकेता, पण धैर्ययुक्त अशा तूं, सर्व इच्छांचा शेवट, जगताचा आश्रय, उपासनेचे फल, अभयाचें पैलतीर, स्तुत्य, मोठें आणि विस्तीर्ण गति असलेलें असें परमात्मपद हेंच आपले अंतिम [प्रतिष्ठा] आहे असें जाणून [दृष्ट्वा] (सर्व अनित्य फलांचा) त्याग केलास! (तूं धन्य आहेस!) ११. दिसण्यास कठिण, जणूं काय अरण्यामध्यें शिर-लेला, गुहेंत लपलेला, गह्वरांत वसलेला व प्राचीन दिव्य पुरुष असा तो आत्मा अध्यात्मयोगाच्या प्राप्तीनें ज्ञात झाल्यावर बुद्धिमान् मनुष्य हर्ष व शोक या दोहोंचाहि त्याग करतो.१२. हें (आत्मज्ञान) श्रवण करून, याचें योग्य ग्रहण ह्म० मनन करून, धर्मरूप व सूक्ष्म अशा याची वृद्धि ह्म० निदिध्यासन करून याची प्राप्ति ह्मणजे साक्षात्कार झाल्यावर तो मनुष्य (अत्यंत) आनंददायक अशा वस्तूची प्राप्ति झाल्यामुळें आनंद पावतो. करितां, हे नचिकेता, तुझ्याकरितां (ब्रह्मज्ञानरूपी ठिकाणाचें) दारच उघ-डले आहे असें मला वाटतें.१३. (नचिकेता ह्मणाला,) धर्माच्या व अधर्माच्या पलीकडचें, कार्य व अकार्य यांच्या पलीकडचें, आणि भूत व भविष्य

**सर्वे वेदा यत्पदमामनन्ति तपांसि सर्वाणि च यद्वदन्ति ॥ यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति तत्ते पदꣳ संग्रहेण ब्रवीम्योमित्येतत् ॥१५॥ एतद्ध्येवाक्षरं ब्रह्म एतदेवाक्षरं परम् ॥ एतद्ध्येवाक्षरं ज्ञात्वा यो यदिच्छति तस्य तत् ॥१६॥ एतदालंबनꣳ श्रेष्ठमेतदालंबनं परम् ॥ एतदालंबनं ज्ञात्वा ब्रह्मलोके महीयते ॥१७॥ न जायते म्रियते वा विपश्चिन्नायं कुतश्चिन्न बभूव कश्चित् ॥ अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे ॥१८॥ हन्ता चेन्मन्यते हन्तुꣳ हतश्चेन्मन्यते हतम् ॥ उभौ तौ न विजानीतो नायं हन्ति न हन्यते ॥१९॥ अणोरणीयान्महतो महीयानात्मास्य जन्तोर्निहितो गुहायाम् ॥ तम-**

यांच्या पलीकडचे असें जे (ब्रह्म) तूं जाणतोस तें मला सांग.१४. (यम ह्मणाला,) सर्व वेद ज्या पदाचें प्रतिपादन करतात, सर्व तपें जें (प्राप्तव्य आहे ह्मणून) सांगतात, ज्याच्या (प्राप्तीच्या) इच्छेनें ब्रह्मचर्याचें आचरण करतात, तें पद, मी तुला थोडक्यांत सांगतों, ॐ हें आहे.१५. हेंच अक्षर ब्रह्म आहे, हेंच अक्षर परम होय. हेंच अ-क्षर [=शाश्वत] (ब्रह्म) जाणलें ह्मणजे ज्याला ज्याची इच्छा होते ते त्याला प्राप्त होतें.१६. ब्रह्मप्राप्तीचा हा मार्ग सर्वांत श्रेष्ठ आहे, सर्वांत उत्तम आहे. हा जाणल्यानें मनुष्य ब्रह्मप्राप्ति होत्साता महत्त्व पावतो.१७. हा ज्ञानस्वरूपी आत्मा जन्म पावत नाहीं अथवा मरण पावत नाहीं; हा (स्वतःहून भिन्न अशा) दुसऱ्या कोणापासून (तद्भिन्न) असा कोणी झालेला नाहीं. हा जन्मरहित, नित्य, क्षयरहित व वृद्धिरहित आहे. शरीराचा वध झाला असतां याचा वध होत नाहीं.१८. मारणारा (मनुष्य) जर समजेल कीं मी याला [आत्म्याला] मारीन, मेलेला (मनुष्य) जर समजेल कीं हा (आत्मा) मेला, तर त्या दोघांनाहि कांहीं समजत नाहीं. मारणारा मारूं शकत नाहीं आणि मेलेला मरत नाहीं.१९. या (ब्रह्मदेवापासून गवताच्या काडीपर्यंत सर्व) प्राणिमात्राचा, सूक्ष्माहून अधिक सूक्ष्म व स्थूलाहून अधिक स्थूल असा आत्मा हृदयरूपी

ऋतुः पश्यति वीतशोको धातुप्रसादान्महिमानमात्मनः ॥२०॥
आसीनो दूरं व्रजति शयानो याति सर्वतः ॥ कस्तं मदामदं देवं
मदन्यो ज्ञातुमर्हति ॥२१॥ अशरीरꣳ शरीरेष्वनवस्थेष्ववस्थितम् ॥
महान्तं विभुमात्मानं मत्वा धीरो न शोचति ॥२२॥ नायमात्मा प्रव-
चनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन ॥ यमेवैष वृणुते तेन लभ्य-
स्तस्यैष आत्मा विवृणुते तनूꣳ स्वाम् ॥२३॥ नाविरतो दुश्चरिता-
न्नाशान्तो नासमाहितः ॥ नाशान्तमानसो वापि प्रज्ञानेनैनमाप्नु-
यात् ॥२४॥ यस्य ब्रह्म च क्षत्रं च उभे भवत ओदनः ॥ मृत्यु-
र्यस्योपसेचनं क इत्था वेद यत्र सः ॥२५॥ इति द्वितीया वल्ली ॥२॥

गुहेमध्ये स्थित आहे. आत्म्याचा हा महिमा इंद्रियांच्या प्रसन्नतेमुळें [धातु-प्रसादात्] निष्काम [अक्रतुः] मनुष्य जाणतात; (व तेणेंकरून) ते शोक-रहित होतात.२०. (एरवीं सकाम प्राकृत मनुष्यांना हा ज्ञेय नाहीं. कारण,) स्थित असतां तो दूर जातो, एके ठिकाणीं असून तो सर्वत्र गमन करतो. हर्षयुक्त व हर्षरहित अशा (विरुद्धगुणयुक्त) त्या दिव्य आत्म्याला माझ्यावांचून इतर कोण जाणूं शकणार आहे?२१. (स्वतः) शरीररहित असून अनित्य [अनवस्थेषु] अशा शरीरांमध्यें रहाणाऱ्या त्या महान् व सर्वव्यापी आत्म्याला (तो मीच आहें असें) जाणून बुद्धिमान् मनुष्य शोक करीत नाहीं.२२. हा आत्मा (आत्मज्ञानाव्यतिरिक्त) शास्त्र-श्रवणानें प्राप्त होत नाहीं, बुद्धीनें समजत नाहीं, पुष्कळ श्रवणानें प्राप्त होत नाहीं. ज्या (स्वतःच्या) आत्म्याची (साधक) ज्ञान देण्याबद्दल प्रार्थना करतो त्याच आत्म्याच्या द्वारें हा (आत्मा) प्राप्त होतो. हा आत्मा त्याच साध-काला आपलें स्वरूप प्रकट करतो.२३. पापकर्मापासून परावृत्त न झालेला, (इंद्रियभोगांपासून) उपरत न झालेला, एकाग्रचित्त न झालेला अथवा शान्तिरहित चित्त असलेला, अशा मनुष्याला ज्ञानाचे योगानें देखील आत्म-प्राप्ति होत नाहीं.२४. ब्राह्मण आणि क्षत्रिय हे ज्याचें खाद्य होतात,

ऋतं पिबन्तौ सुकृतस्य लोके गुहां प्रविष्टौ परमे परार्धे ॥ छायातपौ ब्रह्मविदो वदन्ति पंचाग्नयो ये च त्रिणाचिकेताः ॥१॥ यः सेतुरीजानानामक्षरं ब्रह्म यत्परम् ॥ अभयं तितीर्षतां पारं नाचिकेतꣳ शकेमहि ॥२॥ आत्मानं रथिनं विद्धि शरीरं रथमेव तु ॥ बुद्धिं तु सारथिं विद्धि मनः प्रग्रहमेव च ॥३॥ इंद्रियाणि हयानाहुर्विषयांस्तेषु गोचरान् ॥ आत्मेंद्रियमनोयुक्तं भोक्तेत्याहुर्मनीषिणः ॥४॥ यस्त्वविज्ञानवान्भवत्ययुक्तेन मनसा सदा ॥ तस्येंद्रियाण्यवश्यानि दुष्टाश्वा इव सारथेः ॥५॥ यस्तु विज्ञानवान्भवति युक्तेन मनसा

मृत्यु (देखील) ज्याचें (उपखाद्य) होतो, असा आत्मा कसा व कोठें आहे हें तो कसा जाणूं शकेल?२५.

(प्राप्ता व प्राप्य अशा आत्म्याच्या दोन प्रकारांचे वर्णन करतात—) स्वतः केलेल्या कर्मांचें फल भोगणारे (या) शरीरामध्यें [लोके] ब्रह्मानें [परं] श्रेष्ठ [परमे] स्थान [अर्धे] अशा बुद्धीच्या [गुहां] ठिकाणीं प्रवेश केलेले (जीवात्मा व परमात्मा हे) छाया व प्रकाश यांच्याप्रमाणे आहेत असे ब्रह्मज्ञ सांगतात. तीन वेळां नाचिकेत अग्नीचें हवन केलेले गृहस्थ [पंचाग्नयः] देखील (असेच सांगतात).१. यजन करणाऱ्या (कर्मनिष्ठ) लोकांना सेतूप्रमाणें वाटणारा जो नाचिकेत अग्नि तो आह्मी जाणतों; आणि (संसार) तरूं इच्छिणारांचें भयरहित असें पैलतीर जें परब्रह्म तें देखील आह्मी जाणतों (तें ऐक).२. आत्मा हा रथी आहे, शरीर हा रथ आहे, बुद्धि हा सारथि आहे आणि मन हा लगाम आहे असें जाण.३. इंद्रियें हे अश्व, विषय हे त्यांचे मार्ग आणि इंद्रियें व मन यांसह आत्मा त्यांचा भोक्ता आहे असें विवेकी मनुष्य सांगतात.४. सर्वदा निग्रहहीन मनाचे योगानें ज्याचा बुद्धिरूपी सारथि अकुशल असतो त्याला— वाईट घोडे ज्याप्रमाणें अकुशल सारथ्याला वश नसतात त्याप्रमाणे— इंद्रियें वश नसतात.५. परंतु सर्वदा निग्रहयुक्त मनाचे योगानें ज्याचा बुद्धिरूपी सारथि

सदा ॥ तस्येंद्रियाणि वश्यानि सदश्वा इव सारथेः ॥६॥ यस्त्ववि-ज्ञानवान्भवत्यमनस्कः सदाऽशुचिः ॥ न स तत्पदमाप्नोति संसारं चाधिगच्छति ॥७॥ यस्तु विज्ञानवान्भवति समनस्कः सदा शुचिः ॥ स तु तत्पदमाप्नोति यस्माद्भूयो न जायते ॥८॥ विज्ञा-नसारथिर्यस्तु मनःप्रग्रहवान्नरः ॥ सोऽध्वनः पारमाप्नोति तद्विष्णोः परमं पदम् ॥९॥ इंद्रियेभ्यः परा ह्यर्था अर्थेभ्यश्च परं मनः ॥ मनसस्तु परा बुद्धिर्बुद्धेरात्मा महान्परः ॥१०॥ महतः परमव्यक्त-मव्यक्तात्पुरुषः परः ॥ पुरुषान्न परं किंचित्सा काष्ठा सा परा गतिः ॥११॥ एष सर्वेषु भूतेषु गूढात्मा न प्रकाशते ॥ दृश्यते

कुशल असतो, त्याला—चांगले घोडे ज्याप्रमाणें कुशल सारथ्याला वश असतात त्याप्रमाणें— इंद्रियें वश असतात.६. जो विज्ञानरूपी बुद्धीनें रहित असतो, ज्याचें मन ताब्यांत नसतें, जो सर्वदा अशुचि असतो, त्याला तें (परम) पद प्राप्त होत नाहीं; त्याला (जन्ममरणरूप) संसारच प्राप्त होतो.७. परंतु जो विज्ञानरूपी बुद्धीनें युक्त असतो, ज्याचें मन ताब्यांत असतें, जो सर्वदा शुचिर्भूत असतो, त्याला तें (परम) पद प्राप्त होतें; तें प्राप्त झाल्या-नंतर तो पुन्हां जन्म (व मरण) पावत नाहीं.८. विज्ञानरूपी बुद्धि हा ज्याचा सारथि आहे व मनोरूपी लगाम ज्यानें आंवरून धरलेले आहेत तो मनुष्य (या संसाररूपी) मार्गाचें (पैल) तीर पावतो. तेंच विष्णुरूपी पर-ब्रह्माचें श्रेष्ठ स्थान होय.९. इंद्रियांहून इंद्रियांचे अर्थ श्रेष्ठ आहेत, इंद्रि-यांच्या अर्थांहून मन श्रेष्ठ आहे, मनाहून बुद्धि श्रेष्ठ आहे आणि बुद्धीहून महान् असा आत्मा [महान्=जगतांत प्रथम अव्यक्तापासून उत्पन्न झालेलें हिरण्यगर्भरूप तत्त्व] श्रेष्ठ आहे.१०. आत्म्याहून (सर्व जगताचें बीजरूप जें) अव्यक्त (तें) श्रेष्ठ आहे; अव्यक्ताहून (सर्व कारणांचें आदिकारण असा) पुरुष [परम आत्मा] श्रेष्ठ आहे. पुरुषाहून श्रेष्ठ असें कांहींहि नाहीं. (प्राणि-मात्राची) हीच शेवटची व उत्कृष्ट गति होय.११. हा आत्मा सर्व

त्वग्रयया बुद्ध्या सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभिः ॥१२॥ यच्छेद्वाङ्मनसी प्राज्ञस्तद्यच्छेज्ज्ञान आत्मनि ॥ ज्ञानमात्मनि महति नियच्छेत्तद्यच्छे-च्छान्त आत्मानि ॥१३॥ उत्तिष्ठत जाग्रत प्राप्य वरान्निबोधत ॥ क्षुरस्य धारा निशिता दुरत्यया दुर्गं पथस्तत्कवयो वदन्ति ॥१४॥ अशब्दमस्पर्शमरूपमव्ययं तथाऽरसं नित्यमगन्धवच्च यत् ॥ अनाद्य-नंतं महतः परं ध्रुवं निचाय्य तन्मृत्युमुखात्प्रमुच्यते ॥१५॥ नाचि-केतमुपाख्यानं मृत्युप्रोक्तꣳ सनातनम् ॥ उक्त्वा श्रुत्वा च मेधावी

भूतांचे ठिकाणीं गूढरूपानें आहे; तो प्रकाशित नसतो. केवळ एकाग्र आणि सूक्ष्म अशा बुद्धीच्या योगानें सूक्ष्मदृष्टि मनुष्यांना याचें ज्ञान होतें.१२. (तें ज्ञान होण्याचा उपाय सांगतात—) विवेकी मनुष्यानें वाणीचा [ह्मणजे सर्व इंद्रियांचा] मनाचे ठिकाणीं [मनसी=मनसि] लय करावा. मनाचा ज्ञानस्वरूप बुद्धिरूपी आत्म्याचे ठिकाणीं [ज्ञाने आत्मनि] लय करावा. बुद्धीचा [ज्ञानं] महान् अशा [=प्रथमज हिरण्यगर्भरूप] आत्म्याचे ठिकाणीं लय करावा. त्या आत्म्याचा अविक्रिय अशा (मुख्य) आत्म्याचे ठिकाणीं लय करावा.१३. (याप्रमाणें परम आत्म्याचे ठिकाणीं सर्वांचा लय झाला ह्मणजे मिथ्या ज्ञानाची निवृत्ति होते. ह्मणून हे जीवहो, आत्मज्ञानप्राप्ती-करितां) उठा, (अज्ञाननिद्रेंतून) जागे व्हा, श्रेष्ठ अशा (ज्ञानवान्) आचा-र्यांकडे जाऊन हें आत्मज्ञान प्राप्त करून घ्या. ज्याप्रमाणें वस्तऱ्याच्या तीक्ष्ण केलेल्या धारेवर पाय ठेवून जाणें अशक्य असतें त्याप्रमाणें हा (आत्म-ज्ञानाचा) मार्ग चालण्यास अत्यंत कठिण आहे असें ज्ञानी लोक सांग-तात.१४. शब्दरहित, स्पर्शरहित, रूपरहित, क्षयरहित, रसरहित, नित्य [न बदलणारें], गंधरहित, आदिरहित, अंतरहित, महत्तत्त्वाहून श्रेष्ठ आणि शाश्वत असें जें ब्रह्म तें जाणल्यानें (जन्म व) मरण यांच्यापासून सुटका होते.१५. यमानें नचिकेतस् याला सांगितलेलें हें सनातन उपाख्यान (इतरांना) सांगितल्यानें अथवा (ज्ञात्यांपासून) श्रवण केल्यानें बुद्धिमान्

ब्रह्मलोके महीयते ॥१६॥ य इमं परमं गुह्यं श्रावयेद्ब्रह्मसंसदि ॥ प्रयतः श्राद्धकाले वा तदानन्त्याय कल्पते तदानन्त्याय कल्पत इति ॥१७॥ इति तृतीया वल्ली ॥३॥ ॥ इति प्रथमोऽध्यायः ॥१॥

परांचि खानि व्यतृणत्स्वयंभूस्तस्मात्पराङ् पश्यति नान्तरात्मन् ॥ काश्चिद्धीरः प्रत्यगात्मानमैक्षदावृत्तचक्षुरमृतत्वमिच्छन्॥१॥ पराचः कामाननुयन्ति बालास्ते मृत्योर्यन्ति विततस्य पाशम् ॥ अथ धीरा अमृतत्वं विदित्वा ध्रुवमध्रुवेष्विह न प्रार्थयन्ते ॥२॥ येन रूपं रसं गन्धं शब्दान्स्पर्शांश्च मैथुनान् ॥ एतेनैव विजानाति किमत्र परिशिष्यत एतद्वै तत् ॥३॥ स्वप्नांतं जागरितांतं चोभौ येना-

मनुष्य ब्रह्मलोकामध्यें महत्त्व पावतो [=ब्रह्मरूप होतो].१६. हें अत्यंत गूढ आख्यान जो कोणी शुचिर्भूत होत्साता ब्राह्मणांच्या सभेला ऐकवील अथवा श्राद्धकालीं (भोजन करणारांना) ऐकवील त्याचें तें कृत्य अनंतफलदायक होईल.१७.

## अध्याय दुसरा.

बहिर्मुख (अशीं) इंद्रियें (फक्त) परमेश्वरानें मारून टाकलीं आहेत (इतरांनीं कोणीं नाहीं). ह्मणून (मनुष्य) बाहेर [विषयांकडे] पहातो, अंतरात्म्याकडे पहात नाहीं. एखादाच बुद्धिमान् मनुष्य मोक्षाची इच्छा करणारा होत्साता व सर्व इंद्रियें अंतर्मुख केलेला (इंद्रियांहून) उलट गमन करणाऱ्या [ह्म० अंतर्मुख] आत्म्याला पहातो.१. अल्पबुद्धि मनुष्य बाह्य विषयांच्या मागें जातात (ह्मणून) ते सर्वगामी मृत्यूच्या पाशाप्रत जातात. परंतु बुद्धिमान् मनुष्य (प्रत्यगात्मस्वरूप) अमृतत्व हेंच शाश्वत आहे असें जाणून या लोकीं अनित्य विषयांची इच्छा करीत नाहींत. २. (जें जाणल्यानें विवेकी इतर कशाची इच्छा करीत नाहींत तें कसें प्राप्त होतें ते सांगतात—) ज्याच्या योगानें रूप, रस, गंध, शब्द, स्पर्श आणि मैथुन हे देहादिलक्षणी विषय जाणतां येतात तो हा (देहाहून भिन्न)

नुपश्यति ॥ महान्तं विभुमात्मानं मत्वा धीरो न शोचति ॥४॥ य इमं मध्वदं वेद आत्मानं जीवमन्तिकात् ॥ ईशानं भूतभव्यस्य न ततो विजुगुप्सत एतद्वै तत् ॥५॥ यः पूर्वं तपसो जातमद्भ्यः पूर्वमजायत ॥ गुहां प्रविश्य तिष्ठन्तं यो भूतेभिर्व्यपश्यत एतद्वै तत् ॥६॥ या प्राणेन संभवत्यदितिर्देवतामयी ॥ गुहां प्रविश्य तिष्ठन्तीं या भूतेभिर्व्यजायत एतद्वै तत् ॥७॥ अरण्योर्निहितो जातवेदा गर्भ इव सुभृतो गर्भिणीभिः ॥ दिवे दिव ईड्यो जागृवद्भिर्हविष्मद्भिर्मनुष्येभिरग्निरेतद्वै तत् ॥८॥ यतश्चोदेति सूर्योऽस्तं यत्र च गच्छति ॥

आत्माच आहे. आत्म्याला अविज्ञेय असे या लोकीं कोणतंहि ज्ञान नाहीं. नचिकेता, तूं विचारलेला (आत्मा) तो हा.३. स्वप्नामध्ये आणि जागृतीमध्ये जाणले जाणारे सर्व विषय ज्या आत्म्याच्या योगानें मनुष्य जाणतो तो आत्मा महान् व सर्वव्यापी (परमात्मा) आहे असें ज्ञान झाल्यावर बुद्धिमान् मनुष्य शोक करीत नाहीं.४. कर्मफलाचा भोक्ता [मध्वदं] हा जीव आत्म्याहून भिन्न नाहीं आणि हाच भूतभविष्याचा स्वामी आहे असें ज्याला ज्ञान होतें तो मग (स्वतःच्या) संरक्षणाची इच्छा करीत नाहीं [ह्म० निर्भय होतो]. तूं विचारलेला आत्मा तो हा.५. जो तपाच्या अगोदर उत्पन्न झाला, उदक इत्यादि पंचमहाभूतांच्या अगोदर उत्पन्न झाला, (प्राणिमात्राच्या) हृदयाकाशामध्यें [गुहां] प्रवेश करून (पांच) भूतांसहवर्तमान रहात असलेला असा जो आत्मा कोणी (मुमुक्षु) पहातो तोच ब्रह्म होय. तूं विचारलेला आत्मा तो हा.६. शब्दादि विषय भक्षण करणारी [अदिति] देवतारूपी जी ब्रह्माबरोबर उत्पन्न झाली, (प्राणिमात्राच्या) हृदयाकाशामध्ये प्रवेश करून रहाणारी व जी भूतांबरोबर उत्पन्न झाली, अशी जी (हिरण्यगर्भरूपी देवता) ती (देखील) हेंच ब्रह्म होय.७. गर्भिणी स्त्रियांनी काळजीपूर्वक रक्षण केलेल्या गर्भाप्रमाणें, जागरूक असे ऋत्विज ज्याचें दररोज (रक्षण व) स्तवन करतात असा

तं देवाः सर्वेऽर्पितास्तदु नात्येति कश्चन एतद्वै तत् ॥९॥ यदेवेह तदमुत्र यदमुत्र तदन्विह ॥ मृत्योः स मृत्युमाप्नोति य इह नानेव पश्यति ॥१०॥ मनसैवेदमाप्तव्यं नेह नानास्ति किंचन ॥ मृत्योः स मृत्युं गच्छति य इह नानेव पश्यति ॥११॥ अंगुष्ठमात्रः पुरुषो मध्य आत्मनि तिष्ठति ॥ ईशानो भूतभव्यस्य न ततो विजुगुप्सत एतद्वै तत् ॥१२॥ अंगुष्ठमात्रः पुरुषो ज्योतिरिवाधूमकः ॥ ईशानो भूतभव्यस्य स एवाद्य स उ श्व एतद्वै तत् ॥१३॥ यथोदकं दुर्गे वृष्टं पर्वतेषु विधावति ॥ एवं धर्मान्पृथक् पश्यंस्तानेवानुविधावति

दोन अरणींमध्ये असणारा जो जातवेद अग्नि तो (देखील) हेंच ब्रह्म होय. ८. ज्यापासून सूर्य उदय पावतो व ज्यामध्यें अस्त पावतो त्यामध्यें सर्व देव (चक्राच्या मध्यभागीं सर्व अरा बसविलेल्या असतात त्याप्रमाणें) बसविलेले आहेत. त्याच्या बाहेर कोणीहि जाऊं शकत नाहीं. हेंच तें ब्रह्म होय. ९. या लोकीं जें ब्रह्म आहे तेंच परलोकीं आहे. जें परलोकीं आहे तेंच या लोकीं आहे. या लोकीं ज्याला नानात्व दिसतें तो (एका) मरणामागून (दुसरें) मरण पावतो [ह्म० जन्ममरणरूपी फेऱ्यांत सांपडतो]. १०. या लोकीं अनेक असें कांहीं नाहीं; ज्याला अनेकाप्रमाणें भास होतो तो मरणामागून मरण (याप्रमाणें भ्रमण) पावतो; हे (आत्मैकत्वज्ञान) मनानेच जाणावयाचें आहे. ११. अंगुष्ठप्रमाण पुरुष भूत व भविष्य यांच्यावर स्वामित्व चालवीत शरीरामध्ये रहातो. हें जो जाणतो तो भयरहित होतो. हेंच तें ब्रह्म होय. १२. (हा) अंगुष्ठमात्र पुरुष प्रकाशस्वरूप आहे; धूमरहित आहे; भूत व भविष्य यांचा स्वामी आहे. (हा) आज आहे व उद्यांहि आहे [ह्म० नित्य आहे]. हेंच तें ब्रह्म होय. १३. ज्याप्रमाणें उदक दुर्गम पर्वतांमध्यें पडलें असतां पसरून नाहींसें होतें, त्याप्रमाणें (प्रत्येक शरीराचे ठिकाणीं आत्म्याला) पृथक् धर्म (आहेत असें) मानणारा मनुष्य त्या पृथक् धर्मांमध्येंच नाहींसा होतो [ह्म० पुनः पुनः पृथक् शरीरें

॥१४॥ यथोदकं शुद्धे शुद्धमासिक्तं तादृगेव भवति ॥ एवं मुने-
र्विजानत आत्मा भवति गौतम ॥१५॥ इति चतुर्थी वल्ली ॥४॥

पुरमेकादशद्वारमजस्यावक्रचेतसः ॥ अनुष्ठाय न शोचति
विमुक्तश्च विमुच्यत एतद्वै तत् ॥१॥ हंसः शुचिषद्वसुरन्तरिक्ष-
सद्धोता वेदिषदतिथिर्दुरोणसत् ॥ नृषद्वरसदृतसद्व्योमसदब्जा गोजा
ऋतजा अद्रिजा ऋतं बृहत् ॥२॥ ऊर्ध्वं प्राणमुन्नयत्यपानं प्रत्यगस्यति ॥
मध्ये वामनमासीनं विश्वे देवा उपासते ॥३॥ अस्य विस्रंसमानस्य

धारण करतो].१४. (परंतु) हे गौतमकुलोत्पन्ना, ज्याप्रमाणें शुद्ध उदक शुद्ध उदकामध्यें टाकलें असतां तें तसेंच (शुद्ध) होतें, त्याप्रमाणे (आत्म्याच्या एकत्वाचें) ज्ञान झालेल्या मुनीचा आत्मा (एकत्वरूपच) होतो.१५.

अकरा द्वारें असलेल्या शरीररूपी नगराचा अज [जन्मरहित] व अवक्रचेतस् [ज्याचें ज्ञान एकरूप आहे] आत्मा हा राजा आहे. या नग-रांत राहिला ह्मणून याला शोक होत नाहीं; आणि हें त्यानें सोडलें तरी हा तर मुक्तच. हेंच तें ब्रह्म होय.१. (हा आत्मा एकाच शरीरामध्यें रहाणारा नसून सर्व शरीरांमध्यें रहाणारा आहे असें सांगतात—) हा आदित्यरूपानें [हंसः] आकाशामध्ये स्थित आहे, वायुरूपानें अंतरिक्षामध्यें स्थित आहे, अग्निरूपानें [होता] वेदीचे ठिकाणीं स्थित आहे, अतिथिरूपाने गृहांमध्यें स्थित आहे (अथवा सोमरूपाने कलशामध्यें स्थित आहे), मनुष्यांमध्यें, देवांमध्यें, यज्ञामध्यें (अथवा सत्यामध्यें) व आकाशामध्ये स्थित आहे. हा उदकामध्यें (शंख मकर इत्यादि रूपानें) उत्पन्न होतो, पृथ्वीमध्यें (धान्यादि-रूपानें) उत्पन्न होतो, यज्ञामध्यें (यज्ञफलादिरूपानें) उत्पन्न होतो, पर्व-तांमध्यें (नदी आदि रूपानें) उत्पन्न होतो; हाच महान् सत्य होय.२. (जो हृदयापासून) प्राणवायु वर नेतो आणि अपानवायु खालीं सोडतो त्या मध्यभागीं (हृदयकमलीं) स्थित व भक्ति करण्यास योग्य [वामनं] अशा आत्म्याची सर्व इंद्रियें उपासना करतात [ह्म० त्याच्या आज्ञेनें आपआपले

शरीरस्थस्य देहिनः ॥ देहाद्विमुच्यमानस्य किमत्र परिशिष्यत एतद्वै तत् ॥४॥ न प्राणेन नापानेन मर्त्यो जीवति कश्चन ॥ इतरेण तु जीवन्ति यस्मिन्नेतावुपाश्रितौ ॥५॥ हन्त त इदं प्रवक्ष्यामि गुह्यं ब्रह्म सनातनम् ॥ यथा च मरणं प्राप्य आत्मा भवति गौतम ॥६॥ योनिमन्ये प्रपद्यन्ते शरीरत्वाय देहिनः ॥ स्थाणुमन्येऽनुसंयन्ति यथाकर्म यथाश्रुतम् ॥७॥ य एष सुप्तेषु जागर्ति कामं कामं पुरुषो निर्मिमाणः ॥ तदेव शुक्रं तद्ब्रह्म तदेवामृतमुच्यते ॥ तस्मिँल्लोकाः श्रिताः सर्वे तदु नात्येति कश्चन एतद्वै तत् ॥८॥ अग्निर्यथैको

व्यापार करतात].३. शरीरामध्यें रहाणारा हा आत्मा सुटला असतां ह्मणजे देहामधून निघून गेला असतां देहामध्यें काय शिल्लक रहातें ? [कांहीं नाही. अर्थात् आत्मा शरीराहून भिन्न आहे]. हेंच तें ब्रह्म होय.४. (केवळ) प्राणवायूनें अथवा अपानवायूनें कोणीहि मनुष्य जिवंत राहूं शकत नाहीं. हे वायु ज्याच्या आश्रयानें रहातात अशा (त्यांहून) निराळा जो (आत्मा) त्याच्याच योगानें (मनुष्य) जिवंत राहू शकतात.५. हे गौतमकुलोत्पन्ना, आतां मी तुला गुह्य व सनातन असें ब्रह्म सांगतों; आणि (देहाला) मरण प्राप्त झालें असतां आत्म्याचें काय होतें हें सांगतों.६. (आत्मज्ञान न झालेले) कोणी मनुष्य (पुन्हां) शरीर धारण करण्यासाठीं जननेंद्रियामध्यें प्रवेश करतात. दुसरे कोणी (अत्यंत अधम) मनुष्य (वृक्षादि) स्थावरभाव पावतात. (सारांश,) जसें कर्म केलें असेल आणि जसें ज्ञान मिळविलें असेल त्या मानानें सर्वांना अवस्था प्राप्त होते.७. हे (प्राणादि वायु) निद्रित असतांना, आपल्या इच्छेप्रमाणें (अर्थ) निर्माण करीत जो पुरुष जागृत असतो तोच शुद्ध [शुक्र] ब्रह्म होय, तेंच शाश्वत आहे असें (सर्व शास्त्रांमध्यें) सांगितलें आहे. (पृथिव्यादि) सर्व लोक त्याच्या आश्रयानें राहिले आहेत. त्याच्या बाहेर कोणीहि जाऊं शकत नाहीं. हेंच तें ब्रह्म होय.८. ज्याप्रमाणें एकच अग्नि या लोकामध्यें प्रविष्ट होत्साता प्रत्येक

भुवनं प्रविष्टो रूपं रूपं प्रतिरूपो बभूव ॥ एकस्तथा सर्वभूतांतरात्मा रूपं रूपं प्रतिरूपो बहिश्च ॥९॥ वायुर्यथैको भुवनं प्रविष्टो रूपं रूपं प्रतिरूपो बभूव ॥ एकस्तथा सर्वभूतांतरात्मा रूपं रूपं प्रतिरूपो बहिश्च ॥१०॥ सूर्यो यथा सर्वलोकस्य चक्षुर्न लिप्यते चाक्षुषैर्बाह्यदोषैः ॥ एकस्तथा सर्व भूतांतरात्मा न लिप्यते लोकदुःखेन बाह्यः ॥११॥ एको वशी सर्वभूतांतरात्मा एकं रूपं बहुधा यः करोति ॥ तमात्मस्थं येऽनुपश्यन्ति धीरास्तेषां सुखं शाश्वतं नेतरेषाम् ॥१२॥ नित्योऽनित्यानां चेतनश्चेतनानामेको बहूनां यो विदधाति कामान् ॥

(दाह्य) वस्तूसंबंधानें निरनिराळें रूप धारण करतो, त्याप्रमाणें सर्व भूतांचा अंतरात्मा (आकाशाप्रमाणे) बाहेर [बहिः] एकच असून प्रत्येकाचे ठिकाणीं निरनिराळें रूप धारण करतो.९. ज्याप्रमाणें एकच वायु या लोकामध्यें प्रविष्ट होत्साता प्रत्येक वस्तूसंबंधानें निरानिराळें रूप धारण करतो, त्याप्रमाणें सर्व भूतांचा अंतरात्मा (आकाशाप्रमाणें) बाहेर एकच असून प्रत्येकाचे ठिकाणीं निरानिराळें रूप धारण करतो.१०. (सर्व वस्तु प्रकाशित करण्याला कारण ह्मणून) सर्व लोकांचा चक्षु असा जो सूर्य तो ज्याप्रमाणें (अशुद्ध पदार्थांच्या) दर्शनरूपी बाह्य दोषांनीं लिप्त होत नाहीं, त्याप्रमाणे (दुःखरूपी अध्यासाहून) भिन्न [बाह्यः] असा सर्व भूतांच्या अंतर्यामीं एकच असणारा आत्मा लोकांच्या (जन्ममरणादि) दुःखांनीं लिप्त होत नाहीं.११. एक [ज्याच्यासारखा अथवा ज्याच्याहून अधिक दुसरा कोणी नाहीं], (सर्व जगताचा) स्वामी, सर्व भूतांचा अंतरात्मा आणि एकच स्वरूप जो अनेक प्रकारांनीं दाखवितो अशा त्या–(परमेश्वरा–)ला आपल्या शरीरामध्यें स्थित असलेला जे ज्ञानी मनुष्य साक्षात् पहातात त्यांनाच शाश्वत सुख प्राप्त होतें, इतरांना नाहीं.१२. (सर्व) अनित्य वस्तूंमध्यें जो नित्य आहे, (जगताला) चेतना देणाऱ्यांना जो चेतना देणारा आहे, (स्वतः) एक असून जो अनेकांना कर्मांचीं फळें [कामान्]

तमात्मस्थं येऽनुपश्यन्ति धीरास्तेषां शान्तिः शाश्वती नेतरेषाम् ॥१३॥ तदेतदिति मन्यन्तेऽनिर्देश्यं परमं सुखम् ॥ कथं नु तद्विजानीयां किमु भाति विभाति वा ॥१४॥ न तत्र सूर्यो भाति न चंद्रतारकं नेमा विद्युतो भान्ति कुतोऽयमग्निः ॥ तमेव भान्तमनुभाति सर्वं तस्य भासा सर्वमिदं विभाति ॥१५॥ इति पंचमी वल्ली ॥५॥

ऊर्ध्वमूलोऽवाक्शाख एषोऽश्वत्थः सनातनः ॥ तदेव शुक्रं तद्ब्रह्म तदेवामृतमुच्यते ॥ तस्मिँल्लोकाः श्रिताः सर्वे तदु नात्येति कश्चन एतद्वै तत् ॥१॥ यदिदं किंच जगत्सर्वं प्राण एजति निःसृतम् ॥

देतो, त्याला स्वतःच्या ठिकाणीं स्थित असा जे ज्ञानी पहातात त्यांनाच शाश्वत शान्ति प्राप्त होते, इतरांना नाहीं. १३. नचिकेता ह्मणाला, तें (आत्मज्ञानरूपी) असाधारण सुख अनिर्देश्य [अमुक प्रकारचें आहे असे सांगण्यास अशक्य] असतांहि ज्ञाते 'तें असे आहे' या प्रकारें (प्रत्यक्ष) अनुभवतात. त्या (आत्मज्ञानरूपी) सुखाचें मला कसें बरें ज्ञान होईल? ते (स्वतःच) प्रकाशित होतें काय? अथवा आमच्या बुद्धीला तें स्पष्ट समजतें काय? १४. यम ह्मणाला, त्या ब्रह्माला सूर्य प्रकाशित करूं शकत नाहीं, चंद्र अथवा तारका प्रकाशित करूं शकत नाहींत. (मग) हा अग्नि तरी कसा प्रकाशित करणार? (तर) ते ब्रह्म स्वतः प्रकाशरूपी आहे ह्मणून त्याच्याच प्रकाशाच्या आधारानें हें सर्व (सूर्य चंद्र आदि) प्रकाश पावतें. त्याच्याच तेजानें हें सर्व स्पष्ट प्रकाश पावतें. १५.

या संसाररूपी सनातन अश्वत्थवृक्षाचें मूळ वर (ब्रह्माचे ठिकाणीं) आहे आणि (स्वर्ग, नरक, तिर्यक् इत्यादि) शाखा खालीं आहेत. या वृक्षाचें जें मूळ तेच शुद्ध ब्रह्म होय. तेंच अविनाशी आहे असे (ज्ञाते) सांगतात. (स्वर्ग, गंधर्व इत्यादि) सर्व लोक त्याच्याच आश्रयानें आहेत. त्याहून वरचढ असें कांहीं नाहीं. हेंच तें ब्रह्म होय. १. (ब्रह्म) हें एक मोठें भय व (आपल्यावर) उगारलेलें जणूं काय वज्रच असें समजून हें

**महद्भयं वज्रमुद्यतं य एतद्विदुरमृतास्ते भवन्ति ॥२॥ भयादस्याग्निस्तपति भयात्तपति सूर्यः ॥ भयादिंद्रश्च वायुश्च मृत्युर्धावति पंचमः ॥३॥ इह चेदशकद्बोद्धुं प्राक् शरीरस्य विस्रसः ॥ ततः सर्गेषु लोकेषु शरीरत्वाय कल्पते ॥४॥ यथादर्शे तथात्मनि यथा स्वप्ने तथा पितृलोके ॥ यथाप्सु परीव ददृशे तथा गन्धर्वलोके छायातपयोरिव ब्रह्मलोके ॥५॥ इंद्रियाणां पृथग्भावमुदयास्तमयौ च यत् ॥ पृथगुत्पद्यमानानां मत्वा धीरो न शोचति ॥६॥ इंद्रियेभ्यः परं मनो**

सर्व सृष्ट जग ब्रह्माच्या ठिकाणीं कंप पावतें. हें (ब्रह्म) जे जाणतात ते (जन्म व) मृत्यु यांनीं रहित होतात.२. याच्या भयानें अग्नि तपन पावतो, याच्या भयानें सूर्य तपन पावतो; याच्या भयाने इंद्र व वायु (आपआपलीं कामें) करतात; तसाच पांचवा मृत्यु देखील (याच्याच भयानें आपल्या उद्योगास) प्रवृत्त होतो.३. या लोकीं शरीराचा नाश होण्यापूर्वी मनुष्य जर ब्रह्म जाणूं शकेल तर (तो जन्ममृत्युरहित होतो); नाहींतर (पृथिव्यादि) सृष्ट लोकांमध्यें (पुन्हां) शरीरत्वाप्रत पावतो.४. ज्याप्रमाणें आरशामध्यें (आपलें स्पष्ट) दर्शन होतें त्याप्रमाणें (आरशाप्रमाणें निर्मल झालेल्या) स्वतःच्या बुद्धीमध्यें (आत्म्याचें स्पष्ट) दर्शन होतें. ज्याप्रमाणें स्वप्नांत (जागृतीच्या वासनांचे योगानें आपलें अस्पष्ट) दर्शन होतें त्याप्रमाणें (कर्मफलभोगाच्या आसक्तीमुळें) पितृलोकामध्यें (आत्म्याचें अस्पष्ट) दर्शन होतें. ज्याप्रमाणें उदकामध्यें (आपलें स्वरूप) भ्रमण करणारें दिसतें [परिददृशे इव] त्याप्रमाणें गंधर्वलोकामध्यें (आत्म्याचें) दर्शन (अस्पष्टच) होतें. (फक्त) ब्रह्मलोकीं (आत्म्याचें) दर्शन छाया आणि प्रकाश यांच्याप्रमाणें (स्पष्ट) होतें.५. (आकाशादि आपापल्या कारणांपासून) वेगळीं उत्पन्न झालेलीं इंद्रियें (स्वयंभू आत्म्याहून) निराळीं आहेत आणि त्यांना उत्पत्ति व विनाश होतात (अर्थात् तीं आत्मा नव्हेत). हें जाणून बुद्धिमान् मनुष्य शोक करीत नाहीं.६. इंद्रियें (व त्यांचे अर्थ)

मनसः सत्त्वमुत्तमम् ॥ सत्त्वादधि महानात्मा महतोऽव्यक्तमुत्तमम् ॥७॥ अव्यक्तात्तु परः पुरुषो व्यापकोऽलिंग एव च ॥ यं ज्ञात्वा मुच्यते जन्तुरमृतत्वं च गच्छति ॥८॥ न संदृशे तिष्ठति रूपमस्य न चक्षुषा पश्यति कश्चनैनम् ॥ हृदा मनीषा मनसाभिक्लृप्तो य एतद्विदुरमृतास्ते भवन्ति ॥९॥ यदा पंचावतिष्ठन्ते ज्ञानानि मनसा सह ॥ बुद्धिश्च न विचेष्टति तामाहुः परमां गतिम् ॥१०॥ तां योगमिति मन्यन्ते स्थिरामिंद्रियधारणाम् ॥ अप्रमत्तस्तदा भवति योगो

यांहून मन श्रेष्ठ आहे, मनाहून बुद्धि [सत्त्व] श्रेष्ठ आहे, सत्त्वाहून महान् आत्मा [जगतांत प्रथम उत्पन्न झालेलें तत्त्व] श्रेष्ठ आहे आणि त्या महताहून (सर्व जगताचें बीजरूप जें) अव्यक्त (तें) श्रेष्ठ आहे.७. अव्यक्ताहून सर्वांचा व्यापक आणि अगम्य [अलिंग=कोणत्याहि साधनानें जाणतां येत नाहीं असा] असा पुरुष श्रेष्ठ आहे. त्याचें ज्ञान झालें असतां प्राणी (जिवंतपणींच अविद्यादिकांपासून) मुक्त होतो आणि (शरीरत्यागानंतर) अमृतत्वाप्रत जातो [ह्म० जन्ममरणापासून मुक्त होतो].८. याचें रूप दृष्टीच्या विषयामधलें नाहीं, डोळ्यांनीं याला कोणी पाहूं शकत नाहीं (अथवा इतर इंद्रियांनीं जाणूं शकत नाहीं). मनाचें नियमन करणाऱ्या [मनीट् तृतीया=मनीषा] (हृदयस्थ) बुद्धीनें [हृदा] मननाचे योगानें [मनसा] प्रकाशित झाल्यावर [अभिक्लृप्तः] (हा आत्मा जाणतां येतो). याप्रमाणें ज्यांना याचे ज्ञान होते ते मृत्युरहित होतात.९. (आपापल्या विषयांपासून निवृत्त होऊन) जेव्हां मनासहित पांच ज्ञानेंद्रियें कुंठित होतात आणि बुद्धि गप्प बसते, तेव्हां त्या स्थितीला अत्यंत श्रेष्ठ गति असें ह्मणतात.१०. (या स्थितीमध्यें इंद्रियांचा व इंद्रियव्यापारांचा जरी वियोग होतो तरी) तिला योग असें ह्मणतात. (यानंतर जेव्हां) इंद्रियांची स्थिर धारणा होईल तेव्हां (मुमुक्षु) प्रमादरहित होतो (नुसत्या निवृत्तीनें नाहीं); कारण (नुसता) योग उपाय व अपाय (दोन्ही) कर-

हि प्रभवाप्ययौ ॥११॥ नैव वाचा न मनसा प्राप्तुं शक्यो न चक्षुषा ॥ अस्तीति ब्रुवतोऽन्यत्र कथं तदुपलभ्यते ॥१२॥ अस्तीत्येवोपलब्धव्यस्तत्त्वभावेन चोभयोः ॥ अस्तीत्येवोपलब्धस्य तत्त्वभावः प्रसीदति ॥१३॥ यदा सर्वे प्रमुच्यन्ते कामा येऽस्य हृदि श्रिताः ॥ अथ मर्त्योऽमृतो भवत्यत्र ब्रह्म समश्नुते ॥१४॥ यदा सर्वे प्रभिद्यन्ते हृदयस्येह ग्रन्थयः ॥ अथ मर्त्योऽमृतो भवत्येतावदनुशासनम् ॥१५॥ शतं चैका च हृदयस्य नाड्यस्तासां मूर्धानमभिनिः-

णारा आहे.११. (ब्रह्म जर बुद्धीचा विषय असेल तर 'तें ब्रह्म असें' अशा प्रकारें तें बुद्धीला ग्रहण करतां येईल. पण बुद्धि आपल्या व्यापारापासून निवृत्त झाली ह्मणजे 'ब्रह्म नाहीं' असें ह्मणण्याचा प्रसंग प्राप्त होईल. अशा प्रसंगाचें निरसन करण्याकरितां सांगतात—) केवळ वाणीनें, बुद्धीनें अथवा चक्षु आदि इंद्रियांनीं याची प्राप्ति होणें शक्य नाहीं. (इंद्रियांची स्थिर धारणा होईल तेव्हांच होईल). (तथापि जगताला मूल कारण हेंच ब्रह्म असल्यामुळें ब्रह्माला अस्तित्व आहे, कारण कार्य दिसत आहे. ह्मणून जगताला मूल कारण असें ब्रह्म 'आहे' असेंच ह्मटलें पाहिजे). 'ब्रह्म आहे' असें ह्मणणाऱ्याहून इतर [अस्तीति ब्रुवतः अन्यत्र] (नास्तिक) मनुष्याला ब्रह्म कसें समजणार? (अर्थात् समजणारच नाहीं).१२. (ह्मणून नास्तित्ववादी पक्ष सोडून) (जगद्रूपी कार्य आणि कारण ब्रह्म हीं भिन्न नाहींत अशा) दोघांच्या तत्त्वभावानें '(ब्रह्म) आहे' हाच पक्ष मान्य केला पाहिजे. 'आहे' या प्रकारें मान्य केल्यावर (सर्व उपाधिविरहित असा) तत्त्वभाव प्रकट होतो.१३. (ज्ञान होण्यापूर्वीं) मनुष्याच्या बुद्धीला ज्या ज्या इच्छा होत्या त्या सर्व जेव्हां नाश पावतात तेव्हां तो मृत्युरहित होतो; (व) याच देहीं ब्रह्मरूप पावतो.१४. या देहीं जेव्हां बुद्धीचीं सर्व बंधनें तुटतात तेव्हां मनुष्य मृत्युरहित होतो. हाच (सर्व वेदान्तवाक्यांचा) उपदेश आहे, (याहून अधिक उपदेश कांहीं

तयोर्ध्वमायन्नमृतत्वमेति विष्वङ्ङन्या उत्क्रमणे भवन्ति ॥१६॥ अंगुष्ठमात्रः पुरुषोऽतरात्मा सदा जनानां हृ॒दये संनिविष्टः ॥ तं स्वाच्छरीरात्प्रवृहेन्मुंजादिवेषीकां धैर्येण ॥ तं विद्याच्छुक्रममृतं तं विद्याच्छुक्रममृतमिति ॥१७॥ मृत्युप्रोक्तां नचिकेतोऽथ लब्ध्वा विद्यामेतां योगविधिं च कृत्स्नम् ॥ ब्रह्मप्राप्तो विरजोऽभूद्विमृत्युरन्योऽप्येवं यो विदध्यात्ममेव ॥१८॥ इति षष्ठी वल्ली ॥६॥ इति द्वितीयोऽध्यायः ॥२॥

ॐ सह नाववतु ॥ सह नौ भुनक्तु ॥ सह वीर्यं करवावहै ॥ तेजस्वि नावधीतमस्तु मा विद्विषावहै ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

**इति कृष्णयजुर्वेदीया कठोपनिषत्समाप्ता ॥**

नाहीं).१५. हृदयापासून निघणाऱ्या एकशेंएक नाडी आहेत, त्यांमध्यें मस्तकाला भेदून जाणारी एक (सुषुम्ना नामक) नाडी आहे. तिच्या द्वारें वर जाणारा [=प्राण सोडणारा] मृत्युरहितत्वाप्रत जातो, बाकीच्या नानाविध गति असणाऱ्या [विष्वङ्] नाडी (पुन्हां) संसारप्राप्ति आणतात.१६. अंगुष्ठप्रमाण अंतरात्मा पुरुष मनुष्यांच्या हृदयामध्यें नेहमीं स्थित आहे. त्याला धैर्यानें आपल्या शरीरापासून पृथक् करावा. मुंज नामक तृणामधून (त्यांतील) काडी जशी वेगळी काढतात तद्वत्. तोच (अंतरात्मा) शुद्ध ब्रह्म असें जाणावें.१७. याप्रमाणें यमानें सांगितलेलें हें (आत्म-) ज्ञान आणि (आत्मप्राप्तीचा) संपूर्ण योगविधि नचिकेतानें प्राप्त करून घेतल्यावर त्याला ब्रह्मप्राप्ति झाली [=तो मुक्त झाला], तो धर्म व अधर्म यांविरहित झाला व मृत्युरहित झाला. याप्रकारें इतरहि जो कोणी (आत्म-) ज्ञानी होईल तोहि आत्मरूप, (धर्माधर्मरहित व मृत्युरहित) होईल.१८.

# प्रश्नोपनिषत् ॥४॥

ॐ भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवाः भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः ॥ स्थिरैरंगैस्तुष्टुवांसस्तनूभिर्व्यशेम देवहितं यदायुः ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

ॐ सुकेशा च भारद्वाजः शैब्यश्च सत्यकामः सौर्यायणी च गार्ग्यः कौसल्यश्चाश्वलायनो भार्गवो वैदर्भिः कबन्धी कात्यायनस्ते हैते ब्रह्मपरा ब्रह्मनिष्ठाः परं ब्रह्मान्वेषमाणा एष ह वै तत्सर्वं वक्ष्यतीति ते ह समित्पाणयो भगवन्तं पिप्पलादमुपसन्नाः ॥१॥ तान्ह स ऋषिरुवाच भूय एव तपसा ब्रह्मचर्येण श्रद्धया संवत्सरं संवत्स्यथ यथाकामं प्रश्नान्पृच्छथ यदि विज्ञास्यामः सर्वं ह वो वक्ष्याम इति ॥२॥ अथ कबन्धी कात्यायन उपेत्य पप्रच्छ ॥ भगवन्कुतो ह व

## प्रश्नोपनिषत्.

हे देवहो, आमचे कर्ण कल्याणकारक (गोष्टी) श्रवण करोत हे यजनीय देवहो, आमचे चक्षु कल्याणकारक (गोष्टी) पाहोत. स्थिर अशा अवयवांनीं व शरीरांनीं युक्त होत्सात्या आह्मांकडून तुमचे स्तवन होवो. देवांनीं दिलेले जे आयुष्य असेल ते आह्मास प्राप्त होवो

### प्रश्न पहिला

भरद्वाजाचा पुत्र सुकेशा शिबीचा पुत्र सत्यकाम, गर्गगोत्रोत्पन्न सौर्यायणि, अश्वलाचा पुत्र कौसल्य, विदर्भ देशींचा भार्गव आणि कत्याचा पुत्र कबंधी हे ब्रह्मपरायण व ब्रह्मनिष्ठ होत्साते श्रेष्ठ अशा ब्रह्माचा शोध करीत असलेले हातांमध्ये समिधा घेऊन "ते सर्व ब्रह्म हा (मुनि) आपणांस सांगेल" असे जाणून पिप्पलाद मुनीकडे आले.१. तो ऋषि त्यांना ह्मणाला, तपश्चर्या व ब्रह्मचर्य याचे श्रद्धेने पालन करीत आणखी एक वर्षपर्यंत रहा (आणि मग) इच्छा असेल ते प्रश्न विचारा. जर

इमाः प्रजाः प्रजायन्त इति ॥३॥ तस्मै स होवाच प्रजाकामो वै प्रजापतिः स तपोऽतप्यत स तपस्तप्त्वा स मिथुनमुत्पादयते ॥ रयिं च प्राणं चेत्येतौ मे बहुधा प्रजाः करिष्यत इति ॥४॥ आदित्यो ह वै प्राणो रयिरेव चन्द्रमा रयिर्वा एतत्सर्वं यन्मूर्तं चामूर्तं च तस्मान्मूर्तिरेव रयिः ॥५॥ अथादित्य उदयन्यत्प्राचीं दिशं प्रविशति तेन प्राच्यान्प्राणान् रश्मिषु संनिधत्ते ॥ यद्दक्षिणां यत्प्रतीचीं यदुदीचीं यदधो यदूर्ध्वं यदन्तरा दिशो यत्सर्वं प्रकाशयति तेन सर्वान्प्राणान् रश्मिषु संनिधत्ते ॥६॥ स एष वैश्वानरो विश्वरूपः प्राणोऽग्निरुदयते ॥ तदेतदृचाभ्युक्तम् ॥७॥ विश्वरूपं हरिणं जातवेदसं परा-

मला माहीत असेल तर मी सर्व तुह्मांला सांगेन.२. नंतर (त्याप्रमाणें एक वर्ष झाल्यावर) कत्याचा पुत्र कबंधी (ऋषीकडे) येऊन विचारता झाला कीं, "हे भगवन्, या प्रजा कशापासून उत्पन्न होतात?"३. त्याला पिप्पलाद ऋषि ह्मणाले, प्रजापतीला प्रजा उत्पन्न करण्याची इच्छा झाली; त्यानें तप आचरण केलें. तप आचरण करून त्यानें रयि [चंद्र] आणि प्राण [सूर्य] हें मिथुन, माझी अनेक प्रकारची प्रजा हे करतील अशा उद्देशानें, उत्पन्न केलें.४. प्राण ह्मणजे (खाणारा) सूर्य आणि रयि ह्मणजे (खाद्य) चंद्र. अथवा रयि ह्मणजे हें सर्व— मूर्त [स्थूल] व अमूर्त [सूक्ष्म]. पण मूर्त व अमूर्त असा या सर्वांचा विभाग केला ह्मणजे) जें मूर्त ते अन्न [रयि] (आणि अमूर्त तो भक्षण करणारा प्राण).५. जेव्हां सूर्य उदय पावून पूर्व दिशा व्यापतो तेव्हां पूर्वेकडचे प्राण (आपल्या) किरणांमध्यें धारण करतो [ह्मणजे सर्व किरणांनीं व्यापतो]. (त्याचप्रमाणें) दक्षिण, पश्चिम, उत्तर, अधर, ऊर्ध्व, उपदिशा आणि इतर सर्व (प्रदेश) जेव्हां प्रकाशित करतो तेव्हां त्यांमधील सर्व प्राण (आपल्या) किरणांमध्यें धारण करतो [ह्मणजे सर्व वस्तुजात किरणांनीं व्यापतो].६. तो हा वैश्वानर [सर्वजीवात्मक], विश्वरूप [सर्व जडात्मक], प्राण व अग्नि

यणं ज्योतिरेकं तपन्तम् ॥ सहस्ररश्मिः शतधा वर्तमानः प्राणः प्रजानामुदयत्येष सूर्यः ॥८॥ संवत्सरो वै प्रजापतिस्तस्यायने दक्षिणं चोत्तरं च ॥ तद्ये ह वै तदिष्टापूर्ते कृतमित्युपासते ते चान्द्रमसमेव लोकमभिजयन्ते ॥ त एव पुनरावर्तन्ते तस्मादेते ऋषयः प्रजाकामा दक्षिणं प्रतिपद्यन्ते ॥ एष ह वै रयिर्यः पितृयाणः ॥९॥ अथोत्तरेण तपसा ब्रह्मचर्येण श्रद्धया विद्ययात्मानमन्विष्यादित्यमभिजयन्ते ॥ एतद्वै प्राणानामायतनमेतदमृतमभयमेतत्परायणमेतस्मान्न पुनरावर्तन्त इत्येष निरोधस्तदेष श्लोकः ॥१०॥ पंचपादं पितरं द्वादशाकृतिं दिव आहुः परे अर्धे पुरीषिणम् ॥ अथेमे अन्य उ परे

असा (सूर्य) उदय पावतो (व सर्व व्यापतो). तेंच (या) मंत्रानें सांगितलें आहे—७. "विश्वरूप, किरणयुक्त [हरिणः], जातवेदा [सर्व वस्तुजात जाणणारा], सर्व प्राणाचा आश्रय, प्रकाशरूप, एक, आणि तपन पावणारा (असा सूर्य आहे असें ब्रह्मवेत्ते जाणतात). असंख्यरश्मि, (प्राणिभेदानें) अनेकधा वर्तमान व प्रजांचा प्राण असा हा सूर्य उदय पावतो."८. (चंद्र व सूर्य या मिथुनानें युक्त अशा अहोरात्रांचा समुदाय) संवत्सर हा प्रजापति होय. त्याचे दक्षिण आणि उत्तर असे दोन मार्ग [अयनें] आहेत. त्यांमध्यें जे इष्ट व पूर्त या अनित्य कर्मांची उपासना करतात त्यांना (अन्नरूप) चंद्रलोक प्राप्त होतो. ते (कर्मफलभोगानंतर) पुन्हां (मर्त्यलोकीं) परत येतात. ह्मणून हे प्रजाकाम ऋषि दक्षिणायनरूप अयनाप्रत [ह्म० चंद्रलोकाप्रत] जातात. ज्याला पितृयाण ह्मणतात तो रयि [अन्न] हाच.९. तपश्चर्या, ब्रह्मचर्य, श्रद्धा व विद्या यांचे योगानें (प्राणरूपी) आत्म्याला (आत्मरूप) जाणणारे उत्तरायणानें आदित्यलोक [देवयान] पावतात. हा सर्व प्राणांचा (सामान्य) आश्रय आहे. हा नाशरहित आहे, भयरहित आहे, ही अत्यंत श्रेष्ठ गति आहे. येथें गेल्यावर (प्राणी) पुन्हां परत येत नाहींत ह्मणून (केवलकर्मी) अज्ञानी मनुष्यांना हा बंद आहे. याविषयीं असा

विचक्षणं सप्तचक्रे षडर आहुरर्पितमिति ॥११॥ मासो वै प्रजापतिस्तस्य कृष्णपक्ष एव रयिः शुक्लः प्राणस्तस्मादेत ऋषयः शुक्ल इष्टिं कुर्वन्तीतर इतरस्मिन् ॥१२॥ अहोरात्रो वै प्रजापतिस्तस्याहरेव प्राणो रात्रिरेव रयिः ॥ प्राणं वा एते प्रस्कन्दन्ति ये दिवा रत्या संयुज्यन्ते ब्रह्मचर्यमेव तद्यद्रात्रौ रत्या संयुज्यन्ते ॥१३॥ अन्नं वै प्रजापतिस्ततो ह वै तद्रेतस्तस्मादिमाः प्रजाः प्रजायन्त इति ॥१४॥ तद्ये ह वै तत्प्रजापतिव्रतं चरन्ति ते मिथुनमुत्पादयन्ते ॥ तेषामेवैष ब्रह्मलोको येषां तपो ब्रह्मचर्यं येषु सत्यं प्रतिष्ठितम् ॥१५॥ तेषामसौ विरजो ब्रह्मलोको न येषु जिह्ममनृतं न माया चेति ॥१६॥ इति प्रथमः प्रश्नः ॥१॥

श्लोक आहे–१०. पांच पायांनीं युक्त [हेमंत व शिशिर मिळून एक ऋतु समजून संवत्सराचे पांच ऋतु], सर्वांचा जनक, बारा अवयवांनीं [महिन्यांनीं] युक्त व उदकानें युक्त [पुरीषिणं, आदित्यामुळें वृष्टि होते ह्मणून] असा हा (चंद्रादित्यरूप प्रजापति) स्वर्गलोकाच्या वरील अर्धामध्यें [दिवः परे अर्धे] आहे असें कोणी ह्मणतात [अथ इमे]. सप्तहययुक्त (सतत गमन करणाऱ्या) याच्या चक्रामध्यें सहा (ऋतुरूपी) अरा ठोकल्या आहेत असा हा सर्वज्ञ आहे असें दुसरे ह्मणतात.११. (संवत्सराचा अवयव) मास हा (देखील) प्रजापति आहे. त्याचा कृष्णपक्ष हा रयि आणि शुक्लपक्ष हा प्राण. ह्मणून हे ऋषि शुक्ल पक्षांत यज्ञ करतात. इतर (कोणी अज्ञानामुळें) कृष्ण पक्षांत करतात.१२. अहोरात्र हा प्रजापति. दिवस हा त्याचा प्राण आणि रात्र हा रयि. ...... जे तप व ब्रह्मचर्य आचरण करतात आणि ज्यांचे ठिकाणीं सत्य स्थित आहे अशा गृहस्थांना हा ब्रह्मलोक प्राप्त होतो. कौटिल्य, असत्य आणि माया [मिथ्या आचार] हीं ज्यांचे ठिकाणीं नाहींत अशांनाच हा रजोविरहित ब्रह्मलोक प्राप्त होतो."१३–१६.

अथ हैनं भार्गवो वैदर्भिः पप्रच्छ ॥ भगवन्कत्येव देवाः प्रजां विधारयन्ते कतर एतत्प्रकाशयन्ते कः पुनरेषां वरिष्ठ इति ॥१॥ तस्मै स होवाचाकाशो ह वा एष देवो वायुरग्निरापः पृथिवी वाङ्मनश्चक्षुः श्रोत्रं च ॥ ते प्रकाश्याभिवदन्ति वयमेतद्बाणमवष्टभ्य विधारयामः ॥२॥ तान्वरिष्ठः प्राण उवाच मा मोहमापद्यथाहमेवैतत्पंचधात्मानं प्रविभज्यैतद्बाणमवष्टभ्य विधारयामीति तेऽश्रद्दधाना बभूवुः ॥३॥ सोऽभिमानादूर्ध्वमुत्क्रमत इव तस्मिन्नुत्क्रामत्यथेतरे सर्व एवोत्क्रामन्ते तस्मिंश्च प्रतिष्ठमाने सर्व एव प्रातिष्ठन्ते । तद्यथा

## प्रश्न दुसरा.

नंतर विदर्भ देशींचा भार्गव प्रश्न करिता झाला कीं, हे भगवन्, "कोणते देव शरीराचें [प्रजां] विशेष धारण करतात? (त्यांपैकीं) कोणते (शरीराचें) प्रकाशन करतात? आणि त्यांमध्यें वरिष्ठ कोण?" १. त्याला ते पिप्पलाद मुनि ह्मणाले, "आकाश, वायु, अग्नि, उदक, पृथिवी आणि वाणी [ह्म० कर्मेंद्रियें], मन, चक्षु, श्रोत्र इत्यादि (कर्मेंद्रियें व बुद्धींद्रियें) हे ते (शरीर धारण करणारे देव) होत. ते (आपले महत्त्व) सर्वांना प्रकट करीत ह्मणतात, "आह्मीच या (विनाशी) शरीराला [बाणं=वाति विनाशं गच्छति इति] शिथिल न होऊं देतां [अवष्टभ्य] धारण करतों." २. (अशा प्रकारें अभिमान बाळगणाऱ्या) त्या इंद्रियांना (त्यांच्याहून) वरिष्ठ प्राण ह्मणाला, "मोह पावूं नका. (कारण) मीच स्वतःचे पांच विभाग करून (त्यांचे योगाने) या शरीराला अशिथिल प्रकारें धारण करीत आहें." (या भाषणाचा) त्या इंद्रियांना विश्वास वाटला नाहीं. ३. त्यांच्या या अभिमानामुळें प्राणानें (शरीरांतून) वर निघून गेल्यासारखें केलें. तो (प्राण) वर निघून गेल्यावर इतर सर्व (इंद्रियें) नाश पावलीं. (नंतर) प्राण (पुन्हां) स्थित झाल्यावर सर्व (इंद्रियें) स्थित झालीं. ज्याप्रमाणें मधुमक्षिका आपला राजा (एका ठिकाणाहून) उडून गेला

मक्षिका मधुकरराजानमुत्क्रामन्तं सर्वा एवोत्क्रामन्ते तस्मिंश्च प्रतिष्ठमाने सर्वा एव प्रातिष्ठन्ते एवं वाङ्मनश्चक्षुः श्रोत्रं च ते प्रीताः प्राणं स्तुन्वन्ति ।।४।। एषोऽग्निस्तपत्येष सूर्य एष पर्जन्यो मघवानेष वायुरेष पृथिवी रयिर्देवः सदसच्चामृतं च यत् ।।५।। अरा इव रथनाभौ प्राणे सर्वं प्रतिष्ठितम् ।। ऋचो यजूंषि सामानि यज्ञः क्षत्रं ब्रह्म च ।।६।। प्रजापतिश्चरसि गर्भे त्वमेव प्रतिजायसे ।। तुभ्यं प्राण प्रजास्त्विमा बलिं हरन्ति यः प्राणैः प्रतितिष्ठसि ।।७।। देवानामसि वह्नितमः पितॄणां प्रथमा स्वधा ।। ऋषीणां चरितं सत्यमथर्वांगिरसामसि ।।८।। इंद्रस्त्वं प्राण तेजसा रुद्रोऽसि परिरक्षिता ।। त्वमन्त-

ह्मणजे सर्व उडून जातात आणि तो (एका ठिकाणीं) बसला ह्मणजे सर्व (त्या ठिकाणीं) बसतात तद्वत्. याप्रमाणें, वाणी, मन, चक्षु, श्रोत्र इत्यादि इंद्रियें (प्राणाचें माहात्म्य जाणल्यावर) त्याचे ठिकाणीं प्रीतियुक्त होत्सातीं प्राणाची स्तुति करूं लागलीं.४. हा (प्राण) अग्निरूपानें ज्वलन पावतो, हाच सूर्यरूपानें (प्रकाशतो), हाच पर्जन्यरूपानें (वर्षाव करतो), हाच इंद्ररूपानें (प्रजापालन करतो), वायुरूपानें (वहातो); हाच पृथिवी आहे, चंद्र आहे, सर्व जगताचा देव आहे, सर्व मूर्त आणि अमूर्त (वस्तु) आहे, हाच अमृत होय.५. ज्याप्रमाणें (चक्राच्या) अरा रथनाभीचे ठिकाणीं स्थित असतात त्याप्रमाणें सर्व (वस्तुजात) प्राणाच्या ठिकाणीं स्थित आहे. ऋचा, यजु आणि साम असे (तिन्ही वेदांचे) मंत्र, यज्ञ, क्षत्रियत्व आणि ब्राह्मणत्व हीं (सर्व या प्राणाचे ठिकाणीं स्थित आहेत).६. हे प्राणा, तूंच प्रजापति आहेस, तूं गर्भामध्यें जातोस व जन्म पावतोस. जो तूं (चक्षु आदि) इंद्रियांच्या रूपानें (शरीरामध्यें) रहातोस त्या तुला हे (सर्व) प्राणी (चक्षु आदि द्वारांनीं) बलि देतात.७. देवांकडे बलि नेणाऱ्यांत श्रेष्ठ [वह्नितमः] तूं आहेस. पितृश्राद्धामध्यें पहिली आहुति तूं आहेस. ऋषींचें सत्यचरित तूं आहेस. अंगिरसांमध्यें अथर्वा तूं आहेस.८. हे

रिक्षे चरसि सूर्यस्त्वं ज्योतिषां पतिः ॥९॥ यदा त्वमभिवर्षस्यथेमाः प्राणते प्रजाः ॥ आनंदरूपास्तिष्ठन्ति कामायान्नं भविष्यतीति ॥१०॥ व्रात्यस्त्वं प्राणैकऋषिरत्ता विश्वस्य सत्पतिः ॥ वयमाद्यस्य दातारः पिता त्वं मातरिश्वनः ॥११॥ या ते तनूर्वाचि प्रतिष्ठिता या श्रोत्रे या च चक्षुषि ॥ या च मनसि संतता शिवां तां कुरु मोत्क्रमीः ॥१२॥ प्राणस्येदं वशे सर्वं त्रिदिवे यत्प्रतिष्ठितम् ॥ मातेव पुत्रान्रक्षस्व श्रीश्च प्रज्ञां च विधेहि न इति ॥१३॥ इति द्वितीयः प्रश्नः ॥२॥

अथ हैनं कौसल्यश्चाश्वलायनः पप्रच्छ ॥ भगवन्कुत एष प्राणो

प्राणा, तूं (आपल्या) तेजाच्या योगानें (केवळ) इंद्र आहेस, (जगताचा) पालनकर्ता रुद्र आहेस. अंतरिक्षामध्यें संचार करणारा सूर्य तूं आहेस, (अर्थात्) ज्योतींचा स्वामी तूंच.९. जेव्हां तूं (पर्जन्यरूपानें) वर्षाव करतोस तेव्हां हे प्राणा, ही तुझी प्रजा यथेच्छ अन्न होईल असें पाहून आनंदरूप होते.१०. हे प्राणा, तूं व्रात्य आहेस [=जगतामध्यें तूंच पहिल्यानें उत्पन्न झाल्यामुळें तुझा संस्कार कोणीं केला नाहीं ह्मणून व्रात्य], (सर्व हवि) भक्षण करणारा (अथर्ववेदांतील प्रसिद्ध) एकर्षिनामक (अग्नि) तूं आहेस, विद्यमान विश्वाचा पति आहेस. आद्य अशा तुला (हवि) देणारे आह्मी आहोंत. वायूचा (देखील) उत्पन्नकर्ता तूं आहेस.११. जें तुझें रूप वाचेमध्यें स्थित आहे, श्रोत्रामध्यें, चक्षूमध्यें, मनामध्यें संतत स्थित आहे तें शुभ कर. उत्क्रमण [=मरण] पावूं देऊं नको.१२. (एकंदरींत) त्रैलोक्यामध्यें जें ह्मणून स्थित आहे तें हें सर्व प्राणाच्या अधीन आहे. (हे प्राणा), माता ज्याप्रमाणें पुत्रांचें पालन करते त्याप्रमाणें आमचें रक्षण कर. आह्मांला संपत्ति व बुद्धि दे.१३.

## प्रश्न तिसरा.

नंतर अश्वलाचा पुत्र कौसल्य पिप्पलाद मुनींना प्रश्न करता झाला

जायते कथमायात्यस्मिञ्छरीर आत्मानं वा प्रविभज्य कथं प्रातिष्ठते केनोत्क्रमते कथं बाह्यमभिधत्ते कथमध्यात्ममिति ॥१॥ तस्मै स होवाचातिप्रश्नान्पृच्छसि ब्रह्मिष्ठोऽसीति तस्मात्तेऽहं ब्रवीमि ॥२॥ आत्मन एष प्राणो जायते ॥ यथैषा पुरुषे छायैतस्मिन्नेतदाततं मनोधिकृतेनायात्यस्मिञ्छरीरे ॥३॥ यथा सम्राडेवाधिकृतान्विनियुंक्ते ॥ एतान्ग्रामानेतान्ग्रामानधितिष्ठस्वेत्येवमेवैष प्राणः इतरान्प्राणान्पृथक्पृथगेव संनिधत्ते ॥४॥ पायूपस्थेऽपानं चक्षुःश्रोत्रे मुखनासिकाभ्यां प्राणः स्वयं प्रातिष्ठते मध्ये तु समानः ॥ एष ह्येतद् हुतमन्नं समं नयति

कीं, हे भगवन्, हा प्राण कशापासून उत्पन्न होतो? या शरीरांत कसा येतो? (शरीरांत) स्वतःला विभागून कसा रहातो? (शरीरापासून) कशामुळें निघून जातो? आधिभौतिक व आधिदैविक वस्तु कसा धारण करतो? आध्यात्मिक [आत्म्याशीं संबद्ध असे शरीर] कसें धारण करतो?१. पिप्पलाद मुनि त्याला ह्मणाले, (सामान्य मनुष्यांना न समजण्यासारख्या प्रश्नांहून देखील) कठिण प्रश्न तूं विचारीत आहेस. तूं ब्रह्मज्ञ आहेस ह्मणून (संतुष्ट होत्साता) मी तुला सांगतों.२. (परम पुरुष) आत्म्यापासून प्राण उत्पन्न होतो. ज्याप्रमाणें देहाचे ठिकाणी छाया त्याप्रमाणें या ब्रह्माचे ठिकाणी हा (प्राण) आहे. मनाच्या [संकल्पाच्या] कर्मामुळें हा (प्राण) या शरीरांत येतो.३. ज्याप्रमाणें (तुह्मी) अमुक गांवावर अधिकार चालवा, (तुह्मी) अमुक गांवांवर अधिकार चालवा, अशी अधिकाऱ्यांची नेमणूक सम्राट्च करतो, त्याप्रमाणें हा (मुख्य) प्राण इतर (चक्षु आदि) प्राणांची निरनिराळ्या कामांवर नेमणूक करतो.४. पायु [गुद] व उपस्थ यांचे ठिकाणीं अपान असतो; चक्षु व श्रोत्र याचे ठिकाणी स्थित आणि मुख व नासिका यांचे द्वारे (बाहेर जाणारा वायु) स्वतः प्राण असतो. (प्राण व अपान यांच्या) मध्यें [नाभीचे ठिकाणीं] समान असतो. हा (जठराग्नीमध्यें) हवन केलेलें हें अन्न (सर्वत्र) समान करतो. त्यापासून

तस्मादेताः सप्तार्चिषो भवन्ति ॥५॥ हृदि ह्येष आत्मा ॥ अत्रैत-देकशतं नाडीनां तासां शतं शतमेकैकस्यां द्वासप्ततिर्द्वासप्ततिः प्रति-शाखानाडीसहस्राणि भवन्त्यासु व्यानश्चरति ॥६॥ अथैकयोर्ध्व उदानः पुण्येन पुण्यं लोकं नयति पापेन पापमुभाभ्यामेव मनुष्य-लोकम् ॥७॥ आदित्यो ह वै बाह्यः प्राण उदयत्येष ह्येनं चाक्षुषं प्राणमनुगृह्णानः ॥ पृथिव्यां या देवता सैषा पुरुषस्यापानमवष्टभ्या-न्तरा यदाकाशः स समानो वायुर्व्यानः ॥८॥ तेजो ह वा उदान-स्तस्मादुपशान्ततेजाः ॥ पुनर्भवमिन्द्रियैर्मनसि संपद्यमानैः ॥९॥ यच्चित्तस्तेनैष प्राणमायाति प्राणस्तेजसा युक्तः ॥ सहात्मना यथा-

सात ज्वाळा [दर्शन, श्रवण इत्यादि प्रकारच्या] उत्पन्न होतात.५. हृदयामध्यें हा (लिंगस्वरूपी) आत्मा आहे. येथेंच एकशें एक (प्रधान) नाडी आहेत. त्या प्रत्येक नाडीचे शंभर भेद [शाखानाडी] आहेत. त्या प्रत्येक शाखानाडीच्या (पुन्हां) वहात्तर हजार प्रतिशाखानाड्या आहेत. या नाड्यांमध्यें व्यान संचार करतो.६. (प्रधान नाड्यांपैकीं) एका (सुषुम्ना) नाडीनें ऊर्ध्वगामी उदान (वायु) पुण्यकर्मांचे योगानें पुण्यलोकाला नेतो; पापकर्मांचे योगानें पापलोकाला नेतो; दोन्ही समान असतील तर मनुष्य-लोकाला नेतो.७. आदित्य हा बाह्य प्राण आहे. तो चाक्षुष प्राणावर अनुग्रह करीत वर जातो. पृथिवीचें अधिष्ठान असणारी जी देवता ती अपान व्यापून देहाच्या खालीं जाते. मध्यभागींची आकाश देवता समान व्यापून रहाते. (सर्वव्यापी) वायु देवता व्यान व्यापते.८. (सामान्य) तेजोरूपी देवता उदान व्यापून रहाते. (तें देवतेचें तेज शरीरांतून नाहींसें झालें ह्मणजे) त्याचे योगानें मनुष्य नष्टतेज होतो [मरण पावतो], (सर्व) इंद्रियें मनामध्यें प्रविष्ट होऊन पुनर्जन्माप्रत जातो.९. (मरणकालीं) जो संकल्प असतो त्या संकल्पानुसार मनुष्य (पुन्हां) प्राणयुक्त होतो. प्राण तेजानें युक्त होऊन (स्वामी भोक्ता) जो आत्मा त्यासह (मनुष्याला) संकल्पानुरूप

संकल्पितं लोकं नयति ॥१०॥ य एवं विद्वान्प्राणं वेद ॥ न हास्य प्रजा हीयतेऽमृतो भवति तदेष श्लोकः ॥११॥ उत्पत्तिमायतिं स्थानं विभुत्वं चैव पंचधा ॥ अध्यात्मं चैव प्राणस्य विज्ञायामृतमश्नुते विज्ञायामृतमश्नुत इति ॥१२॥ इति तृतीयः प्रश्नः ॥३॥

अथ हैनं सौर्यायणी गार्ग्यः पप्रच्छ ॥ भगवन्नेतस्मिन्पुरुषे कानि स्वपन्ति कान्यस्मिञ्जाग्रति कतर एष देवः स्वप्नान्पश्यति कस्यैतत्सुखं भवति कस्मिन्नु सर्वे संप्रतिष्ठिता भवन्तीति ॥१॥ तस्मै स होवाच ॥ यथा गार्ग्य मरीचयोऽर्कस्यास्तं गच्छतः सर्वा एतस्मिंस्तेजोमंडल एकीभवन्ति ॥ ताः पुनः पुनरुदयतः प्रचरन्त्येवं ह वै तत्सर्वं परे देवे मनस्येकीभवति ॥ तेन तर्ह्येष पुरुषो न शृणोति न

लोकाप्रत नेतो.१० जो हें सर्व जाणतो त्यालाच प्राणाचें ज्ञान झालें (असें समजावें). हें ज्ञान झालेल्या मनुष्याचा वंश क्षीण होत नाहीं. (शरीर नष्ट झालें तरी) तो मृत्युरहित होतो. याविषयी पुढील श्लोक आहे–११. (या) प्राणाची उत्पत्ति, आगमन, स्थिति आणि पांच प्रकारांनीं (शरीर) व्यापून रहाणें [हें बाह्य अधिदैव व अधिभूत] व आत्म्याशीं संबद्ध [अध्यात्म] असें (चक्षु इत्यादिकांचे ठिकाणी) रहाणें हीं जाणणारा मृत्युरहितत्व पावतो.१२.

## प्रश्न चवथा.

नंतर गर्गगोत्रोत्पन्न सौर्यायणि पिप्पलाद मुनींना प्रश्न करता झाला कीं, हे भगवन्, या शरीरामध्यें कोणतीं इंद्रियें झोंप घेतात? कोणती जागतात? कोणता देव स्वप्नें पहातो? सुख होतें हे कोणाला होतें? हीं सर्व (इंद्रियें वगैरे) कशामध्यें स्थित आहेत?१. पिप्पलाद मुनि त्याला ह्मणाले, हे गार्ग्या, ज्याप्रमाणें अस्ताला जाणाऱ्या सूर्याचे सर्व किरण त्या तेजोमंडलामध्यें एक होतात आणि सूर्य पुन्हां उदय पावला ह्मणजे (त्यापासून पुन्हां) ते प्रसृत होतात, त्याप्रमाणें तें (विषय व इंद्रियें यांपासून उत्पन्न होणारें)

पश्यति न जिघ्रति न रसयते न स्पृशते नाभिवदते नादत्ते नानन्दयते न विसृजते नेयायते स्वपितीत्याचक्षते ॥२॥ प्राणाग्नय एवैतस्मिन्पुरे जाग्रति गार्हपत्यो ह वा एषोऽपानो व्यानोऽन्वाहार्यपचनो यद्गार्हपत्यात्प्रणीयते प्रणयनादाहवनीयः प्राणः ॥३॥ यदुच्छ्वासनिश्वासावेतावाहुती समं नयतीति स समानः मनो ह वाव यजमान इष्टफलमेवोदानः स एनं यजमानमहरहर्ब्रह्म गमयति ॥४॥ अत्रैष देवः स्वप्ने महिमानमनुभवति ॥ यद्दृष्टं दृष्टमनुपश्यति श्रुतं श्रुतमेवार्थमनुशृणोति देशदिगंतरैश्च प्रत्यनुभूतं पुनः पुनः प्रत्यनुभवति दृष्टं चादृष्टं च श्रुतं चाश्रुतं चानुभूतं चाननुभूतं च सच्चासच्च सर्वं पश्यति सर्वः

सर्व (त्यांहून) श्रेष्ठ व दिव्य अशा मनामध्यें (स्वप्नकाळीं) एक होतें. म्हणून हा पुरुष (त्या वेळीं) ऐकत नाहीं, पहात नाहीं, वास घेत नाहीं, स्वाद घेत नाही, स्पर्श जाणत नाहीं, बोलत नाहीं, घेत नाही, आनंद पावत नाहीं, टाकीत नाहीं, गमन करीत नाहीं. तो झोंप घेत आहे असें म्हणतात.२. (इंद्रियें झोंप घेत असतां) या शरीरामध्यें प्राणरूपी अग्नि जागृत असतात. अपान हा गार्हपत्य (अग्नि) होय. व्यान हा अन्वाहार्यपचन (दक्षिणाग्नि) होय. प्राण हा गार्हपत्यापासून वर (मुख व नासिका यांचे ठिकाणीं) नेला जातो म्हणून आहवनीय (अग्नि) होय.३. उच्छ्वास आणि निश्वासरूपी आहुति (शरीराच्या बाहेर व आंत) समान नेतो म्हणून समान हा होत होय. मन हा यजमान होय. आणि उदान हें यज्ञाचें फल होय. (कारण) तो (ऊर्ध्वगामी उदान सुषुप्तिकाळीं) दररोज यजमानाला [मनाला] ब्रह्माची प्राप्ति करून देतो.४. या वेळीं हाच (मनोरूपी) देव स्वप्नामध्यें (आपल्या) महान् रूपाचा अनुभव घेतो, जें जें (वासनेच्या प्रबलतेनुरूप) पाहिलें असेल तें तें पुन्हां पहातो, ऐकलें असेल तें तें पुन्हां ऐकतो, नाना ठिकाणीं अनुभविलें असेल तें तें पुन्हां अनुभवितो; पाहिलेलें, न पाहिलेलें, ऐकलेलें, न ऐकलेलें, अनुभविलेलें, न अनुभविलेलें, अस्तित्वांत

पश्यति ॥५॥ स यदा तेजसाभिभूतो भवत्यत्रैष देवः स्वप्नान्न पश्यत्यथ तदैतस्मिञ्छरीरे एतत्सुखं भवति ॥६॥ स यथा सोम्य वयांसि वासोवृक्षं संप्रतिष्ठन्ते ॥ एवं ह वै तत्सर्वं पर आत्मनि संप्रतिष्ठते ॥७॥ पृथिवी च पृथिवीमात्रा चापश्चापोमात्रा च तेजश्च तेजोमात्रा च वायुश्च वायुमात्रा चाकाशश्चाकाशमात्रा च चक्षुश्च द्रष्टव्यं च श्रोत्रं च श्रोतव्यं च घ्राणं च घ्रातव्यं च रसश्च रसयितव्यं च त्वक् च स्पर्शयितव्यं च वाक् च वक्तव्यं च हस्तौ चादातव्यं चोपस्थश्चानन्दयितव्यं च पायुश्च विसर्जयितव्यं च पादौ च गन्तव्यं च मनश्च मन्तव्यं च बुद्धिश्च बोद्धव्यं चाहंकारश्चाहंकर्तव्यं च चित्तं च चेतयितव्यं च तेजश्च विद्योतयितव्यं च प्राणश्च विधारयितव्यं च ॥८॥ एष हि द्रष्टा स्प्रष्टा श्रोता घ्राता रसयिता मन्ता बोद्धा कर्ता विज्ञानात्मा पुरुषः ॥

असलेले, अस्तित्वांत नसलेलें, असें सर्व (स्वतः) सर्वरूप होत्साता पहातो.५. तो (मनोरूपी) देव जेव्हां (ब्रह्मरूपी) तेजानें व्याप्त होतो तेव्हां याला स्वप्नें दिसत नाहींत (मनाचे किरण हृदयामध्यें आकृष्ट होतात). तेव्हां (सुषुप्तीमध्ये) या शरीराला हें सुख होतें.६. बाळा गार्ग्या, पक्षी ज्याप्रमाणें निवासस्थानाच्या वृक्षावर (एकत्र) जातात त्याप्रमाणें (या वेळीं) हीं सर्व श्रेष्ठ अशा (आनंदस्वरूपी) आत्म्याचे ठिकाणीं एकत्र होतात.७. (हें सर्व ह्मणजे)– (स्थूल) पृथिवी, पृथिवीमात्रा [कारणरूप सूक्ष्म तन्मात्रा], आप, आपोमात्रा, तेज, तेजोमात्रा, वायु, वायुमात्रा, आकाश, आकाशमात्रा, चक्षु, द्रष्टव्य [चक्षूला गोचर असें सर्व], श्रोत्र, श्रोतव्य, घ्राण, घ्रातव्य, रस, रसयितव्य, त्वचा, स्पर्शयितव्य, वाणी, वक्तव्य, हस्त, हस्तविषय, उपस्थ, उपस्थविषय, गुद, विसर्जयितव्य, पाय, गमनविषय, मन, मंतव्य, बुद्धि, बोद्धव्य, अहंकार, अहंकारविषय, चित्त, चित्तविषय, तेज, तेजोविषय, प्राण आणि प्राणधारणविषय.८. हाच (उपाधिरहित झालेला) पहाणारा, स्पर्श करणारा, श्रवण करणारा, वास घेणारा, स्वाद घेणारा, मनन करणारा, जाणणारा

स परेऽक्षरे आत्मनि संप्रतिष्ठते ॥९॥ परमेवाक्षरं प्रतिपद्यते स यो ह वै तदच्छायमशरीरमलोहितं शुभ्रमक्षरं वेदयते यस्तु सोम्य ॥ स सर्वज्ञः सर्वो भवति तदेष श्लोकः ॥१०॥ विज्ञानात्मा सह देवैश्च सर्वैः प्राणा भूतानि संप्रतिष्ठन्ति यत्र ॥ तदक्षरं वेदयते यस्तु सोम्य स सर्वज्ञः सर्वमेवाविवेशेति ॥११॥ इति चतुर्थः प्रश्नः ॥४॥

अथ हैनं शैब्यः सत्यकामः पप्रच्छ ॥ स यो ह वै तद्भगवन्मनुष्येषु प्रायणान्तमोंकारमभिध्यायीत ॥ कतमं वाव स तेन लोकं जयतीति ॥१॥ तस्मै स होवाच ॥ एतद्वै सत्यकाम परं चापरं च ब्रह्म यदोंकारः। तस्माद्विद्वानेतेनैवायतनेनैकतरमन्वेति ॥२॥ स यद्येक-

कर्ता, विज्ञानस्वभावी आत्मा पुरुष होय. हा पर [श्रेष्ठ] व अविनाशी अशा आत्म्याचे [परमात्म्याचे] ठिकाणीं स्थित आहे.९. हे बाळा, त्या अच्छाय [तमोरहित], (सर्व नामरूपादि उपाधिरूपी) शरीररहित, अंतःकरणरहित [अथवा रागरहित], शुभ्र [प्रकाशरूप], नाशरहित अशा परमात्म्याला जो जाणतो तो त्या अविनाशी परमात्म्याप्रत जातो. तो सर्वरूप व सर्वज्ञ होतो. याविषयीं असा श्लोक आहे—१०. सर्व करणांनीं [देवैः] युक्त असे प्राण व (पृथिव्यादि) भूतें ज्याचे ठिकाणीं स्थित आहेत अशा त्या विज्ञानरूपी व अविनाशी परमात्म्याला जो जाणतो तो, हे बाळा, सर्वज्ञ होय, तो सर्व व्यापून रहातो.११.

## प्रश्न पांचवा.

नंतर शिबीचा पुत्र सत्यकाम मुनींना विचारता झाला कीं, हे भगवन्, मनुष्यांपैकीं जो कोणी मरणापर्यंत ॐकाराचें [ॐकाररूपी ब्रह्माचें] ध्यान करील तो तेणेंकरून कोणता लोक प्राप्त करून घेईल? १. मुनि त्याला ह्मणाले, हे सत्यकामा, ॐकाररूपी ब्रह्म पर आणि अपर असें (दोन प्रकारचें) आहे. ह्मणून हें जाणणारा मनुष्य याच (आत्मप्राप्तीला साधन अशा) ॐकारध्यानरूपी आश्रयानें (स्वतःला प्रिय वाटणाऱ्या)

मात्रमभिध्यायीत स तेनैव संवेदितस्तूर्णमेव जगत्यामभिसंपद्यते ॥ तमृचो मनुष्यलोकमुपनयन्ते स तत्र तपसा ब्रह्मचर्येण श्रद्धया संपन्नो महिमानमनुभवति ॥३॥ अथ यदि द्विमात्रेण मनसि संपद्यते सोऽन्तरिक्षं यजुर्भिरुन्नीयते सोमलोकम् ॥ स सोमलोके विभूतिमनुभूय पुनरावर्तते ॥४॥ यः पुनरेतं त्रिमात्रेणोमित्येतेनैवाक्षरेण परं पुरुषमभिध्यायीत स तेजसि सूर्ये संपन्नः ॥ यथा पादोदरस्त्वचा विनिर्मुच्यत एवं ह वै स पाप्मना विनिर्मुक्तः स सामभिरुन्नीयते ब्रह्मलोकं स एतस्माज्जीवघनात्परात्परं पुरिशयं पुरुषमीक्षते तदेतौ श्लोकौ भवतः ॥५॥ तिस्रो मात्रा मृत्युमत्यः प्रयुक्ता अन्योन्यसक्ता अनविप्रयुक्ताः ॥ क्रियासु बाह्याभ्यन्तरमध्यमासु सम्यक् प्रयुक्तासु न कंपते

दोहोंपैकीं एका ब्रह्माकडे जातो.२. तो जर केवळ अकारमात्र ॐकारब्रह्माचें ध्यान करील तर त्या ध्यानाचे योगानें (एकमात्रा—) ज्ञानयुक्त होऊन (पुन्हां) लवकरच पृथिवीवर (संपन्न) जन्म पावतो. ऋग्वेदाचे मंत्र त्याला मनुष्यशरीराला आणतात. तो तेथें तप, ब्रह्मचर्य आणि श्रद्धा यांनीं युक्त होत्साता वैभवाचा [आत्मानंदरहित मानुषानंदाचा] अनुभव घेतो.३. जर दोन मात्रांनीं युक्त अशा ॐकारब्रह्माचें ध्यान करील तर तो मनानें संपन्न होतो. यजुर्वेदाचे मंत्र त्याला अंतरिक्षांतील सोमलोकाप्रत नेतात. तो सोमलोकामध्यें ऐश्वर्याचा अनुभव घेऊन पुन्हां (मृत्युलोकीं) परत येतो.४. परंतु जो (पूर्ण) तीन मात्रांनीं ॐ या अक्षरानें पर पुरुषाचें ध्यान करील तो तेजोयुक्त सूर्यलोकीं संपन्न होतो. ज्याप्रमाणें सर्प कात टाकतो त्याप्रमाणें तो पापापासून मुक्त होत्साता साममंत्रांनीं वर ब्रह्मलोकीं जातो [खालीं येत नाहीं]. तो (तेथें) या जीवयुक्त आत्म्याहून अत्यंत श्रेष्ठ व सर्वशरीरव्यापी अशा पुरुषाला पहातो. याविषयीं पुढील श्लोक आहेत—५. तीन मात्रा (ब्रह्मदृष्टि नसेल तर) मृत्युयुक्त आहेत. त्याच आत्म्याचे ध्यानाकडे लावल्या तर परस्परसंबद्ध व अभिन्न आहेत.

ज्ञः ॥६॥ ऋग्भिरेतं यजुर्भिरन्तरिक्षं सामभिर्यत्तत्कवयो वेदयन्ते ॥ तमोंकारेणैवायतनेनान्वेति विद्वान्यत्तच्छान्तमजरममृतमभयं परं चेति ॥७॥ इति पंचमः प्रश्नः ॥५॥

अथ हैनं सुकेशा भारद्वाजः पप्रच्छ ॥ भगवन्हिरण्यनाभः कौसल्यो राजपुत्रो मामुपेत्यैतं प्रश्नमपृच्छत ॥ षोडशकलं भारद्वाज पुरुषं वेत्थ तमहं कुमारमब्रुवं नाहमिमं वेद यद्यहमिममवेदिषं कथं ते नावक्ष्यमिति समूलो वा एष परिशुष्यति योऽनृतमभिवदति तस्मान्नार्हाम्यनृतं वक्तुं स तूष्णीं रथमारुह्य प्रवव्राज ॥ तं त्वा पृच्छामि

बाह्य, आभ्यंतर आणि मध्यम [याग, प्राणायाम, जप इत्यादि] क्रियांचे ठिकाणीं (ब्रह्माहून मी भिन्न नाहीं अशा) योग्य रीतीनें या मात्रांचा उपयोग केला असतां ज्ञानी मनुष्य (ॐकाररूप होत्साता) चंचलतारहित होतो.६. ऋग्वेदमंत्रांनीं हा (मनुष्य) लोक, यजुर्वेदमंत्रांनीं अंतरिक्षलोक आणि सामवेदमंत्रांनीं ज्ञानी जो जाणतात तो (ब्रह्म—)लोक प्राप्त होतो. तो हा (अपरब्रह्मलक्षण त्रिविध लोक) ॐकाररूपी साधनानेंच विद्वानाला प्राप्त होतो. शान्त, जरारहित, मरणरहित व भयरहित असें जें पर ब्रह्म तें याच ॐकाररूपी साधनानें विद्वानाला प्राप्त होतें.७.

## प्रश्न सहावा.

नंतर भरद्वाजाचा पुत्र सुकेशा मुनींना विचारता झाला कीं, हे भगवन्, कोसलदेशीचा हिरण्यनाभ नामक राजपुत्र माझ्याकडे येऊन प्रश्न विचारता झाला कीं, "हे भारद्वाजा, सोळा कलांचा [अवयवांचा] पुरुष तुला माहीत आहे का?" त्या कुमाराला मीं सांगितलें की, "मला माहीत नाहीं. जर असा (पुरुष) मला माहीत असता तर मीं तुला कां बरें सांगितला नसता? जो असत्य बोलतो तो मूळासकट सर्वत्र शुष्क होतो. ह्मणून मीं असत्य भाषण करणें योग्य नाहीं." तो मुकाट्यानें रथावर आरूढ होऊन परत गेला. (असा) हा पुरुष कोठें आहे असें मी

कासौ पुरुष इति ॥१॥ तस्मै स होवाच ॥ इहैवान्तःशरीरे सोम्य स पुरुषो यस्मिन्नेताः षोडशकलाः प्रभवन्तीति ॥२॥ स ईक्षांचक्रे ॥ कस्मिन्नहमुत्क्रान्त उत्क्रान्तो भविष्यामि कस्मिन्वा प्रतिष्ठिते प्रतिष्ठास्यामीति ॥३॥ स प्राणमसृजत प्राणाच्छ्रद्धां खं वायुर्ज्योतिरापः पृथिवीन्द्रियं मनः ॥ अन्नमन्नाद्वीर्यं तपो मन्त्राः कर्म लोका लोकेषु च नाम च ॥४॥ स यथेमा नद्यः स्यन्दमानाः समुद्रायणाः समुद्रं प्राप्यास्तं गच्छन्ति भिद्येते तासां नामरूपे समुद्र इत्येवं प्रोच्यते ॥ एवमेवास्य परिद्रष्टुरिमाः षोडशकलाः पुरुषायणाः पुरुषं प्राप्यास्तं गच्छन्ति भिद्येते चासां नामरूपे पुरुष इत्येवं प्रोच्यते स एषोऽकलोऽमृतो भवति तदेष श्लोकः ॥५॥ अरा इव रथनाभौ

आपणांस विचारतों.१. त्याला ते मुनि ह्मणाले, बाळा, ज्याच्यामध्यें सोळा कला उत्पन्न होतात असा हा पुरुष याच शरीराच्या अंतर्भागीं (हृदयकमलीं) आहे.२. तो (पुरुष) विचार करता झाला कीं, "असें कोणतें तत्त्व आहे कीं जें (देहांतून) वर गेलें असतां मी वर जाईन आणि जें (देहामध्यें) स्थित असतां मी स्थित राहीन?"३. (ह्मणून) त्यानें प्राणाची उत्पत्ति केली. प्राणापासून श्रद्धा, नंतर आकाश, वायु, तेज, आप, पृथिवी, इंद्रिय [कर्मेंद्रियें व ज्ञानेंद्रियें], मन, अन्न, अन्नापासून वीर्य, तप, (वेदांचे) मंत्र, कर्म, लोक [कर्माचें फल पृथिवी, स्वर्ग इत्यादि] आणि लोकांमध्यें नांव.४. ज्याप्रमाणें या वहाणाऱ्या व समुद्राकडे जाणाऱ्या नद्या समुद्राप्रत प्राप्त झाल्या असतां अस्त पावतात व त्यांचें नांव आणि रूप हीं समुद्रामध्यें नष्ट होतात, त्याप्रमाणें या सर्वसाक्षी पुरुषाच्या या सोळा कला पुरुषाकडे जाणाऱ्या आहेत, या पुरुषाकडे आल्या ह्मणजे अस्त पावतात व यांचें नांव आणि रूप हीं पुरुषामध्यें नष्ट होतात असें (ब्रह्मज्ञान्यांनीं) सांगितलें आहे. (हें जो जाणतो) तो कलारहित व मृत्युरहित होतो. याविषयीं असा श्लोक आहे.—५. रथनाभीचे ठिकाणीं ज्याप्रमाणें

कला यस्मिन्प्रतिष्ठिताः ॥ तं वेद्यं पुरुषं वेद यथा मा वो मृत्युः परिव्यथा इति ॥६॥ तान्होवाचैतावदेवाहमेतत्परं ब्रह्म वेद नातः परमस्तीति ॥७॥ ते तमर्चयन्तस्त्वं हि नः पिता योऽस्माकमविद्यायाः परं पारं तारयसीति ॥ नमः परमऋषिभ्यो नमः परमऋषिभ्यः ॥८॥ इति षष्ठः प्रश्नः ॥६॥

ॐ भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवा भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः ॥ स्थिरैरंगैस्तुष्टुवांसस्तनूभिर्व्यशेम देवहितं यदायुः ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

इति अथर्ववेदीया प्रश्नोपनिषत्समाप्ता ॥

---

अरा, त्याप्रमाणें ज्याचे ठिकाणीं कला स्थित आहेत त्या जाणण्याला योग्य अशा पुरुषाला, हे शिष्यहो, तुह्मांला मृत्यूनें पीडा देऊं नये याकरितां, जाणा.६. (नंतर) त्यांना ते (पिप्पलाद मुनि) ह्मणाले, परब्रह्माचें मला इतकेंच ज्ञान आहे; आणि या ज्ञानाहून अधिक ज्ञान (कोणालाच) नाहीं.७. त्या शिष्यांनीं मुनीची पूजा करून भाषण केलें कीं, अविद्येच्या परतीरावर नेऊन आमचें तारण करणारा जो तूं तोच खरोखर आमचा पिता आहेस. (ब्रह्मविद्यासंप्रदायी) श्रेष्ठ ऋषींना आमचा (आदरयुक्त) नमस्कार असो.८.

# मुंडकोपनिषत् ॥५॥

ॐ भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवा भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः ॥ स्थिरैरंगैस्तुष्टुवांसस्तनूभिर्व्यशेम देवहितं यदायुः ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

ॐ ब्रह्मा देवानां प्रथमः संबभूव विश्वस्य कर्ता भुवनस्य गोप्ता ॥ स ब्रह्मविद्यां सर्वविद्याप्रतिष्ठामथर्वाय ज्येष्ठपुत्राय प्राह ॥१॥ अथर्वणे यां प्रवदेत ब्रह्माथर्वा तां पुरोवाचांगिरे ब्रह्मविद्याम् ॥ स भारद्वाजाय सत्यवहाय प्राह भारद्वाजोऽगिरसे परावराम् ॥२॥ शौनको ह वै महाशालोऽगिरसं विधिवदुपसन्नः पप्रच्छ ॥ कस्मिन्नु भगवो विज्ञाते सर्वमिदं विज्ञातं भवतीति ॥३॥ तस्मै स होवाच ॥ द्वे विद्ये वेदितव्ये इति ह स्म यद्ब्रह्मविदो वदन्ति परा चैवापरा च ॥४॥ तत्रापरा ऋग्वेदो यजुर्वेदः सामवेदोऽथर्ववेदः शिक्षा कल्पो व्याकरणं

## मुंडकोपनिषत्.

### मुंडक पहिलें.

(इंद्रादि) देवांपैकीं प्रथम, विश्वाचा कर्ता व भुवनांचा पालयिता ब्रह्मदेव उत्पन्न झाला. सर्व विद्यांचें आश्रयस्थान अशी ब्रह्मविद्या त्यानें (आपला) ज्येष्ठ पुत्र अथर्वा याला सांगितली.१. ब्रह्मदेवानें जी ब्रह्मविद्या अथर्वा याला सांगितली ती त्यानें नंतर अंगिः याला सांगितली. त्यानें भरद्वाजगोत्रोत्पन्न सत्यवहाला सांगितली. (अशी एकापासून दुसऱ्याला अशा) क्रमानें आलेली (ही विद्या) सत्यवहानें अंगिरसाला सांगितली.२. अत्यंत गृहस्थधर्मयुक्त शौनक विधिपूर्वक अंगिरस् मुनीकडे येऊन विचारता झाला कीं, हे भगवन्, (असें) काय (आहे कीं जें) जाणलें असतां हें सर्व ज्ञात होईल?३. त्याला ते मुनि ह्मणाले, परा विद्या आणि अपरा विद्या या दोन विद्या जाणण्याला योग्य आहेत असें ब्रह्मवेत्ते सांगतात.४. त्यांपैकीं

**निरुक्तं छन्दो ज्योतिषमिति ॥ अथ परा यया तदक्षरमधिगम्यते ॥५॥ यत्तदद्रेश्यमग्राह्यमगोत्रमवर्णमचक्षुःश्रोत्रं तदपाणिपादम् ॥ नित्यं विभुं सर्वगतं सुसूक्ष्मं तदव्ययं यद्भूतयोनिं परिपश्यन्ति धीराः ॥६॥ यथोर्णनाभिः सृजते गृह्णते च यथा पृथिव्यामोषधयः संभवन्ति ॥ यथा सतः पुरुषात्केशलोमानि तथाक्षरात्संभवतीह विश्वम् ॥७॥ तपसा चीयते ब्रह्म ततोऽन्नमभिजायते ॥ अन्नात्प्राणो मनः सत्यं लोकाः कर्मसु चामृतम् ॥८॥ यः सर्वज्ञः सर्वविद्यस्य ज्ञानमयं**

अपरा विद्या ह्मणजे ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद (आणि त्यांचीं अंगें) शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद आणि ज्योतिष हीं होत. आतां परा विद्या ह्मणजे जिच्या योगानें तें अविनाशी (ब्रह्म) प्राप्त होतें ती होय.५. तें (ब्रह्म) ह्मणजे जें (ज्ञानेंद्रियांना) पहाण्यास अशक्य, (कर्मेंद्रियांना) ग्रहण करण्यास अशक्य, मूलरहित, गुणरहित, चक्षु व श्रोत्र यांनीं रहित, हस्त व पाद यांनीं रहित, नित्य, सर्वविध [=विभु= ब्रह्मदेवापासून स्थावरापर्यंत सर्व प्राण्यांच्या रूपानें सर्वविध असलेलें], सर्वव्यापी, अत्यंत सूक्ष्म आणि क्षयरहित असें जें (सर्व) प्राण्यांच्या उत्पत्तीला कारण आहे असें ज्ञाते जाणतात तें होय.६. ज्याप्रमाणें कोळी (स्वतःच तंतु) उत्पन्न करतो व (पुन्हां) आंत घेतो, ज्याप्रमाणें पृथिवी-वर ओषधी उत्पन्न होतात, ज्याप्रमाणें जिवंत मनुष्यापासून (मस्तकाचे) केश आणि (शरीरावरील) लव उत्पन्न होतात त्याप्रमाणें (त्या) अविनाशी ब्रह्मापासून विश्व उत्पन्न होतें.७. (सृष्टि निर्माण करण्याच्या ज्ञानरूप) तपानें (कार्यलक्षण हिरण्यगर्भनामक) ब्रह्म वृद्धि पावते [मी अनेक रूपें धारण करीन असें ध्यान करतें]; त्यापासून अन्न उत्पन्न होतें; अन्नापासून प्राण उत्पन्न होतो; प्राणापासून मन [संकल्प] उत्पन्न होतें; मनापासून आकाशादि भूतपंचक [सत्य] उत्पन्न होतें; पंचमहाभूतांपासून (भू आदि सात) लोक उत्पन्न होतात; लोकांपासून कर्म उत्पन्न होतें; आणि

तपः ॥ तस्मादेतद्ब्रह्म नाम रूपमन्नं च जायते ॥९॥ इति प्रथममुंडके प्रथमः खंडः ॥१॥

तदेतत्सत्यं मन्त्रेषु कर्माणि कवयो यान्यपश्यंस्तानि त्रेतायां बहुधा संततानि ॥ तान्याचरथ नियतं सत्यकामा एष वः पन्थाः सुकृतस्य लोके ॥१॥ यदा लेलायते ह्यर्चिः समिद्धे हव्यवाहने ॥ तदाज्यभागावन्तरेणाहुतीः प्रतिपादयेत् ॥२॥ यस्याग्निहोत्रमदर्शमपौर्णमासमचातुर्मास्यमनाग्रयणमतिथिवर्जितं च ॥ अहुतमवैश्वदेवमविधिना हुतमासप्तमांस्तस्य लोकान्हिनस्ति ॥३॥ काली कराली

कर्मांचे ठिकाणीं कर्मफल [अमृतं] उत्पन्न होतें.८. जें (सामान्यतः) सर्व जाणणारें, (विशेषतः) सर्व जाणणारें, ज्याचें तप ज्ञानमय आहे (आयासमय नाहीं), अशा अ-क्षर ब्रह्मापासून हे (कार्यलक्षण हिरण्यगर्भ) ब्रह्म उत्पन्न होते. तशींच रूप, अन्न (इत्यादि) उत्पन्न होतात.९.

(दोन्ही विद्यांचें सामान्य स्वरूप सांगून आतां विशेष स्वरूप सांगतात—) (ऋग्वेदादि) मंत्रांचे ठिकाणीं (अग्निहोत्रादि) जीं कर्मं (वसिष्ठादि) ऋषींनी अवलोकन केलीं तीं (हौत्र, आध्वर्यव आणि औद्गात्र अशा) तिहींनीं युक्त बहुत प्रकारांनी प्रवृत्त असलेलीं सत्य आहेत [पुरुषार्थ प्राप्त करून देणारीं आहेत]. हे कर्मफलेच्छुहो, त्यांचे नित्य आचरण करा. चांगल्या प्रकारें आचरलेल्या कर्मांचे फल तुह्मांला मिळण्याला [लोके] हा मार्ग आहे.१. जेव्हां इंधनांनीं सम्यक् पेटलेल्या अग्नीमध्यें ज्वाळा चलन पावत असते तेव्हां आज्यभागांचे मध्यंतरीं आहुति द्याव्या.२. ज्याचें अग्निहोत्र दर्शकर्मवर्जित, पौर्णमासकर्मवर्जित, चातुर्मास्यकर्मवर्जित, आग्रयणकर्मवर्जित, अतिथिपूजनवर्जित, हवनवर्जित, वैश्वदेववर्जित, हवन असेल तर तें अविधिपूर्वक, असें असेल तर तेणेंकरून त्याला सातहि लोक अप्राप्य होतात [योग्य कर्म केलें असतां सात लोकांची प्राप्ति होते].३. काली, कराली, मनोजवा, सुलोहिता, सुधूम्रवर्णा,

च मनोजवा च सुलोहिता या च सुधूम्रवर्णा ॥ स्फुलिंगिनी विश्वरुची च देवी लेलायमाना इति सप्तजिह्वाः ॥४॥ एतेषु यश्चरते भ्राजमानेषु यथाकालं चाहुतयो ह्याददायन् ॥ तं नयन्त्येताः सूर्यस्य रश्मयो यत्र देवानां पतिरेकोऽधिवासः ॥५॥ एह्येहीति तमाहुतयः सुवर्चसः सूर्यस्य रश्मिभिर्यजमानं वहन्ति ॥ प्रियां वाचमभिवदन्त्योऽर्चयन्त्य एष वः पुण्यः सुकृतो ब्रह्मलोकः ॥६॥ प्लवा ह्येते अदृढा यज्ञरूपा अष्टादशोक्तमवरं येषु कर्म ॥ एतच्छ्रेयो येऽभिनन्दन्ति मूढा जरामृत्युं ते पुनरेवापि यन्ति ॥७॥ अविद्यायामन्तरे वर्तमानाः स्वयं धीराः पंडितं मन्यमानाः ॥ जंघन्यमानाः परियन्ति मूढा अंधेनैव नीयमाना यथांधाः ॥८॥ अविद्यायां बहुधा

स्फुलिंगिनी आणि दिव्य विश्वरुची अशा चलन पावणाऱ्या सात अग्नीच्या जिह्वा आहेत.४. या प्रदीप्त असतां यांचेमध्यें यथाकाल आहुति देऊन जो (अग्निहोत्रादि) कर्म करतो त्याला या सूर्यरश्मिरूप होऊन ज्या ठिकाणीं देवेंद्र एकटा वास करतो त्या ठिकाणी नेतात.५. दीप्तियुक्त [सुवर्चसः] अशा त्या आहुति 'इकडे ये' 'इकडे ये' असें ह्मणतच (कीं काय) सूर्याच्या रश्मींचे द्वारें 'हा पुण्य ब्रह्मलोक [स्वर्ग] तुझ्या कर्माचें फल होय' असें प्रिय भाषण उच्चारीत व पूजन करीत यजमानाला (स्वर्गलोकीं) नेतात.६. (सोळा ऋत्विज्, यजमान आणि पत्नी असें) अठरा जणांचें (ज्ञानरहित ह्मणून) गौण कर्म ज्यांमध्यें सांगितलें आहे अशा या यज्ञरूपी नौका अस्थिर आहेत. हेंच श्रेयस्कर आहे असें समजून जे मूढ यांतच आनंद मानतात ते पुन्हां पुन्हां जरा व मृत्यु यांप्रत येतात.७. अज्ञानामध्यें रहाणारे (परंतु) स्वतःला बुद्धिमान् व विद्वान् असें मानणारे (हे) मूढ (जरारोगादिकांनीं) वारंवार पीडित होत्साते अंध अंधानें वाट दाखविली असतां जसे (व्यर्थ) भ्रमण पावतात त्याप्रमाणें भ्रमण पावतात.८. अनेक प्रकारांनीं अविद्येमध्यें रहाणारे अज्ञानी जन आपण कृतार्थ

वर्तमाना वयं कृतार्था इत्यभिमन्यन्ति बालाः ॥ यत्कर्मिणो न प्रवेदयन्ति रागात्तेनातुराः क्षीणलोकाश्च्यवन्ते ॥९॥ इष्टापूर्तं मन्यमाना वरिष्ठं नान्यच्छ्रेयो वेदयन्ते प्रमूढाः ॥ नाकस्य पृष्ठे ते सुकृतेऽनुभूत्वेमं लोकं हीनतरं वा विशन्ति ॥१०॥ तपःश्रद्धे ये ह्युपवसन्त्यरण्ये शान्ता विद्वांसो भैक्ष्यचर्यां चरन्तः ॥ सूर्यद्वारेण ते विरजाः प्रयान्ति यत्रामृतः स पुरुषो ह्यव्ययात्मा ॥११॥ परीक्ष्य लोकान्कर्मचितान्ब्राह्मणो निर्वेदमायान्नास्त्यकृतः कृतेन ॥ तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत्समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम् ॥१२॥ तस्मै स विद्वानुपसन्नाय सम्यक् प्रशान्तचित्ताय शमान्विताय ॥ येनाक्षरं

आहोंत असा अभिमान बाळगतात. (कर्मांचे ठिकाणीं असलेल्या) प्रीतीमुळें (आपल्या अधःपाताचें) कारण कर्मठ जन जाणत नाहींत. त्यामुळें ते दुःखी होत्साते कर्मफलाचा क्षय झाला ह्मणजे खालीं पडतात.९. इष्ट [यागादि श्रौत] आणि पूर्त [वापीतडागादि स्मार्त] कर्म हेंच अत्यंत श्रेष्ठ आहे असें मानणारे मूढ जन याहून श्रेयस्कर दुसरें कांहीं नाहीं असें समजतात. स्वर्गांतील श्रेष्ठ कर्मफलभोगस्थानीं (कर्मफलाचा) उपभोग घेतल्यानंतर ते या (मानुष) लोकीं अथवा याहून हीन अशा (तिर्यक् इत्यादि) लोकीं प्रवेश करतात.१०. (परंतु याच्या उलट) जे शमयुक्त विद्वान् [वानप्रस्थ व संन्यासी] अरण्यामध्यें भिक्षाचर्य आचरण करून तप [आश्रमविहित कर्म] आणि श्रद्धा [ब्रह्मविद्या] यांचें सेवन करतात ते कर्मरहित [विरजाः] होऊन ज्या ठिकाणीं तो मृत्युरहित व अव्ययस्वभाव (परम) पुरुष आहे त्या (सत्यलोकादिकांचे) ठिकाणीं सूर्याचे मार्गानें जातात.११. कर्मापासून प्राप्त होणारे लोक (नाशवंत आहेत असें) जाणून ब्राह्मणानें वैराग्ययुक्त व्हावें. कर्मानें नित्य [अकृतः] असें ब्रह्म (प्राप्त होत) नाहीं. त्याच्या ज्ञानाकरितां त्यानें हातामध्यें समिधा घेऊन श्रुतिसंपन्न व ब्रह्मनिष्ठ अशा गुरूकडेच जावें.१२. (याप्रकारें) येणाऱ्या, सम्यक प्रशान्तचित्त व शमानें युक्त अशा त्याला तो

पुरुषं वेद सत्यं प्रोवाच तां तत्त्वतो ब्रह्मविद्याम् ॥१३॥ इति प्रथममुंडके द्वितीयः खंडः ॥२॥ ॥ इति प्रथममुंडकम् ॥१॥

तदेतत्सत्यं यथा सुदीप्तात्पावकाद्विस्फुलिंगाः सहस्रशः प्रभवन्ते सरूपाः ॥ तथाक्षराद्विविधाः सोम्य भावाः प्रजायन्ते तत्र चैवापि यन्ति ॥१॥ दिव्यो ह्यमूर्तः पुरुषः सबाह्याभ्यन्तरो ह्यजः ॥ अप्राणो ह्यमनाः शुभ्रो ह्यक्षरात्परतः परः ॥२॥ एतस्माज्जायते प्राणो मनः सर्वेंद्रियाणि च ॥ खं वायुर्ज्योतिरापः पृथिवी विश्वस्य धारिणी ॥३॥ अग्निर्मूर्धा चक्षुषी चंद्रसूर्यौ दिशः श्रोत्रे वाग्विवृताश्च वेदाः ॥ वायुः प्राणो हृदयं विश्वमस्य पद्भ्यां पृथिवी ह्येष सर्वभूतान्तरात्मा ॥४॥ तस्मादग्निः समिधो यस्य सूर्यः सोमात्पर्जन्य

ज्ञानी (गुरु), अ-क्षर व सत्य असा (परम) पुरुष ज्याच्या योगानें जाणला जातो ती ब्रह्मविद्या, योग्य प्रकारें सांगतो. १३.

## मुंडक दुसरें.

ही (परा विद्या) सत्य आहे. ज्याप्रमाणें चांगल्या पेटलेल्या अग्नीपासून तत्स्वरूप हजारों ठिणग्या उत्पन्न होतात, त्याप्रमाणें हे बाळा, (त्या) अ-क्षर ब्रह्मापासून [पुरुषापासून] नाना प्रकारचे जीव उत्पन्न होतात आणि त्याच्यामध्येंच लय पावतात. १. तो पुरुष दीप्तिमान्, अमूर्त, बाह्यवर्ती तसाच आन्तरवर्ती, जन्मरहित, प्राणरहित, मनोरहित [संकल्परहित], शुद्ध, दुसऱ्या (उपाधियुक्त) अक्षराहून श्रेष्ठ असा आहे. २. याच्यापासून प्राण, मन, सर्व इंद्रियें, आकाश, वायु, तेज, उदक आणि विश्वाला धारण करणारी पृथ्वी हीं उत्पन्न होतात. ३. याचें अग्नि हें मस्तक, चंद्र व सूर्य हे चक्षु, दिशा हें श्रोत्र, प्रसिद्ध वेद ही वाणी, वायु हा प्राण, आणि सर्व विश्व हें हृदय होय. पृथिवी याच्या पायांपासून उत्पन्न झाली. हा सर्व भूतांचा अंतरात्मा आहे. ४. त्या पुरुषापासून (द्युलोक हा) अग्नि उत्पन्न झाला, या अग्नीच्या समिधा सूर्य होय. (सूर्याचें द्युलोकाग्नीमध्यें हवन केल्यानें चंद्र उत्पन्न झाला).

ओषधयः पृथिव्याम् ॥ पुमान् रेतः सिंचति योषितायां बह्वीः प्रजाः पुरुषात्संप्रसूताः ॥५॥ तस्मादृचः साम यजूंषि दीक्षा यज्ञाश्च सर्वे क्रतवो दक्षिणाश्च ॥ संवत्सरश्च यजमानश्च लोकाः सोमो यत्र पवते यत्र सूर्यः ॥६॥ तस्माच्च देवा बहुधा संप्रसूताः साध्या मनुष्याः पशवो वयांसि ॥ प्राणापानौ व्रीहियवौ तपश्च श्रद्धा सत्यं ब्रह्मचर्यं विधिश्च ॥७॥ सप्त प्राणाः प्रभवन्ति तस्मात्सप्तार्चिषः समिधः सप्त होमाः ॥ सप्त इमे लोका येषु चरन्ति प्राणा गुहाशया निहिताः सप्त सप्त ॥८॥ अतः समुद्रा गिरयश्च सर्वेऽस्मात्स्यंदन्ते सिंधवः सर्व-

चंद्राख्या हवनापासून [चंद्र हा समिधा अर्थात् द्युलोक हाच अग्नि] पर्जन्य उत्पन्न झाला. (पर्जन्याचें) पृथिवी–(रूपी अग्नी–)चे ठिकाणीं (हवन केल्यानें) ओषधी उत्पन्न झाल्या. (ओषधींचें पुरुषरूपी अग्नीमध्ये हवन केल्याने रेत उत्पन्न झालें). ...अशा प्रकारें त्या पुरुषापासूनच बहुत प्रजा उत्पन्न झाल्या.५. ऋग्वेद, सामवेद, यजुर्वेद, (मौंजी आदि) दीक्षा, (अग्निहोत्रादि यूपरहित) यज्ञ, सर्व (यूपसहित) यज्ञ [क्रतु], दक्षिणा, संवत्सर [कर्मांगकाल], यजमान, आणि जेथें चंद्र पावन करतो व जेथें सूर्य (तपन पावतो) ते (कर्मफलरूपी) लोक हे त्या पुरुषापासूनच उत्पन्न झाले.६. त्यापासूनच (वसु आदि) नाना प्रकारचे देव, साध्य, मनुष्य, पशु, पक्षी, प्राण, अपान, (हवीकरितां लागणारे) व्रीहि व यव, तप, श्रद्धा, सत्य, ब्रह्मचर्य आणि विधि ही सर्व उत्पन्न झालीं.७. (मस्तकांतले श्रोत्र, नेत्र, नासिका व मुख हे) सात प्राण, सात ज्वाळा (इंद्रियांच्या विषयांचें प्रकाशन), (सात) समिधा [विषय], सात होम [विषयांचे ज्ञान], ज्यांमध्यें प्राण वावरतात असे सात लोक [इंद्रियें] आणि हृदयामध्यें (अथवा शरीरामध्यें) [गुहायां] (विधात्यानें प्रतिप्राण्याचे ठिकाणीं) स्थापन केलेले प्राण हीं सर्व त्या पुरुषापासूनच उत्पन्न झालीं.८. सर्व समुद्र आणि पर्वत यापासून उत्पन्न झाले. नाना प्रकारचीं रूपें धारण करणाऱ्या नद्या यापा–

रूपाः ॥ अतश्च सर्वा ओषधयो रसश्च येनैष भूतैस्तिष्ठते ह्यन्तरात्मा ॥९॥ पुरुष एवेदं विश्वं कर्म तपो ब्रह्म परामृतम् ॥ एतद्यो वेद निहितं गुहायां सोऽविद्याग्रंथिं विकिरतीह सोम्य ॥१०॥ इति द्वितीयमुंडके प्रथमः खंडः ॥१॥

आविः संनिहितं गुहाचरं नाम महत्पदमत्रैतत्समर्पितम् ॥ एजत्प्राणन्निमिषच्च यदेतज्जानथ सदसद्वरेण्यं परं विज्ञानाद्यद्वरिष्ठं प्रजानाम् ॥१॥ यदर्चिमद्यदणुभ्योऽणु च यस्मिँल्लोका निहिता लोकिनश्च ॥ तदेतदक्षरं ब्रह्म स प्राणस्तदु वाङ्मनः ॥ तदेतत्सत्यं तदमृतं

सून प्रवाह पावतात. सर्व ओषधी आणि ज्या (षड्विध) रसाच्या योगानें हा अंतरात्मा (स्थूल) भूतांनीं परिवेष्टित असा रहातो तो रस हीं सर्व त्या पुरुषापासूनच उत्पन्न झालीं.९. पुरुषच हें (सर्व) विश्व, कर्म, तप, आणि श्रेष्ठ व मृत्युरहित असें ब्रह्म आहे. हें ब्रह्म (आपल्या) हृदयामध्यें स्थित आहे असें जो जाणतो तोच हे बाळा, जिवंतपणीं अविद्यारूपी ग्रंथी तोडून टाकतो.१०.

प्रकाशरूप [आविः], (हृदयामध्यें) सम्यक् स्थित [संनिहित], शरीरामध्यें संचार करणारें [गुहाचरं] अशी ज्याची प्रसिद्धि आहे, महत्त्वामुळें (सर्व पदांच्या अर्थांचें ह्मणजे) पदार्थांचें स्थान, ज्यामध्यें चलन पावणारे (पक्षी आदि) आणि प्राणापानादिकांनीं युक्त (मनुष्य पशु आदि) निमेष (व उन्मेष) करणारे (प्राणी) असें सर्व (वस्तुजात) स्थित आहे, सदसत्स्वरूप [सद्रूप व असद्रूप सर्व वस्तु ज्यानें व्यापलेल्या आहेत], वरणीय, लौकिक ज्ञानाच्या पलीकडे असलेलें आणि सर्व वस्तूंमध्यें श्रेष्ठ, अशा ब्रह्माचें, हे शिष्यहो, तुह्मी ज्ञान करून घ्या.१. जें दीप्तिमान् आहे, जें सूक्ष्माहून देखील सूक्ष्म आहे, (भू आदि) लोक आणि (त्या) लोकांतील (मनुष्यादि) रहिवासी हे ज्याच्यामध्यें स्थित आहेत, तें हें अविनाशी ब्रह्म होय. तेंच प्राण, तेंच वाणी, तेंच मन होय. तें सत्य, मरणरहित

तद्वेद्धव्यं सोम्य विद्धि ॥२॥ धनुर्गृहीत्वौपनिषदं महास्त्रं शरं ह्युपासा-
निशितं संधयीत ॥ आयम्य तद्भावगतेन चेतसा लक्ष्यं तदेवाक्षरं
सोम्य विद्धि ॥३॥ प्रणवो धनुः शरो ह्यात्मा ब्रह्म तल्लक्ष्यमुच्यते ॥
अप्रमत्तेन वेद्धव्यं शरवत्तन्मयो भवेत् ॥४॥ यस्मिन्द्यौः पृथिवी
चान्तरिक्षमोतं मनः सह प्राणैश्च सर्वैः ॥ तमेवैकं जानथ आत्मान-
मन्या वाचो विमुंचथामृतस्यैष सेतुः ॥५॥ अरा इव रथनाभौ
संहता यत्र नाड्यः ॥ स एषोऽन्तश्चरते बहुधा जायमानः ॥ ॐ
इत्येवं ध्यायथ आत्मानं स्वस्ति वः पाराय तमसः परस्तात् ॥६॥
यः सर्वज्ञः सर्वविद्यस्यैष महिमा भुवि ॥ दिव्ये ब्रह्मपुरे ह्येष

आहे. तें (मनाचें) लक्ष्य झालें पाहिजे. बाळा, तूं त्याचे ज्ञान करून घे.२. महास्त्र जें उपनिषद्रूपी धनुष्य तें घेऊन त्याला सतत ध्यानानें बारीक केलेला [उपासानिशित] शर लाव. ब्रह्माचे ठिकाणीं ज्याची भावना गेली आहे अशा चित्तानें तें ओढून, हे बाळा, त्याच अ-क्षर (ब्रह्मरूपी) लक्ष्याचें छेदन कर.३. ॐकार हें धनुष्य, आत्मा हा शर आणि ब्रह्म हें त्याचें लक्ष्य. एकाग्र चित्तानें नेम मारला असतां —ज्याप्रमाणें शर लक्ष्यमय होतो त्याप्रमाणें— (मारणारा) ब्रह्ममय होतो.४. स्वर्ग, पृथिवी, अंतरिक्ष आणि सर्व इंद्रियांसह मन हीं ज्याचे ठिकाणीं वेष्टिलीं आहेत ते एक ब्रह्म तुह्मीच आहां असें जाणा. इतर वाचा सोडून द्या. (हें ज्ञान) हाच मोक्षप्राप्तीचा सेतु आहे.५. ज्याप्रमाणें रथनाभीचे ठिकाणीं अरा त्याप्रमाणें (शरीरांतील) नाड्या ज्याचे ठिकाणीं एक होतात तो (क्रुद्ध, हर्षयुक्त इत्यादि) नाना प्रकारांनीं प्रकट होणारा (आत्मा) शरीरांत वावरतो. त्या आत्म्याचें ॐकाररूपानें ध्यान करा. (अविद्यारूपी) तमाच्या पलीकडे जाऊं इच्छिणाऱ्या तुमचें पैलतीरीं सुखानें गमन होवो.६. जो (सामान्यतः) सर्व जाणणारा आहे, जो (विशेषतः) सर्व वस्तु जाणणारा आहे, पृथ्वीवर ज्याचा हा महिमा स्पष्ट दिसत आहे [सूर्य, चंद्र, पंचमहाभूतें

व्योम्न्यात्मा प्रतिष्ठितः ॥ मनोमयः प्राणशरीरनेता प्रतिष्ठितोऽन्ने हृदयं संनिधाय ॥ तद्विज्ञानेन परिपश्यन्ति धीरा आनंदरूपममृतं यद्विभाति ॥७॥ भिद्यते हृदयग्रंथिश्छिद्यन्ते सर्वसंशयाः ॥ क्षीयन्ते चास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे परावरे ॥८॥ हिरण्मये परे कोशे विरजं ब्रह्म निष्कलम् ॥ तच्छुभ्रं ज्योतिषां ज्योतिस्तद्यदात्मविदो विदुः ॥९॥ न तत्र सूर्यो भाति न चंद्रतारकं नेमा विद्युतो भान्ति कुतोऽयमग्निः ॥ तमेव भान्तमनु भाति सर्वं तस्य भासा सर्वमिदं विभाति ॥१०॥ ब्रह्मैवेदममृतं पुरस्ताद्ब्रह्म पश्चाद्ब्रह्म दक्षिणतश्चोत्तरेण ॥ अधश्चोर्ध्वं च

वगैरे आपली कामें नियमानें करीत आहेत हा त्याचाच महिमा], दिव्य अशा ब्रह्मपुरांतील ह्मणजे हृदयपुंडरीकांतील आकाशामध्यें हा आत्मा स्थित आहे. मनाचे द्वारें प्रकट होणारा, प्राण व शरीर यांचा नियंता असा हा (आत्मा) हृदयाचा आश्रय घेऊन अन्नाचे ठिकाणी स्थित आहे. आनंदरूपानें आणि अमृतरूपानें जें प्रकाशमान होत आहे असें हें आत्मतत्त्व विशिष्ट (अनुभवयुक्त) ज्ञानानेंच ज्ञाते जाणतात.७. कारणरूप [पर] व कार्यरूप [अवर] अशा या आत्मतत्त्वाचें दर्शन [अनुभवयुक्त ज्ञान] झालें ह्मणजेच हृदयाची (अविद्यावासनारूप) ग्रंथि तुटते, सर्व संशयांचा नाश होतो आणि (जन्ममरणाला कारण अशा सर्व) कर्मांचा क्षय होतो.८. ज्योतिर्मय अशा श्रेष्ठ [आत्मस्वरूपाची उपलब्धि येथें होते ह्मणून श्रेष्ठ] कोशामध्यें असलेलें, मलरहित, अवयवरहित, शुद्ध, प्रकाशरूप पदार्थांचें देखील प्रकाशक असें तें ब्रह्म, जे आत्म्याला जाणणारे असतात तेच जाणतात.९. त्या ब्रह्माला सूर्य प्रकाशित करीत नाहीं, चंद्र अथवा तारका प्रकाशित करीत नाहींत, या विजा प्रकाशित करीत नाहींत, मग अग्नि कुठला ? स्वतःप्रकाश अशा त्याच्याच प्रकाशानें सर्व (प्रकाशरूप वस्तु) प्रकाशित होतात. त्याच्याच प्रकाशाचे योगानें हें सर्व (जगत्) प्रकाश पावतें.१०. हें मरणरहित ब्रह्मच पुढें, मागें, उजवीकडे, डावीकडे, खालीं, वर सर्वत्र

प्रसृतं ब्रह्मैवेदं विश्वमिदं वरिष्ठम् ॥११॥ इति द्वितीयमुंडके द्वितीय: खंड: ॥२॥ इति द्वितीयमुंडकम् ॥२॥

द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते ॥ तयोरन्य: पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्न्यो अभिचाकशीति ॥१॥ समाने वृक्षे पुरुषो निमग्नोऽनीशया शोचति मुह्यमान: ॥ जुष्टं यदा पश्यत्यन्य-मीशमस्य महिमानमिति वीतशोक: ॥२॥ यदा पश्य: पश्यते रुक्म-वर्णं कर्तारमीशं पुरुषं ब्रह्मयोनिम् ॥ तदा विद्वान्पुण्यपापे विधूय निरंजन: परमं साम्यमुपैति ॥३॥ प्राणो ह्येष य: सर्वभूतैर्विभाति विजानन्विद्वान्भवते नातिवादी ॥ आत्मक्रीड आत्मरति: क्रियावानेष

पसरलेलें आहे. हें ब्रह्मच सर्व विश्व होय. हें सर्वांमध्यें अत्यंत श्रेष्ठ आहे. ११.

## मुंडक तिसरें.

सर्वदा एकत्र असणारे व एकमेकांचे मित्र असे दोन पक्षी [जीव व ईश्वर] एकाच (शरीररूपी) वृक्षाला चिकटून राहिले आहेत. त्यांपैकीं एक [जीव] (कर्मनिष्पन्न) स्वादांनीं युक्त असें फल भक्षण करतो व दुसरा कांहीं भक्षण न करितां केवळ पहात असतो. १. (दोघांनाहि) समान असणाऱ्या त्या (शरीररूपी) वृक्षाचे ठिकाणीं चिकटलेला (एक) पुरुष (जीव) (त्यावर) आपलें स्वामित्व नाहीं अशा कल्पनेनें वेडा होत्साता दु:ख करतो. दुसरा पक्षी (ईश्वर) समाधानी व (त्यामुळें) वृक्षाचा स्वामी आहे असें जेव्हां हा (जीव) पहातो तेव्हां हा महिमा याचा आहे असें जाणून तो शोकरहित होतो. २. स्वयंज्योति:स्वभाव, (जगाचा) कर्ता, स्वामी, ब्रह्म आणि ब्रह्माचें कारण हाच (ईश्वर) असें जेव्हां हा पहाणारा जीव प्रत्यक्ष पहातो तेव्हां हा ज्ञानी होऊन पुण्य आणि पाप यांचा नाश करून लेपरहित होत्साता (त्या परब्रह्माबरोबर) सर्वस्वीं साम्य पावतो. ३. जो सर्व भूतांचे द्वारें प्रकाशित होत आहे तो प्राण (अथवा ईश्वर) हाच आहे

**ब्रह्मविदां वरिष्ठः ॥४॥ सत्येन लभ्यस्तपसा ह्येष आत्मा सम्यग्ज्ञानेन ब्रह्मचर्येण नित्यम् ॥ अंतःशरीरे ज्योतिर्मयो हि शुभ्रो यं पश्यन्ति यतयः क्षीणदोषाः ॥५॥ सत्यमेव जयति नानृतं सत्येन पंथा विततो देवयानः ॥ येनाक्रमन्त्यृषयो ह्याप्तकामा यत्र तत्सत्यस्य परमं निधानम् ॥६॥ बृहच्च तद्दिव्यमचिन्त्यरूपं सूक्ष्माच्च तत्सूक्ष्मतरं विभाति ॥ दूरात्सुदूरे तदिहान्तिके च पश्यत्स्विहैव निहितं गुहायाम् ॥७॥ न चक्षुषा गृह्यते नापि वाचा नान्यैर्देवैस्तपसा कर्मणा वा ॥ ज्ञानप्रसादेन विशुद्धसत्त्वस्ततस्तु तं पश्यते निष्कलं ध्यायमानः ॥८॥ एषोऽणुरात्मा चेतसा वेदितव्यो यस्मिन्प्राणः पंचधा**

[ब्र० मीच आहें] असें जाणणारा विद्वान् फार [व्यर्थ] बोलत नाहीं. आत्म्याचे बरोबर क्रीडा करणारा व आत्म्यावर प्रीति करणारा, असा होत्साता क्रिया करणारा हाच ब्रह्मवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ होय.४. सत्य, तप, योग्य ज्ञान आणि सतत ब्रह्मचर्य यांचे योगानें हा आत्मा [ईश्वर] प्राप्त होतो. ज्योतिर्मय व शुभ्र अशा याला ज्यांचे दोष नाश पावले आहेत असे यति आपल्याच शरीरामध्यें स्थित असा पहातात.५. सत्याचाच जय होतो, असत्याचा नाहीं. तृष्णारहित [आप्तकामाः] ऋषि जो मार्ग आक्रमण करतात व ज्या मार्गावर सत्याचें परम स्थान ह्म० ब्रह्म आहे असा देवयान मार्ग सत्यानें भरलेला आहे.६. तें (ब्रह्म) मोठें व प्रकाशरूप आहे, त्याच्या स्वरूपाची कल्पना करणें शक्य नाहीं, तें सूक्ष्माहून देखील सूक्ष्म आहे. दूराहून देखील दूर ठिकाणीं तें आहे, समीप आहे, त्याला पहाणारांना [योगी, ज्ञानी वगैरेंना] ते येथेंच (बुद्धिरूपी) गुहेमध्यें स्थित आहे (असें दिसतें).७. चक्षूंनीं त्याचें ग्रहण होत नाहीं, वाणीनें होत नाहीं, इतर इंद्रियांनीं होत नाहीं, तप अथवा कर्म यांनीं होत नाहीं. ज्ञानप्रसादानें जेव्हां अंतःकरण शुद्ध होईल तेव्हांच त्या अवयवरहित ब्रह्माचें ध्यान केलें असतां तें दिसतें.८. ज्यामध्ये प्राण

संविवेश ॥ प्राणैश्चित्तं सर्वमोतं प्रजानां यस्मिन्विशुद्धे विभवत्येष आत्मा ॥९॥ यं यं लोकं मनसा संविभाति विशुद्धसत्त्वः कामयते यांश्च कामान् ॥ तं तं लोकं जयते तांश्च कामांस्तस्मादात्मज्ञं ह्यर्चये-द्भूतिकामः ॥१०॥ इति तृतीयमुंडके प्रथमः खंडः ॥१॥

स वेदैतत्परमं ब्रह्म धाम यत्र विश्वं निहितं भाति शुभ्रम् ॥ उपासते पुरुषं ये ह्यकामास्ते शुक्रमेतदतिवर्तन्ति धीराः ॥१॥ कामान्यः कामयते मन्यमानः स कामभिर्जायते तत्र तत्र ॥ पर्याप्त-कामस्य कृतात्मनस्तु इहैव सर्वे प्रविलीयन्ति कामाः ॥२॥ नाय-

(प्राणापानादि) पांच भेदांनीं वास करीत आहे अशा शरीरामध्यें हा अणु-स्वरूप आत्मा अंतःकरणानें जाणला पाहिजे. जनांचें अंतःकरण (इंद्रियां-सहवर्तमान प्राणांनीं) व्यापलें आहे. हें अंतःकरण शुद्ध झालें ह्मणजे हा आत्मा स्वतः प्रकाशमान होतो.९. ज्या ज्या (पितृलोक आदि) लोकाचा मनानें संकल्प करतो, विशुद्धान्तःकरण होत्साता ज्या ज्या भोगांची इच्छा करतो, तो तो लोक त्याला प्राप्त होतो आणि ते ते भोग प्राप्त होतात. ह्मणून (आपली आत्यंतिक) उन्नति इच्छिणाऱ्या मनुष्यानें आत्मज्ञानी मनु ष्याची पूजा करावी (व त्यापासून आत्मज्ञान प्राप्त करून घ्यावें).१०.

(कारण) अत्यंत श्रेष्ठ असें स्थान, ज्याच्यामध्यें (सर्व) विश्व अर्पित आहे, आणि जें (अत्यंत) स्वच्छ प्रकाशानें युक्त आहे, असे ब्रह्म तो (आत्मज्ञानी मनुष्य) जाणतो. जे बुद्धिमान् मनुष्य तृष्णारहित होत्साते या ब्रह्माची उपासना करतात ते जन्ममरण ओलांडून पलीकडे जातात.१. कामांचें चिंतन करीत जो ते (प्राप्त होण्याची) इच्छा करतो तो त्या त्या कामांचे योगानें त्या त्या (कामप्राप्तीला निमित्त अशा) ठिकाणीं जन्म पावतो. परंतु ज्याचे सर्व काम (आत्मप्राप्तिकामामुळें) गेलेले आहेत व जो परमात्मरूप झाला आहे अशा मनुष्याचे सर्व काम या जन्मींच [इहैव] नाश पावतात.२. हा आत्मा (वेदशास्त्रादिकांच्या) अध्ययनानें प्राप्त होत

मात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन ॥ यमेवैष वृणुते तेन लभ्यस्तस्यैष आत्मा विवृणुते तनुं स्वाम् ॥३॥ नायमात्मा बलहीनेन लभ्यो न च प्रमादात्तपसो वाप्यलिंगात् ॥ एतैरुपायैर्यतते यस्तु विद्वांस्तस्यैष आत्मा विशते ब्रह्मधाम ॥४॥ संप्राप्यैनमृषयो ज्ञानतृप्ताः कृतात्मानो वीतरागाः प्रशान्ताः ॥ ते सर्वगं सर्वतः प्राप्य धीरा युक्तात्मानः सर्वमेवाविशन्ति ॥५॥ वेदान्तविज्ञानसुनिश्चितार्थाः संन्यासयोगाद्यतयः शुद्धसत्त्वाः ॥ ते ब्रह्मलोकेषु परान्तकाले परामृताः परिमुच्यन्ति सर्वे ॥६॥ गताः कलाः पंचदश प्रतिष्ठा देवाश्च सर्वे प्रतिदेवतासु ॥ कर्माणि विज्ञानमयश्च आत्मा परेऽव्यये

नाहीं, धारणाशक्तीनें प्राप्त होत नाहीं, बहुत श्रवणानें प्राप्त होत नाहीं. (तर) ज्या आत्म्याची प्राप्ति होण्याची हा (साधक) इच्छा करतो त्या प्राप्तीच्या इच्छेनेंच हा प्राप्त होतो. (कारण) अशा मनुष्यालाच हा आत्मा आपलें स्वरूप प्रकट करतो.३. (आत्मनिष्ठारूपी) बल ज्याचेजवळ नाहीं, (लौकिक विषयासक्तिरूप) प्रमादानें जो युक्त आहे, अथवा जो अहेतुपूर्वक तपश्चर्या करीत नाहीं, त्याला हा आत्मा प्राप्त होत नाहीं. जो विद्वान् (बल, अप्रमाद आणि अहेतुक तप) या उपायांनीं प्रयत्न करतो त्याचा आत्मा ब्रह्मस्थान पावतो.४. याची प्राप्ति झालेले ऋषि त्या ज्ञानानें तृप्त होतात, परमात्मरूप होतात, विषयप्रीतिरहित होतात आणि अत्यंत शान्त होतात. ते बुद्धिमान् व नित्यसमाधानस्वभावी [युक्तात्मानः] सर्वव्यापी ब्रह्म सर्वत्र प्राप्त होत्साते (शरीरपातकालीं) सर्वांमध्यें (ह्मणजे ब्रह्मामध्यें) प्रवेश करतात.५. वेदान्ताच्या योगानें उत्पन्न झालेल्या विज्ञानानें ज्यांनीं (प्राप्तव्य) अर्थ [परमात्मा] सुनिश्चित केलेला आहे, संन्यासयोगामुळें जे यमनयुक्त व शुद्ध अंतःकरणयुक्त झाले आहेत ते ब्रह्मस्वरूप होत्साते [परामृताः परं अमृतं ब्रह्म आत्मभूतं येषां ते] सर्व देहपरित्यागकालीं ब्रह्मामध्यें [ब्रह्मलोके] मुक्त होतात.६. (त्या वेळीं) पंधरा कला आपापल्या

सर्व एकीभवन्ति ॥७॥ यथा नद्यः स्यन्दमानाः समुद्रेऽस्तं गच्छन्ति नामरूपे विहाय ॥ तथा विद्वान्नामरूपाद्विमुक्तः परात्परं पुरुषमुपैति दिव्यम् ॥८॥ स यो ह वै तत्परमं ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति नास्याब्रह्मवित्कुले भवति ॥ तरति शोकं तरति पाप्मानं गुहाग्रंथिभ्यो विमुक्तोऽमृतो भवति ॥९॥ तदेतदृचाभ्युक्तम् । क्रियावन्तः श्रोत्रिया ब्रह्मनिष्ठाः स्वयं जुह्वत एकर्षिं श्रद्धयन्तः ॥ तेषामेवैतां ब्रह्मविद्यां वदेत शिरोव्रतं विधिवद्यैस्तु चीर्णम् ॥१०॥ तदेतत्सत्यमृषिरंगिराः पुरोवाच नैतदचीर्णव्रतोऽधीते ॥ नमः परमऋषिभ्यो नमः परमऋषिभ्यः ॥११॥ इति तृतीयमुंडके द्वितीयः खंडः ॥२॥ इति तृतीयमुंडकम् ॥३॥

कारणाप्रत [प्रतिष्ठाः] जातात. (चक्षु आदि) सर्व इंद्रियें आपापल्या देवतेप्रत जातात. कर्मे व विज्ञानमय आत्मा ही सर्व अत्यंत श्रेष्ठ व अव्यय अशा ब्रह्माचे ठिकाणीं एकरूप होतात.७. ज्याप्रमाणें वहाणाऱ्या नद्या (आपलें) नांव व स्वरूप टाकून देऊन समुद्रामध्यें लय पावतात त्याप्रमाणें विद्वान् मनुष्य नांव व रूप यांपासून मुक्त होऊन श्रेष्ठाहून देखील श्रेष्ठ अशा दिव्य (परम) पुरुषाप्रत जातो.८. हें परम ब्रह्म जो कोणी जाणतो तो ब्रह्मच होतो. त्याच्या कुळामध्यें ब्रह्म न जाणणारा कोणी होत नाहीं. तो शोकाच्या पलीकडे जातो, पापाच्या पलीकडे जातो, हृदयस्थ अविद्यारूपी ग्रंथींतून मुक्त होऊन मृत्युरहित होतो.९. हा (विद्यासंप्रदानविधि) पुढील मंत्रानें स्पष्ट करतात— जे योग्य कर्माचें अनुष्ठान करणारे श्रुतिसंपन्न विद्वान् (अपर) ब्रह्माचे ठिकाणीं निष्ठा असलेले श्रद्धापूर्वक स्वतः एकर्षिनामक अग्नीचें हवन करतात आणि ज्यांनीं (अथर्ववेदामध्यें सांगितलेलें) शिरोव्रत विधिपूर्वक पाळलें असेल त्यांनाच ही ब्रह्मविद्या सांगावी.१०. तें हें (परम) पुरुषाचें यथार्थ ज्ञान पूर्वी अंगिरा मुनींनीं सांगितलें. ज्यानें व्रत आचरण केलें नसेल तो याचें अध्ययन करूं शकत

ॐ भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवा भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः ॥ स्थिरैरंगैस्तुष्टुवांसस्तनूभिर्व्यशेम देवहितं यदायुः ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

इति अथर्ववेदीया मुंडकोपनिषत्समाप्ता ॥

---

नाहीं [म्हणजे त्याला हे ज्ञान प्राप्त होत नाहीं]. (ही ब्रह्मविद्या परंपरेनें प्राप्त करून देणाऱ्या) थोर ऋषींना (आदरपूर्वक) नमस्कार असो. ११.

# मांडूक्योपनिषत् ॥६॥



ॐ भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवा भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः ॥ स्थिरैरंगैस्तुष्टुवांसस्तनूभिर्व्यशेम देवहितं यदायुः ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

**ॐ इत्येतदक्षरमिदं सर्वं तस्योपव्याख्यानं भूतं भवद्भविष्यदिति सर्वमोङ्कार एव ॥ यच्चान्यत्त्रिकालातीतं तदप्योङ्कार एव ॥१॥ सर्वं ह्येतद्ब्रह्मायमात्मा ब्रह्म सोऽयमात्मा चतुष्पात् ॥२॥ जागरितस्थानो बहिष्प्रज्ञः सप्तांग एकोनविंशतिमुखः स्थूलभुग्वैश्वानरः प्रथमः पादः ॥३॥ स्वप्नस्थानोऽन्तःप्रज्ञः सप्तांग एकोनविंशतिमुखः प्रविविक्तभुक् तैजसो द्वितीयः पादः ॥४॥ यत्र सुप्तो न कंचन**

## मांडूक्योपनिषत्.



हें सर्व (विश्व) ओंकार आहे, ओंकाराचें उपव्याख्यान होय. भूत, वर्तमान आणि भविष्य सर्व ओंकारच होय. त्रिकालातीत जें कांहीं इतर असेल तेंहि ओंकारच होय.१. हें सर्व ब्रह्म आहे. हा आत्मा ब्रह्म आहे, हा (विश्व, तैजस, प्राज्ञ आणि तुरीय अशा) चार प्रकारचा आत्मा.२. जागृति हें ज्याचें स्थान आहे, स्वतःहून इतर पदार्थ ज्याच्या ज्ञानाचे विषय आहेत, (द्युलोक हें शिर, अग्नि हें मुख, सूर्य हा चक्षु, वायु हा प्राण, आकाश हा देहाचा मध्यभाग, उदक हें मूत्रस्थान आणि पृथिवी हें गुद असे) सात ज्याचे अवयव आहेत, (पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें, पांच प्राण आणि मन, बुद्धि, चित्त, अहंकार हीं) एकोणीस ज्याचीं मुखें आहेत, असा स्थूल विषयांचा भोक्ता वैश्वानर [सर्वपिंडात्मा] हा प्रथम प्रकार.३. स्वप्न हें ज्याचें स्थान, अंतर्विषय ज्याच्या ज्ञानाचा विषय, सात अवयव, एकोणीस मुखें, विषयस्पर्शरहित केवळ वासना हा ज्याचा भोग आहे असा तेजोरूप दुसरा प्रकार.४. निद्रा प्राप्त झाल्यामुळें

कामं कामयते न कंचन स्वप्नं पश्यति तत्सुषुप्तम् ॥ सुषुप्तस्थान एकीभूतः प्रज्ञानघन एवानन्दमयो ह्यानंदभुक् चेतोमुखः प्राज्ञस्तृतीयः पादः ॥५॥ एष सर्वेश्वर एष सर्वज्ञ एषोऽतर्याम्येष योनिः सर्वस्य प्रभवाप्ययौ हि भूतानाम् ॥६॥ नांतःप्रज्ञं न बहिष्प्रज्ञं नोभयतःप्रज्ञं न प्रज्ञानघनं न प्रज्ञं नाप्रज्ञम् ॥ अदृष्टमव्यवहार्यमग्राह्यमलक्षणमचिन्त्यमव्यपदेश्यमेकात्मप्रत्ययसारं प्रपंचोपशमं शान्तं शिवमद्वैतं चतुर्थं मन्यन्ते स आत्मा स विज्ञेयः ॥७॥ सोऽयमात्माऽध्यक्षरमोङ्कारोऽधिमात्रं पादा मात्रा मात्राश्च पादा अकार उकारो मकार इति ॥८॥ जागरितस्थानो वैश्वानरोऽकारः प्रथमा मात्राप्तेरादिमत्वाद्वाप्नोति ह वै सर्वान्कामानादिश्च भवति य एवं वेद ॥९॥

जेव्हां कोणतीहि इच्छा होत नाहीं, कोणतेंहि स्वप्न दिसत नाहीं, त्याला सुषुप्ति ह्मणतात. सुषुप्तिस्थानाचे ठिकाणीं, एक झालेला, प्रज्ञानपूर्ण व आनंदपूर्ण, आनंदाचा भोक्ता, चैतन्य हें ज्याचें मुख असा प्राज्ञ हा तिसरा प्रकार.५. हाच सर्वांचा ईश्वर, सर्वांचा ज्ञाता, हा (सर्वांचा) अंतर्यामी, हा सर्वांचें उत्पत्तिकारण, भूतांची उत्पत्ति व विनाश हाच होय.६. अंतःप्रज्ञ नव्हे, बहिष्प्रज्ञ नव्हे, उभयप्रज्ञ नव्हे, प्रज्ञानपूर्ण नव्हे, प्रज्ञ नव्हे, अप्रज्ञ नव्हे. अदृष्ट, अव्यवहार्य, अग्राह्य, अलक्षण, अचिंत्य, अव्यपदेश्य, एकात्मप्रत्यय हेंच ज्याचें सार आहे, प्रपंचविरहित, शान्त, कल्याणरूप आणि द्वैतरहित असा चवथा प्रकार होय. हाच (खरा) आत्मा. याचेंच ज्ञान करून घेतलें पाहिजे.७. तो हा आत्मा अक्षराचे योगानें वर्णन करतात. तें अक्षर ॐकार होय. हा मात्रांनीं युक्त असा आहे. आत्म्याचे पाद ते ॐकाराच्या मात्रा होत व ॐकाराच्या मात्रा ते आत्म्याचे पाद होत. त्या मात्रा ह्मणजे अकार, उकार, मकार या होत.८. जागृति हें ज्याचें स्थान आहे असा वैश्वानररूपी हा ॐकारांतील अकार होय. ही पहिली मात्रा. कारण अकारानें सर्व वाणी व्यापली आहे

स्वप्नस्थानस्तैजस उकारो द्वितीया मात्रोत्कर्षादुभयत्वाद्वोत्कर्षति ह वै ज्ञानसंततिं समानश्च भवति नास्याब्रह्मवित्कुले भवति य एवं वेद ॥१०॥ सुषुप्तस्थानः प्राज्ञो मकारस्तृतीया मात्रा मितेरपीतेर्वा मिनोति ह वा इदं सर्वमपीतिश्च भवति य एवं वेद ॥११॥ अमात्रश्चतुर्थोऽव्यवहार्यः प्रपंचोपशमः शिवोऽद्वैत एवमोङ्कार आत्मैव संविशत्यात्मनात्मानं य एवं वेद य एवं वेद ॥१२॥

ॐ भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवा भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः ॥ स्थिरैरंगैस्तुष्टुवांसस्तनूभिर्व्यशेम देवहितं यदायुः ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

इति अथर्ववेदीया मांडूक्योपनिषत्समाप्ता ॥

---

किंवा अकार पहिला वर्ण आहे. जो हें जाणतो त्याच्या सर्व इच्छा पूर्ण होतात, तो श्रेष्ठ होतो.९. स्वप्न हें ज्याचें स्थान आहे असा तेजोरूपी हा उकार होय. ही दुसरी मात्रा. कारण अकाराहून उकार वरचा आहे, अथवा अकार व मकार या दोहोंच्या मधला आहे. जो हें जाणतो तो ज्ञानपरंपरेची वृद्धि करतो, (शत्रुमित्रांचे ठिकाणीं) समान होतो, त्याच्या कुळामध्यें ब्रह्मविषयीं अज्ञानी कोणी होत नाहीं.१०. सुषुप्ति हें ज्याचें स्थान आहे असा प्राज्ञरूपी हा मकार होय. ही तिसरी मात्रा. कारण हा अकार व उकार यांचें मान करतो, किंवा सुषुप्तिकालीं विश्व व तैजस हे प्राज्ञामध्यें एक होतात. हें जो जाणतो तो सर्वांचें स्वतःमध्यें माप घेतो अथवा सर्वांशीं एकरूप होतो.११. मात्रारहित तो चवथा प्रकार. हा अव्यवहार्य, प्रपंचापासून निवृत्त, कल्याणरूप, अद्वैतरूप होय. या प्रकारें ॐकार हा आत्मा होय. हें जो जाणतो त्याचा आत्मा आत्म्यामध्यें प्रवेश करतो [आत्मरूप होतो].१२.

# तैत्तिरीयोपनिषत् ॥७॥

## शिक्षाध्यायः

ॐ शं नो मित्रः शं वरुणः ॥ शं नो भवत्वर्यमा ॥ शं न इंद्रो बृहस्पतिः ॥ शं नो विष्णुरुरुक्रमः ॥ नमो ब्रह्मणे ॥ नमस्ते वायो ॥ त्वमेव प्रत्यक्षं ब्रह्मासि ॥ त्वामेव प्रत्यक्षं ब्रह्म वदिष्यामि ॥ ऋतं वदिष्यामि ॥ सत्यं वदिष्यामि ॥ तन्मामवतु ॥ तद्वक्तारमवतु ॥ अवतु माम् ॥ अवतु वक्तारम् ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

**ॐ शं नो मित्रः शं वरुणः ॥ शं नो भवत्वर्यमा ॥ शं न इन्द्रो बृहस्पतिः ॥ शं नो विष्णुरुरुक्रमः ॥ नमो ब्रह्मणे ॥ नमस्ते वायो ॥ त्वमेव प्रत्यक्षं ब्रह्मासि ॥ त्वामेव प्रत्यक्षं ब्रह्म वदिष्यामि ॥ ऋतं वदिष्यामि ॥ सत्यं वदिष्यामि ॥ तन्मामवतु ॥ तद्वक्तारमवतु ॥ अवतु माम् ॥ अवतु वक्तारम् ॥१॥ इति प्रथमोऽनुवाकः ॥१॥**

**ॐ शीक्षां व्याख्यास्यामः ॥ वर्णः स्वरः ॥ मात्रा बलम् ॥ साम**

# तैत्तिरीयोपनिषत्.

---

## शिक्षाध्याय.

मित्र व वरुण आह्मांला कल्याणकारक होवोत. सूर्य आह्मांला कल्याणकारक होवो. इंद्र व बृहस्पति आह्मांला कल्याणकारक होवोत. विस्तीर्णगति विष्णु आह्मांला कल्याणकारक होवो. ब्रह्माला नमस्कार असो. हे वायु, तुला नमस्कार असो. तूंच प्रत्यक्ष ब्रह्म आहेस. तुलाच मी प्रत्यक्ष असें ब्रह्म ह्मणतों. मी यथाशास्त्र भाषण करीन. मी सत्य भाषण करीन. तें (वायुरूपी ब्रह्म) माझें रक्षण करो, वक्त्याचे रक्षण करो, माझें रक्षण करो, वक्त्याचें रक्षण करो. १.

आतां शिक्षेची व्याख्या सांगतों [जिच्या योगानें वर्णादिकांचा

संतानः ॥ इत्युक्तः शीक्षाध्यायः ॥१॥ इति द्वितीयोऽनुवाकः ॥२॥

सह नौ यशः ॥ सह नौ ब्रह्मवर्चसम् ॥ अथातः संहिताया उपनिषदं व्याख्यास्यामः ॥ पंचस्वधिकरणेषु ॥ अधिलोकमधिज्यौतिषमधिविद्यमधिप्रजमध्यात्मम् ॥ ता महासंहिता इत्याचक्षते ॥ अथाधिलोकम् ॥ पृथिवी पूर्वरूपम् ॥ द्यौरुत्तररूपम् ॥ आकाशः संधिः ॥१॥ वायुः संधानम् ॥ इत्यधिलोकम् ॥ अथाधिज्यौतिषम् ॥ अग्निः पूर्वरूपम् ॥ आदित्य उत्तररूपम् ॥ आपः संधिः ॥ वैद्युतः संधानम् ॥ इत्याधिज्यौतिषम् ॥ अथाधिविद्यम् ॥ आचार्यः पूर्वरूपम् ॥२॥ अन्तेवास्युत्तररूपम् ॥ विद्या संधिः ॥ प्रवचनꣳ संधानम् ॥ इत्यधिविद्यम् ॥ अथाधिप्रजम् ॥ माता पूर्वरूपम् ॥ पितोत्तररूपम् ॥

उच्चार करतां येतो ती शिक्षा]. वर्ण [अकारादि], स्वर [उदात्त आदि], मात्रा [ह्रस्व आदि], बल [उच्चारतांना करावा लागणारा प्रयत्न], साम [उच्चाराची समता] आणि संतान [संहिता]. (यांचें अध्ययन करावयाचें). याप्रमाणें शिक्षाध्याय सांगितला. १.

आह्मां दोघांना समान यश प्राप्त होवो. आमचें ब्रह्मचर्यतेज समान असो. आतां आह्मी संहिताविषय [संहिता=वर्णांचा समुच्चय, हा ज्याचा विषय आहे तें] दर्शन सांगतों. तें पांच विषयांनीं सांगतों. लोकांसंबंधानें, ज्योतिषासंबंधानें, विद्येसंबंधानें, प्रजेसंबंधानें आणि आत्म्यासंबंधानें, असे उपनिषदांचे पांच विषय आहेत. यांना महासंहिता असें ह्मणतात. आतां अधिलोकदर्शन सांगतों. पृथिवी हें पूर्वरूप, अंतरिक्षलोक हें उत्तररूप, आकाश हा संधि [मध्य]. १. वायु हें संधान [जोडणारा]. याप्रमाणें अधिलोकदर्शन झालें. आतां अधिज्यौतिष सांगतों. अग्नि हें पूर्वरूप, आदित्य हें उत्तररूप, उदक हा संधि, विद्युत् हें संधान. याप्रमाणें अधिज्यौतिष. आतां अधिविद्य– आचार्य हें पूर्वरूप. २. शिष्य हें उत्तररूप, विद्या हा संधि, प्रवचन हें संधान. याप्रमाणें अधिविद्य. आतां अधिप्रज–

प्रजा संधिः ॥ प्रजननꣳ संधानम् ॥ इत्यधिप्रजम् ॥३॥ अथाध्यात्मम् ॥ अधरा हनुः पूर्वरूपम् ॥ उत्तरा हनुरुत्तररूपम् ॥ वाक् संधिः ॥ जिह्वा संधानम् ॥ इत्यध्यात्मम् ॥ इतीमा महासंहिताः ॥ य एवमेता महासंहिता व्याख्याता वेद ॥ संधीयते प्रजया पशुभिः ॥ ब्रह्मवर्चसेनान्नाद्येन सुवर्ग्येण लोकेन ॥४॥ ( संधिराचार्यः पूर्वरूपमित्यधिप्रजं लोकेन ) ॥ इति तृतीयोऽनुवाकः ॥३॥

यश्छंदसामृषभो विश्वरूपः ॥ छन्दोभ्योऽध्यमृतात्संबभूव ॥ स मेन्द्रो मेधया स्पृणोतु ॥ अमृतस्य देव धारणो भूयासम् ॥ शरीरं मे विचर्षणम् ॥ जिह्वा मे मधुमत्तमा ॥ कर्णाभ्यां भूरि विश्रुवम् ॥ ब्रह्मणः कोशोऽसि मेधया पिहितः ॥ श्रुतं मे गोपाय ॥ आवहन्ती वितन्वाना ॥१॥ कुर्वाणा चीरमात्मनः ॥ वासांसि मम गावश्च ॥

माता हें पूर्वरूप, पिता हें उत्तररूप, प्रजा हा संधि, प्रजनन हें संधान. याप्रमाणें अधिप्रज.३. आतां अध्यात्म– खालची हनुवटी हें पूर्वरूप, वरची हनुवटी हें उत्तररूप, वाणी हा संधि, जिह्वा हें संधान. याप्रमाणें अध्यात्मदर्शन झालें. या महासंहिता होत. जो या महासंहिता या प्रकारें जाणतो तो प्रजा, पशु, ब्रह्मतेज, मुख्य अन्न [तांदुळ इत्यादि] आणि (कर्मांचें फल असा) स्वर्गलोक यांनीं युक्त होतो.४.

जो वेदांमध्ये प्रधान आहे, जो सर्वरूप आहे, जो वेदोरूपी अमृतापासून उत्पन्न झाला, असा (ॐकाररूपी) इंद्र मला ज्ञानानें समृद्ध करो. हे देवा, मला अमृताचा [अर्थात् अमृतसाधक ब्रह्मज्ञानाचा] धारणकर्ता होऊं दे. माझें शरीर योग्य होऊं दे. माझी जिह्वा अत्यंत मधुरभाषणी होऊं दे. कर्णांनीं मला पुष्कळ श्रवण करूं दे. तूं परमात्म्याचें प्रतीक लौकिकज्ञानानें आच्छादित आहेस [=लौकिक ज्ञानाला समजत नाहींस]. माझें श्रवण (आत्मज्ञान वगैरे) रक्षण कर. [ज्ञानप्राप्तीकरितां ह्मणण्याचे हे मंत्र झाले. आतां श्रीच्या प्राप्तीकरितां ह्मणण्याचे मंत्र सांगतात–] आणणारी,

अन्नपाने च सर्वदा ॥ ततो मे श्रियमावह ॥ लोमशां पशुभिः सह स्वाहा ॥ आ मा यन्तु ब्रह्मचारिणः स्वाहा ॥ वि मायन्तु ब्रह्मचारिणः स्वाहा ॥ प्र मायन्तु ब्रह्मचारिणः स्वाहा ॥ दमायन्तु ब्रह्मचारिणः स्वाहा ॥ शमायन्तु ब्रह्मचारिणः स्वाहा ॥२॥ यशो जनेऽसानि स्वाहा ॥ श्रेयान् वस्यसोऽसानि स्वाहा ॥ तं त्वा भग प्रविशानि स्वाहा ॥ स मा भग प्रविश स्वाहा ॥ तस्मिन्सहस्रशाखे ॥ नि भगाहं त्वयि मृजे स्वाहा ॥ यथापः प्रवता यन्ति ॥ यथा मासा अहर्जरम् ॥ एवं मां ब्रह्मचारिणः ॥ धातरायन्तु सर्वतः स्वाहा ॥ प्रतिवेशोऽसि प्र मा भाहि प्र मा पद्यस्व ॥३॥ ( वितन्वाना शमायन्तु ब्रह्मचारिणः स्वाहा ॥ धातरायन्तु सर्वतः स्वाहैकं च) ॥ इति चतुर्थोऽनुवाकः ॥४॥

भूर्भुवः सुवरिति वा एतास्तिस्रो व्याहृतयः। तासामु ह

विस्तार करणारी व अनेक कालपर्यंत माझीं वस्त्रें, माझ्या गाई यांचें रक्षण करणारी, सर्वकाल अन्न व पाणी देणारी, अजा व इतर पशु देणारी अशी श्री ज्ञानप्राप्तीनंतर मला प्राप्त करून दे. [स्वाहा. आहुति]. माझ्याकडे ब्रह्मचारी [शिष्य] येवोत. [त्रिवार]. ते शिष्य दमानें युक्त होवोत. शमानें युक्त होवोत.१.२. जनामध्यें मी यशस्वी व्हावें, श्रीमानाहून देखील श्रीमान् व्हावें. हे भगवन् (ॐकारा), मी तुजमध्यें प्रवेश करावा. तूंहि मजमध्यें प्रवेश कर. सहस्रावयवयुक्त अशा तुजमध्यें प्रवेश करून मी तुला शोधीन. ज्याप्रमाणें उदक निम्नग प्रदेशाच्या अनुरोधानें जातें, ज्याप्रमाणें महिने संवत्सराच्या अनुरोधानें जातात, तसे हे विधात्या, सर्व बाजूंनीं माझ्याकडे शिष्य येवोत. तूं श्रमपरिहाराचें स्थान आहेस. मला आपलें स्वरूप प्रकट कर. मजप्रत ये [तूं व मी एकरूप व्हावें].३.

(याप्रमाणें मेधा, श्री आदि इच्छिणाराकरितां मंत्र सांगितले. आतां व्याहृतिरूप ब्रह्माची अंतरुपासना सांगतात—) भूः, भुवः आणि सुवः

स्मैतां चतुर्थीम् ॥ माहाचमस्यः प्रवेदयते ॥ मह इति ॥ तद्ब्रह्म ॥ स आत्मा ॥ अंगान्यन्या देवताः ॥ भूरिति वा अयं लोकः ॥ भुव इत्यंतरिक्षम् ॥ सुवरित्यसौ लोकः ॥१॥ मह इत्यादित्यः ॥ आदित्येन वाव सर्वे लोका महीयन्ते ॥ भूरिति वा अग्निः ॥ भुव इति वायुः ॥ सुवरित्यादित्यः ॥ मह इति चन्द्रमाः ॥ चन्द्रमसा वाव सर्वाणि ज्योतींषि महीयन्ते ॥ भूरिति वा ऋचः ॥ भुव इति सामानि ॥ सुवरिति यजूंषि ॥२॥ मह इति ब्रह्म ॥ ब्रह्मणा वाव सर्वे वेदा महीयन्ते ॥ भूरिति वै प्राणः ॥ भुव इत्यपानः ॥ सुवरिति व्यानः ॥ मह इत्यन्नम् ॥ अन्नेन वाव सर्वे प्राणा महीयन्ते ॥ ता वा एताश्चतस्रश्चतुर्धा ॥ चतस्रश्चतस्रो व्याहृतयः ॥ ता यो वेद ॥ स वेद ब्रह्म ॥ सर्वेऽस्मै देवा बलिमावहन्ति ॥३॥ ( असौ लोको यजूंषि वेद द्वे च ) ॥ इति पंचमोऽनुवाकः ॥५॥

अशा तीन प्रकारच्या व्याहृति आहेत. त्यांची चवथी व्याहृति महः ही आहे. ही महाचमस ऋषीचा पुत्र [माहाचमस्य] यानें सांगितली. हेंच ब्रह्म होय. हाच आत्मा होय. इतर (आदित्यादि) देवता हीं अंगें. भूः ह्मणजे हा लोक, भुवः ह्मणजे अंतरिक्ष लोक, सुवः ह्मणजे तो (स्वर्ग) लोक.१. महः ह्मणजे आदित्य [सूर्यमंडलरूपी जगाचा प्राण]. आदित्याचे योगानें सर्व लोक वृद्धि पावतात. भूः ह्मणजे अग्नि, भुवः ह्मणजे वायु, सुवः ह्मणजे आदित्य, महः ह्मणजे चंद्रमा. चंद्राचे योगानें सर्व ज्योतिर्मय पदार्थांची [नक्षत्रें इत्यादि] वृद्धि होते. भूः ह्मणजे ऋचा, भुवः ह्मणजे साम. सुवः ह्मणजे यजु.२. महः ह्मणजे ब्रह्म. ब्रह्माचे योगानें सर्व वेद महत्त्व पावतात. भूः ह्मणजे प्राण, भुवः ह्मणजे अपान, सुवः ह्मणजे व्यान, महः ह्मणजे अन्न. अन्नानें सर्व प्राणांची वृद्धि होते. याप्रमाणे या चार व्याहृतींचे चार प्रकार आहेत. यांचें ज्याला ज्ञान होतें त्याला ब्रह्माचें ज्ञान होतें. त्याला सर्व देव बलि आणतात [समृद्ध करतात].३.

स य एषोऽन्तर्हृदय आकाशः ॥ तस्मिन्नयं पुरुषो मनोमयः ॥ अमृतो हिरण्मयः ॥ अन्तरेण तालुके ॥ य एष स्तन इवावलम्बते ॥ सेंद्रयोनिः ॥ यत्रासौ केशान्तो विवर्तते ॥ व्यपोह्य शीर्षकपाले ॥ भूरित्यग्नौ प्रतितिष्ठति ॥ भुव इति वायौ ॥१॥ सुवरित्यादित्ये ॥ मह इति ब्रह्मणि ॥ आप्नोति स्वाराज्यम् ॥ आप्नोति मनसस्पतिम् ॥ वाक्पतिश्चक्षुष्पतिः ॥ श्रोत्रपतिर्विज्ञानपतिः ॥ एतत्ततो भवति ॥ आकाशशरीरं ब्रह्म ॥ सत्यात्म प्राणारामं मनआनन्दम् ॥ शान्तिसमृद्धममृतम् ॥ इति प्राचीनयोग्योपास्स्व ॥२॥ (वायावमृतमेकं च) ॥ इति षष्ठोऽनुवाकः ॥६॥

पृथिव्यंतरिक्षं द्यौर्दिशोऽवान्तरदिशाः ॥ अग्निर्वायुरादित्यश्चंद्रमा

हृदयाचे अंतर्भागीं जें आकाश आहे त्यामध्यें हा मनोमय पुरुष [भू आदि लोकांना व्यापून रहाणारा तो पुरुष] आहे. तो मृत्युरहित आहे, प्रकाशस्वरूप आहे. तालूंच्या मध्यें [मुखाचे आंत जिभेच्या मूळाचे वर असलेले भाग यांना तालुका ह्मणतात] स्तनांच्यासारखा जो भाग त्याचे मध्यें आहे. तेंच ब्रह्माचें [इंद्र] ज्ञान होण्याचें द्वार होय. (हें द्वार) ज्या ठिकाणीं केस फुटतात [ह्मणजे डोक्यापर्यंत] तेथपर्यंत हें पसरलेलें आहे. ज्ञानी मनुष्य मस्तकाचीं कपालें फोडून त्या द्वारानें निघून, भूर्व्याहृतिरूप अग्नीचें स्वरूप पावतो [ह्मणजे अग्निरूपानें हा लोक व्यापतो]. भुवर्व्याहृतिरूप वायूचें स्वरूप पावतो. १. सुवर्व्याहृतिरूप आदित्याचें स्वरूप पावतो. महर्व्याहृतिरूप ब्रह्माचें स्वरूप पावतो. (त्यांमध्यें आत्मरूपानें स्थित होत्साता) आधिपत्य मिळवितो. मनाचें स्वामित्व मिळवितो. वाणी, चक्षु, श्रोत्र व विज्ञान या सर्वांचा स्वामी होतो. नंतर एतद्रूप [ब्रह्मरूप] होतो. आकाश हें ज्याचें शरीर, सत्य ज्याचा आत्मा, प्राणांचा आराम, मनाचा आनंद, शान्तीनें पूर्ण, मृत्युरहित, अशा त्या ब्रह्माची, हे पुरातन ऋषींची योग्यता इच्छिणाऱ्या शिष्या, उपासना कर. २.

नक्षत्राणि ॥ आप ओषधयो वनस्पतय आकाश आत्मा ॥ इत्यधि-भूतम् ॥ अथाध्यात्मम् ॥ प्राणो व्यानोऽपान उदानः समानः ॥ चक्षुः श्रोत्रं मनो वाक् त्वक् ॥ चर्म मांसꣳ स्नावास्थि मज्जा ॥ एतदधिविधाय ऋषिरवोचत् ॥ पांक्तं वा इदꣳ सर्वम् ॥ पांक्तेनैव पांक्तꣳ स्पृणोतीति ॥१॥ (सर्वमेकं च) ॥ इति सप्तमोऽनुवाकः ॥७॥

ओमिति ब्रह्म ॥ ओमितीदꣳ सर्वम् ॥ ओमित्येतदनुकृति ह स्म वा अप्यो श्रावयत्याश्रावयन्ति ॥ ओमितिसामानि गायन्ति ॥ ॐ शोमिति शस्त्राणि शंसन्ति ॥ ओमित्यध्वर्युः प्रति-गरं प्रतिगृणाति ॥ ओमिति ब्रह्मा प्रसौति ॥ ओमित्यग्निहोत्रमनुजा-

(ब्रह्माची पृथिव्यादि यज्ञस्वरूपानें उपासना सांगतात—) पृथिवी, अंतरिक्ष, द्यौ, दिशा आणि अवान्तर दिशा (हें लोकपांक्तस्वरूप) [पांक्त= यज्ञ]. अग्नि, वायु, आदित्य, चंद्र, नक्षत्रें (हें देवतापांक्तस्वरूप). उदक, ओषधि, वनस्पति, आकाश, आत्मा (हें भूतपांक्तस्वरूप). याप्रमाणें आधि-भूतस्वरूप झालें. आतां अध्यात्मस्वरूप— प्राण, व्यान, अपान, उदान, समान (हें वायुपांक्तस्वरूप). चक्षु, श्रोत्र, मन, वाणी, त्वचा (हे इंद्रिय-पांक्तस्वरूप). चर्म, मांस, स्नायु, अस्थि, मज्जा (हें धातुपांक्तस्वरूप). हें सांगून ऋषि ह्मणाले, हें सर्व (जगत्) पांक्तच आहे. पांक्तानेंच पांक्ताची तुष्टि (अथवा पूर्तता) होते. १.

(आतां ॐकाराचा उपासनाविधि सांगतात—) ॐ हें ब्रह्म आहे. हें सर्व (विश्व) ॐ आहे. ॐ अनुकृति आहे [कांहीं सांगितलें असतां ऐकणारा ॐ ह्मणून त्याप्रमाणें करतो. ह्मणजे अनुकृति हा अर्थ ॐ अक्षराचा झाला. ह्मणजे लौकिक व्यवहाराला कारण ॐकार होतो. त्याच-प्रमाणें वैदिक व्यवहाराला देखील होतो असें पुढें सांगतात—] (देवांना मंत्र) ऐकव असें सांगितलें असतां ॐ ह्मणून मंत्र ह्मणतात. ॐ ह्मणून सामांचें गायन करतात. ॐ शं असें ह्मणून शस्त्र [गानरहित स्तोत्रमंत्र]

नाति ।। ओमिति ब्राह्मणः प्रवक्ष्यन्नाह ब्रह्मोपाप्नवानीति ।। ब्रह्मैवोपाप्नोति ।।१।। (ॐ दश) ।। इत्यष्टमोऽनुवाकः ।।८।।

ऋतं च स्वाध्यायप्रवचने च ।। सत्यं च स्वाध्यायप्रवचने च।। तपश्च स्वाध्यायप्रवचने च ।। दमश्च स्वाध्यायप्रवचने च ।। शमश्च स्वाध्यायप्रवचने च ।। अग्नयश्च स्वाध्यायप्रवचने च ।। अग्निहोत्रं च स्वाध्यायप्रवचने च ।। अतिथयश्च स्वाध्यायप्रवचने च ।। मानुषं च स्वाध्यायप्रवचने च ।। प्रजा च स्वाध्यायप्रवचने च ।। प्रजनश्च स्वाध्यायप्रवचने च ।। प्रजातिश्च स्वाध्यायप्रवचने च ।। सत्यमिति सत्यवचा राथीतरः ।।तप इति तपोनित्यः पौरुशिष्टिः ।। स्वाध्यायप्रवचने एवेति नाको मौद्गल्यः ।। तद्धि तपस्तद्धि तपः ।।१।। (प्रजा च स्वाध्यायप्रवचने च पट् च) ।। इति नवमोऽनुवाकः ।।९।।

ह्मणतात. ॐ असें ह्मणून अध्वर्यु प्रतिगर कर्म करतो. ॐ असे ह्मणून ब्रह्मा अनुज्ञा देतो. ॐ असें ह्मणून अग्निहोत्राला अनुज्ञा देतो. ॐ असा अध्ययनाला आरंभ करणारा ब्राह्मण "मला ब्रह्माची प्राप्ति होवो" असें ह्मणतो. (त्याप्रमाणें) त्याला ब्रह्माची प्राप्ति होते. १.

यथाशास्त्र भाषण [ऋतं], अध्ययन [स्वाध्याय] आणि अध्यापन [प्रवचन] यांचे अनुष्ठान [आचरण] केलें पाहिजे. सत्य आणि स्वाध्यायप्रवचन, तप आणि स्वाध्यायप्रवचन, दम आणि स्वाध्यायप्रवचन, शम आणि स्वाध्यायप्रवचन, अग्न्याधान आणि स्वाध्यायप्रवचन, अग्निहोत्र आणि स्वाध्यायप्रवचन, आतिथ्य आणि स्वाध्यायप्रवचन, लौकिकव्यवहार आणि स्वाध्यायप्रवचन, प्रजोत्पत्ति आणि स्वाध्यायप्रवचन, ऋतुकालीं गमन आणि स्वाध्यायप्रवचन, पौत्रोत्पत्ति आणि स्वाध्यायप्रवचन, यांचें अनुष्ठान केलें पाहिजे. सत्याचें अनुष्ठान केलें पाहिजे, असें रथीतर ऋषीचा सत्यवचा नामक पुत्र सांगतो. तपाचें अनुष्ठान केले पाहिजे, असें पुरुशिष्टि ऋषीचा तपोनित्य नामक पुत्र सांगतो. स्वाध्याय व प्रवचन यांचेंच अनुष्ठान

अहं वृक्षस्य रेरिवा ॥ कीर्तिः पृष्ठं गिरेरिव ॥ ऊर्ध्वपवित्रो वाजिनीव स्वमृतमस्मि ॥ द्रविणꣳ सवर्चसम् ॥ सुमेधा अमृतोऽक्षितः ॥ इति त्रिशंकोर्वेदानुवचनम् ॥१॥ (अहꣳ षट् ) ॥ इति दशमोऽनुवाकः ॥१०॥

वेदमनूच्याचार्योऽन्तेवासिनमनुशास्ति ॥ सत्यं वद ॥ धर्मं चर ॥ स्वाध्यायान्मा प्रमदः ॥ आचार्याय प्रियं धनमाहृत्य प्रजातंतुं मा व्यवच्छेत्सीः ॥ सत्यान्न प्रमदितव्यम् ॥ धर्मान्न प्रमदितव्यम् ॥ कुशलान्न प्रमदितव्यम् ॥ भूत्यै न प्रमदितव्यम् ॥ स्वाध्यायप्रवचनाभ्यां

केले पाहिजे, कारण तेंच तप होय, असें मुद्गल ऋषींचा नाक नामक पुत्र सांगतो. १.

मी (संसाररूपी) वृक्षाचा (अंतर्यामित्वानें) प्रेरणा करणारा आहें. (माझी) कीर्ति पर्वताच्या पृष्ठाप्रमाणें (उंच) आहे. पवित्र ब्रह्म [पवित्रं] ज्याचें कारण [ऊर्ध्वं] आहे असा मी आहें. सूर्याचे ठिकाणीं [वाजिनि] ज्याप्रमाणें प्रकाशरूप अथवा शोभमान आत्मस्वरूप आहे, त्याप्रमाणें माझे ठिकाणीं आहे. दीप्तियुक्त असें द्रव्य मजपाशीं आहे. उत्तम बुद्धीनें युक्त, मरणरहित व क्षयरहित असा मी आहे. याप्रमाणें आत्मैकत्वज्ञानानें उत्पन्न झालेलें त्रिशंकु ऋषीचें वचन आहे. १.

वेदांचें अध्यापन केल्यानंतर आचार्य शिष्याला उपदेश करतात—सत्य भाषण कर. धर्माचें अनुष्ठान कर. स्वाध्यायाविषयीं प्रमाद करूं नको. आचार्याला धन प्रिय आहे असें समजून तें देऊन ज्ञानरूपी प्रजेचा वंश छेदूं नकोस [ह्मणजे गुरुदक्षिणा दिल्यानें आपलें कर्तव्य संपलें असें न समजतां आचार्याकडून प्राप्त झालेले ज्ञान इतरांना देऊन त्या ज्ञानाचा विस्तार कर]. सत्याविषयीं प्रमाद करूं नको. (कर्तव्य) धर्माविषयीं प्रमाद करूं नको. आत्मसंरक्षणार्थ कर्माविषयीं [कुशलात्] प्रमाद करूं नको. भूत्यर्थ मंगलकर्माविषयीं प्रमाद करूं नको. स्वाध्याय व प्रवचन यांविषयीं प्रमाद करूं

न प्रमदितव्यम् ॥१॥ देवपितृकार्याभ्यां न प्रमदितव्यम् ॥ मातृदेवो भव ॥ पितृदेवो भव ॥ आचार्यदेवो भव ॥ अतिथिदेवो भव ॥ यान्यनवद्यानि कर्माणि तानि सेवितव्यानि नो इतराणि ॥ यान्यस्माकꣳ सुचरितानि तानि त्वयोपास्यानि ॥२॥ नो इतराणि ॥ ये के चास्मच्छ्रेयांसो ब्राह्मणाः ॥ तेषां त्वयासनेन प्रश्वसितव्यम् ॥ श्रद्धया देयम्॥ अश्रद्धयाऽदेयम् ॥ श्रिया देयम् ॥ ह्रिया देयम् ॥ भिया देयम् ॥ संविदा देयम् ॥ अथ यदि ते कर्मविचिकित्सा वा वृत्तविचिकित्सा वा स्यात् ॥३॥ ये तत्र ब्राह्मणाः संमर्शिनः ॥ युक्ता आयुक्ताः ॥ अलूक्षा धर्मकामाः स्युः ॥ यथा ते तत्र वर्तेरन् ॥ तथा तत्र वर्तेथाः ॥ अथाभ्याख्यातेषु ॥ ये तत्र ब्राह्मणाः संमर्शिनः ॥ युक्ता आयुक्ताः॥ अलूक्षा

नको.१. देवकार्य व पितृकार्य यांविषयीं प्रमाद करूं नको. मातृदेव [माता हाच ज्याचा देव आहे असा] हो. पितृदेव हो. आचार्यदेव हो. अतिथिदेव हो. जीं अनिंद्य कर्में आहेत त्यांचेंच आचरण करावें. इतर कर्मांचें आचरण करूं नये. आमचीं जीं सत्कर्में असतील त्यांचेंच तूं आचरण करावेंस.२. इतर कर्मांचें आचरण करूं नयेस. आमच्याहून जे प्रशस्यतर ब्राह्मण असतील (ते आले असतां) त्यांना आसन (वगैरे) देऊन तूं त्यांच्या श्रमाचा परिहार करावास. (जे कांहीं द्यावयाचें ते) श्रद्धेनें द्यावें, अश्रद्धेनें देऊं नये. थोरपणानें द्यावें, आदरानें द्यावें, नम्रतापूर्वक द्यावें, (मित्रत्वाची) ओळख करून घेऊन [संविदा] द्यावें. जर कर्मासंबंधानें अथवा वर्तनासंबंधानें तुला शंका आली तर त्या ठिकाणीं जे ब्राह्मण विचारशील, त्या (कर्माचे व वर्तनाचे) ठिकाणीं युक्त, अत्यंत युक्त, क्रूरबुद्धिरहित, धर्मेच्छु असे असतील ते त्यासंबंधानें जसें आचरण करीत असतील तसें आचरण तूं त्यासंबंधानें करीत जा.३. (कांहीं) दोषानें युक्त अशा कर्माचे अथवा आचरणाचे संबंधानें जे ब्राह्मण विचारशील, युक्त, अत्यंत युक्त, क्रूरबुद्धिरहित, धर्मेच्छु असे असतील ते त्यासंबंधानें जसें

धर्मकामाः स्युः ॥ यथा ते तेषु वर्तेरन् ॥ तथा तेषु वर्तेथाः ॥ एष आदेशः ॥ एष उपदेशः ॥ एषा वेदोपनिषत् ॥ एतदनुशासनम् ॥ एवमुपासितव्यम् ॥ एवमु चैतदुपास्यम् ॥४॥ (स्वाध्यायप्रवचनाभ्यां न प्रमदितव्यं तानि त्वयोपास्यानि स्यात्तेषु वर्तेरन् सप्त च) ॥ इत्येकादशोऽनुवाकः ॥११॥

शं नो मित्रः शं वरुणः ॥ शं नो भवत्वर्यमा ॥ शं न इंद्रो बृहस्पतिः ॥ शं नो विष्णुरुरुक्रमः ॥ नमो ब्रह्मणे ॥ नमस्ते वायो ॥ त्वमेव प्रत्यक्षं ब्रह्मासि ॥ त्वामेव प्रत्यक्षं ब्रह्मावादिषम् ॥ ऋतमवादिषम् ॥ सत्यमवादिषम् ॥ तन्मामावीत् ॥ तद्वक्तारमावीत् ॥ आवीन्माम् ॥ आवीद्वक्तारम् ॥१॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः (सत्यमवादिषं पंच च) ॥ इति द्वादशोऽनुवाकः ॥१२॥

( शं नः शीक्षा२ सह नौ यश्छन्दसां भूः स यः पृथिव्योमित्यृतं चाहं वेदमनूच्य शं नो द्वादश ) ॥ शं नो मह इत्यादिस्यो नो इतराणि त्रयोविंशतिः ॥

आचरण करीत असतील तसें आचरण तूं त्यासंबंधानें करीत जा. (याप्रमाणें) हा विधि (अथवा आज्ञा) आहे. हा (परंपरागत) उपदेश आहे. हें वेदांचें रहस्य आहे. हें (प्रमाणभूत आचार्यांचें) अनुशासन [आज्ञा] आहे. याप्रमाणें आचरण करावें. याप्रमाणें आचरण करावें.४.

मित्र व वरुण आह्मांला कल्याणकारक होवोत. सूर्य आह्मांला कल्याणकारक होवो. इंद्र व बृहस्पति आह्मांला कल्याणकारक होवोत. विस्तीर्णगति विष्णु आह्मांला कल्याणकारक होवो. ब्रह्माला नमस्कार असो. हे वायु, तुला नमस्कार असो. तूंच प्रत्यक्ष ब्रह्म आहेस. तुलाच मी प्रत्यक्ष असें ब्रह्म ह्मणतों. मीं यथाशास्त्र भाषण केलें. मीं सत्य भाषण केलें. तें (ब्रह्म) माझें रक्षण करो. वक्त्याचें रक्षण करो. माझें रक्षण करो. वक्त्याचें रक्षण करो.१.

ॐ शं नो मित्रः शं वरुणः शं नो भवत्वर्यमा ॥ शं न इन्द्रो बृहस्पतिः शं नो विष्णुरुरुक्रमः ॥ नमो ब्रह्मणे ॥ नमस्ते वायो ॥ त्वमेव प्रत्यक्षं ब्रह्मासि ॥ त्वामेव प्रत्यक्षं ब्रह्म वदिष्यामि ॥ ऋतं वदिष्यामि ॥ सत्यं वदिष्यामि ॥ तन्मामवतु ॥ तद्वक्तारमवतु ॥ अवतु माम् ॥ अवतु वक्तारम् ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

इति तैत्तिरीयोपनिषदि प्रथमः शिक्षाध्यायः ॥

---

## ब्रह्मानन्दवल्ली ॥

ॐ सह नाववतु ॥ सह नौ भुनक्तु ॥ सह वीर्यं करवावहै ॥ तेजस्वि नावधीतमस्तु मा विद्विषावहै ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

ॐ ब्रह्मविदाप्नोति परम् ॥ तदेषाभ्युक्ता ॥ सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म ॥ यो वेद निहितं गुहायां परमे व्योमन् ॥ सोऽश्नुते सर्वान् कामान् सह ॥ ब्रह्मणा विपश्चितेति ॥ तस्माद्वा एतस्मादात्मन आकाशः संभूतः ॥ आकाशाद्वायुः ॥ वायोरग्निः ॥ अग्नेरापः ॥ अद्भ्यः पृथिवी ॥ पृथिव्या ओषधयः ॥ ओषधीभ्योऽन्नम् ॥ अन्नात्पुरुषः ॥ स वा एष पुरुषोऽन्नरसमयः ॥ तस्येदमेव शिरः ॥ अयं

### ब्रह्मानन्दवल्ली.

जो ब्रह्म जाणतो त्याला ते पर [ज्याच्याहून श्रेष्ठ कांहीं नाहीं] ब्रह्म प्राप्त होते. याविषयीं पुढील ऋचा सांगितली आहे— ब्रह्म सत्य, ज्ञान आणि अनन्त (असें) आहे. सूक्ष्म आकाशामध्यें [हृदयाकाशामध्यें] बुद्धीचे ठिकाणीं ते स्थित आहे असें जो जाणतो तो सर्वज्ञस्वरूप ब्रह्माबरोबर [=ब्रह्मरूप होऊन] सर्व काम पावतो. त्या या आत्मस्वरूप ब्रह्मापासून आकाश उत्पन्न झालें. आकाशापासून वायु उत्पन्न झाला. वायूपासून अग्नि उत्पन्न झाला. अग्नीपासून उदक उत्पन्न झालें. उदकापासून पृथिवी उत्पन्न झाली. पृथिवीपासून ओषधि उत्पन्न झाल्या. ओषधींपासून अन्न उत्पन्न झालें. अन्नापासून पुरुष उत्पन्न झाला. ह्मणून हा पुरुष अन्नाच्या रसानें पूर्ण आहे.

दक्षिणः पक्षः ॥ अयमुत्तरः पक्षः ॥ अयमात्मा ॥ इदं पुच्छं प्रतिष्ठा॥ तदप्येष श्लोको भवति ॥ इति प्रथमोऽनुवाकः ॥१॥

अन्नाद्वै प्रजाः प्रजायन्ते ॥ याः काश्च पृथिवीꣳ श्रिताः ॥ अथो अन्नेनैव जीवन्ति ॥ अथैनदपि यन्त्यन्ततः ॥ अन्नꣳ हि भूतानां ज्येष्ठम् ॥ तस्मात्सर्वौषधमुच्यते ॥ सर्वं वै तेऽन्नमाप्नुवन्ति ॥ येऽन्नं ब्रह्मोपासते ॥ अन्नꣳ हि भूतानां ज्येष्ठम् ॥ तस्मात्सर्वौषधमुच्यते ॥ अन्नाद्भूतानि जायन्ते॥ जातान्यन्नेन वर्धन्ते ॥ अद्यतेऽत्ति च भूतानि॥ तस्मादन्नं तदुच्यत इति ॥ तस्माद्वा एतस्मादन्नरसमयात् ॥ अन्योऽन्तर आत्मा प्राणमयः ॥ तेनैष पूर्णः ॥ स वा एष पुरुषविध एव॥ तस्य पुरुषविधताम् ॥ अन्वयं पुरुषविधः ॥ तस्य प्राण एव शिरः ॥

त्याचें हें (प्रत्यक्ष दिसणारें) मस्तक. ही (उजवा हात) दक्षिण बाजू. ही (डावा हात) उत्तर बाजू. हा देहाचा मध्यभाग. हें (कटीच्या खालचा भाग) शरीराला आधारभूत पुच्छ. पुढील मंत्रहि याच अर्थाचा आहे. १.

ज्या ह्मणून पृथिवीच्या आश्रयानें रहाणाऱ्या प्रजा आहेत त्या सर्व अन्नापासून उत्पन्न होतात. अन्नानेंच त्या जिवंत रहातात. शेवटीं यामध्येंच [अन्नामध्येंच] लय पावतात. प्राण्यांच्या अगोदर अन्न उत्पन्न झालें (आणि त्याचे योगानें सर्व प्राण्यांची उत्पत्ति झाली). ह्मणून तें सर्वांचें औषध असें ह्मणतात. जे या अन्नरूप ब्रह्माची उपासना करतात त्यांना सर्व प्रकारचें अन्न प्राप्त होतें. सर्व प्राण्यांच्या पूर्वीं अन्न उत्पन्न झालें. ह्मणून तें सर्वांचें औषध असें ह्मणतात. अन्नापासून प्राणी जन्म पावतात. जन्म पावल्यावर अन्नानें वृद्धि पावतात. प्राण्यांकडून भक्षण केलें जातें [अद्यते] आणि प्राण्यांना भक्षण करतें [अत्ति] ह्मणून याला 'अन्न' असे ह्मणतात. या अन्नरसमय पिंडाहून वेगळा प्राणमय अंतरात्मा आहे. त्यानें [प्राणमय आत्म्यानें] हा (अन्नरसमय पिंड) व्याप्त आहे. तो प्राणमय आत्मा या पुरुषाप्रमाणेच आहे. पुरुषाप्रमाणें ह्मणजे असा—

व्यानो दक्षिणः पक्षः ॥ अपान उत्तरः पक्षः ॥ आकाश आत्मा ॥ पृथिवी पुच्छं प्रतिष्ठा ॥ तदप्येष श्लोको भवति ॥ इति द्वितीयोऽनुवाकः ॥

प्राणं देवा अनु प्राणन्ति ॥ मनुष्याः पशवश्च ये ॥ प्राणो हि भूतानामायुः ॥ तस्मात्सर्वायुषमुच्यते ॥ सर्वमेव त आयुर्यन्ति ॥ ये प्राणं ब्रह्मोपासते ॥ प्राणो हि भूतानामायुः ॥ तस्मात्सर्वायुषमुच्यत इति ॥ तस्यैष एव शारीर आत्मा ॥ यः पूर्वस्य ॥ तस्माद्वा एतस्मात्प्राणमयात् ॥ अन्योऽन्तर आत्मा मनोमयः ॥ तेनैष पूर्णः ॥ स वा एष पुरुषविध एव ॥ तस्य पुरुषविधताम् ॥ अन्वयं पुरुषविधः ॥ तस्य यजुरेव शिरः ॥ ऋग्दक्षिणः पक्षः ॥ सामोत्तरः पक्षः ॥ आदेश आत्मा ॥ अथर्वांगिरसः पुच्छं प्रतिष्ठा ॥ तदप्येष श्लोको भवति॥ इति तृतीयोऽनुवाकः ॥३॥

प्राण हें याचें शिर. व्यान हा दक्षिण पक्ष. अपान हा उत्तर पक्ष. आकाश हा आत्मा. पृथिवी हे आधारभूत पुच्छ. पुढील मंत्रहि यान्न अर्थाचा आहे.२.

(अग्नि आदि) देव (वाय्वात्मक) प्राणाचे अनुरोधानें प्राणनकर्म करतात. मनुष्य व पशु त्याचप्रमाणें प्राणाचे अनुरोधानें प्राणनकर्म करतात. कारण प्राण हा सर्व भूतांचें आयुष्य होय. ह्मणून त्याला सर्वायुष [सर्वांचें आयुष्य] असें ह्मणतात. जे प्राणरूप ब्रह्माची उपासना करतात ते सर्व आयुष्य पावतात. कारण प्राण हा भूतांचें आयुष्य आहे. ह्मणून त्याला सर्वायुष ह्मणतात. पहिल्या (अन्नमय) कोशाचा जो शारीर [शरीरामध्यें असणारा] आत्मा तोच या (प्राणमय) कोशाचा. या प्राणमयाहून वेगळा मनोमय आत्मा आहे. त्यानें [मनोमय आत्म्यानें] हा (प्राणमय आत्मा) व्याप्त आहे. तो मनोमय आत्मा या पुरुषाप्रमाणेंच आहे. पुरुषाप्रमाणें ह्मणजे असा— यजु हें त्याचें शिर ऋक् हा दक्षिण पक्ष. साम हा उत्तर पक्ष. आदेश [ब्राह्मणं] हा आत्मा. अथर्वांगिरस हें आधारभूत पुच्छ. पुढील मंत्रहि याच अर्थाचा आहे.३.

यतो वाचो निवर्तन्ते ॥ अप्राप्य मनसा सह ॥ आनंदं ब्रह्मणो विद्वान् ॥ न बिभेति कदाचनेति ॥ तस्यैष एव शारीर आत्मा ॥ यः पूर्वस्य ॥ तस्माद्वा एतस्मान्मनोमयात् ॥ अन्योऽन्तर आत्मा विज्ञानमयः ॥ तेनैष पूर्णः ॥ स वा एष पुरुषविध एव ॥ तस्य पुरुषविधताम् ॥ अन्वयं पुरुषविधः ॥ तस्य श्रद्धैव शिरः ॥ ऋतं दक्षिणः पक्षः ॥ सत्यमुत्तरः पक्षः ॥ योग आत्मा ॥ महः पुच्छं प्रतिष्ठा ॥ तदप्येष श्लोको भवति ॥ इति चतुर्थोऽनुवाकः॥४॥

विज्ञानं यज्ञं तनुते ॥ कर्माणि तनुतेऽपि च ॥ विज्ञानं देवाः सर्वे ॥ ब्रह्म ज्येष्ठमुपासते ॥ विज्ञानं ब्रह्म चेद्वेद ॥ तस्माच्चेन्न प्रमाद्यति ॥ शरीरे पाप्मनो हित्वा ॥ सर्वान्कामान्समश्नुत इति ॥ तस्यैष

ज्याचा आनंद प्राप्त न होतां मनाप्रमाणेंच वाणी देखील ज्या ब्रह्मापासून निवृत्त होते त्या ब्रह्माचा साक्षात्काररूपी आनंद जो जाणतो त्याला कसलेंहि भय रहात नाहीं. मागच्या (प्राणमय) कोशाचा जो शारीर [शरीरामध्यें असणारा] आत्मा तोच या (मनोमय) कोशाचा. या मनोमयाहून वेगळा विज्ञानमय आत्मा आहे. त्यानें [विज्ञानमय आत्म्यानें] हा (मनोमय) आत्मा व्याप्त आहे. तो विज्ञानमय आत्मा या पुरुषाप्रमाणेंच आहे. पुरुषाप्रमाणे ह्मणजे असा— श्रद्धा हें त्याचें शिर. यथाशास्त्रत्व [ऋतं] हा दक्षिण पक्ष. सत्य हा उत्तर पक्ष. योग [समाधि=तदात्मकत्व] हा आत्मा. महत्तत्व [महत्=ह्मणजे सृष्ट्यारंभीं प्रथम उत्पन्न झालेलें तत्त्व] हें आधारभूत पुच्छ. पुढील मंत्रहि याच अर्थाचा आहे.४.

विज्ञानवान् (श्रद्धापूर्वक) यज्ञ करतो, कर्म करतो. (इंद्रादि) सर्व देव (त्यांच्या) अगोदर असलेल्या विज्ञानरूपी ब्रह्माची उपासना करतात. (हें) विज्ञानरूपी ब्रह्म जो जाणतो व त्याचे संबंधानें प्रमादरहित असतो तो शरीरसंबंधी सर्व पापांचा त्याग करून (विज्ञानब्रह्मरूप होत्साता) सर्व इच्छा पावतो. मागच्या (मनोमय) कोशाचा जो शारीर [शरीरामध्यें

एव शारीर आत्मा ॥ यः पूर्वस्य ॥ तस्माद्वा एतस्माद्विज्ञानमयात् ॥ अन्योऽन्तर आत्माऽऽनंदमयः ॥ तेनैष पूर्णः ॥ स वा एष पुरुषविध एव ॥ तस्य पुरुषविधताम् ॥ अन्वयं पुरुषविधः ॥ तस्य प्रियमेव शिरः ॥ मोदो दक्षिणः पक्षः ॥ प्रमोद उत्तरः पक्षः ॥ आनंद आत्मा ॥ ब्रह्म पुच्छं प्रतिष्ठा ॥ तदप्येष श्लोको भवति ॥ इति पंचमोऽनुवाकः

असन्नेव स भवति । असद्ब्रह्मेति वेद चेत् ॥ अस्ति ब्रह्मेति चेद्वेद ॥ सन्तमेनं ततो विदुरिति ॥ तस्यैष एव शारीर आत्मा ॥ यः पूर्वस्य ॥ अथातोऽनुप्रश्नाः ॥ उताविद्वानमुं लोकं प्रेत्य ॥ कश्चन गच्छती३ ॥ आहो विद्वानमुं लोकं प्रेत्य ॥ कश्चित्समश्नुता३ उ ॥ सोऽकामयत ॥ बहु स्यां प्रजायेयेति ॥ स तपोऽतप्यत ॥

असणारा] आत्मा तोच या (विज्ञानमय) कोशाचा. या विज्ञानमयाहून वेगळा आनंदमय आत्मा आहे. त्याने [आनंदमय आत्म्याने] हा (विज्ञानमय) आत्मा व्याप्त आहे. तो आनंदमय आत्मा या पुरुषाप्रमाणेंच आहे. पुरुषाप्रमाणें ह्मणजे असा— तृप्ति हें त्याचें शिर. मोद [इष्टप्राप्तीमुळें होणारा] हा दक्षिण पक्ष. प्रमोद [प्रकृष्ट मोद] हा उत्तर पक्ष. आनंद हा आत्मा. ब्रह्म हें आधारभूत पुच्छ. पुढील मंत्रहि याच अर्थाचा आहे.५.

ब्रह्म असत् [अविद्यमान] आहे असें ज्याला वाटतें तो असत् असल्यासारखा होतो. ब्रह्म विद्यमान आहे असे जो जाणतो तो सत् आहे असें समजतात. मागच्या (विज्ञानमय) कोशाचा जो शारीर [शरीरामध्यें असणारा] आत्मा तोच या (आनंदमय) कोशाचा. आतां याविषयीं शिष्याचे प्रश्न— ब्रह्म न जाणणारा त्या (पर) लोकाप्रत गेला असतां ब्रह्माप्रत जातो किंवा जात नाहीं ? (जात नसेल तर) विद्वान् (तरी) त्या (पर) लोकाप्रत गेला असतां ब्रह्म पावतो किंवा नाहीं ? (आचार्यांचें उत्तर—) त्या (जगत्कारण) आत्म्याला मीं पुष्कळ व्हावें, प्रजा उत्पन्न करावी, अशी इच्छा झाली. (ह्मणून) त्यानें तप आचरण केलें. तप आचरण करून

स तपस्तप्त्वा ॥ इदꣳ सर्वमसृजत ॥ यदिदं किंच ॥ तत्सृष्ट्वा ॥ तदेवानुप्राविशत् ॥ तदनुप्रविश्य ॥ सच्च त्यच्चाभवत् ॥ निरुक्तं चानिरुक्तं च ॥ निलयनं चानिलयनं च ॥ विज्ञानं चाविज्ञानं च ॥ सत्यं चानृतं च सत्यमभवत् ॥ यदिदं किंच ॥ तत्सत्यमित्याचक्षते ॥ तदप्येष श्लोको भवति ॥ इति षष्ठोऽनुवाकः ॥६॥

असद्वा इदमग्र आसीत् ॥ ततो वै सदजायत ॥ तदात्मानꣳ स्वयमकुरुत ॥ तस्मात्तत्सुकृतमुच्यत इति ॥ यद्वै तत्सुकृतम् ॥ रसो वै सः ॥ रसꣳ ह्येवायं लब्ध्वानंदी भवति ॥ को ह्येवान्यात्कः प्राण्यात् ॥ यदेष आकाश आनंदो न स्यात् ॥ एष ह्येवानंदयाति ॥ यदा ह्येवैष एतस्मिन्नदृश्येऽनात्म्येऽनिरुक्तेऽनिलयनेऽभयं प्रतिष्ठां

त्यानें हें जें जें कांहीं ह्मणून (अस्तित्वांत) आहे तें (सर्व) निर्माण केलें. तें निर्माण करून त्यानें स्वतः त्यामध्यें प्रवेश केला. प्रवेश करून तो मूर्त [सत्] आणि अमूर्त [त्यत्] असा झाला; निरुक्त [देशकालादि विशिष्ट=मूर्त] आणि अनिरुक्त [अमूर्त] असा झाला; निलयन [स्थान=मूर्तधर्म] आणि अनिलयन [अस्थान] झाला; विज्ञान [चेतन] आणि अविज्ञान [अचेतन] झाला; (व्यावहारिक) सत्य आणि असत्य झाला. तो सत्य ह्मणजे सत् व त्यत् रूपी आत्माच हें सर्व झाला. ह्मणून त्या आत्म्याला सत्य असें ह्मणतात. पुढील मंत्रहि याच अर्थाचा आहे. ६.

हें सर्व (जगत्) पूर्वी असत् [नामरूपादि वैशिष्ट्यरहित] होतें. त्यापासून सत् उत्पन्न झाले. त्यानें स्वतःच आपणाला उत्पन्न केलें. ह्मणून त्याला सुकृत असें ह्मणतात. तें जें सुकृत तें रस होय. (मधुर, अम्ल इत्यादि) रस मिळाल्यानें (मनुष्य) आनंदी होतो. आकाशाप्रमाणे सर्वव्यापी असा हा आत्मा आनंदमय नसता तर अपानचेष्टा कोणीं करविल्या असत्या [अन्यात्] ? प्राणचेष्टा कोणीं करविल्या असत्या [प्राण्यात्] ? (अर्थात्) हाच आत्मा (जीवांना) आनंद देतो. जेव्हां (मनुष्य) या अदृश्य,

विन्दते ॥ अथ सोऽभयं गतो भवति ॥ यदा ह्येवैष एतस्मिन्नुदरमंतरं कुरुते ॥ अथ तस्य भयं भवति ॥ तत्त्वेव भयं विदुषोऽमन्वानस्य ॥ तदप्येष श्लोको भवति ॥ इति सप्तमोऽनुवाकः ॥७॥

भीषाऽस्माद्वातः पवते ॥ भीषोदेति सूर्यः ॥ भीषाऽस्मादग्निश्चेंद्रश्च ॥ मृत्युर्धावति पंचम इति ॥ सैषाऽऽनन्दस्य मीमांसा भवति॥ युवा स्यात्साधुयुवाध्यायकः ॥ आशिष्टो दृढिष्टो बलिष्ठः ॥ तस्येयं पृथिवी सर्वा वित्तस्य पूर्णा स्यात् ॥ स एको मानुष आनंदः ॥ ते ये शतं मानुषा आनंदाः ॥ स एको मनुष्यगंधर्वाणामानंदः ॥ श्रोत्रियस्य चाकामहतस्य ॥ ते ये शतं मनुष्यगंधर्वाणामानंदाः ॥ स एको देवगंधर्वाणामानंदः ॥ श्रोत्रियस्य चाकामहतस्य ॥ ते ये शतं देवगंध-

अशरीर, अविकार, अनिलयन अशा ब्रह्माचे ठिकाणीं भयरहित रीतीनें स्थित होतो [आत्मभाव पावतो] तेव्हां तो अभयाप्रत गेला असें होतें. जेव्हां तो ब्रह्माचे ठिकाणी (आपणांपासून) अल्प जरी भेद पाहील तेव्हां त्याला भय आहेच असें समजावें. ('मी ब्रह्म आहें' असा अभेद) न जाणणाऱ्या केवल कर्मविद्याविशारदाला देखील तेच भय आहे. पुढील मंत्रहि याच अर्थाचा आहे.७.

या ब्रह्मापासून भीति आहे ह्मणून वायु वहातो, याच्या भीतीनें सूर्य उगवतो, याच्या भीतीनें अग्नि आणि इंद्र आपापली कामें करतात, आणि पांचवा मृत्यु येतो. (आनंदरूपी) ब्रह्माच्या आनंदाची मीमांसा अशी आहे— चांगला तरुण असा वेदाध्ययन केलेला, आशायुक्त, दृढस्वभावी व बलवान् अशाला ही सर्व पृथ्वी वित्तपूर्ण अशी मिळावी [ह्मणजे पृथ्वीचें राज्य मिळावें]. (या योगाने त्याला जो आनंद होईल) तो एक मानुष आनंद होय. असे शंभर मानुषानंद ह्मणजे मनुष्यगंधर्वांचा [मनुष्य असून कर्माचे योगानें गंधर्व झालेले] एक आनंद होय. (आनंदरूप ब्रह्म जाणणाऱ्या) निष्काम श्रोत्रियाला हा आनंद होतो. असे मनुष्यगंधर्वांचे

र्वाणामानंदाः ॥ स एकः पितॄणां चिरलोकलोकानामानंदः ॥ श्रोत्रियस्य चाकामहतस्य ॥ ते ये शतं पितॄणां चिरलोकलोकानामानंदाः ॥ स एक आजानजानां देवानामानंदः ॥ श्रोत्रियस्य चाकामहतस्य ॥ ते ये शतमाजानजानां देवानामानंदाः ॥ स एकः कर्मदेवानां देवानामानंदः ॥ ये कर्मणा देवानपियन्ति ॥ श्रोत्रियस्य चाकामहतस्य ॥ ते ये शतं कर्मदेवानां देवानामानंदाः ॥ स एको देवानामानंदः ॥ श्रोत्रियस्य चाकामहतस्य ॥ ते ये शतं देवानामानंदाः ॥ स एक इंद्रस्यानंदः ॥ श्रोत्रियस्य चाकामहतस्य ॥ ते ये शतमिंद्रस्यानंदाः ॥ स एको बृहस्पतेरानंदः ॥ श्रोत्रियस्य चाकामहतस्य ॥ ते ये शतं बृहस्पतेरानंदाः ॥ स एकः प्रजापतेरानंदः ॥ श्रोत्रियस्य

शंभर आनंद ह्मणजे देवगंधर्वांचा एक आनंद होय. निष्काम श्रोत्रियाला हा आनंद होतो. असे देवगंधर्वांचे शंभर आनंद ह्मणजे चिरलोकपितरांचा [ज्या लोकामधून पुन्हां भूलोकीं यावें लागत नाहीं त्या लोकांतील पितरांचा] एक आनंद होय. निष्काम श्रोत्रियाला हा आनंद होतो. असे चिरलोकपितरांचे शंभर आनंद ह्मणजे (कल्पारंभीं उत्पन्न झालेल्या) आजाननामक देवलोकांतील देवांचा एक आनंद होय. निष्काम श्रोत्रियाला हा आनंद होतो. असे आजानदेवांचे शंभर आनंद ह्मणजे जे कर्माचे योगाने देवत्व पावलेले असतात त्या कर्मदेवांचा एक आनंद होय. निष्काम श्रोत्रियाला हा आनंद होतो. असे कर्मदेवांचे शंभर आनंद ह्मणजे देवांचा एक आनंद होय. निष्काम श्रोत्रियाला हा आनंद होतो. असे देवांचे शंभर आनंद ह्मणजे इंद्राचा एक आनंद होय. निष्काम श्रोत्रियाला हा आनंद होतो. असे इंद्राचे शंभर आनंद ह्मणजे बृहस्पतीचा एक आनंद होय. निष्काम श्रोत्रियाला हा आनंद होतो. असे बृहस्पतीचे शंभर आनंद ह्मणजे प्रजापतीचा एक आनंद होय. निष्काम श्रोत्रियाला हा आनंद होतो. असे प्रजापतीचे शंभर आनंद ह्मणजे ब्रह्माचा एक आनंद होय. (आनंदरूप

चाकामहतस्य ॥ ते ये शतं प्रजापतेरानंदाः ॥ स एको ब्रह्मण आनंदः ॥ श्रोत्रियस्य चाकामहतस्य ॥ स यश्चायं पुरुषे ॥ यश्चासावादित्ये ॥ स एकः ॥ स य एवंवित् ॥ अस्माल्लोकात्प्रेत्य ॥ एतमन्नमयमात्मानमुपसंक्रामति ॥ एतं प्राणमयमात्मानमुपसंक्रामति ॥ एतं मनोमयमात्मानमुपसंक्रामति ॥ एतं विज्ञानमयमात्मानमुपसंक्रामति॥ एतमानंदमयमात्मानमुपसंक्रामति ॥ तदप्येष श्लोको भवति ॥ इत्यष्टमोऽनुवाकः ॥८॥

यतो वाचो निवर्तन्ते ॥ अप्राप्य मनसा सह ॥ आनंदं ब्रह्मणो विद्वान् ॥ न बिभेति कुतश्चनेति ॥ एतꣳ ह वाव न तपति किमहꣳ साधु नाकरवम् ॥ किमहं पापमकरवमिति ॥ स य एवं विद्वानेते आत्मानꣳ स्पृणुते ॥ उभे ह्येवैष एते आत्मानꣳ स्पृणुते ॥ य एवं वेद ॥ इत्युपनिषत् ॥ इति नवमोऽनुवाकः ॥९॥

ब्रह्म जाणणाऱ्या) निष्काम श्रोत्रियाला हा आनंद होतो. हा आनंद ह्मणजे जो (मागें सांगितलेल्या पंचकोशात्मक) पुरुषाचे ठिकाणीं आहे, आदित्याचे ठिकाणीं आहे. हा सर्व एकच आहे. सारांश, ज्याला ब्रह्माचें याप्रमाणें (अभेदानें) ज्ञान होतें, तो इहलोकांतून निघून गेला ह्मणजे या अन्नमय आत्म्याशीं एकरूप होतो, या प्राणमय आत्म्याशीं एकरूप होतो, या मनोमय आत्म्याशीं एकरूप होतो, या विज्ञानमय आत्म्याशीं एकरूप होतो, या आनंदमय आत्म्याशीं एकरूप होतो. पुढील मंत्रहि याच अर्थाचा आहे.८.

ज्याचा आनंद प्राप्त न होतां मनाप्रमाणेंच वाणी देखील ज्या ब्रह्मापासून निवृत्त होते त्या ब्रह्माचा साक्षात्काररूपी आनंद जो जाणतो त्याला कसलेंहि भय रहात नाहीं. कारण मीं चांगलें कृत्य केलें नाहीं, मीं पाप केलें, अशी शंका त्याला [ब्रह्मज्ञान्याला] ताप देत नाहीं. (कारण) याप्रकारें जो (ब्रह्म) जाणतो तो पुण्य व पाप या दोहोंनीं आत्म्यालाच तुष्ट

ब्रह्मविदिदमेकविंशतिरन्नादन्नरसमयात्प्राणो व्यानोऽपान आकाशः पृथिवी पुच्छꣳ षड्विंशतिः प्राण यजुर्ऋक्सामादेशोऽथर्वांगिरसः पुच्छं द्वाविंशतिर्यन: श्रद्धर्त सत्यं योगो महोऽष्टादश विज्ञान प्रियं मोदः प्रमोद आनन्दो ब्रह्म पुच्छं द्वाविंशतिरसन्नेवाष्टाविंशतिरसत्षोडश भीषाऽस्मादिकपंचाशद्यतः कुतश्चैकादश ॥

ॐ सह नाववतु ॥ सह नौ भुनक्तु ॥ सह वीर्यं करवावहै ॥ तेजस्वि नावधीतमस्तु मा विद्विषावहै ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

इति तैत्तिरीयोपनिषदि द्वितीया ब्रह्मानंदवल्ली ॥

---

## भृगुवल्ली ॥

ॐ ॥ सह नाववतु ॥ सह नौ भुनक्तु ॥ सह वीर्यं करवावहै ॥ तेजस्वि नावधीतमस्तु मा विद्विषावहै ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

**भृगुर्वै वारुणिः ॥ वरुणं पितरमुपससार ॥ अधीहि भगवो ब्रह्मेति ॥ तस्मा एतत्प्रोवाच ॥ अन्नं प्राणं चक्षुः श्रोत्रं मनो वाचमिति ॥ तꣳ होवाच ॥ यतो वा इमानि भूतानि जायन्ते ॥ येन जातानि जीवन्ति ॥ यत्प्रयन्त्यभिसंविशान्ति ॥ तद्विजिज्ञासस्व ॥**

करतो [हीं आत्मरूपच आहेत, यांना स्वतंत्र अस्तित्व नाहीं असें जाणतो]. याप्रमाणें ब्रह्म प्राप्त करून देणारी (सर्वविद्यारहस्यरूपी) विद्या सांगितली. ९.

## भृगुवल्ली.

वरुणाचा पुत्र भृगु (आपल्या) वरुणनामक पित्याकडे गेला आणि ह्मणाला, हे भगवन्, ब्रह्म ह्मणजे काय तें मला सांगा. त्याला वरुणानें अन्न, प्राण, चक्षु, श्रोत्र, मन आणि वाणी हींच ब्रह्म होत असें (अगोदर) सांगितलें. नंतर ह्मणाला, "ज्यापासून हीं भूतें [प्राणी] उत्पन्न होतात, उत्पन्न झाल्यावर ज्याचे योगानें जगतात, (प्रयाणकालीं) ज्याप्रत जातात, ज्याच्यामध्यें लुप्त होतात तें ब्रह्म होय. (असें ब्रह्म कोणतें) तें (तूं आपण होऊन) जाणण्याची इच्छा कर." नंतर तो भृगु (ब्रह्म-

तद्ब्रह्मेति ॥ स तपोऽतप्यत ॥ स तपस्तप्त्वा ॥ इति प्रथमोऽनुवाकः १

अन्नं ब्रह्मेति व्यजानात् ॥ अन्नाद्ध्येव खल्विमानि भूतानि जायन्ते ॥ अन्नेन जातानि जीवन्ति ॥ अन्नं प्रयन्त्यभिसंविशन्तीति ॥ तद्विज्ञाय ॥ पुनरेव वरुणं पितरमुपससार ॥ अधीहि भगवो ब्रह्मेति॥ तꣳ होवाच ॥ तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व ॥ तपो ब्रह्मेति ॥ स तपोऽतप्यत ॥ स तपस्तप्त्वा ॥ इति द्वितीयोऽनुवाकः ॥२॥

प्राणो ब्रह्मेति व्यजानात् ॥ प्राणाद्ध्येव खल्विमानि भूतानि जायन्ते ॥ प्राणेन जातानि जीवन्ति ॥ प्राणं प्रयन्त्यभिसंविशन्तीति॥ तद्विज्ञाय ॥ पुनरेव वरुणं पितरमुपससार ॥ अधीहि भगवो ब्रह्मेति ॥ तꣳ होवाच ॥ तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व ॥ तपो ब्रह्मेति ॥ स तपोऽतप्यत ॥ स तपस्तप्त्वा ॥ इति तृतीयोऽनुवाकः ॥३॥

ज्ञानार्थ) तप आचरण करिता झाला. तप आचरण केल्यावर 'अन्न हें ब्रह्म' असें त्याला ज्ञान झालें.१. कारण अन्नापासूनच हे सर्व प्राणी उत्पन्न होतात. उत्पन्न झाल्यावर अन्नाचे योगानें जगतात. (मरणकालीं) अन्नाप्रत जातात, अन्नामध्यें लय पावतात. याप्रमाणे ज्ञान झालें तरी (समाधान न झाल्यामुळें) तो पुन्हां (आपल्या) वरुण पित्याकडे आला आणि ह्मणाला, हे भगवन्, ब्रह्म ह्मणजे काय तें मला सांगा. पिता त्याला ह्मणाला, तपाचे योगानें तूं ब्रह्म जाण. तप हेंच ब्रह्माचें साधन आहे. त्यानें (पुन्हां अधिक) तप आचरण केलें. तप आचरण केल्यावर 'प्राण हें ब्रह्म' असें त्याला ज्ञान झालें.२. कारण प्राणापासूनच हे सर्व प्राणी उत्पन्न होतात. उत्पन्न झाल्यावर प्राणाचे योगानें जगतात. (मरणकालीं) प्राणाप्रत जातात, प्राणामध्यें लय पावतात. याप्रमाणे ज्ञान झाले तरी (समाधान न झाल्यामुळें) तो पुन्हां वरुण पित्याकडे आला आणि ह्मणाला, हे भगवन्, ब्रह्म ह्मणजे काय तें मला सांगा. पिता त्याला ह्मणाला, तपाचे योगानें तूं ब्रह्म जाण. तप हेंच ब्रह्माचें साधन आहे. त्यानें

मनो ब्रह्मेति व्यजानात् ॥ मनसो ह्येव खल्विमानि भूतानि जायन्ते ॥ मनसा जातानि जीवन्ति ॥ मनः प्रयन्त्यभिसंविशन्तीति॥ तद्विज्ञाय ॥ पुनरेव वरुणं पितरमुपससार ॥ अधीहि भगवो ब्रह्मेति ॥ त१ँ होवाच ॥ तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व ॥ तपो ब्रह्मेति ॥ स तपोऽतप्यत ॥ स तपस्तप्त्वा ॥ इति चतुर्थोऽनुवाकः ॥४॥

विज्ञानं ब्रह्मेति व्यजानात् ॥ विज्ञानाद्ध्येव खल्विमानि भूतानि जायन्ते ॥ विज्ञानेन जातानि जीवन्ति ॥ विज्ञानं प्रयन्त्यभिसंविशन्तीति ॥ तद्विज्ञाय ॥ पुनरेव वरुणं पितरमुपससार ॥ अधीहि भगवो ब्रह्मेति ॥ त१ँ होवाच ॥ तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व ॥ तपो ब्रह्मेति ॥ स तपोऽतप्यत ॥ स तपस्तप्त्वा ॥ इति पंचमोऽनुवाकः

(पुन्हां अधिक) तप आचरण केले. तप आचरण केल्यावर 'मन हे ब्रह्म' असें त्याला ज्ञान झाले.३. कारण मनापासूनच हे सर्व प्राणी उत्पन्न होतात. उत्पन्न झाल्यावर मनाचे योगाने जगतात (मरणकाली) मनाप्रत जातात, मनामध्ये लय पावतात. याप्रमाणे ज्ञान झाले तरी (समाधान न झाल्यामुळे) तो पुन्हां वरुण पित्याकडे आला आणि ह्मणाला, हे भगवन्, ब्रह्म ह्मणजे काय ते मला सांगा. पिता त्याला ह्मणाला, तपाचे योगाने तूं ब्रह्म जाण. तप हेच ब्रह्माचे साधन आहे. त्याने (पुन्हा अधिक) तप आचरण केलें. तप आचरण केल्यावर 'विज्ञान हे ब्रह्म' असे त्याला ज्ञान झाले.४. कारण विज्ञानापासूनच हे सर्व प्राणी उत्पन्न होतात. उत्पन्न झाल्यावर विज्ञानाचे योगाने जगतात. (मरणकाली) विज्ञानाप्रत जातात, विज्ञानामध्ये लय पावतात. याप्रमाणे ज्ञान झाले तरी (समाधान न झाल्यामुळे) तो पुन्हा वरुण पित्याकडे आला आणि ह्मणाला, हे भगवन्, ब्रह्म ह्मणजे काय तें मला सांगा. पिता त्याला ह्मणाला, तपाचे योगाने तूं ब्रह्म जाण. तप हेच ब्रह्माचें साधन आहे. त्याने (पुन्हां अधिक) तप आचरण केले. तप आचरण केल्यावर 'आनंद हे ब्रह्म'

**आनंदो ब्रह्मेति व्यजानात् ॥ आनंदाद्ध्येव खल्विमानि भूतानि जायन्ते ॥ आनंदेन जातानि जीवन्ति ॥ आनंदं प्रयन्त्यभिसंविशन्तीति ॥ सैषा भार्गवी वारुणी विद्या ॥ परमे व्योमन् प्रतिष्ठिता ॥ स य एवं वेद प्रतितिष्ठति ॥ अन्नवानन्नादो भवति ॥ महान् भवति प्रजया पशुभिर्ब्रह्मवर्चसेन ॥ महान् कीर्त्या ॥ इति षष्ठोऽनुवाकः ॥६॥**

**अन्नं न निन्द्यात् ॥ तद्व्रतम् ॥ प्राणो वा अन्नम् ॥ शरीरमन्नादम् ॥ प्राणे शरीरं प्रतिष्ठितम् ॥ शरीरे प्राणः प्रतिष्ठितः ॥ तदेतदन्नमन्ने प्रतिष्ठितम् ॥ स य एतदन्नमन्ने प्रतिष्ठितं वेद प्रतितिष्ठति ॥**

असें त्याला ज्ञान झालें.५. कारण आनंदापासूनच हे सर्व प्राणी उत्पन्न होतात. उत्पन्न झाल्यावर आनंदाचे योगानें जगतात. (मरणकालीं) आनंदाप्रत जातात, आनंदामध्यें लय पावतात. (याप्रमाणे तपाचे योगानें भृगूला हळू हळू आनंदरूप ब्रह्माचें ज्ञान झाले). अशी ही वरुणानें सांगितलेली व भृगूनें जाणलेली विद्या आहे. ही अत्यंत सूक्ष्म (अशा हृदयाकाशामध्यें) स्थित आहे [ह्मणजे अत्यंत गूढ आहे]. जो कोणी याप्रमाणें (तप आचरण करून ही विद्या स्वानुभवानें) जाणतो तो ब्रह्माचे ठिकाणीं स्थित होतो. अन्नानें समृद्ध होतो, (पुष्कळ) अन्न खाण्यास समर्थ होतो, प्रजा–पशु–ब्रह्मतेज यांचे योगानें श्रेष्ठ होतो, कीर्तीनें श्रेष्ठ होतो.६.

अन्नाची निंदा करूं नये [कारण अन्नाचे योगानें ब्रह्माचें ज्ञान होतें]. (अन्नाची निंदा न करण्याचें) व्रत धारण करावें. प्राण हें अन्न होय [कारण प्राण शरीरामध्यें आहे]. शरीर हें अन्नाचें भक्षक आहे. प्राणामध्ये शरीर स्थित आहे [कारण प्राणामुळेंच शरीर असतें]. शरीरामध्यें प्राण स्थित आहे. ह्मणजे अन्नामध्यें अन्न स्थित आहे [प्राण व शरीर हीं एकमेकाचीं अन्न व अन्नभक्षक आहेत]. याप्रमाणें अन्नामध्यें अन्न स्थित आहे हें जो जाणतो तो प्रतिष्ठा पावतो. अन्नानें समृद्ध होतो, (पुष्कळ)

अन्नवानन्नादो भवति ॥ महान् भवति प्रजया पशुभिर्ब्रह्मवर्चसेन ॥ महान् कीर्त्या ॥ इति सप्तमोऽनुवाकः ॥७॥

अन्नं न परिचक्षीत ॥ तद्व्रतम् ॥ आपो वा अन्नम् ॥ ज्योतिरन्नादम् ॥ अप्सु ज्योतिः प्रतिष्ठितम् ॥ ज्योतिष्यापः प्रतिष्ठिताः ॥ तदेतदन्नमन्ने प्रतिष्ठितम् ॥ स य एतदन्नमन्ने प्रतिष्ठितं वेद प्रतितिष्ठति ॥ अन्नवानन्नादो भवति ॥ महान्भवति प्रजया पशुभिर्ब्रह्मवर्चसेन ॥ महान्कीर्त्या ॥ इत्यष्टमोऽनुवाकः ॥८॥

अन्नं बहु कुर्वीत ॥ तद्व्रतम् ॥ पृथिवी वा अन्नम् ॥ आकाशोऽन्नादः ॥ पृथिव्यामाकाशः प्रतिष्ठितः ॥ आकाशे पृथिवी प्रतिष्ठिता ॥ तदेतदन्नमन्ने प्रतिष्ठितम् ॥ स य एतदन्नमन्ने प्रतिष्ठितं वेद प्रतितिष्ठति ॥ अन्नवानन्नादो भवति ॥ महान्भवति प्रजया पशुभिर्ब्रह्मवर्चसेन ॥ महान्कीर्त्या ॥ इति नवमोऽनुवाकः ॥९॥

अन्न खाण्यास समर्थ होतो, प्रजा–पशु–ब्रह्मतेज यांचे योगानें श्रेष्ठ होतो, कीर्तीनें श्रेष्ठ होतो.७.

अन्नाचा त्याग करूं नये. (अन्नाचा त्याग न करण्याचें) व्रत धारण करावें. उदक हें अन्न होय. तेज हें अन्नाचें भक्षक आहे. उदकामध्यें तेज स्थित आहे. तेजामध्यें उदक स्थित आहे. ह्मणजे अन्नामध्यें अन्न स्थित आहे. याप्रमाणें अन्नामध्यें अन्न स्थित आहे हें जो जाणतो तो प्रतिष्ठा पावतो. अन्नानें समृद्ध होतो, (पुष्कळ) अन्न खाण्यास समर्थ होतो, प्रजा–पशु–ब्रह्मतेज यांचे योगानें श्रेष्ठ होतो, कीर्तीनें श्रेष्ठ होतो.८.

अन्नाची वृद्धि करावी. (अन्नाची वृद्धि करण्याचें) व्रत धारण करावें. पृथ्वी हें अन्न होय. आकाश हें अन्नाचें भक्षक आहे. पृथिवीमध्यें आकाश स्थित आहे. आकाशामध्यें पृथिवी स्थित आहे. ह्मणजे अन्नामध्यें अन्न स्थित आहे. याप्रमाणें अन्नामध्यें अन्न स्थित आहे हें जो जाणतो तो प्रतिष्ठा पावतो. अन्नानें समृद्ध होतो, (पुष्कळ) अन्न खाण्यास समर्थ

न कंचन वसतौ प्रत्याचक्षीत ॥ तद्व्रतम् ॥ तस्माद्यया कया च विधया बह्वन्नं प्राप्नुयात् ॥ अराध्यस्मा अन्नमित्याचक्षते ॥ एतद्वै मुखतोऽन्नꣳ राद्धम् ॥ मुखतोऽस्मा अन्नꣳ राध्यते ॥ एतद्वै मध्यतोऽन्नꣳ राद्धम् ॥ मध्यतोऽस्मा अन्नꣳ राध्यते ॥ एतद्वा अंततोऽन्नꣳ राद्धम् ॥ अंततोऽस्मा अन्नꣳ राध्यते ॥१॥ य एवं वेद ॥ क्षेम इति वाचि ॥ योगक्षेम इति प्राणापानयोः ॥ कर्मेति हस्तयोः ॥ गतिरिति पादयोः ॥ विमुक्तिरिति पायौ ॥ इति मानुषीः समाज्ञाः ॥ अथ दैवीः ॥ तृप्तिरिति वृष्टौ ॥ बलमिति विद्युति ॥२॥ यश इति पशुषु ॥

होतो, प्रजा—पशु—ब्रह्मतेज यांचे योगानें श्रेष्ठ होतो, कीर्तीनें श्रेष्ठ होतो.९.

(आपल्या घरीं) वसतीकरितां आलेल्या कोणालाहि हरकत करूं नये. हें व्रत पालन करावें. याच्याकरितां [अतिथीकरितां] अन्न तयार आहे असें (सज्जन) बोलत असतात; ह्मणून कोणत्याहि प्रकारानें पुष्कळ अन्न मिळवीत असावें. यानें उत्तम (देश, काल व पात्र यांचे) ठिकाणीं अन्न तयार केलें ह्मणून उत्तम (देश, काल व पात्र यांचे) ठिकाणीं त्याचेकरितां [अन्नदात्याकरितां] अन्न तयार होतें; मध्यम (देशकालादि) ठिकाणीं अन्न तयार केलें ह्मणून त्या मध्यम (देशकालादि) ठिकाणीं त्याचेकरितां अन्न तयार होतें; अधम (देशकालादि) ठिकाणीं अन्न तयार केलें ह्मणून त्या अधम (देशकालादि) ठिकाणीं त्याचेकरितां अन्न तयार होते [सारांश, जसें अन्नदान केलें असेल तसें फळ मिळतें]. जो हें जाणील त्याला (अन्नादि समृद्धि, ब्रह्मतेज, कीर्ति इत्यादि पूर्वोक्त) फळ प्राप्त होतें. ब्रह्म वाणीचे ठिकाणीं क्षेमरूपानें स्थित आहे, योग व क्षेम या रूपानें प्राण व अपान यांचे ठिकाणीं स्थित आहे [योग=अप्राप्त वस्तूची प्राप्ति; क्षेम=प्राप्त वस्तूचे रक्षण], कर्मरूपानें हस्तांचे ठिकाणीं स्थित आहे, गतिरूपानें पायांचे ठिकाणीं स्थित आहे, (मलादि—) विमोचनरूपानें पायूचे ठिकाणीं स्थित

याप्रमाणें (ब्रह्माच्या) मानव उपासना [समाज्ञा] आहेत. आतां

ज्योतिरिति नक्षत्रेषु ॥ प्रजातिरमृतमानंद इत्युपस्थे ॥ सर्वमित्याकाशे ॥ तत्प्रतिष्ठेत्युपासीत ॥ प्रतिष्ठावान् भवति ॥ तन्मह इत्युपासीत ॥ महान् भवति ॥ तन्मन इत्युपासीत ॥ मानवान् भवति ॥३॥ तन्नम इत्युपासीत ॥ नम्यन्तेऽस्मै कामाः ॥ तद्ब्रह्मेत्युपासीत ॥ ब्रह्मवान् भवति ॥ तद्ब्रह्मणः परिमर इत्युपासीत ॥ पर्येणं म्रियन्ते द्विषन्तः सपत्नाः ॥ परि येऽप्रिया भ्रातृव्याः ॥ स यश्चायं पुरुषे ॥ यश्चासावादित्ये ॥ स एकः ॥४॥ स य एवंवित् ॥ अस्माल्लोकात्प्रेत्य ॥ एतमन्नमयमात्मानमुपसंक्रम्य ॥ एतं प्राणमयमात्मानमुपसंक्रम्य ॥ एतं मनोमयमात्मानमुपसंक्रम्य ॥ एतं विज्ञानमयमात्मान-

दैवी उपासना— तृप्तिरूपानें वृष्टीचे ठिकाणीं स्थित आहे, बलरूपानें विजेचे ठिकाणीं स्थित आहे, यशोरूपानें पशूंचे ठिकाणीं स्थित आहे, ज्योतीरूपानें नक्षत्रांचे ठिकाणीं स्थित आहे, प्रजोत्पत्ति आणि (तेणेंकरून) मोक्ष आणि आनंद यांचे रूपानें उपस्थाचे ठिकाणीं स्थित आहे, सर्वरूपानें आकाशाचे ठिकाणीं स्थित आहे. (ह्मणून) या सर्वांची ब्रह्माचें स्थान ह्मणून उपासना करावी. (जो ज्या स्थानाची उपासना करील तो) तें स्थान पावतो. महत्त्वरूपानें त्या ब्रह्माची उपासना करावी ह्मणजे महान् होतो. मननरूपानें उपासना करावी ह्मणजे मननयुक्त होतो. नमस्काररूपानें उपासना करावी ह्मणजे त्याला सर्व मनोरथ नमन करतात [=प्राप्त होतात]. ब्रह्मरूपानें उपासना करावी ह्मणजे ब्रह्मरूप होतो. सर्वविनाशक कालरूपानें (अथवा वायुरूपानें) उपासना करावी ह्मणजे द्वेष करणारे शत्रु आणि अप्रिय दायाद नाश पावतात. हें ब्रह्म ह्मणजे जें पंचकोशात्मक पुरुषाचे ठिकाणीं आहे, आदित्याचे ठिकाणीं आहे. हें सर्व एकच आहे. सारांश, ज्याला ब्रह्माचें याप्रमाणें (अभेदानें) ज्ञान होतें तो इहलोकांतून निघून गेला ह्मणजे या अन्नमय आत्म्याशीं एकरूप होऊन, या प्राणमय आत्म्याशीं एकरूप होऊन, या मनोमय आत्म्याशीं एकरूप होऊन, या विज्ञानमय आत्म्याशीं एकरूप

मुपसंक्रम्य ॥ एतमानंदमयमात्मानमुपसंक्रम्य ॥ इमाँल्लोकान्कामान्नी कामरूप्यनुसंचरन् ॥ एतत्साम गायन्नास्ते ॥ हा३वु हा३वु हा३वु ॥५॥ अहमन्नमहमन्नमहमन्नम् ॥ अहमन्नादो३ऽहमन्नादो३ऽहमन्नादः ॥ अहꣳ श्लोककृदहꣳ श्लोककृदहꣳ श्लोककृत् ॥ अहमस्मि प्रथमजा ऋता३स्य ॥ पूर्वं देवेभ्योऽमृतस्य ना३भायि ॥ यो मा ददाति स इदेव मा३ऽऽवाः ॥ अहमन्नमन्नमदन्तमा३द्मि ॥ अहं विश्वं भुवनमभ्यभवा३म् ॥ सुवर्न ज्योतीः ॥ य एवं वेद ॥ इत्युपनिषत् ॥६॥ इति दशमोऽनुवाकः ॥१०॥

भृगुस्तस्मै यतो वै विज्ञान्ति तद्विजिज्ञा-स्व तत्त्रयोदशान्नं प्राणो मनो विज्ञानमिति विज्ञाय तं तपसा द्वादश द्वादशानन्द इति सैषा दशान्नं न निन्द्यात् प्राणः शरीरमन्नं न परिचक्षीतापो ज्योतिरन्नं बहु कुर्वीत पृथिव्यामाकाश एकादशैकादश ॥ न कंचनैकषष्टिरेकान्नविंशतिरेकान्नविंशतिः ॥

होऊन, या आनंदमय आत्म्याशीं एकरूप होऊन, इच्छेस येईल तें अन्न खाणारा व इच्छेस येईल तें रूप धारण करणारा होत्साता पुढील सामाचें गायन करीत या (भू, भुव इत्यादि) लोकांमध्यें संचार करतो– "हा३ वु० अहमन्नं०" इत्यादि [या सामाचा अर्थ— अहो! मीच अन्न, मीच अन्नभक्षक; माझा महिमा मींच वर्णन केला. ऋताच्या अगोदरचा माझा जन्म आहे, देवांच्या अगोदरचा आहे. अमृतत्वाचें स्थान मीच आहें. जो मला याप्रमाणें अन्न देतो तो माझें रक्षण करतो. (कारण) मी अन्नच आहें. जो अन्न देत नाहीं त्याचा मी भक्षक आहें. मी हें सर्व विश्व व्यापून राहिलों आहें. माझें तेज आदित्याप्रमाणें (सर्वव्यापी) आहे]. याप्रमाणें (ब्रह्मज्ञान) जो जाणतो त्याला (समृद्धि, ब्रह्मतेज, कीर्ति इत्यादि) फळ मिळतें. याप्रमाणें ब्रह्म प्राप्त करून देणारी (सर्वविद्यारहस्यरूपी विद्या) सांगितली.१०.

ॐ सह नाववतु ॥ सह नौ भुनक्तु ॥ सह वीर्यं करवावहै ॥ तेजस्वि नावधीतमस्तु मा विद्विषावहै ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

इति तैत्तिरीयोपनिषदि तृतीया भृगुवल्ली ॥

---

ॐ शं नो मित्रः शं वरुणः ॥ शं नो भवत्वर्यमा ॥ शं न इंद्रो बृहस्पतिः ॥ शं नो विष्णुरुरुक्रमः ॥ नमो ब्रह्मणे ॥ नमस्ते वायो ॥ त्वमेव प्रत्यक्षं ब्रह्मासि ॥ त्वामेव प्रत्यक्षं ब्रह्म वदिष्यामि ॥ ऋतं वदिष्यामि ॥ सत्यं वदिष्यामि ॥ तन्मामवतु ॥ तद्वक्तारमवतु ॥ अवतु माम् ॥ अवतु वक्तारम् ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

इति कृष्णयजुर्वेदीया तैत्तिरीयोपनिषत्समाप्ता ॥

# ऐतरेयोपनिषत् ॥८॥



वाङ्मे मनसि प्रतिष्ठिता मनो मे वाचि प्रतिष्ठितमाविरावीर्म एधि ॥ वेदस्य म आणीस्थः श्रुतं मे मा प्रहासीरनेनाधीतेनाहोरात्रान्संदधाम्यृतं वदिष्यामि सत्यं वदिष्यामि ॥ तन्मामवतु तद्वक्तारमवतु अवतु मामवतु वक्तारमवतु वक्तारम् ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

आत्मा वा इदमेक एवाग्र आसीन्नान्यत्किंचन मिषत् स ईक्षत लोकान्नु सृजा इति ॥१॥ स इमांल्लोकानसृजत अम्भो मरीचीर्मरमापोऽदोम्भः परेण दिवं द्यौः प्रतिष्ठाऽन्तरिक्षं मरीचयः ॥ पृथिवी मरो या अधस्तात्ता आपः ॥२॥ स ईक्षतेमे नु लोका लोकपालान्नु सृजा

## ऐतरेयोपनिषत्.



माझी वाणी मनामध्यें स्थित आहे, माझें मन माझ्या वाणीमध्यें स्थित आहे. हे (स्वप्रकाश) ब्रह्म, मला प्रकट हो. हे वाणी व मनहो, तत्त्वविद्या मजकडे आणण्यास तुह्मी समर्थ व्हा. मीं श्रवण केलेलें ज्ञान मजकडून विसरवूं नका. मी रात्रंदिवस हें अध्ययन करीत आहें. मी यथाशास्त्र भाषण करीन. मी सत्य भाषण करीन. तें (ब्रह्म) माझें रक्षण करो, वक्त्याचें रक्षण करो, माझें रक्षण करो, वक्त्याचें रक्षण करो.

हें (जगत्) (उत्पत्तीच्या) पूर्वी फक्त एक आत्मा होतें. (आत्म्याखेरीज) दुसरें व्यापारवत् असें कांहीं नव्हतें. मीं लोक उत्पन्न करावे असा त्यानें विचार केला.१. त्यानें हे लोक उत्पन्न केले— अंभ, मरीची, मर आणि आप. द्युलोक ज्याचा आधार आहे असा द्युलोकाचे वर (असलेला) तो अंभलोक. (द्युलोकाचे खालीं) अंतरिक्ष हा मरीचीलोक. पृथिवी हा मरलोक. (पृथिवीहून) जो खालीं तो आप.२. त्यानें पुन्हां विचार केला कीं, हे लोक (झाले), (आतां) लोकपाल उत्पन्न करतों. त्यानें उदका-

इति ॥ सोऽद्भ्य एव पुरुषं समुद्धृत्यामूर्छयत् ॥३॥ तमभ्यतपत्तस्याभितप्तस्य मुखं निरभिद्यत यथांडं मुखाद्वाग्वाचोऽग्निर्नासिके निरभिद्येतां नासिकाभ्यां प्राणः प्राणाद्वायुरक्षिणी निरभिद्येतामक्षीभ्यां चक्षुश्चक्षुष आदित्यः कर्णौ निरभिद्येतां कर्णाभ्यां श्रोत्रं श्रोत्राद्दिशस्त्वङ्निरभिद्यत त्वचो लोमानि लोमभ्य ओषधिवनस्पतयो हृदयं निरभिद्यत हृदयान्मनो मनसश्चंद्रमा नाभिर्निरभिद्यत नाभ्या अपानोऽपानान्मृत्युः शिश्नं निरभिद्यत शिश्नाद्रेतो रेतस आपः ॥४॥ इति प्रथमः खंडः ॥१॥

ता एता देवताः सृष्टा अस्मिन् महत्यर्णवे प्रापतंस्तमशनापिपासाभ्यामन्ववार्जत् ॥ ता एनमब्रुवन्नायतनं नः प्रजानीहि यस्मिन् प्रतिष्ठिता अन्नमदामेति ॥१॥ ताभ्यो गामानयत्ता अब्रुवन्न वै नोऽ-

मधून एक पुरुष काढून त्याला पिंडानें युक्त केलें.३. त्याकडे त्यानें पाहिलें [पहाणें हेंच तप केलें]. पाहिल्यावर (पहण्यापासून) अंडें निघतें त्याप्रमाणें त्यापासून मुख [अधिष्ठान] निघालें; मुखापासून वाणी [इंद्रिय] उत्पन्न झाली; वाणीपासून अग्नि [देवता]. नासिका उत्पन्न झाल्या; नासिकांपासून प्राण आणि प्राणापासून वायु उत्पन्न झाला. नेत्र उत्पन्न झाले; नेत्रांपासून चक्षु आणि चक्षूंपासून आदित्य. कर्ण उत्पन्न झाले; कर्णांपासून श्रोत्र आणि श्रोत्रापासून दिशा. त्वचा उत्पन्न झाली; त्वचेपासून लोम आणि लोमांपासून ओषधिवनस्पति. हृदय उत्पन्न झालें; हृदयापासून मन आणि मनापासून चंद्रमा. नाभि उत्पन्न झाली; नाभीपासून अपान आणि अपानापासून मृत्यु. शिश्न उत्पन्न झालें, शिश्नापासून रेत आणि रेतापासून उदक.४.

याप्रमाणें (आत्म्यानें) उत्पन्न केलेल्या या देवता या (संसाररूपी) महान् समुद्रामध्यें पडल्या. आत्म्यानें त्या पुरुषाला अशना [भूक] व पिपासा [तहान] यांनीं युक्त केलें. त्या (देवता) या (सृष्टिकर्त्या) आत्म्याला [ईश्वराला] ह्मणाल्या, आमच्याकरितां अधिष्ठान तयार कर ह्मणजे त्यामध्यें

यमलमिति ॥ ताभ्योऽश्वमानयत्ता अब्रुवन्न वै नोऽयमलमिति ॥२॥ ताभ्यः पुरुषमानयत्ता अब्रुवन् सुकृतं बतेति पुरुषो वाव सुकृतम् ॥ ता अब्रवीद्यथायतनं प्रविशतेति ॥३॥ अग्निर्वाग्भूत्वा मुखं प्राविशद्वायुः प्राणो भूत्वा नासिके प्राविशदादित्यश्चक्षुर्भूत्वाक्षिणी प्राविशद्दिशः श्रोत्रं भूत्वा कर्णौ प्राविशन्नोषधिवनस्पतयो लोमानि भूत्वा त्वचं प्राविशंश्चंद्रमा मनो भूत्वा हृदयं प्राविशन्मृत्युरपानो भूत्वा नाभिं प्राविशदापो रेतो भूत्वा शिश्नं प्राविशन् ॥४॥ तमशनापिपासे अब्रूतामावाभ्यामभिप्रजानीहीति ॥ ते अब्रवीदेतास्वेव वां देवतास्वाभजाम्येतासु भागिन्यौ करोमीति ॥ तस्माद्यस्यै कस्यै च देवतायै हवि-

स्थित होत्सात्या आह्मी अन्न भक्षण करूं. १. त्यानें त्यांजपुढें गाय आणली. (तेव्हां) त्या ह्मणाल्या, हा (पिंड) आह्मांला योग्य नाहीं. (तेव्हां) त्यानें त्यांजपुढें अश्व आणला. त्या ह्मणाल्या, हा (पिंड) आह्मांला योग्य नाहीं. २. (तेव्हां) त्यानें त्यांजपुढें पुरुष आणला. त्या ह्मणाल्या, खरोखर हें (अधिष्ठान) चांगलें केलेंस. कारण मनुष्यदेह हाच पुण्यकारक आहे. त्यांना ईश्वर ह्मणाला, आपापल्या (योग्य) अधिष्ठानाचे ठिकाणीं प्रवेश करा. ३. (तेव्हां) अग्नि वाणी होऊन मुखांत प्रवेश करिता झाला. वायु प्राण होऊन नासिकांमध्ये प्रवेश करिता झाला. आदित्य चक्षु होऊन नेत्रांमध्ये प्रवेश करिता झाला. दिशा श्रोत्र होऊन कर्णांमध्यें प्रवेश करित्या झाल्या. ओषधिवनस्पति लोम होऊन त्वचेमध्यें प्रवेश करित्या झाल्या. चंद्रमा मन होऊन हृदयामध्यें प्रवेश करिता झाला. मृत्यु अपान होऊन नाभीमध्यें प्रवेश करिता झाला. उदक रेत होऊन शिश्नामध्यें प्रवेश करितें झालें. ४. त्याला [ईश्वराला] अशना आणि पिपासा ह्मणाल्या की, आमच्याकरितां अधिष्ठान तयार कर. त्यांना तो (ईश्वर) ह्मणाला, या देवतांमध्येंच तुह्मांला भाग देतों. यांचेमध्येंच तुह्मांला भागदार करतों. ह्मणून (जेव्हां) कोणत्याहि देवतेकरितां हवि घेतला जातो तेव्हां त्यामध्यें अशना आणि पिपासा

गृह्यते भागिन्यावेवास्यामशनापिपासे भवतः ॥५॥ इति द्वितीयः खंडः ॥२॥

स ईक्षतेमे नु लोकाश्च लोकपालाश्चान्नमेभ्यः सृजा इति ॥१॥ सोऽपोऽभ्यतपत्ताभ्योऽभितप्ताभ्यो मूर्तिरजायत ॥ या वै सा मूर्तिरजायतान्नं वै तत् ॥२॥ तदेनत्सृष्टं पराङ्त्यजिघांसत् तद्वाचा जिघृक्षत्तन्नाशक्नोद्वाचा ग्रहीतुम् ॥ स यद्धैनद्वाचाऽग्रहैष्यदभिव्याहृत्य हैवान्नमत्रप्स्यत् ॥३॥ तत्प्राणेनाजिघृक्षत् तन्नाशक्नोत्प्राणेन ग्रहीतुम् ॥ स यद्धैनत्प्राणेनाग्रहैष्यदभिप्राण्य हैवान्नमत्रप्स्यत् ॥४॥ तच्चक्षुषाजिघृक्षत्तन्नाशक्नोच्चक्षुषा ग्रहीतुम् ॥ स यद्धैनच्चक्षुषाग्रहैष्यत् दृष्ट्वा हैवान्नमत्रप्स्यत् ॥५॥ तच्छ्रोत्रेणाजिघृक्षत् तन्नाशक्नोच्छ्रोत्रेण ग्रहीतुम् ॥

या वांटेकरी होतात.५.

त्या ईश्वरानें विचार केला, हे लोक आणि लोकपाल (मीं उत्पन्न केले); (आतां) यांचेकरितां अन्न उत्पन्न करावें.१. त्यानें उदकाकडे पाहिलें [संकल्परूपी तप केलें]. त्या उदकापासून (अन्नाची) मूर्ति उत्पन्न झाली. ती जी मूर्ति उत्पन्न झाली तेंच अन्न होय.२. तें उत्पन्न केलेलें अन्न (पुरुषाकडे जाणें ह्मणजे आपला मृत्यु आहे असें समजून) मागें जाऊन पलायन करूं लागलें. (तेव्हां) तो (पुरुष) त्या अन्नाला वाणीनें घेऊं लागला पण वाणीनें (अन्न) घेण्यास समर्थ झाला नाहीं. जर वाणीनें घेऊं शकला असता तर (आतां देखील वाणीनें) अन्नाचा उच्चार करून तृप्त झाला असता.३. त्या अन्नाला प्राणानें घेऊं लागला, पण प्राणानें घेण्यास समर्थ झाला नाहीं. जर प्राणानें घेऊं शकला असता तर (आतां देखील प्राणानें) अन्नाचा श्वास घेऊन तृप्त झाला असता.४. त्या अन्नाला चक्षूनें घेऊं लागला पण चक्षूनें घेण्यास समर्थ झाला नाहीं. जर चक्षूनें घेऊं शकला असता तर (आतां देखील चक्षूनें) अन्न पाहून तृप्त झाला असता.५. त्या अन्नाला श्रोत्रानें घेऊं लागला पण श्रोत्रानें

**स यद्धैनच्छ्रोत्रेणाग्रहैष्यच्छ्रुत्वा हैवान्नमत्रप्स्यत् ॥६॥ तत्त्वचाजिघृक्षत् तन्नाशक्नोत्त्वचा ग्रहीतुम् ॥ स यद्धैनत्त्वचाग्रहैष्यत्स्पृष्ट्वा हैवान्नमत्रप्स्यत् ॥७॥ तन्मनसाजिघृक्षत् तन्नाशक्नोन्मनसा ग्रहीतुम् ॥ स यद्धैनन्मनसाग्रहैष्यद्ध्यात्वा हैवान्नमत्रप्स्यत् ॥८॥ तच्छिश्नेनाजिघृक्षत्तन्नाशक्नोच्छिश्नेन ग्रहीतुम् ॥ स यद्धैनच्छिश्नेनाग्रहैष्यद्विसृज्य हैवान्नमत्रप्स्यत् ॥९॥ तदपानेनाजिघृक्षत् तदावयत् ॥ सैषोऽन्नस्य ग्रहो यद्वायुरन्नायुर्वा एष यद्वायुः ॥१०॥ स ईक्षत कथं न्विदं मदृते स्यादिति स ईक्षत कतरेण प्रपद्या इति ॥ स ईक्षत यदि वाचाभिव्याहृतं यदि प्राणेनाभिप्राणितं यदि चक्षुषा दृष्टं यदि श्रोत्रेण श्रुतं यदि त्वचा स्पृष्टं यदि मनसा ध्यातं यद्यपानेनाभ्यपानितं यदि शिश्नेन विसृष्टमथ कोऽहमिति ॥११॥ स एतमेव सीमानं विदार्यैतया द्वारा प्रापद्यत ॥**

घेण्यास समर्थ झाला नाहीं. जर श्रोत्रानें घेऊं शकला असता तर (आतां देखील श्रोत्रानें) अन्नाचे श्रवण करून तृप्त झाला असता.६. त्या अन्नाला त्वचेनें घेऊं लागला पण त्वचेनें घेण्यास समर्थ झाला नाहीं. जर त्वचेनें घेऊं शकला असता तर (आतां देखील) अन्नाला स्पर्श केल्यानें तृप्त झाला असता.७. त्या अन्नाला मनानें घेऊं लागला पण मनानें घेण्यास समर्थ झाला नाहीं. जर मनानें घेऊं शकला असता तर (आता देखील) अन्नाचें ध्यान करून तृप्त झाला असता.८.९. त्या अन्नाला अपानवायूनें घेऊं लागला तेव्हां तें अन्न त्यानें भक्षण केलें. (ह्मणून) अन्न ग्रहण करणारा वायु आहे. वायु ह्याच अन्नाचें जीवन आहे.१०. नंतर त्या ईश्वरानें विचार केला, हा पुरुष माझ्यावांचून कसा राहूं शकेल ? मी यामध्यें कसा प्रवेश करावा ? जर वाणी बोलते, प्राण श्वास घेतो, चक्षु पहातो, श्रोत्र श्रवण करतें, त्वचा स्पर्श करते, मन ध्यान करतें, अपान श्वास सोडतो, तर मग मी कोठें ? (मी कशाचा स्वामी ?)११. ह्मणून त्यानें या (मस्तकाची) सीमा विदारण करून त्या द्वारानें आंत

सैषा विदृतिर्नाम द्वास्तदेतन्नान्दनं तस्य त्रय आवसथास्त्रयः स्वप्ना अयमावसथोऽयमावसथोऽयमावसथ इति ॥१२॥ स जातो भूतान्यभिव्यैख्यत् किमिहान्यं वावादिषदिति ॥ स एतमेव पुरुषं ब्रह्म ततममपश्यदिदमदर्शमिती३ ॥१३॥ तस्मादिदंद्रो नामेदंद्रो ह वै नाम तमिदंद्रं सन्तमिंद्र इत्याचक्षते परोक्षेण परोक्षप्रिया इव हि देवाः परोक्षप्रिया इव हि देवाः ॥१४॥ इति तृतीय खंडः ॥३॥ इति प्रथमोऽध्यायः ॥

पुरुषे ह वा अयमादितो गर्भो भवति यदेतद्रेतस्तदेतत्सर्वेभ्योऽ-गेभ्यस्तेजः संभूतमात्मन्येवात्मानं बिभर्ति तद्यदा स्त्रियां सिंचत्यथैनज्जन-

प्रवेश केला. हे द्वार (विदारण केलें ह्मणून) विदृति या नांवानें प्रसिद्ध आहे. (या द्वाराने जाणारा परब्रह्माचे ठिकाणी आनंद पावतो ह्मणून) हें नंदन होय. त्याचीं तीन स्थानें आहेत (जागृतीमध्यें उजवा चक्षु, स्वप्नामध्ये मन आणि सुषुप्तीमध्यें हृदयाकाश). (तीन स्थानांमध्यें जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति अशी) तीन स्वप्नें आहेत. [सर्व स्वप्नेंच आहेत. कारण तिन्हींमध्ये मूळ ब्रह्मतत्त्वाचें तिरोधान होऊन जीवतत्त्वाचाच अवभास होतो]. हीं (चक्षु, कंठ व हृदय) त्याचीं स्थानें आहेत. १२. तो ईश्वर (जीवरूपाने शरीरांत) प्रवेश करून राहिल्यानंतर (पुन्हां ईश्वराच्या अनु-ग्रहामुळें) त्याला पंचमहाभूतांचे ज्ञान झाले (व वाटलें) कीं, येथें ब्रह्माहून अन्य कोणती वस्तु आहे असें मी ह्मणूं? ब्रह्म हा पुरुष सर्वस्वीं व्यापून राहिलें आहे असें त्याला ज्ञान झाले. अहो, हे तर माझेंच स्वरूप (असें त्यानें जाणलें). १३. ह्मणून हें पहाणारा परमात्मा तो इदंद्र. त्या इदंद्रालाच इंद्र असें परोक्ष नांवानें ह्मणतात. कारण देवांना परोक्ष प्रिय असतें. १४.

पुत्र उत्पन्न झाला ह्मणजे पिता त्याचें वर्धन करतो. जन्म झाल्या-पासून पिता जें पुत्राचें वर्धन करतो तें आपलें स्वतःचेंच वर्धन होय.

यति तदस्य प्रथमं जन्म ॥१॥ तत् स्त्रिया आत्मभूयं गच्छति यथा स्वमंगं तथा तस्मादेनां न हिनस्ति सास्यैतमात्मानमत्र गतं भावयति ॥२॥ सा भावयित्री भावयितव्या भवति तं स्त्री गर्भं बिभर्ति सोऽग्र एव कुमारं जन्मनोऽग्रेऽधिभावयति स यत्कुमारं जन्मनोऽग्रेऽधिभावयत्यात्मानमेव तद्भावयत्येषां लोकानां सन्तत्या एवं सन्तता हीमे लोकास्तदस्य द्वितीयं जन्म ॥३॥ सोऽस्यायमात्मा पुण्येभ्यः कर्मभ्यः प्रतिधीयतेऽथास्यायमितर आत्मा कृतकृत्यो वयोगतः प्रैति स इतः प्रयन्नेव पुनर्जायते तदस्य तृतीयं जन्म ॥४॥ तदुक्तमृषिणा ॥ गर्भे नु सन्नन्वेषामवेदमहं देवानां जनिमानि विश्वा ॥ शतं मा पुर आयसीररक्षन्नधः श्येनो जवसा निरदीयमिति गर्भ एवैतच्छयानो वामदेव एवमुवाच ॥५॥ स एवं विद्वानस्माच्छरीरभेदादूर्ध्व उत्क्रम्यामुष्मिन् स्वर्गे लोके सर्वान् कामानाप्त्वामृतः समभवत् सम-

कारण लोकांचा विच्छेद होऊं नये ह्मणून हे लोक (पुत्रादि रूपाने) संतत आहेत. (पुत्र) हा पुरुषाचा दुसरा जन्म होय.१–३. हा पित्याचा (पुत्ररूपी) आत्मा पुण्य कर्मांचे ठिकाणीं प्रतिनिधि होतो [ह्म० पित्यानें करावयाचीं कृत्यें करतो]. नंतर याचा हा (पितृरूपी) पहिला आत्मा कृतकर्तव्य होऊन वयोवृद्ध होत्साता मरण पावतो. या लोकामधून शरीरत्याग केल्याबरोबर तो पुन्हां उत्पन्न होतो. तो त्याचा तिसरा जन्म.४. ह्मणून ऋषींनें (मंत्ररूपानें) पुढील उद्गार काढले आहेत– (मातेच्या) गर्भामध्यें असतांनाच या (वाणी, अग्नि इत्यादि) इंद्रियांचे सर्व जन्म [मुखापासून वाणी, वाणीपासून अग्नि इत्यादि] मीं जाणले. लोहाप्रमाणे कठिण अशा शेकडों शरीरांनीं मला खालीं संसारांत ठेवण्याकरितां माझें रक्षण केलें. (परंतु) श्येन पक्ष्याप्रमाणें (जाळें तोडून आत्मज्ञानाच्या) सामर्थ्यानें मी वर उडून गेलों [संसारापासून मुक्त झालों]. गर्भामध्यें असतांनाच वामदेव ऋषि हें भाषण बोलले.५. याप्रमाणें जाणल्यामुळें तो ऋषि या

भवत् ॥६॥ इति चतुर्थः खंडः ॥४॥ इति द्वितीयोऽध्यायः ॥

कोऽयमात्मेति वयमुपास्महे कतरः स आत्मा येन वा पश्यति येन वा शृणोति येन वा गन्धानाजिघ्रति येन वा वाचं व्याकरोति येन वा स्वादु चास्वादु च विजानाति ॥१॥ यदेतत् हृदयं मनश्चैतत् ॥ संज्ञानमाज्ञानं विज्ञानं प्रज्ञानं मेधा दृष्टिर्धृतिर्मतिर्मनीषा जूतिः स्मृतिः संकल्पः क्रतुरसुः कामो वश इति ॥ सर्वाण्येवैतानि प्रज्ञानस्य नामधेयानि भवन्ति ॥२॥ एष ब्रह्मैष इंद्र एष प्रजापतिरेते सर्वे देवा इमानि च पंच महाभूतानि पृथिवी वायुराकाश आपो

शरीराचा नाश झाल्यानंतर त्या स्वर्गलोकामध्यें सर्व मनोरथ पावून मृत्युरहित झाला.६.

(मागें सोपाधिक व निरुपाधिक अशीं आत्म्याचीं दोन वर्णनें सांगितलीं. त्यांपैकीं) आम्हीं ज्याची उपासना करावयाची तो कोणता आत्मा ? दोहोंपैकीं तो कोणता ? ज्याचे योगानें (मनुष्य) पहातो, ज्याचे योगानें ऐकतो, ज्याचे योगानें गंधाचा वास घेतो, ज्याचे योगानें शब्द उच्चारतो, अथवा ज्याचे योगानें स्वादु व अस्वादु हें जाणतो (तो आत्मा कीं काय ?).१. अथवा हृदय [अंतःकरण] आणि मन [आत्म्याच्या संकल्पविकल्पांचें साधन] हा आत्मा ? (अंतःकरणाच्या वृत्ति–) संज्ञान [चेतनभाव], आज्ञान [ईश्वरभाव], विज्ञान, प्रज्ञान [प्रज्ञता], बुद्धि, दृष्टि, धृति, मनन, इच्छा, जूति [मनाची व्यग्रता], स्मृति, संकल्प, क्रतु [करण्याचा निश्चय, अध्यवसाय], प्राणवृत्ति, विषयतृष्णा, लोभ इत्यादि सर्व वृत्तींचे ठिकाणीं असलेलें चैतन्य हा आत्मा काय ? (याचा निर्णय सांगतात—) हीं सर्व प्रज्ञानाचीं ह्म० शुद्ध चैतन्याचीं नांवें आहेत. या उपाधींहून वेगळें जें शुद्ध चैतन्य तो मुख्य आत्मा होय.२. हाच प्रज्ञानरूप आत्मा ब्रह्मा होय, हाच इंद्र, हाच प्रजापति, हाच हे सर्व देव, हाच हीं पृथिवी, वायु, आकाश, उदक आणि तेज हीं पंचमहाभूतें, हाच

ज्योतींषीत्येतानीमानि च क्षुद्रमिश्राणीव ॥ बीजानीतराणि चेतराणि चांडजानि च जारुजानि च स्वेदजानि चोद्भिजानि चाश्वा गावः पुरुषा हस्तिनो यत्किंचेदं प्राणि जंगमं च पतत्रि च यच्च स्थावरं सर्वं तत्प्रज्ञानेत्रं प्रज्ञाने प्रतिष्ठितं प्रज्ञानेत्रो लोकः प्रज्ञा प्रतिष्ठा प्रज्ञानं ब्रह्म ॥३॥ स एतेन प्रज्ञेनात्मनास्माल्लोकादुत्क्रम्यामुष्मिन् स्वर्गे लोके सर्वान्कामानाप्त्वाऽमृतः समभवत् समभवत् ॥ इत्योम् ॥४॥ इति पंचमः खंडः ॥५॥ इति तृतीयोऽध्यायः ॥

वाङ्मे मनसि प्रतिष्ठिता मनो मे वाचि प्रतिष्ठितमाविरावीर्म एधि ॥ वेदस्य म आणीस्थः श्रुतं मे मा प्रहासीरनेनाधीतेनाहोरात्रान्संदधाम्यृतं वदिष्यामि सत्यं वदिष्यामि तन्मामवतु तद्वक्तारमवतु अवतु मामवतु वक्तारमवतु वक्तारम् ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

इति ऋग्वेदीया ऐतरेयोपनिषत्समाप्ता ॥

---

(पिपीलिकादि) क्षुद्र बीजें, हाच इतर अंडज, जारुज, स्वेदज, उद्भिज होय; अश्व, गाई, पुरुष, हत्ती जें जें कांहीं प्राणयुक्त, जंगम व पंखयुक्त, जें जें स्थावर, तें सर्व प्रज्ञानेत्र [प्रज्ञा हाच ज्याचा नेत्र आहे असें] होय. हें प्रज्ञानरूप ब्रह्माचे ठिकाणीं स्थित आहे. सर्व मनुष्य प्रज्ञानेत्र आहेत. प्रज्ञा हेंच सर्वांचें आधारस्थान आहे. (ह्मणून) प्रज्ञान हेंच ब्रह्म होय. ३. तो (वामदेव) या प्रज्ञायुक्त आत्म्यानें या लोकांतून वर जाऊन पलीकडील स्वर्ग लोकामध्यें सर्व मनोरथ प्राप्त करून घेऊन मृत्युरहित झाला. ४.

# छांदोग्योपनिषत् ॥९॥

ॐ आप्यायन्तु ममांगानि वाक्प्राणश्चक्षुः श्रोत्रमथो बलमिंद्रियाणि च ॥ सर्वाणि सर्वं ब्रह्मोपनिषदं माहं ब्रह्म निराकुर्यां मा मा ब्रह्म निराकरोदनिराकरणमस्त्वनिराकरणमस्तु तदात्मनि निरते य उपनिषत्सु धर्मास्ते मयि सन्तु ते मयि सन्तु ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

अथ प्रथमोऽध्यायः ॥

ओमित्येतदक्षरमुद्गीथमुपासीतोमिति ह्युद्गायति तस्योपव्याख्यानम् ॥१॥ एषां भूतानां पृथिवी रसः पृथिव्या आपो रसोऽपामोषधयो रस ओषधीनां पुरुषो रसः पुरुषस्य वाग्रसो वाच ऋग्रस ऋचः साम रसः साम्न उद्गीथो रसः ॥२॥ स एष रसानां रसतमः परमः परार्ध्योऽष्टमो यदुद्गीथः ॥३॥ कतमा कतमर्क्कतमत्कतमत्साम कतमः कतम उद्गीथ इति विमृष्टं भवति ॥४॥ वागेवर्क्प्राणः सामोमित्येतदक्षरमुद्गीथस्तद्वा एतन्मिथुनं यद्वाक् च प्राण-

## छांदोग्योपनिषत्.

### अध्याय पहिला.

उद्गीथाची ह्मणजे ॐ या अक्षराची उपासना करावी. ॐ असा आरंभ करून गायन करतात ह्मणून याला 'उद्गीथ' ह्मणतात. त्याचें व्याख्यान आतां सांगतों. १. या भूतांचा पृथिवी हा रस [आधार अथवा सार] आहे, पृथिवीचा रस उदक, उदकाचा रस ओषधी, ओषधींचा रस पुरुष, पुरुषाचा रस वाणी, वाणीचा रस ऋग्वेद, ऋग्वेदाचा रस साम आणि सामाचा रस उद्गीथ. २. सर्व रसांमध्यें अत्यंत श्रेष्ठ व उत्कृष्ट परमात्मरूपी असा हा आठवा उद्गीथ रस आहे. ३. ऋक् कोणती, साम कोणता आणि उद्गीथ कोणता याचा (आतां) विचार करूं. ४. वाणी ही ऋक्,

श्वक्चं साम च ॥५॥ तदेतन्मिथुनमोमित्येतस्मिन्नक्षरे संसृज्यते यदा वै मिथुनौ समागच्छत आपयतो वै तावन्योन्यस्य कामम् ॥६॥ आपयिता ह वै कामानां भवति य एतदेवं विद्वानक्षरमुद्गीथमुपास्ते ॥७॥ तद्वा एतदनुज्ञाक्षरं यद्धि किंचानुजानात्योमित्येव तदाहैषो एव समृद्धिर्यदनुज्ञा समर्धयिता ह है कामानां भवति य एतदेवं विद्वानक्षरमुद्गीथमुपास्ते ॥८॥ तेनेयं त्रयी विद्या वर्तत ओमित्याश्रावयत्योमिति शंसत्योमित्युद्गायत्येतस्यैवाक्षरस्यापचित्यै महिम्ना रसेन ॥९॥ तनौभौ कुरुतो यश्चैतदेवं वेद यश्च न वेद । नाना तु विद्या चाविद्या च यदेव विद्यया करोति श्रद्धयोपनिषदा तदेव वीर्यवत्तरं भवतीति खल्वेतस्यैवाक्षरस्योपव्याख्यानं भवति ॥१०॥ इति प्रथम खंडः ॥१॥

प्राण हा साम आणि ॐ अक्षर हा उद्गीथ. वाणी आणि प्राण ॐ हें अक्षर उत्पन्न करतात.५.६. हें जाणून जो शाश्वत अशा उद्गीथाची उपासना करतो तो सर्व मनोरथ पावतो.७. अनुज्ञा ह्मणजे हें (ॐ) अक्षर होय. (कारण) जेव्हां कोणी अनुमति देतो तेव्हां ॐ असेंच ह्मणतो. ह्मणून ही अनुज्ञा अथवा ॐ ह्मणजेच समृद्धि होय. हें जाणून जो अ–क्षर उद्गीथाची उपासना करतो तो (सर्व) मनोरथांच्या समृद्धीनें युक्त होतो.८. या ॐ अक्षरानेंच वेदत्रयानें सांगितलेलें कर्म होतें. ॐ असें ह्मणून मंत्र श्रवण करवितात, सांगतात व गायन करतात [हा सोमयाग होय]. ही याच ॐ अक्षराची पूजा होय. याच अक्षराचा महिमा व रस यांचे योगानें (वेदत्रयानें सांगितलेलें कर्म होतें व कर्मापासून अन्नादिकांची उत्पत्ति होते. सारांश, ॐ हें परमात्म्याचें रूप आहे).९. ॐ अक्षराचें माहात्म्य जाणून कर्म करणारे आणि न जाणतां केवळ कर्म करणारे असे दोघे याच अक्षरानें कर्म करतात. विद्या आणि अविद्या भिन्न आहेत. (ह्मणून) विद्येनें [ज्ञानानें], श्रद्धेनें व योगपूर्वक [उपनिषदा] जें कर्म करतो तें अधिक फल

देवासुरा ह वै यत्र संयेतिर उभये प्राजापत्यास्तद्ध देवा उद्गीथमाजह्रुरनेनैनानभिभविष्याम इति ॥१॥ ते ह नासिक्यं प्राणमुद्गीथमुपासांचक्रिरे तꣳ हासुराः पाप्मना विविधुस्तस्मात्तेनोभयं जिघ्रति सुरभि च दुर्गंधि च पाप्मना ह्येष विद्धः ॥२॥ अथ ह वाचमुद्गीथमुपासांचक्रिरे ताꣳ हासुराः पाप्मना विविधुस्तस्मात्तयोभयं वदति सत्यं चानृतं च पाप्मना ह्येषा विद्धा ॥३॥ अथ ह चक्षुरुद्गीथमुपासांचक्रिरे तद्धासुराः पाप्मना विविधुस्तस्मात्तेनोभयं पश्यति दर्शनीयं चादर्शनीयं च पाप्मना ह्येतद्विद्धम् ॥४॥ अथ ह श्रोत्रमुद्गीथमुपासांचक्रिरे तद्धासुराः पाप्मना विविधुस्तस्मात्तेनोभयꣳ

देणारें होतें. [अज्ञानानें केलेल्या कर्माचें फल कमी मिळतें]. याप्रमाणें या अक्षराचें व्याख्यान सांगितलें.१०.

देव [शास्त्रानें प्रकाशित अशा इंद्रियवृत्ति] आणि असुर [केवळ विषयांचे ठिकाणीं रममाण होणाऱ्या तमोरूपी इंद्रियवृत्ति] यांचा संग्राम झाला. दोवेहि प्रजापतीचीच संतति [प्रजापति=कर्म व ज्ञान यांचा अधिकारी पुरुष]. देवांनीं उद्गीथाचा स्वीकार केला व ह्मणाले, आह्मी यानें असुरांचा पराभव करूं.१. त्या देवानीं नासिकेचे ठिकाणीं स्थित अशा प्राणरूपी उद्गीथाची उपासना केली. (पण) त्या प्राणाला असुरांनीं पापाचा स्पर्श केला. ह्मणून तिनें [नासिकेनें] सुगंधी व दुर्गंधी अशा दोन्ही वस्तूंचा वास घेतां येतो. कारण तिला पापाचा स्पर्श झाला.२. नंतर देवांनीं वाणीरूपी उद्गीथाची उपासना केली. (पण) त्या वाणीला असुरांनीं पापाचा स्पर्श केला. ह्मणून तिनें सत्य आणि असत्य दोन्ही बोलतां येतात. कारण तिला पापाचा स्पर्श झाला.३. नंतर देवांनीं चक्षुरूपी उद्गीथाची उपासना केली. (पण) त्याला असुरांनीं पापाचा स्पर्श केला. ह्मणून त्याला दर्शनीय आणि अदर्शनीय दोन्ही दिसतात. कारण त्याला पापाचा स्पर्श झाला.४. नंतर देवांनीं श्रोत्ररूपी उद्गीथाची उपासना केली.

शृणोति श्रवणीयं चाश्रवणीयं च पाप्मना ह्येतद्विद्धम् ॥५॥ अथ ह मन उद्गीथमुपासांचक्रिरे तद्धासुराः पाप्मना विविधुस्तस्मात्तेनोभयꣳ संकल्पयते संकल्पनीयं चासंकल्पनीयं च पाप्मना ह्येतद्विद्धम् ॥६॥ अथ ह य एवायं मुख्यः प्राणस्तमुद्गीथमुपासांचक्रिरे तꣳ हासुरा ऋत्वा विदध्वंसुर्यथाश्मानमाखणमृत्वा विध्वंसेत ॥७॥ एवं यथाश्मानमाखणमृत्वा विध्वंसत एवꣳ हैव स विध्वंसते य एवंविदि पापं कामयते यश्चैनमभिदासति स एषोऽश्माखणः ॥८॥ नैवैतेन सुरभि न दुर्गंधि विजानात्यपहतपाप्मा ह्येष तेन यदश्नाति यत्पिबति तेनेतरान् प्राणानवत्येतमु एवांततोऽवित्त्वोत्क्रामति व्याददात्येवांतत इति ॥९॥ तꣳ हांगिरा उद्गीथमुपासांचक्रे एतमु एवां-

(पण) त्याला असुरांनीं पापाचा स्पर्श केला. ह्मणून त्याला श्रवणीय व अश्रवणीय दोन्ही ऐकूं येतात. कारण त्याला पापाचा स्पर्श झाला.५. नंतर देवांनीं मनोरूपी उद्गीथाची उपासना केली. (पण) त्याला असुरांनीं पापाचा स्पर्श केला. ह्मणून त्याला संकल्पनीय आणि असंकल्पनीय दोहींचा संकल्प करतां येतो. कारण त्याला पापाचा स्पर्श झाला.६. नंतर देवांनीं मुखाचे ठिकाणीं स्थित जो प्रसिद्ध प्राण त्याची उपासना केली. त्याकडे असुर गेले पण (आपोआप) नाश पावले. ज्याप्रमाणें खणतां न येण्याइतक्या कठिण खडकाकडे जाणारा (मनुष्य) (आपोआप) नाश पावतो तद्वत्.७. याप्रमाणें जसे ते (असुर) कठिण खडकाप्रत जाऊन नाश पावले त्याप्रमाणें याप्रकारें प्राणरूपी आत्मा जाणणाऱ्या मनुष्यासंबंधानें ज्याच्या मनांत पाप येतें अथवा जो याजवर प्रहार करतो तो तसा नाश पावतो. कारण तो ज्ञानी कठिण खडकासारखा (अभेद्य) होय.८. यानें सुगंधी आणि दुर्गंधी यांचें ज्ञान होत नाहीं. (कारण) हा निष्पाप आहे. त्या मुखस्थ प्राणानें (प्राणी) जें खातो व पितो त्याचे योगानें इतर इंद्रियांचें रक्षण करतो. या मुखस्थ प्राणाची (अन्नपानादि) वृत्ति मरणकालीं न मिळाल्या-

गिरसं मन्यन्तेऽङ्गानां यद्रसः ॥१०॥ तेन तꣳ ह बृहस्पतिरुद्गीथमुपासांचक्र एतमु एव बृहस्पतिं मन्यन्ते वाग्घि बृहती तस्या एष पतिः ॥११॥ तेन तꣳ हायास्य उद्गीथमुपासांचक्र एतमु एवायास्यं मन्यन्त आस्याद्यदयते ॥१२॥ तेन तꣳ ह बको दाल्भ्यो विदांचकार ॥ स ह नैमिषीयाणामुद्गाता बभूव स ह स्मैभ्यः कामानागायति ॥१३॥ आगाता ह वै कामानां भवति य एतदेवं विद्वानक्षरमुद्गीथमुपास्त इत्यध्यात्मम् ॥१४॥ इति द्वितीयः खंडः ॥२॥

अथाधिदैवतं य एवासौ तपति तमुद्गीथमुपासीतोद्यन्वा एष प्रजाभ्य उद्गायति उद्यंस्तमो भयमपहन्त्यपहन्ता ह वै भयस्य

मुळें इतर इंद्रियसमुदाय मरण पावतो, आ वासतो.९. या प्राणरूपी उद्गीथाची अंगिरा उपासना करता झाला. प्राणालाच अंगिरस् समजतात. कारण प्राण ह्मणजे अंगांचा रस होय.१०. या (प्राणरूपी) उद्गीथाची बृहस्पति उपासना करता झाला. प्राणालाच बृहस्पति समजतात. कारण वाणीरूपी बृहतीचा हा स्वामी होय.११. या प्राणरूपी उद्गीथाची आयास्य ऋषि उपासना करता झाला. प्राणालाच आयास्य समजतात. कारण हा आस्यापासून [मुखापासून] येतो.१२. नंतर दल्भ्य ऋषीचा पुत्र बक यालाहि प्राणाचें ज्ञान झालें. (ह्मणून) तो नैमिषारण्यांतील सत्रामध्यें उद्गाता झाला. या ज्ञानाचे योगानें त्यानें नैमिषीयाचे काम पुरविले.१३. जो याप्रमाणें जाणून (प्राणरूपी) अ–क्षर उद्गीथाची उपासना करतो त्याला (सर्व) काम प्राप्त होतात. याप्रमाणें उद्गीथाची आत्मविषयक उपासना सांगितली.१४.

आतां उद्गीथाची देवताविषयक उपासना (सांगतात–) जो हा (सूर्य) तपन पावतो तत्स्वरूपी उद्गीथाची उपासना करावी. कारण तो उदयाला येऊन (प्रजांकरितां अन्न उत्पन्न व्हावें ह्मणून उद्गाता जे यज्ञाचें काम करतो) तेंच उद्गात्याचें काम करतो. उदयाला येऊन अंधकार व

तमसो भवति य एवं वेद ॥१॥ समान उ एवायं चासौ चोष्णोऽयमुष्णोऽसौ स्वर इतीममाचक्षते स्वर इति प्रत्यास्वर इत्यमुं तस्माद्वा एतमिममसुं चोद्गीथमुपासीत ॥२॥ अथ खलु व्यानमेवोद्गीथमुपासीत यद्वै प्राणिति स प्राणो यदपानिति सोऽपानोऽथ यः प्राणापानयोः संधिः स व्यानो यो व्यानः सा वाक् तस्मादप्राणन्ननपानन्वाचमभिव्याहरति ॥३॥ या वाक्सर्क्तस्मादप्राणन्ननपानन्नृचमभिव्याहरति यर्क्तत्साम तस्मादप्राणन्ननपानन्साम गायति यत्साम स उद्गीथस्तस्मादप्राणन्ननपानन्नुद्गायति ॥४॥ अतो यान्यन्यानि वीर्य-

(अंधकारजन्य) भय नाहींसें करतो. हें जो जाणतो तो (जन्ममरणादिरूपी) भयाचा व (जन्ममरणाला कारण अशा) अज्ञानाचा निहंता होतो. १. हा (प्राण) आणि हा (सूर्य) दोघेहि (गुणानें) समान आहेत. हा (प्राण) उष्ण आहे, तो (सविता) देखील उष्ण आहे. या प्राणाला स्वर [स्वरति =जातो=नाश पावतो] असें ह्मणतात, सूर्याला स्वर आणि प्रत्यास्वर [जातो व गेल्यावर पुन्हां परत येतो] असें ह्मणतात. ह्मणून (दोघांमध्यें तत्त्वतः अभेद असल्यामुळें) या प्राणाची व त्या आदित्याची उद्गीथरूपानें उपासना करावी. २. त्याचप्रमाणें व्यानरूपी उद्गीथाची उपासना करावी. जो (मुख व नासिका यांचे द्वारें) वायु बाहेर सरतो [प्राणिति] तो प्राण; जो वायु (त्याच द्वारांनीं) आंत येतो [अपानिति] तो अपान. प्राण व अपान दोहोंचा अभाव (असतांना त्या अभावाचे ठिकाणीं असणारी जी वायुवृत्ति) तो व्यान. जो व्यान तीच वाणी [वाणी हें व्यानाचें कार्य आहे]. ह्मणून प्राण व अपान यांचे व्यापार न करतां (व्यानाच्याच व्यापारानें) मनुष्य वाणी उच्चारतो. ३. जी वाणी ती ऋक्. ह्मणून प्राण व अपान यांचे व्यापार न करतां (मनुष्य) ऋचा [ऋग्रूपी उद्गीथ] उच्चारतो. जी ऋचा तो साम. ह्मणून प्राण व अपान यांचे व्यापार न करतां सामाचे गायन करतो. जो साम तो उद्गीथ. ह्मणून प्राण व

वन्ति कर्माणि यथाग्नेर्मन्थनमाजेः सरणं दृढस्य धनुष आयमनमप्राणन्ननपानंस्तानि करोत्येतस्य हेतोर्व्यानमेवोद्गीथमुपासीत ॥५॥ अथ खलूद्गीथाक्षराण्युपासीतोद्गीथ इति प्राण एवोत्प्राणेन ह्युत्तिष्ठति वाग्गीर्वाचो ह गिर इत्याचक्षतेऽन्नं थमन्ने हीद्ँ सर्वँ स्थितम् ॥६॥ द्यौरेवोदन्तरिक्षं गीः पृथिवी थमादित्य एवोद्वायुर्गीरग्निस्थँ सामवेद एवोद्यजुर्वेदो गीः ऋग्वेदस्थं दुग्धेऽस्मै वाग्दोहं यो वाचो दोहोऽन्नवानन्नादो भवति य एतान्येवं विद्वानुद्गीथाक्षराण्युपास्त उद्गीथ इति ॥७॥ अथ खल्वाशीःसमृद्धिरुपसरणानीत्युपासीत येन साम्ना

अपान यांचे व्यापार न करतां (व्यानाच्या व्यापारानें) उद्गीथाची उपासना करतो.४. उच्चाराखेरीज अग्नीचें मंथन, युद्धाकरितां धांवणें, बळकट धनुष्य आकर्षण करणें, अशीं जीं बलानें होणारीं इतर कर्में आहेत तीं देखील प्राण व अपान यांचे व्यापार न करतां (व्यानाच्या व्यापारानें) करतो. याकरितां व्यानरूपीच उद्गीथाची उपासना करावी.५. त्याचप्रमाणें उद्गीथाच्या अक्षरांची उद्गीथरूपानें उपासना करावी. प्राण हा 'उत्;' कारण प्राणानेंच मनुष्य सर्व व्यापार करतो (प्राणाच्या अभावीं मरण पावतो). वाणी ही 'गी;' कारण, वाणीला गिरः असें ह्मणतात. अन्न हें 'थ;' कारण, अन्नामध्यें हें सर्व (विश्व) स्थित आहे.६. द्युलोक हा 'उत्' अंतरिक्ष लोक 'गी' आणि पृथिवी 'थ.' आदित्य हा 'उत्' वायु 'गी' आणि अग्नि 'थ.' सामवेद हा 'उत्' यजुर्वेद 'गी' आणि ऋग्वेद 'थ.' हीं उद्गीथाचीं अक्षरें याप्रमाणें जाणून जो (त्यांची) उद्गीथरूपानें उपासना करतो त्याला जो वाणीचा दोह [=दूध. ह्म० ऋग्वेदादि शब्दांनीं साध्य असें फल] तो वाणी देते, तो अन्नानें समृद्ध होतो, (पुष्कळ) अन्न भक्षण करण्यास समर्थ [प्रदीप्ताग्नि] होतो.७. आतां कामसमृद्धि कशी होईल तें सांगतात— यांचें ध्यान केलें पाहिजे [उपसर्तव्यानि] अशा रीतीनें उपासना करावी [ह्मणजे ध्यानयुक्त उपासना करावी]. ज्या सामानें स्तवन

स्तोष्यन्स्यात्तत्सामोपधावेत् ॥८॥ यस्यामृचि तामृचं यदार्षेयं तमृषिं यां देवतामभिष्टोष्यन्स्यात्तां देवतामुपधावेत् ॥९॥ येन च्छन्दसा स्तोष्यन् स्यात्तच्छन्द उपधावेद्येन स्तोमेन स्तोष्यमाणः स्यात्तं स्तोममुपधावेत् ॥१०॥ यां दिशमभिष्टोष्यन्स्यात्तां दिशमुपधावेत् ॥११॥ आत्मानमन्तत उपसृत्य स्तुवीत कामं ध्यायन्नप्रमत्तोऽभ्याशो ह यदस्मै स कामः समृद्ध्येत यत्कामः स्तुवीतेति यत्कामः स्तुवीतेति ॥१२॥ इति तृतीय खंडः ॥३॥

ओमित्येतदक्षरमुद्गीथमुपासीतोमिति ह्युद्गायति तस्योपव्याख्यानम् ॥१॥ देवा वै मृत्योर्बिभ्यतस्त्रयीं विद्यां प्राविशंस्ते छन्दोभिरच्छादयन्यदेभिरच्छादयंस्तच्छन्दसां छन्दस्त्वम् ॥२॥ तानु तत्र मृत्यु-

करील त्या सामाचें [देवता इत्यादिकांचें] ध्यान करावें.८. ज्या ऋचेमध्यें तो साम असेल त्या ऋचेचें ध्यान करावें. ज्या ऋषीचा असेल त्या ऋषीचें ध्यान करावें. ज्या देवतेचें स्तवन असेल त्या देवतेचें ध्यान करावें.९. ज्या छंदानें स्तवन करील त्या छंदाचें ध्यान करावें. ज्या स्तोमानें स्तवन करील त्या स्तोमाचें ध्यान करावें.१०. ज्या दिशेचें स्तवन असेल त्या दिशेचें ध्यान करावें.११. शेवटीं (गोत्र, नाम) इत्यादिकांनीं स्वतःचें ध्यान करून स्तवन करावें. ज्या कामाची [मनोरथाची] इच्छा करून त्याचें ध्यान करीत (स्वर इत्यादिकांचा) प्रमाद न करतां स्तवन करील त्याला तत्काल त्या कामाची समृद्धि होईल.१२.

उद्गीथाची ह्मणजे ॐ या अक्षराची उपासना करावी. ॐ असा आरंभ करून गायन करतात ह्मणून त्याला 'उद्गीथ' ह्मणतात. त्याचें व्याख्यान सांगतों.१. मृत्यूची भीति पावलेले देव त्रयी विद्येमध्यें [वेदविहित कर्मामध्यें] प्रवेश करते झाले. त्यांनीं (कर्माचे ठिकाणीं उपयोग केलेल्या) छंदांनीं स्वतःला (मृत्यूपासून रक्षण होईल अशा बुद्धीनें) आच्छादून घेतलें. यांनीं आच्छादून घेतलें ह्मणून यांना 'छंद' ह्मणतात.२.

यथा मत्स्यमुदके परिपश्येदेवं पर्यपश्यदृचि साम्नि यजुषि । ते नु विद्त्वोर्ध्वा ऋचः साम्नो यजुषः स्वरमेव प्राविशन् ॥३॥ यदा वा ऋचमाप्नोत्योमित्येवातिस्वरत्येवꣳ सामैवं यजुरेष उ स्वरो यदेतदक्षर-मेतदमृतमभयं तत्प्रविश्य देवा अमृता अभया अभवन् ॥४॥ स य एतदेवं विद्वानक्षरं प्रणौत्येतदेवाक्षरꣳ स्वरममृतमभयं प्रविशति तत्प्रविश्य यदमृता देवास्तदमृतो भवति ॥५॥ इति चतुर्थ खंडः ॥४॥

अथ खलु य उद्गीथः स प्रणवो यः प्रणवः स उद्गीथ इत्यसौ वा आदित्य उद्गीथ एष प्रणव ओमिति ह्येष स्वरन्नेति ॥१॥ एतमु एवाहमभ्यगासिषं तस्मान्मम त्वमेकोऽसीति ह कौषीतकिः पुत्रमुवाच

ज्याप्रमाणें (धीवर) मत्स्याला उदकामध्यें (असलेला) पहातात त्याप्रमाणें मृत्यूनें ऋक्, साम आणि यजु यांचेमध्यें [यांचे कर्मांमध्यें] त्या देवांना पाहिलें [=कर्मांनीं मृत्युराहितत्व मिळेना]. (मृत्यूचा उद्देश) जाणून ते देव ऋक्, यजु व साम यांच्या कर्मांमधून निघून स्वर शब्दानें निर्दिष्ट अशा ॐकारामध्यें प्रवेश करते झाले [ॐकाराची उपासना करूं लागले].३. जेव्हां ऋचांना अध्ययनानें आपल्या स्वाधीन करून घेतो तेव्हां ॐ असा अतिशय आदरानें उच्चार करतो. याप्रमाणेंच साम व यजु यांचे प्रसंगीं ॐ उच्चार करतो. ह्मणून स्वर ह्मणजे हेंच ॐ अक्षर होय. हें मृत्युरहित व भयरहित आहे. यामध्यें प्रवेश करून देव मृत्युरहित व भयरहित झाले.४. याप्रमाणे (इतर) जो कोणी ॐ अक्षराचें स्तवन करतो तो त्याच मृत्युरहित व भयरहित अक्षरामध्यें अथवा स्वरामध्यें प्रवेश करतो. प्रवेश करून देव जें अमरत्व पावले तें अमरत्व तोहि पावतो.५.

जो उद्गीथ तोच प्रणव [ॐकार], जो प्रणव तोच उद्गीथ. हा आदित्य उद्गीथ, हाच प्रणव, हाच ॐ. कारण हा (जणूं काय) ॐ उच्चारीत चालत असतो.१. मीं आदित्याचें (केवळ) आदित्यरूपानेंच गायन केलें; ह्मणून तूं मला एक पुत्र झालास.'' असें

रश्मींस्त्वं पर्यावर्तयाद्बहवो वै ते भविष्यन्तीत्यधिदैवतम् ॥२॥ अथाध्यात्मं य एवायं मुख्यः प्राणस्तमुद्गीथमुपासीतोमिति ह्येष स्वरन्नेति ॥३॥ एतमु एवाहमभ्यगासिषं तस्मान्मम त्वमेकोऽसीति ह कौषीतकिः पुत्रमुवाच प्राणांस्त्वं भूमानमभिगायताद्बहवो वै मे भविष्यन्तीति ॥४॥ अथ खलु य उद्गीथः स प्रणवो यः प्रणवः स उद्गीथ इति होतृषदनाद्धैवापि दुरुद्गीतमनुसमाहरतीत्यनुसमाहरतीति ॥५॥ इति पंचमः खंडः ॥५॥

इयमेवर्गग्निः साम तदेतदेतस्यामृच्यध्यूढꣳ साम तस्मादृच्यध्यूढꣳ साम गीयत इयमेव साग्निरमस्तत्साम ॥१॥ अंतरिक्षमेवर्ग्वायुः साम तदेतदेतस्यामृच्यध्यूढꣳ साम तस्मादृच्यध्यूढꣳ साम

तकाचा पुत्र] आपल्या पुत्राला बोलला. तूं आदित्याचे किरण त्याच्या भोंवतीं पसर [ह्म० सर्वप्रकारे गायन कर] (ह्मणजे) तुला पुष्कळ (पुत्र) होतील. याप्रमाणें उद्गीथाची देवताविषयक उपासना सांगितली.२. आतां उद्गीथाची आत्मविषयक उपासना सांगतात. हा जो मुखस्थ प्राण आहे त्याची उद्गीथरूपानें उपासना करावी. ॐ अशी अनुज्ञा देतच (जणूं काय) हा (वाणी इत्यादिकांना प्रवृत्त करीत) जातो.३. "याचें मीं केवळ प्राणरूपानेंच गायन केले; ह्मणून तूं मला एक पुत्र झालास." असें कौषीतकि आपल्या पुत्राला बोलला. तूं प्राणाचें बहुतप्रकारें गायन कर. ह्मणजे तुला पुष्कळ (पुत्र) होतील.४. जो उद्गीथ तोच प्रणव, जो प्रणव तोच उद्गीथ. हें (एकत्वाचें ज्ञान), होत्याकडून जर मंत्रोच्चारादिकामध्यें प्रमाद झाला तर त्याचें निरसन करतें.५.

ही पृथिवी ह्मणजे ऋक्, अग्नि साम. कारण हा सामरूपी अग्नि या ऋग्रूपी पृथिवीचे वर स्थित आहे. ह्मणून सामाचें गायन ऋचांवर स्थित असें ह्मणजे ऋचेनुसार करतात. 'सा' ह्मणजे पृथिवी आणि 'अम' ह्मणजे अग्नि. मिळून साम.१. अंतरिक्ष ह्मणजे ऋक्, वायु

गीयतेऽन्तरिक्षमेव सा वायुरमस्तत्साम ॥२॥ द्यौरेवर्गादित्यः साम तदेतदेतस्यामृच्यध्यूढꣳ साम तस्मादृच्यध्यूढꣳ साम गीयते द्यौरेव सादित्योऽमस्तत्साम ॥३॥ नक्षत्राण्येवर्क्चन्द्रमाः साम तदेतदेतस्यामृच्यध्यूढꣳ साम तस्मादृच्यध्यूढꣳ साम गीयते नक्षत्राण्येव सा चन्द्रमा अमस्तत्साम ॥४॥ अथ यदेतदादित्यस्य शुक्लं भाः सैवर्गथ यन्नीलं परः कृष्णं तत्साम तदेतदेतस्यामृच्यध्यूढꣳ साम तस्मादृच्यध्यूढꣳ साम गीयते ॥५॥ अथ यदेवैतदादित्यस्य शुक्लं भाः सैव साथ यन्नीलं परः कृष्णं तदमस्तत्सामाथ य एषोऽतरादित्ये हिरण्मयः पुरुषो दृश्यते हिरण्यश्मश्रुर्हिरण्यकेश आप्रणखात्सर्व एव सुवर्णः ॥६॥ तस्य यथा कप्यासं पुंडरीकमेवमक्षिणी तस्योदिति नाम स एष

साम. हा सामरूपी वायु या ऋग्रूपी अंतरिक्षाचे वर स्थित आहे. ह्मणून सामाचें गायन ऋचेनुसार करतात. सा ह्मणजे अंतरिक्ष आणि अम ह्मणजे वायु. मिळून साम.२. द्युलोक ह्मणजे ऋक्, आदित्य साम. हा सामरूपी आदित्य या ऋग्रूपी द्युलोकाचे वर स्थित आहे. ह्मणून सामाचें गायन ऋचेनुसार करतात. सा ह्मणजे द्युलोक आणि अम ह्मणजे आदित्य. मिळून साम.३. नक्षत्रें ह्मणजे ऋक्, चंद्रमा साम. हा सामरूपी चंद्रमा या ऋग्रूपी नक्षत्रांचे वर स्थित आहे. ह्मणून सामाचें गायन ऋचेनुसार करतात. सा ह्मणजे नक्षत्रें आणि अम ह्मणजे चंद्रमा. मिळून साम.४. आदित्याची जी शुक्ल प्रभा ती ऋक्. आदित्याचे ठिकाणचें (एकान्तामध्यें समाहित दृष्टि झालेल्या योग्यास दिसणारें) नीलवर्ण अत्यंत कार्ष्ण्य हा साम. हें सामरूपी कार्ष्ण्य या ऋग्रूपी प्रभेचे वर स्थित आहे. ह्मणून सामाचें गायन ऋचेनुसार करतात.५. आदित्याची जी शुक्ल प्रभा ती सा आणि जें नील कार्ष्ण्य तें अम. (मिळून) आदित्याचे मध्यभागीं जो ज्योतिर्मय सर्वव्यापी प्रभाश्मश्रु, प्रभाकेश, नखाग्रांपासून सर्व प्रभारूप (पुरुष) दिसतो तो साम.६. अत्यंत पांढरें असें कमळ असतें तसे याचे नेत्र अत्यंत

सर्वेभ्यः पाप्मभ्य उदित उदेति ह वै सर्वेभ्यः पाप्मभ्यो य एवं वेद ॥७॥ तस्यर्क्च साम च गेष्णौ तस्मादुद्गीथस्तस्मात्त्वेवोद्गातैतस्य हि गाता स एष ये चामुष्मात्परांचो लोकास्तेषां चेष्टे देवकामानां चेत्यधिदैवतम् ॥८॥ इति षष्ठः खंडः ॥६॥

अथाध्यात्मं वागेवर्क्प्राणः साम तदेतदेतस्यामृच्यध्यूढꣳ साम तस्मादृच्यध्यूढꣳ साम गीयते वागेव सा प्राणोऽमस्तत्साम ॥१॥ चक्षुरेवर्गात्मा साम तदेतदेतस्यामृच्यध्यूढꣳ साम तस्मादृच्यध्यूढꣳ साम गीयते चक्षुरेव सात्मामस्तत्साम ॥२॥ श्रोत्रमेवर्ङ्मनः साम तदेतदेतस्यामृच्यध्यूढꣳ साम तस्मादृच्यध्यूढꣳ साम गीयते श्रोत्रमेव

तेजस्वी आहेत. त्याचें 'उत्' असें (गौण) नांव आहे. तो या सर्व पापांपासून उत् ह्म० वर जातो [मुक्त होतो]. याप्रमाणें जो जाणतो तो देखील सर्व पापांपासून मुक्त होतो.७. (पृथिव्यादि वर सांगितलेलीं) ऋक्सामरूपी द्वंद्वें हीं त्या उद्गीथाचीं रूपें होत. त्यापासून उद्गीथ ह्मणतात. त्यापासूनच याचें गायन करणारा उद्गाता. याच्या [आदित्याच्या] खालचे जे लोक आहेत त्या सर्वांचा हा (उद्गाता) स्वामी आहे. तसाच देवसंबंधी कामांचा देखील स्वामी आहे [देवरूप होतो]. याप्रमाणें उद्गीथाची देवताविषयक उपासना सांगितली.८.

आतां उद्गीथाची आत्मविषयक उपासना सांगतात-वाणी ही ऋक्, प्राण हा साम. हा सामरूपी प्राण या ऋग्रूपी वाणीचे वर स्थित आहे. ह्मणून सामाचें गायन ऋचेनुसार करतात. सा ह्मणजे वाणी आणि अम ह्मणजे प्राण. मिळून साम.१. चक्षु हा ऋक्, आत्मा हा साम. हा सामरूपी आत्मा या ऋग्रूपी चक्षूचे वर स्थित आहे. ह्मणून सामाचें गायन ऋचेनुसार करतात. सा ह्मणजे चक्षु आणि अम ह्मणजे आत्मा. मिळून साम.२. श्रोत्र हें ऋक्, मन हें साम. हें सामरूपी मन या ऋग्रूपी श्रोत्राचे वर स्थित आहे. ह्मणून सामाचें गायन ऋचेनुसार करतात. सा

सा मनोऽमस्तत्साम ॥३॥ अथ यदेतदक्ष्णः शुक्लं भाः सैवर्गथ यन्नीलं परः कृष्णं तत्साम तदेतदेतस्यामृच्यध्यूढꣳ साम तस्मादृच्यध्यूढꣳ साम गीयते अथ यदेवैतदक्ष्णः शुक्लं भाः सैव साऽथ यन्नीलं परः कृष्णं तदमस्तत्साम ॥४॥ अथ य एषोऽन्तरक्षिणि पुरुषो दृश्यते सैवर्क्तत्साम तदुक्थं तद्यजुस्तद्ब्रह्म तस्यैतस्य तदेव रूपं यदमुष्य रूपं यावमुष्य गेष्णौ तौ गेष्णौ यन्नाम तन्नाम ॥५॥ स एष ये चैतस्मादर्वाञ्चो लोकास्तेषां चेष्टे मनुष्यकामानां चेति तद्य इमे वीणायां गायन्त्येतं ते गायन्ति तस्मात्ते धनसनयः ॥६॥ अथ य एतदेवं विद्वान्साम गायत्युभौ स गायति सोऽमुनैव स एष ये चामुष्मात्पराञ्चो लोकास्तांश्चाप्नोति देवकामांश्च ॥७॥ अथानेनैव ये चैतस्मादर्वाञ्चो लोकास्तांश्चाप्नोति मनुष्यकामांश्च तस्मादु हैवंविदुद्गाता ब्रूयात् ॥८॥

ह्मणजे श्रोत्र आणि अम ह्मणजे मन. मिळून साम.३. चक्षूची जी शुक्ल प्रभा ती ऋक्; नीलवर्ण अत्यंत कार्ष्ण्य तें साम. हे सामरूपी कार्ष्ण्य या ऋग्रूपी प्रभेचे वर स्थित आहे. ह्मणून सामाचे गायन ऋचेनुसार करतात. जी शुक्ल प्रभा ती सा आणि अत्यंत कार्ष्ण्य तें अम. मिळून साम.४. या चक्षूच्या अंतर्भागीं जो पुरुष दिसतो तोच ऋक्, तोच साम, तोच स्तोत्र [उक्थ], तोच यजु, तोच ब्रह्म. त्या आदित्यपुरुषाचें जें रूप तेंच याचें रूप, त्याचीं जीं (पृथिव्यादि) द्वंद्वं तींच याचीं, त्याचें जें नांव तेच याचें नांव.५. हा चाक्षुष पुरुष (यापासून) जे खालचे लोक त्यांचा स्वामी आहे, मनुष्यसंबंधी कामांचा [इच्छांचा] स्वामी आहे. जे वीणेमध्यें गायन करतात ते याचेंच गायन करतात. ह्मणून ते धनलाभयुक्त होतात.६. जो हे जाणून साम गायन करतो तो (आदित्य व चाक्षुष अशा) दोन्ही पुरुषांचें गायन करतो. आदित्याचे गायनानें आदित्याच्या दृष्टीखालचे जे लोक आहेत ते आणि देवांचे काम यांची याला प्राप्ति होते.७. चाक्षुषाचे गायनाने त्याच्या दृष्टी-

कं ते काममागायानीत्येष ह्येव कामागानस्येष्टे य एवं विद्वान्साम गायति साम गायति ॥९॥ इति सप्तमः खंडः ॥७॥

त्रयो होद्गीथे कुशला बभूवुः शिलकः शालावत्यश्चैकितायनो दाल्भ्यः प्रवाहणो जैवलिरिति ते होचुरुद्गीथे वै कुशलाः स्मो हन्तोद्गीथे कथां वदाम इति ॥१॥ तथेति ह समुपविविशुः स ह प्रवाहणो जैवलिरुवाच भगवन्तावग्रे वदतां ब्राह्मणयोर्वदतोर्वाचं श्रोष्यामीति ॥२॥ स ह शिलकः शालावत्यश्चैकितायनं दाल्भ्यमुवाच हन्त त्वा पृच्छानीति पृच्छेति होवाच ॥३॥ का साम्नो गतिरिति स्वर इति होवाच स्वरस्य का गतिरिति प्राण इति होवाच प्राणस्य का गतिरित्यन्नमिति होवाचान्नस्य का गतिरित्याप इति होवाच ॥४॥ अपां का गतिरित्यसौ लोक इति होवाचामुष्य लोकस्य का गतिरिति न

खालचे जे लोक आहेत ते आणि मनुष्यांचे काम यांची याला प्राप्ति होते. ह्मणून हें जाणणाऱ्या उद्गात्यानें यजमानाला विचारावें कीं, कोणत्या कामाचें गायन करूं ? (कारण) हें जाणून जो साम गायन करतो तो त्या (सर्व) कामांचा स्वामी होतो. ८-९.

शलावताचा पुत्र शिलक, दाल्भ्यगोत्री चैकितायन [चिकितायनाचा पुत्र] आणि जीवलाचा पुत्र प्रवाहण (नामक राजा) असे तिघेजण उद्गीथज्ञानामध्यें कुशल होते. ते (आपआपसांत) ह्मणाले, आपण उद्गीथामध्यें कुशल आहोंत. तेव्हां आपण उद्गीथसंबंधीं वाद करूं. १. हें सर्वांस पसंत होऊन ते एकत्र बसले. जीवलपुत्र प्रवाहण ह्मणाला, आपण दोघे अगोदर बोला. तुह्मी ब्राह्मण काय बोलतां तें मी ऐकतो. २. तेव्हां शलावतपुत्र शिलक दाल्भ्यगोत्री चैकितायनाला ह्मणाला, मी तुला प्रश्न करूं काय ? त्यानें उत्तर दिलें, प्रश्न कर. ३. (प्रश्न—) "सामाचा आश्रय कोणता ?" (उत्तर—) "स्वर." "स्वराचा आश्रय कोणता ?" "प्राण." "प्राणाचा आश्रय कोणता ?" "अन्न." "अन्नाचा आश्रय कोणता ?"

स्वर्गं लोकमतिनयेदिति होवाच स्वर्गं वयं लोकꣳ सामाभिसंस्थापयामः स्वर्गसंस्तावꣳ हि सामेति ॥५॥ तꣳ ह शिलकः शालावत्यश्चैकितायनं दाल्भ्यमुवाचाप्रतिष्ठितं वै किल ते दाल्भ्य साम यस्त्वेतर्हि ब्रूयान्मूर्धा ते विपतिष्यतीति मूर्धा ते विपतेदिति ॥६॥ हन्ताहमेतद्भगवतो वेदानीति विद्धीति होवाचामुष्य लोकस्य का गतिरित्ययं लोक इति होवाचास्य लोकस्य का गतिरिति न प्रतिष्ठां लोकमतिनयेदिति होवाच प्रतिष्ठां वयं लोकꣳ सामाभिसंस्थापयामः प्रतिष्ठासंस्तावꣳ हि सामेति ॥७॥ तꣳ ह प्रवाहणो जैवलिरुवाचांतवद्वै किल ते शालावत्य साम यस्त्वेतर्हि ब्रूयान्मूर्धा ते विपतिष्यतीति

"उदक."४. "उदकाचा आश्रय कोणता?" "तो लोक [स्वर्ग]." "त्या (स्वर्ग) लोकाचा आश्रय कोणता?" "स्वर्ग लोकाच्या पलीकडे दुसऱ्या कोणत्या आश्रयाप्रत साम जात नाहीं. स्वर्ग लोकाचे ठिकाणीं प्रतिष्ठित असाच साम आह्मी जाणतों. स्वर्गरूपानें ज्याचें स्तवन आहे असा साम आहे." ५. (या दाल्भ्याच्या उत्तरावर) शिलक दाल्भ्याला ह्मणाला, "दाल्भ्या, तुझा साम अप्रतिष्ठित [असमाप्तगति] आहे. आतां दुसरा कोणी (साम समाप्तगति आहे असें सांगेल आणि तूं खोटें सांगतोस ह्मणून) तुझें मस्तक तुटून पडेल असें ह्मणेल तर तुझें मस्तक तुटून पडेल."६. दाल्भ्य ह्मणाला, "बरें, तर मग मी हें ज्ञान तुजपासून जाणतों [ह्म० मला सांग]." "ऐक तर मग. स्वर्ग लोकाचा आश्रय कोणता, तर हा लोक [कारण या लोकींच्या यज्ञयागादिकांनीं स्वर्गलोक पुष्ट होतो]. या लोकाचा आश्रय कोणता, तर या लोकाच्या पलीकडे (कोणत्याहि) आश्रयाला कोणीहि साम नेऊं शकत नाहीं. आह्मी या लोकापर्यंत सामाचा आश्रय ठेवतों. 'हा लोक सामाचा आश्रय आहे' अशी सामाची स्तुति करतात." ७. यावर प्रवाहण ह्मणाला, "हे शालावत्या, तुझा साम अंतयुक्त आहे. आतां दुसरा कोणी (याच्या उलट सांगेल आणि तूं खोटें सांग-

मूर्धा ते विपतेदिति हन्ताहमेतद्भगवतो वेदानीति विद्धीति होवाच ॥८॥ इति अष्टमः खंडः ॥८॥

अस्य लोकस्य का गतिरित्याकाश इति होवाच सर्वाणि ह वा इमानि भूतान्याकाशादेव समुत्पद्यन्त आकाशं प्रत्यस्तं यन्त्याकाशो ह्येवैभ्यो ज्यायानाकाशः परायणम् ॥१॥ स एष परोवरीयानुद्गीथः स एषोऽनन्तः परोवरीयो हास्य भवति परोवरीयसो ह लोकाञ्जयति य एतदेवं विद्वान्परोवरीयांसमुद्गीथमुपास्ते ॥२॥ तꣳ हैतमतिधन्वा शौनक उदरशांडिल्यायोक्त्वोवाच यावत्त एनं प्रजायामुद्गीथं वेदिष्यन्ते परोवरीयो हैभ्यस्तावदस्मिँल्लोके जीवनं भविष्यति ॥३॥ तथामुष्मिँल्लोके लोक इति स य एतदेवं विद्वानुपास्ते परोवरीय एव हास्यास्मिँल्लोके जीवनं भवति तथामुष्मिँल्लोके लोक इति लोके लोक इति ॥४॥ इति नवमः खंडः ॥९॥

तोस ह्मणून) तुझें मस्तक तुटून पडेल असे ह्मणेल तर तुझें मस्तक तुटून पडेल.'' शालावत्य ह्मणाला, बरें, तर मग मी हें ज्ञान तुजपासून जाणतों.'' प्रवाहण ह्मणाला, ऐक तर मग.''॰ ८.

''या लोकाचा आश्रय कोणता, तर आकाश. हीं (स्थावरजंगमादि) सर्व भूतें आकाशापासूनच उत्पन्न होतात आणि आकाशामध्येंच अस्त पावतात. या सर्वांपेक्षां आकाश श्रेष्ठ आहे, सर्वांचें आकाश आश्रयस्थान आहे [ह्म० आकाश परमात्मरूप आहे]. १. हाच श्रेष्ठ व श्रेष्ठतर उद्गीथ होय. हा अनन्त आहे. या श्रेष्ठ व श्रेष्ठतर अशा उद्गीथाची जो हें जाणून उपासना करतो तो एकाहून एक श्रेष्ठ असे लोक पावतो. २. हे उद्गीथज्ञान शुनकाचा पुत्र अतिधन्वा यानें (आपला शिष्य) उदरशाडिल्य याला सांगितलें आणि पुढें सांगितले कीं, ''जोंपर्यंत तुझे वंशज हें उद्गीथज्ञान जाणतील तोंपर्यंत त्यांचें या लोकीं या (सामान्य) लोकांहून श्रेष्ठ असें जीवन होईल. ३. त्याप्रमाणेंच परलोकीं या (सामान्य) लोकांहून श्रेष्ठ असें

मटचीहतेषु कुरुष्वाटिक्या सह जाययोषस्तिर्ह चाक्रायण इभ्यग्रामे प्रद्राणक उवास ॥१॥ स हेभ्यं कुल्माषान्खादन्तं बिभिक्षे तꣳ होवाच ॥ नेतोऽन्ये विद्यन्ते यच्च ये म इम उपनिहिता इति ॥२॥ एतेषां मे देहीति होवाच तानस्मै प्रददौ हन्तानुपानमित्युच्छिष्टं वै मे पीतꣳ स्यादिति होवाच ॥३॥ न स्विदेतेऽप्युच्छिष्टा इति न वा अजीविष्यमिमानखादन्निति होवाच कामो म उदकपानमिति ॥४॥ स ह खादित्वातिशेषाञ्जायाया आजहार साग्र एव सुभिक्षा बभूव तान्प्रतिगृह्य निदधौ ॥५॥ स ह प्रातः संजिहान उवाच यद्बतान्नस्य लभेमहि लभे-

जीवन होईल." हे जाणून जो जो कोणी उद्गीथाची उपासना करील त्यालाहि या लोकीं आणि परलोकीं श्रेष्ठ जीवन प्राप्त होईल ४.

टोळांनीं व्याप्त (अर्थात् दुर्भिक्षयुक्त) अशा कुरुदेशामध्ये इभ्यनामक राजाच्या ग्रामात उषस्ति नांवाचा चक्राचा पुत्र अत्यंत दीन अवस्थेप्रत आलेला असा आटिकी नामक आपल्या भार्येसह रहात होता. १. (एकदां) घाणेरडे उडीद खात बसलेल्या इभ्याला पाहून उषस्तीने त्याजवळ याचना केली. इभ्य ह्मणाला, मीं जे येथे ठेवलेले आहेत त्या-(उच्छिष्ट राशी-)हून निराळे उडीद मजपाशीं नाहींत. २. उषस्ति ह्मणाला, यापैकीं मला दे. इभ्याने ते त्याला दिले. आता उदक घे असे तो ह्मणाला तेव्हां उषस्तीने उत्तर केले, मीं उष्टे पाणी प्राशन केले असे होईल. ३. यावर इभ्य ह्मणाला, हे उडीद (तूं भक्षण केलेस) ते उष्टे नाहींत काय? उषस्ति ह्मणाला, मीं जर हे खाल्ले नसते तर मी जिवंत राहिलो नसतो. (पण) उदकपान मला इच्छा होईल तेव्हा मिळते [ह्मणून उष्टे उदक प्राशन केले तर पाप लागेल]. ४. खाल्ल्यानंतर शिल्लक राहिलेले उडीद त्याने आपल्या भार्येकरिता आणले. तिला अगोदरच अन्नप्राप्ति झाली होती. ह्मणून तिने ते (उडीद) घेतले व ठेवून दिले. ५. (दुसरे दिवशीं) प्रातः-

महि धनमात्राꣳ राजासौ यक्ष्यते स मा सर्वैरार्त्विज्यैर्वृणीतेति ॥६॥ तं जायोवाच हन्त पत इम एव कुल्माषा इति तान्खादित्वाऽमुं यज्ञं विततमेयाय ॥७॥ तत्रोद्गातॄनास्तावे स्तोष्यमाणानुपोपविवेश स ह प्रस्तोतारमुवाच ॥८॥ प्रस्तोतर्या देवता प्रस्तावमन्वायत्ता तां चेदविद्वान्प्रस्तोष्यसि मूर्धा ते विपतिष्यतीति ॥९॥ एवमेवोद्गातारमुवाचोद्गातर्या देवतोद्गीथमन्वायत्ता तां चेदविद्वानुद्गास्यसि मूर्धा ते विपतिष्यतीति ॥१०॥ एवमेव प्रतिहर्तारमुवाच प्रतिहर्तर्या देवता प्रतिहारमन्वायत्ता तां चेदविद्वान्प्रतिहरिष्यसि मूर्धा ते विपतिष्यतीति ते ह समारतास्तूष्णीमासांचक्रिरे ॥११॥ इति दशमः खंडः ॥१०॥

अथ हैनं यजमान उवाच भगवन्तं वा अहं विविदिषाणीत्युषस्तिरस्मि चाक्रायण इति होवाच ॥१॥ स होवाच भगवन्तं वा

काळीं तो निद्रेचा त्याग करून उठला व ह्मणाला, जर आपल्याला अन्न मिळेल तर आपणांस कांहीं धन मिळेल. राजा (येथें जवळच) यज्ञ करीत आहे, तो मला सर्व ऋत्विक्कर्माकरितां पसंत करील.६. त्याला भार्या ह्मणाली, हे पते, हे उडीद येथें आहेत. ते खाऊन तो त्या मोठ्या यज्ञाला गेला.७. (तेथें गेल्यावर) उद्गातृपुरुष आस्तावामध्यें [स्तवन करण्याच्या जागेमध्यें] स्तवन करीत बसले होते त्यांच्याजवळ जाऊन तो बसला. तो प्रस्तोत्याला ह्मणाला, प्रस्तोतर्, जी देवता प्रस्तावभक्तीचा विषय आहे ती न जाणतां जर स्तवन करशील तर तुझें मस्तक तुटून पडेल.८.९. नंतर उद्गात्याला ह्मणाला, हे उद्गातर्, जी देवता उद्गीथाचा विषय आहे ती न जाणतां जर तिचें स्तवन करशील तर तुझें मस्तक तुटून पडेल.१०. याप्रमाणेंच प्रतिहर्त्याला ह्मणाला, हे प्रतिहर्तर्, जी देवता प्रतिहाराचा विषय आहे ती न जाणतां जर तिचें स्तवन करशील तर तुझें मस्तक तुटून पडेल. (हें ऐकून) ते सर्व थांबले व स्तब्ध राहिले.११.

तेव्हां यजमान (राजा) त्याला ह्मणाला, आपण कोण हें जाणण्याची

अह्मेभिः सर्वैरार्त्विज्यैः पर्यैषिषं भगवतो वा अह्मवित्त्यान्यानवृषि ॥२॥ भगवांस्त्वेव मे सर्वैरार्त्विज्यैरिति तथेत्यथ तर्ह्यत एव समति-सृष्टाः स्तुवतां यावत्त्वेभ्यो धनं दद्यास्तावन्मम दद्या इति तथेति ह यजमान उवाच ॥३॥ अथ हैनं प्रस्तोतोपससाद प्रस्तोतर्या देवता प्रस्तावमन्वायत्ता तां चेदविद्वान्प्रस्तोष्यसि मूर्धा ते विपतिष्यतीति मा भगवानवोचत्कतमा सा देवतेति ॥४॥ प्राण इति होवाच सर्वाणि ह वा इमानि भूतानि प्राणमेवाभिसंविशन्ति प्राणमभ्युज्जि-हते सैषा देवता प्रस्तावमन्वायत्ता तां चेदविद्वान्प्रास्तोष्यो मूर्धा ते व्यपतिष्यत्तथोक्तस्य मयेति ॥५॥ अथ हैनमुद्गातोपससादोद्गातर्या देवतोद्गीथमन्वायत्ता तां चेदविद्वानुद्गास्यसि मूर्धा ते विपतिष्यतीति

माझी इच्छा आहे. तो ह्मणाला, मी उषस्ति चाक्रायण आहे. १. राजा ह्मणाला, या सर्व ऋत्विक्कर्मांचे ठिकाणीं मीं आपलीच योजना केली होती. (पण) आपण न मिळाल्यामुळे इतरास निवडले. २. आता सर्व ऋत्विक्कर्मांचे ठिकाणीं आपणच असावे. उषस्ति ह्मणाला, ठीक आहे. तर मग मी आता याना स्तवन करण्याची अनुज्ञा देतो. तू याना जितके धन देशील तितके मला दे. राजा ह्मणाला, ठीक आहे. ३. नंतर त्याच्याकडे प्रस्तोता आला. तो (उषस्ति) प्रस्तोत्याला ह्मणाला, हे प्रस्तो-तर्, जी देवता प्रस्तावाचा विषय आहे ती न जाणता जर स्तवन कर-शील तर तुझे मस्तक तुटून पडेल. प्रस्तोता ह्मणाला, ती देवता कोणती हे आपण मला सागा. ४. उषस्ति ह्मणाला, ती देवता प्राण. हीं सर्व भूते (अंतकालीं) प्राणामध्येच प्रवेश करतात आणि (उत्पत्तिकालीं) प्राणा-पासूनच उत्पन्न होतात. ही देवता प्रस्तावाचा विषय आहे. ही न जाणता जर तूं स्तवन केले असतेस तर मीं सांगितल्याप्रमाणे तुझे मस्तक तुटून पडले असते. ५. नतर त्याच्याकडे उद्गाता आला. तो (उषस्ति) त्याला ह्मणाला, हे उद्गातर्, जी देवता उद्गीथाचा विषय आहे ती न

मा भगवानवोचत्कतमा सा देवतेति ॥६॥ आदित्य इति होवाच सर्वाणि ह वा इमानि भूतान्यादित्यमुच्चैः सन्तं गायन्ति सैषा देवतो-द्गीथमन्वायत्ता तां चेदविद्वानुदगास्यो मूर्धा ते व्यपतिष्यत्तथोक्तस्य मयेति ॥७॥ अथ हैनं प्रतिहर्तोपससाद प्रतिहर्तर्या देवता प्रति-हारमन्वायत्ता तां चेदविद्वान्प्रतिहरिष्यसि मूर्धा ते विपतिष्यतीति मा भगवानवोचत्कतमा सा देवतेति ॥८॥ अन्नमिति होवाच सर्वाणि ह वा इमानि भूतान्यन्नमेव प्रतिहरमाणानि जीवन्ति सैषा देवता प्रतिहारमन्वायत्ता तां चेदविद्वान्प्रत्यहरिष्यो मूर्धा ते व्यपतिष्य-त्तथोक्तस्य मयेति तथोक्तस्य मयेति ॥९॥ इति एकादशः खंडः ॥११॥

अथातः शौव उद्गीथस्तद्ध बको दाल्भ्यो ग्लावो वा मैत्रेयः स्वाध्यायमुद्व्रव्राज ॥१॥ तस्मै श्वा श्वेतः प्रादुर्बभूव तमन्ये श्वान

जाणतां जर स्तवन करशील तर तुझें मस्तक तुटून पडेल. उद्गाता ह्मणाला, ती देवता कोणती हे आपण मला सांगा.६. उषस्ति ह्मणाला, ती देवता आदित्य. हीं सर्व भूतें सर्वांहून ऊर्ध्वभागीं असलेल्या आदि-त्याचें गायन करतात. ही देवता उद्गीथाचा विषय आहे. ही देवता न जाणतां जर तूं स्तवन केलें असतेंस तर मीं सांगितल्याप्रमाणें तुझें मस्तक तुटून पडलें असतें.७. नंतर त्याच्याकडे प्रतिहर्ता आला. तो (उषस्ति) त्याला ह्मणाला, हे प्रतिहर्तर्, जी देवता प्रतिहाराचा विषय आहे ती न जाणतां जर स्तवन करशील तर तुझें मस्तक तुटून पडेल. प्रतिहर्ता ह्मणाला, ती देवता कोणती हें आपण मला सांगा.८. उषस्ति ह्मणाला, ती देवता अन्न. हीं सर्व भूतें आपल्याकरितां सर्व ठिकाणांहून अन्न आणूनच जगतात. ही देवता प्रतिहाराचा विषय आहे. ही देवता न जाणतां जर तूं स्तवन केलें असतेंस तर मीं सांगितल्याप्रमाणें तुझें मस्तक तुटून पडलें असतें.९.

आतां अन्नलाभाला साधन अशा शौव [श्वानदृष्ट] उद्गीथाचें महत्त्व वर्णन करतात— दल्भपुत्र बक नामक होता. तो मित्रेचा (दत्तक) पुत्र

उपसमेत्योचुरन्नं नो भगवानागायत्वशनायाम वा इति ॥२॥ तान्होवाचेहैव मा प्रातरुपसमीयातेति तद्ध बको दाल्भ्यो ग्लावो वा मैत्रेयः प्रतिपालयांचकार ॥३॥ ते ह यथैवेदं बहिष्पवमानेन स्तोष्यमाणाः संरब्धाः सर्पन्तीत्येवमाससृपुस्ते ह समुपविश्य हिं चक्रुः ॥४॥ ओ३मदा३मों३ पिबा३मों३देवो वरुणः प्रजापतिः सविता२न्नमिहा२हरदन्नपते३न्नमिहा२हरा२हरों३मिति ॥५॥ इति द्वादशः खंडः॥१२॥

अयं वाव लोको हाउकारो वायुर्हाइकारश्चन्द्रमा अथकार आत्मेहकारोऽग्निरीकारः ॥१॥ आदित्य ऊकारो निहव एकारो विश्वेदेवा औहोयिकारः प्रजापतिर्हिंकारः प्राणः स्वरोऽन्नं या वाग्विराट् ॥२॥ अनिरुक्तस्त्रयोदशः स्तोभः संचरो हुंकारः ॥३॥ दुग्धेऽ-

होता व त्याचें नांव ग्लाव ठेवलें होतें. तो वेदाध्ययन करण्याकरितां एकान्त ठिकाणीं गेला.१. (त्याच्या स्वाध्यायानें संतुष्ट होत्साती) देवता श्वेतवर्ण श्वानाचें रूप घेऊन त्याजकडे आली. त्या श्वानाकडे इतर श्वान येऊन ह्मणाले, आपण आह्मांला अन्न द्यावें. आह्मी क्षुधार्त आहों.२. त्यांना तो श्वेतवर्ण श्वान ह्मणाला, याच ठिकाणीं प्रातःकाळीं तुह्मी माझ्या समीप या. हें बक दाल्भ्य अथवा ग्लाव मैत्रेय यानें पाहिलें.३. त्याप्रमाणें ते श्वान आले व ज्याप्रमाणें उद्गातृपुरुष बहिष्पवमान स्तोत्रानें स्तवन करीत परिभ्रमण करतात त्याप्रमाणे त्यांनीं स्तवन करीत एकाचे मागें एक असें परिभ्रमण केलें. नंतर खालीं बसून सर्वांनीं हिंकार केला.४.— "आह्मांला (अन्न) प्राप्त होवो, (उदक) प्राप्त होवो. वरुण, प्रजापति व सविता हे देव आह्मांला अन्न देवोत. हे अन्नपते, आह्मांला अन्न आण."५.

(रथंतर सामामध्यें प्रसिद्ध असा) हाउकार ह्मणजे हा लोक होय. (वामदेव्य सामामध्यें प्रसिद्ध असा) हाइकार ह्मणजे वायु होय. चंद्रमा हा अथकार, आत्मा हा इहकार आणि अग्नि हा ईकार.१. आदित्य हा उकार, आह्वान हा एकार, विश्वेदेव हा औहोयिकार, प्रजापति हा हिंकार,

स्मै वाग्दोहं यो वाचो दोहोऽन्नवानन्नादो भवति य एतामेवꣳ साम्नामुपनिषदं वेदोपनिषदं वेद इति ॥४॥ इति त्रयोदशः खंडः ॥१३॥ इति प्रथमोऽध्यायः ॥१॥

## अथ द्वितीयोऽध्यायः ॥

ॐ समस्तस्य खलु साम्न उपासनꣳ साधु यत्खलु साधु तत्सामेत्याचक्षते यदसाधु तदसामेति ॥१॥ तदुताप्याहुः साम्नैनमुपागादिति साधुनैनमुपागादित्येव तदाहुरसाम्नैनमुपागादित्यसाधुनैनमुपागादित्येव तदाहुः ॥२॥ अथोताप्याहुः साम नो बतेति यत्साधु भवति साधु बतेत्येव तदाहुरसाम नो बतेति यदसाधु भवत्यसाधु बतेत्येव तदाहुः ॥३॥ स य एतदेवं विद्वान्साधु सामेत्युपास्तेऽभ्याशो ह

प्राण हा स्वर, अन्न—वाक् व विराट् हा या नामक स्तोभ.२. वर्णन करण्यास अशक्य व कार्यरूपानें सर्वत्र संचार करणारा असा तेरावा स्तोभ हुंकार हा होय.३. सामावयव जें स्तोभाक्षर तद्विषय उपनिषत् जो जाणतो त्याला वाणी वाणीचें सर्व फल प्राप्त करून देते, तो अन्नानें समृद्ध होतो, (पुष्कळ) अन्न खाण्यास समर्थ होतो.४.

## अध्याय दुसरा.

सर्वावयवविशिष्ट अशा सामाची उपासना चांगली होय. जें जें कांहीं चांगलें [साधु] असतें त्याला साम असें ह्मणतात, जें असाधु त्याला असाम असें ह्मणतात.१. याविषयीं आणखी सांगतात— (अमुक मनुष्य) सामानें त्याकडे [राजाकडे] गेला ह्मणजे चांगल्या वृत्तीनें त्याकडे गेला; आणि असामानें त्याकडे गेला ह्मणजे वाईट वृत्तीनें त्याकडे गेला असें सामान्य जन ह्मणतात.२. याविषयीं आणखी सांगतात— आमचें साम झालें आहे असें ह्मणतात तेव्हां चांगलें झालें असतें ह्मणून चांगलें झालें असें ह्मणतात; आणि आमचें असाम झालें आहे असें ह्मणतात तेव्हां वाईट झालें असतें ह्मणून वाईट झालें असें ह्मणतात.३. याप्रमाणें

यदेनꣳ साधवो धर्मा आ च गच्छेयुरुप च नमेयुः ॥४॥ इति प्रथमः खंडः ॥१॥

लोकेषु पंचविधꣳ सामोपासीत पृथिवी हिंकारोऽग्निः प्रस्तावोऽन्तरिक्षमुद्गीथ आदित्यः प्रतिहारो द्यौर्निधनमित्यूर्ध्वेषु ॥१॥ अथावृत्तेषु द्यौर्हिंकार आदित्यः प्रस्तावोऽन्तरिक्षमुद्गीथोऽग्निः प्रतिहारः पृथिवी निधनम् ॥२॥ कल्पन्ते हास्मै लोका ऊर्ध्वाश्चावृत्ताश्च य एतदेवं विद्वाँल्लोकेषु पंचविधꣳ सामोपास्ते ॥३॥ इति द्वितीयः खंडः

वृष्टौ पंचविधꣳ सामोपासीत पुरोवातो हिंकारो मेघो जायते स प्रस्तावो वर्षति स उद्गीथो विद्योतते स्तनयति स प्रतिहारः ॥१॥ उद्गृह्णाति तन्निधनं वर्षति हास्मै वर्षयति ह य एतदेवं विद्वान्वृष्टौ पंचविधꣳ सामोपास्ते ॥२॥ इति तृतीयः खंडः ॥३॥

जाणून जो कोणी सामाची साधु [चांगलें] ह्मणून उपासना करतो त्याप्रत तत्काल चांगले धर्म येतात, त्याजपुढें नम्र होतात.४.

लोकांचे ठिकाणीं पांच प्रकारांनीं सामाची उपासना करावी. ती अशी— पृथिवी हा हिंकार, अग्नि हा प्रस्ताव, अंतरिक्ष हा उद्गीथ, आदित्य हा प्रतिहार आणि द्युलोक हें निधन. याप्रमाणें सामाची ऊर्ध्वमुख उपासना झाली.१. आतां अधोमुख उपासना सांगतात— द्युलोक हा हिंकार, आदित्य हा प्रस्ताव, अंतरिक्ष हा उद्गीथ, अग्नि हा प्रतिहार आणि पृथिवी हें निधन.२. जो याप्रमाणें जाणून लोकांचे ठिकाणीं पंचविध सामाची उपासना करतो त्याला ऊर्ध्वमुख आणि अधोमुख (अशा दोन्ही) लोकांची प्राप्ति होते (ह्म० या लोकांमध्यें जात येत रहातो).३.

वृष्टीचे ठिकाणीं पांच प्रकारांनीं सामाची उपासना करावी. (वृष्टीच्या) पूर्वीचा वायु हा हिंकार. मेघ उत्पन्न होतो हा प्रस्ताव. वर्षाव करतो हा उद्गीथ. वीज पडते व गर्जना होते हा प्रतिहार.१. खालीं ओढून घेतो हें निधन. जो याप्रमाणें जाणून सामाची ही पांच प्रकारांनीं

सर्वास्वप्सु पंचविधꣳ सामोपासीत मेघो यत्संप्लवते स हिंकारो यद्वर्षति स प्रस्तावो याः प्राच्यः स्यन्दन्ते स उद्गीथो याः प्रतीच्यः स प्रतिहारः समुद्रो निधनम् ॥१॥ न हाप्सु प्रैत्यप्सुमान्भवति य एतदेवं विद्वान्सर्वास्वप्सु पंचविधꣳ सामोपास्ते ॥२॥ इति चतुर्थः खंडः ॥४॥

ऋतुषु पंचविधꣳ सामोपासीत वसंतो हिंकारो ग्रीष्मः प्रस्तावो वर्षा उद्गीथः शरत्प्रतिहारो हेमंतो निधनम् ॥१॥ कल्पन्ते हास्मा ऋतव ऋतुमान्भवति य एतदेवं विद्वानृतुषु पंचविधꣳ सामोपास्ते ॥२॥ इति पंचमः खंडः ॥५॥

पशुषु पंचविधꣳ सामोपासीताजा हिंकारोऽवयः प्रस्तावो गाव उद्गीथोऽश्वाः प्रतिहारः पुरुषो निधनम् ॥१॥ भवन्ति हास्य

उपासना करतो त्याच्या इच्छेनुसार वृष्टि होते आणि (वृष्टि होत नसेल तर) तो वृष्टि करतो.२.

सर्व उदकांचे ठिकाणीं पांच प्रकारांनीं सामाची उपासना करावी. मेघ एकत्र होतात हा हिंकार. वृष्टि करतात हा प्रस्ताव. पूर्व दिशेकडील मेघ वृष्टि करतात हा उद्गीथ. पश्चिमेकडील मेघ वृष्टि करतात हा प्रतिहार. समुद्र हें निधन.१. याप्रमाणें जाणून जो सर्व उदकांचे ठिकाणीं पांच प्रकारांनीं सामाची उपासना करतो तो उदकांत बुडत नाहीं आणि उदकानें समृद्ध होतो.२.

ऋतूंचे ठिकाणीं पांच प्रकारांनीं सामाची उपासना करावी. वसंत हा हिंकार. ग्रीष्म हा प्रस्ताव. वर्षा हा उद्गीथ. शरत् हा प्रतिकार. हेमन्त हें निधन.१. याप्रमाणें जाणून जो ऋतूंचे ठिकाणीं पांच प्रकारांनीं सामाची उपासना करतो त्याला सर्व ऋतु आपापलें फळ देतात. तो (स्वेच्छेनें) सर्व ऋतूंच्या भोगांनीं संपन्न होतो.२.

पशूंचे ठिकाणीं पांच प्रकारांनीं सामाची उपासना करावी. अजा

पशवः पशुमान्भवति य एतदेवं विद्वान्पशुषु पंचविधꣳ सामोपास्ते ॥२॥ इति षष्ठः खंडः ॥६॥

प्राणेषु पंचविधं परोवरीयः सामोपासीत प्राणो हिंकारो वाक्प्रस्तावश्चक्षुरुद्गीथः श्रोत्रं प्रतिहारो मनो निधनं परोवरीयांसि वा एतानि ॥१॥ परोवरीयो हास्य भवति परोवरीयसो ह लोकाञ्जयति य एतदेवं विद्वान्प्राणेषु पंचविधं परोवरीयः सामोपास्त इति तु पंचविधस्य ॥२॥ इति सप्तमः खंडः ॥७॥

अथ सप्तविधस्य वाचि सप्तविधꣳ सामोपासीत यत्किंच वाचो हुमिति स हिंकारो यत्प्रेति स प्रस्तावो यदेति स आदिः ॥१॥ यदुदिति स उद्गीथो यत्प्रतीति स प्रतिहारो यदुपेति स उपद्रवो यन्नीति

[शेळी] हा हिंकार. अवी [बोकड] हा प्रस्ताव. गाय हा उद्गीथ. अश्व हा प्रतिहार आणि पुरुष हें निधन.१. याप्रमाणें जाणून जो पशूंचे ठिकाणीं पांच प्रकारांनीं सामाची उपासना करतो तो पशूंनीं संपन्न होतो, पशूंपासून मिळणाऱ्या भोगांनीं संपन्न होतो.२.

पांच प्रकारच्या प्राणांचे ठिकाणीं मागच्याहून पुढचा श्रेष्ठ या प्रकारें सामाची उपासना करावी. प्राण हा हिंकार. वाणी हा प्रस्ताव. चक्षु हा उद्गीथ. श्रोत्र हा प्रतिहार. मन हें निधन. यांत मागच्याहून पुढचा श्रेष्ठ आहे.१. याप्रमाणें जाणून जो प्राणांचे ठिकाणीं पंचविध सामाची उपासना करतो त्याचें जीवन उत्तरोत्तर अधिक संपन्न होतें. उत्तरोत्तर अधिक असे लोक त्याला प्राप्त होतात. याप्रमाणें पंचविध सामाची उपासना सांगितली.२.

आतां सप्तविध सामाची उपासना सांगतात— वाचेचे ठिकाणीं सात प्रकारांनीं सामाची उपासना करावी. शब्दाचा जो हुं असा विशेष तो हिंकार. जो बाहेर येतो तो प्रस्ताव. जो आ असा तो आदि.१. जो उत् असा तो उद्गीथ. जो प्रतीतीला येतो तो प्रतिहार. जो जवळ येतो

तन्निधनम् ॥२॥ दुग्धेऽस्मै वाग्दोहं यो वाचो दोहोऽन्नवानन्नादो भवति य एतदेवं विद्वान्वाचि सप्तविधꣳ सामोपास्ते ॥३॥ इति अष्टमः खंडः ॥८॥

अथ खल्वमुमादित्यꣳ सप्तविधꣳ सामोपासीत सर्वदा समस्तेन साम मां प्रति मां प्रतीति सर्वेण समस्तेन साम ॥१॥ तस्मिन्निमानि सर्वाणि भूतान्यन्वायत्तानीति विद्यात्तस्य यत्पुरोदयात्स हिंकारस्तदस्य पशवोऽन्वायत्तास्तस्मात्ते हिं कुर्वन्ति हिंकारभाजिनो ह्येतस्य साम्नः ॥२॥ अथ यत्प्रथमोदिते स प्रस्तावस्तदस्य मनुष्या अन्वायत्तास्तस्मात्ते प्रस्तुतिकामाः प्रशंसाकामाः प्रस्तावभाजिनो ह्येतस्य साम्नः ॥३॥ अथ यत्संगववेलायाꣳ स आदित्यस्तदस्य वयां-

[उपेति] तो उपद्रव. जो नि तो निधन.२. जो याप्रमाणें जाणून वाणचि ठिकाणीं सप्तविध सामाची उपासना करतो त्याला वाणीचें सर्व फळ वाणी देते. तो अन्नानें समृद्ध होतो, (पुष्कळ) अन्न खाण्यास समर्थ होतो.३.

या आदित्याची सप्तविध सामानें उपासना करावी. (आदित्य) सर्वदा सारखा असतो. ह्मणून (सर्वांचे ठिकाणीं) हा माझ्याकरितां हा माझ्याकरितां अशी समान बुद्धि उत्पन्न करतो. ह्मणून साम सर्वरूपानें आदित्याशीं समान आहे.१. त्यामध्ये ही सर्व भूतें अनुगत आहेत [ह्म० त्याच्यावर अवलंबून आहेत] असें जाणावें. त्याचें उदयाच्या पूर्वीचें रूप तो हिंकार. त्याच्या ठिकाणी पशु अनुगत आहेत ह्मणून ते उदयाच्या पूर्वरूपीं हिं असा शब्द करतात. सामाचा हिंकार भाग हे (पशु) आहेत.२. आदित्याचे प्रथम उदय पावलेलें जें रूप तो प्रस्ताव. त्याचे ठिकाणीं मनुष्य अनुगत आहेत. ह्मणून ते स्तुति व प्रशंसा यांची इच्छा करतात. सामाचा प्रस्ताव भाग हे (मनुष्य) आहेत.३. संगवकालींचें [सूर्यकिरणांचा सूर्याशीं संयोग अथवा वत्सांचा गाईशीं संयोग; ह्मणजे दूध काढण्याची वेळ] आदित्याचें जें रूप तो आदि. त्याचे

स्यन्वायत्तानि तस्मात्तान्यंतरिक्षेऽनारंबणान्यादायात्मानं परिपतन्त्या-
दिभाजीनि ह्येतस्य साम्नः ॥४॥ अथ यत्संप्रति मध्यंदिने स उद्गीथ-
स्तदस्य देवा अन्वायत्तास्तस्मात्ते सत्तमाः प्राजापत्यानामुद्गीथभाजिनो
ह्येतस्य साम्नः ॥५॥ अथ यदूर्ध्वं मध्यंदिनात्प्रागपराह्णात्स प्रतिहारस्त-
दस्य गर्भा अन्वायत्तास्तस्मात्ते प्रतिहृता नावपद्यन्ते प्रतिहारभाजिनो
ह्येतस्यः साम्नः ॥६॥ अथ यदूर्ध्वमपराह्णात्प्रागस्तमयात्स उपद्रवस्त-
दस्यारण्या अन्वायत्तास्तस्मात्ते पुरुषं दृष्ट्वा कक्षꣳ श्वभ्रमित्युपद्रवन्त्यु-
पद्रवभाजिनो ह्येतस्य साम्नः ॥७॥ अथ यत्प्रथमास्तमिते तन्निधनं
तदस्य पितरोऽन्वायत्तास्तस्मात्तान्निदधति निधनभाजिनो ह्येतस्य साम्न
एवं खल्वमुमादित्यꣳ सप्तविधꣳ सामोपास्ते ॥८॥ इति नवमः खंडः ॥

ठिकाणीं पक्षी अनुगत आहेत. ह्मणून ते आधार नसतांना अंतरिक्षामध्यें आपण आपल्या आधारानें उडतात. सामाचा आदि भाग हे पक्षी आहेत. ४. आतां मध्यदिवसाचे ठिकाणीं जें रूप तो उद्गीथ. त्याचे ठिकाणीं देव अनुगत आहेत. ह्मणून ते प्रजापतीच्या प्रजेमध्यें श्रेष्ठ होत. सामाचा उद्गीथ भाग हे देव आहेत.५. मध्यदिवसानंतर आणि अपराह्णाच्या पूर्वींचें जें रूप तो प्रतिहार. याचे ठिकाणीं गर्भ अनुगत आहेत. ह्मणून ते प्रतिहृत [अधोगति] असले तरी पतन पावत नाहींत. सामाचा प्रतिहार भाग हे गर्भ आहेत.६. अपराह्णाच्या नंतर आणि अस्ताच्या पूर्वींचें जें रूप तो उपद्रव. याचे ठिकाणीं अरण्यांतील पशु अनुगत आहेत. ह्मणून ते मनुष्याला पाहिल्याबरोबर भयरहित अशा अरण्यामध्यें प्रवेश करतात. सामाचा उपद्रव भाग हे अरण्यांतील पशु आहेत.७. अस्त झाल्याबरोबरचें जें रूप तें निधन. त्याचे ठिकाणीं पितर अनुगत आहेत. ह्मणून (दर्भरूपानें) त्यांचें स्थापन करतात. सामाचा निधन भाग हे पितर आहेत. याप्रमाणें आदित्याचे ठिकाणीं सप्तविध सामाची उपासना करावी. (ही उपासना करील त्याला पूर्वोक्त फळ मिळेल).८.

अथः खल्वात्मसंमितमतिमृत्यु सप्तविधꣳ सामोपासीत हिंकार इति त्र्यक्षरं प्रस्ताव इति त्र्यक्षरं तत्समम् ॥१॥ आदिरिति द्व्यक्षरं प्रतिहार इति चतुरक्षरं तत इहैकं तत्समम् ॥२॥ उद्गीथ इति त्र्यक्षरमुपद्रव इति चतुरक्षरं त्रिभिस्त्रिभिः समं भवत्यक्षरमतिशिष्यते त्र्यक्षरं तत्समम् ॥३॥ निधनमिति त्र्यक्षरं तत्सममेव भवति तानि ह वा एतानि द्वाविंशतिरक्षराणि ॥४॥ एकविंशत्यादित्यमाप्नोत्येक-विंशो वा इतोऽसावादित्यो द्वाविंशेन परमादित्याज्जयति तन्नाकं तद्विशोकम् ॥५॥ आप्नोति हादित्यस्य जयं परो हास्यादित्यजया-ज्जयो भवति य एतदेवं विद्वानात्मसंमितमतिमृत्यु सप्तविधꣳ सामो-पास्ते सामोपास्ते ॥६॥ इति दशमः खंडः ॥१०॥

मनो हिंकारो वाक्प्रस्तावश्चक्षुरुद्गीथः श्रोत्रं प्रतिहारः प्राणो

यानंतर सामाच्या हिंकारादि अवयवांच्या अक्षरांप्रमाणें परिमित अशा व मृत्यूच्या पार जाण्यास साधन अशा सप्तविध सामाची उपासना करावी. हिंकाराचीं तीन अक्षरें. (त्याप्रमाणेच) प्रस्तावाचीं तीन अक्षरें.१. आदि हीं दोन अक्षरें. प्रतिहार हीं चार अक्षरे. मिळून प्रत्येकीं सारखीं (तीन) झालीं.२. उद्गीथ हीं तीन अक्षरें. उपद्रव हीं चार अक्षरें. तीन तीन अक्षरें सारखीं होऊन एक अक्षर अधिक होतें.३. निधन हीं तीन अक्षरें. हीं सारखींच आहेत. (मिळून) हीं बावीस अक्षरें झालीं.४. एकवीस अक्षरांनीं आदित्याची [मृत्यूची] प्राप्ति होते. कारण या लोकापासून आदित्यलोक एकविसावा आहे. बावीस अक्षरांनीं आदि-त्याच्या [मृत्यूच्या] पलीकडील लोक प्राप्त होतो. तें स्थान दुःखरहित आहे, शोकरहित आहे.५. (एकवीस या संख्येनें) आदित्यलोक पावतो. (बावीस या संख्येनें) हें जाणून सामाच्या अवयवाक्षरांप्रमाणें मृत्यूच्या पार जाण्यास साधन अशी सप्तविध सामाची उपासना जो करतो तो आदित्य-लोकाच्या [मृत्यूच्या] पलीकडे जातो.६.

निधनमेतद्गायत्रं प्राणेषु प्रोतम् ॥१॥ स य एवमेतद्गायत्रं प्राणेषु प्रोतं वेद प्राणी भवति सर्वमायुरेति ज्योग्जीवति महान्प्रजया पशुभिर्भवति महान्कीर्त्या महामनाः स्यात्तद्व्रतम् ॥२॥ इत्येकादशः खंडः ॥११॥

अभिमन्थति स हिंकारो धूमो जायते स प्रस्तावो ज्वलति स उद्गीथोऽङ्गारा भवन्ति स प्रतिहार उपशाम्यति तन्निधनꣳ संशाम्यति तन्निधनमेतद्रथंतरमग्नौ प्रोतम् ॥१॥ स य एवमेतद्रथंतरमग्नौ प्रोतं वेद ब्रह्मवर्चस्यन्नादो भवति सर्वमायुरेति ज्योग्जीवति महान्प्रजया पशुभिर्भवति महान्कीर्त्या न प्रत्यङ्ङग्निमाचामेन्न निष्ठीवेत्तद्व्रतम् ॥२॥ इति द्वादश खंडः ॥१२॥...॥१३॥

उद्यन्हिंकार उदितः प्रस्तावो मध्यंदिन उद्गीथोऽपराह्णः प्रति-

मन हा हिंकार, वाणी हा प्रस्ताव, चक्षु हा उद्गीथ, श्रोत्र हा प्रतिहार, प्राण हा निधन. याप्रमाणें गायत्र साम प्राणांचे ठिकाणीं गुंफित [प्रोत] आहे.१. याप्रमाणें प्राणांमध्ये गुंफलेला हा गायत्र साम जो जाणतो तो प्राणयुक्त होतो, पूर्ण आयुष्य पावतो, त्याचें जीवित उज्ज्वल होतें, प्रजा–पशु इत्यादिकांनीं तो महान् होतो, कीर्तीनें महान् होतो. गायत्र सामाची उपासना करणाराचें मन मोठें असणें हें व्रत होय.२.

अभिमंथन करणें हा हिंकार, धूम होणे हा प्रस्ताव, ज्वलन पावणे हा उद्गीथ, निखारे होणें हा प्रतिहार, (अग्नि) शमन होणें हें निधन. निःशेष शमन होणें हे निधन. हा रथंतर साम अग्नीचे ठिकाणीं प्रोत आहे.१. अग्नीचे ठिकाणीं प्रोत असा हा रथंतर साम जो जाणतो तो ब्रह्मतेजानें युक्त होतो, (पुष्कळ) अन्न खाण्यास समर्थ होतो, पूर्ण आयुष्य पावतो, त्याचें जीवित तेजस्वी होतें, तो प्रजा–पशु यांनीं महान् होतो, कीर्तीनें महान् होतो. अग्नीकडे तोंड करून कांहीं भक्षण करूं नये आणि थुंकी टाकूं नये असें याचें व्रत आहे.२. ...

हारोऽस्तं यन्निधनमेतद्बृहदादित्ये प्रोतम् ॥१॥ स य एवमेतद्बृहदादित्ये प्रोतं वेद तेजस्व्यन्नादो भवति सर्वमायुरेति ज्योग्जीवति महान्प्रजया पशुभिर्भवति महान्कीर्त्या तपन्तं न निन्देत्तद्व्रतम् ॥२॥ इति चतुर्दशः खंडः ॥१४॥

अभ्राणि संप्लवन्ते स हिंकारो मेघो जायते स प्रस्तावो वर्षति स उद्गीथो विद्योतते स्तनयति स प्रतिहार उद्गृह्णाति तन्निधनमेतद्वैरूपं पर्जन्ये प्रोतम् ॥१॥ स य एवमेतद्वैरूपं पर्जन्ये प्रोतं वेद विरूपांश्च सुरूपांश्च पशूनवरुन्धे सर्वमायुरेति ज्योग्जीवति महान्प्रजया पशुभिर्भवति महान्कीर्त्या वर्षन्तं न निंदेत्तद्व्रतम् ॥२॥ इति पंचदशः खंडः ॥१५॥

वसंतो हिंकारो ग्रीष्मः प्रस्तावो वर्षा उद्गीथः शरत्प्रतिहारो

(आदित्य) उगवत असतांना हिंकार, उदय पावला ह्मणजे प्रस्ताव, मध्यदिवस उद्गीथ, अपराह्णकाल प्रतिहार आणि अस्त हें निधन. हा साम बृहदादित्याचे ठिकाणीं प्रोत आहे.१. याप्रमाणें बृहदादित्याचे ठिकाणीं प्रोत अशा सामाला जो जाणतो तो तेजस्वी होतो, (पुष्कळ) अन्न खाण्यास समर्थ होतो, पूर्ण आयुष्य पावतो, त्याचें जीवित तेजस्वी होतें, प्रजा–पशु यांनीं महान् होतो, कीर्तीनें महान् होतो. (आदित्य) तपन पावत असतां निंदा करूं नये हें व्रत.२.

अभ्रें पसरतात हा हिंकार, मेघ उत्पन्न होतो हा प्रस्ताव, वर्षाव होतो हा उद्गीथ, वीज चमकते व गर्जना होते हा प्रतिहार, पर्जन्य बंद होतो हें निधन. याप्रमाणे हा वैरूप साम पर्जन्याचे ठिकाणीं प्रोत आहे.१. याप्रमाणें पर्जन्यामध्यें प्रोत असा वैरूप साम जो जाणतो त्याला विरूप व सुरूप सर्व पशु प्राप्त होतात, तो पूर्ण आयुष्य पावतो, त्याचें जीवित तेजस्वी होतें, प्रजा–पशु यांनीं तो महान् होतो, कीर्तीनें महान् होतो. पर्जन्याचा वर्षाव होत असतां (त्याची) निंदा करूं नये हें व्रत.२.

हेमंतो निधनमेतद्वैराजमृतुषु प्रोतम् ॥१॥ स य एवमेतद्वैराजमृतुषु प्रोतं वेद विराजति प्रजया पशुभिर्ब्रह्मवर्चसेन सर्वमायुरेति ज्योग्जीवति महान्प्रजया पशुभिर्भवति महान्कीर्त्यर्तून्न निन्देत्तद्व्रतम् ॥२॥ इति षोडशः खंडः ॥१६॥

पृथिवी हिंकारोऽन्तरिक्षं प्रस्तावो द्यौरुद्गीथो दिशः प्रतिहारः समुद्रो निधनमेताः शक्वर्यो लोकेषु प्रोताः ॥१॥ स य एवमेताः शक्वर्यो लोकेषु प्रोता वेद लोकी भवति सर्वमायुरेति ज्योग्जीवति महान्प्रजया पशुभिर्भवति महान्कीर्त्या लोकान्न निन्देत्तद्व्रतम् ॥२॥ इति सप्तदशः खंडः ॥१७॥

अजा हिंकारोऽवयः प्रस्तावो गाव उद्गीथोऽश्वाः प्रतिहारः पुरुषो निधनमेता रेवत्यः पशुषु प्रोताः ॥१॥ स य एवमेता

वसंत हा हिंकार, ग्रीष्म हा प्रस्ताव, वर्षा हा उद्गीथ, शरत् हा प्रतिहार, हेमंत हें निधन. हा वैराज साम ऋतूंचे ठिकाणीं प्रोत आहे. १. याप्रमाणें ऋतूंचे ठिकाणीं प्रोत असा हा वैराज साम जो जाणतो तो प्रजा–पशु–ब्रह्मतेज यांचे योगानें तेजस्वी होतो, पूर्ण आयुष्य पावतो, त्याचें जीवित तेजस्वी होतें, प्रजा–पशु यांनीं महान् होतो, कीर्तीनें महान् होतो. ऋतूंची निंदा करूं नये हें व्रत. २.

पृथिवी हा हिंकार, अंतरिक्ष हा प्रस्ताव, द्युलोक हा उद्गीथ, दिशा हा प्रतिहार, समुद्र हे निधन. हा शक्वर्य साम लोकांचे ठिकाणीं प्रोत आहे. १. याप्रमाणे लोकांचे ठिकाणीं प्रोत असा हा शक्वर्य साम जो जाणतो तो लोकांतील फलांनीं युक्त होतो, पूर्ण आयुष्य पावतो, त्याचें जीवित तेजस्वी होतें, प्रजा–पशु यांनीं महान् होतो, कीर्तीनें महान् होतो. लोकांची निंदा करूं नये हें व्रत. २.

अजा हा हिंकार, बोकड हा प्रस्ताव, गाई हा उद्गीथ, अश्व हा प्रतिहार, पुरुष हें निधन. हा रेवत्य साम पशूंचे ठिकाणीं प्रोत आहे. १.

रेवत्यः पशुषु प्रोता वेद पशुमान्भवति सर्वमायुरेति ज्योग्जीवति महान्प्रजया पशुभिर्भवति महान्कीर्त्या पशून्न निन्देत्तद्व्रतम् ॥२॥ इत्यष्टादशः खंडः ॥१८॥

लोम हिंकारस्त्वक्प्रस्तावो मांसमुद्गीथोऽस्थि प्रतिहारो मज्जा निधनमेतद्यज्ञायज्ञीयमंगेषु प्रोतम् ॥१॥ स य एवमेतद्यज्ञायज्ञीयमंगेषु प्रोतं वेदांगी भवति नांगेन विहूर्छति सर्वमायुरेति ज्योग्जीवति महान्प्रजया पशुभिर्भवति महान्कीर्त्या संवत्सरं मज्ज्ञो नाश्नीयात्तद्व्रतं मज्ज्ञो नाश्नीयादिति वा ॥२॥ इत्येकोनविंशः खंडः ॥१९॥

अग्निर्हिंकारो वायुः प्रस्ताव आदित्य उद्गीथो नक्षत्राणि प्रतिहारश्चंद्रमा निधनमेतद्राजनं देवतासु प्रोतम् ॥१॥ स य एवमेतद्राजनं देवतासु प्रोतं वेदैतासामेव देवतानाꣳ सलोकताꣳ सार्ष्टिताꣳ

याप्रमाणें पशूंचे ठिकाणीं प्रोत असा हा रेवत्य साम जो जाणतो तो पशूंनीं युक्त होतो, पूर्ण आयुष्य पावतो, त्याचें जीवित तेजस्वी होतें, प्रजा–पशु यांनीं महान् होतो, कीर्तीनें महान् होतो. पशूंची निंदा करूं नये हें व्रत.२.

लोम हा हिंकार, त्वचा हा प्रस्ताव, मांस हा उद्गीथ, अस्थि हा प्रतिहार, मज्जा हे निधन. हा यज्ञायज्ञीय साम अवयवांचे ठिकाणीं प्रोत आहे.१. याप्रमाणें अवयवांचे ठिकाणीं प्रोत असा हा यज्ञायज्ञीय साम जो जाणतो तो सर्व अवयवांनीं युक्त होतो. अवयवांनीं वियुक्त होत नाहीं, पूर्ण आयुष्य पावतो, त्याचें जीवित तेजस्वी होतें, प्रजा–पशु यांनीं महान् होतो, कीर्तीनें महान् होतो. संवत्सरपर्यंत अथवा केव्हांहि मांस भक्षण करूं नये असें व्रत.२.

अग्नि हा हिंकार, वायु हा प्रस्ताव, आदित्य हा उद्गीथ, नक्षत्रें हा प्रतिहार, चंद्रमा हें निधन. हा राजन साम देवतांचे ठिकाणीं प्रोत आहे. १. याप्रमाणें देवतांचे ठिकाणीं प्रोत असा हा राजन साम जो जाणतो

सायुज्यं गच्छति सर्वमायुरेति ज्योग्जीवति महान्प्रजया पशुभिर्भवति महान्कीर्त्या ब्राह्मणान्न निन्देत्तद्व्रतम् ॥२॥ इति विंशः खंडः ॥२०॥

त्रयी विद्या हिंकारस्त्रय इमे लोकाः स प्रस्तावोऽग्निर्वायुरादित्यः स उद्गीथो नक्षत्राणि वयांसि मरीचयः स प्रतिहारः सर्पा गंधर्वाः पितरस्तन्निधनमेतत्साम सर्वस्मिन्प्रोतम् ॥१॥ स य एवमेतत्साम सर्वस्मिन्प्रोतं वेद सर्वꣳ ह भवति ॥२॥ तदेष श्लोकः ॥ यानि पंचधा त्रीणि त्रीणि तेभ्यो न ज्यायः परमन्यदस्ति ॥३॥ यस्तद्वेद स वेद सर्वꣳ सर्वा दिशो बलिमस्मै हरन्ति सर्वमस्मीत्युपासीत तद्व्रतं तद्व्रतम् ॥४॥ इत्येकविंश खंडः ॥२१॥

विनर्दि साम्नो वृणे पशव्यमित्यग्नेरुद्गीथोऽनिरुक्तः प्रजापतेर्निरुक्तः सोमस्य मृदु श्लक्ष्णं वायोः श्लक्ष्णं बलवदिंद्रस्य क्रौंचं बृहस्पते-

त्याला देवतांचें सालोक्य, सार्ष्टिता व सायुज्यता हीं प्राप्त होतात. तो पूर्ण आयुष्य पावतो, त्याचें जीवित तेजस्वी होतें, प्रजा-पशु यांनीं महान् होतो, कीर्तीनें महान् होतो. ब्राह्मणांची निंदा करूं नये हें व्रत.२.

त्रयी विद्या [वेद] हा हिंकार. हे तीन लोक हा प्रस्ताव. वायु व आदित्य हा उद्गीथ. नक्षत्रें, पक्षी व किरण हा प्रतिहार. सर्प, गंधर्व व पितर हें निधन. हा साम सर्वांचे ठिकाणीं प्रोत आहे.१. याप्रमाणें सर्वांमध्यें प्रोत असा हा साम जो जाणतो तो सर्व होतो.२. याविषयीं पुढील मंत्र आहे— (हिंकारादि) पांच प्रकारांनीं जी त्रयी विद्या इत्यादि सांगितलीं त्यांच्यापेक्षां श्रेष्ठ असें दुसरें कांहीं नाहीं.३. हे जो जाणतो तो सर्व जाणतो. सर्व दिशा त्याच्याकरितां भोग आणतात. सर्व मी आहें अशी याची उपासना करावी. हेंच याचें व्रत.४.

(आतां सामोपासनेच्या प्रसंगानें गायनविशेष सांगतात—) पशूंना हितकारक अशा सामाच्या विशिष्ट स्वरयुक्त [विनर्दि] गानाची मी प्रार्थना करतों [असें उद्गाता अथवा यजमान ह्मणतो]. अग्नीचें उद्गीथ पशूंसंबंधी,

रपध्वान्तं वरुणस्य तान्सर्वानेवोपसेवेत वारुणं त्वेव वर्जयेत् ॥१॥ अमृतत्वं देवेभ्य आगायानीत्यागायेत्स्वधां पितृभ्य आशां मनुष्येभ्यस्तृणोदकं पशुभ्यः स्वर्गं लोकं यजमानायान्नमात्मन आगायानीत्येतानि मनसा ध्यायन्नप्रमत्तः स्तुवीत ॥२॥ सर्वे स्वरा इंद्रस्यात्मानः सर्व ऊष्माणः प्रजापतेरात्मानः सर्वे स्पर्शा मृत्योरात्मानस्तं यदि स्वरेषूपालभेतेंद्रꣳ शरणं प्रपन्नोऽभूवं स त्वा प्रति वक्ष्यतीत्येनं ब्रूयात् ॥३॥ अथ यद्येनमूष्मसूपालभेत प्रजापतिꣳ शरणं प्रपन्नोऽभूवं स त्वा प्रति पेक्ष्यतीत्येनं ब्रूयादथ यद्येनꣳ स्पर्शेषूपालभेत मृत्युꣳ शरणं प्रपन्नोऽभूवं स त्वा प्रति धक्ष्यतीत्येनं ब्रूयात् ॥४॥ सर्वे स्वरा घोषवन्तो बल-

प्रजापतीचें अविशिष्ट, चंद्राचें स्पष्ट, वायूचें मृदु व सौम्य, इंद्राचे सौम्य व जोरदार, बृहस्पतीचें क्रौंच पक्ष्याच्या आवाजासारखें, आणि वरुणाचे फुटलेल्या कांस्यपात्राप्रमाणें अशा या गानांपैकीं वरुणाचें वर्ज्य करून बाकीच्या सर्वांचा उपयोग करावा. १. गानप्रसंगीं देवांकरितां अमृत प्राप्त होवो असें ध्यान करावे. पितरांकरितां स्वधा, मनुष्यांकरितां आशा, पशूंकरितां तृण व उदक, यजमानाकरितां स्वर्गलोक, स्व तःकरितां अन्न याप्रमाणें मनानें ध्यान करून एकाग्र चित्तयुक्त स्वरादियुक्त स्तवन करावें. २. सर्व स्वर हे इंद्राचा देह आहेत. सर्व ऊष्मवर्ण [श, ष, स, ह] प्रजापतीचा देह आहेत. सर्व स्पर्श [क इत्यादि व्यंजनें] मृत्यूचा देह आहेत. जर (कदाचित्) स्वराचा चुकीचा उच्चार केल्यामुळें कोणीं निंदा केली तर "मी इंद्राला शरण आहें, तुला काय बोलावयाचें ते इंद्र बोलेल" असें ह्मणावें. ३. ऊष्म वर्णांचा चुकीचा उच्चार केल्यामुळें कोणीं निंदा केली तर "मी प्रजापतीला शरण आहे, प्रजापति तुझें चूर्ण करून टाकील" असें ह्मणावें. स्पर्शांचा चुकीचा उच्चार केल्यामुळें कोणीं निंदा केली तर "मी मृत्यूला शरण आहें, मृत्यु तुझें भस्म करून टाकील" असें ह्मणावें. ४. सर्व स्वरांचा मोठ्यानें व जोरानें उच्चार करावा.

वन्तो वक्तव्या इंद्रे बलं ददानीति सर्वे ऊष्माणोऽग्रस्ता अनिरस्ता विवृता वक्तव्याः प्रजापतेरात्मानं परिददानीति सर्वे स्पर्शा लेशेनानभिनिहिता वक्तव्या मृत्योरात्मानं परिहराणीति ॥५॥ इति द्वाविंशः खंडः ॥२२॥

त्रयो धर्मस्कंधा यज्ञोऽध्ययनं दानमिति प्रथमस्तप एव द्वितीयो ब्रह्मचार्याचार्यकुलवासी तृतीयोऽत्यंतमात्मानमाचार्यकुलेऽवसादयन्सर्व एते पुण्यलोका भवन्ति ब्रह्मसंस्थोऽमृतत्वमेति ॥१॥ प्रजापतिर्लोकानभ्यतपत्तेभ्योऽभितप्तेभ्यस्त्रयी विद्या संप्रास्रवत्तामभ्यतपत्तस्या अभितप्ताया एतान्यक्षराणि संप्रास्रवन्त भूर्भुवः स्वरिति ॥२॥ तान्यभ्यतपत्तेभ्योऽभितप्तेभ्य ॐकारः संप्रास्रवत्तद्यथा शंकुना सर्वाणि पर्णानि

इंद्राला मी बल देतों असें ध्यान करावें. सर्व ऊष्म वर्ण अंतरापर्यंत प्रवेश करून, बाहेर (फार) न सोडलेले आणि स्पष्ट उच्चारावे. हे मी प्रजापतीला देत आहें असें ध्यान करावें. सर्व स्पर्श सावकाश उच्चारावे. मृत्यूपासून माझें रक्षण होवो असें ध्यान करावे.५.

धर्माचे तीन भाग आहेत. यज्ञ, अध्ययन व दान हा प्रथम भाग. ब्रह्मचारी आचार्यगृहीं रहाणें हा दुसरा भाग. (ब्रह्मचाऱ्यानें) सतत मरेपर्यंत आचार्यगृहीं रहाणें हा तिसरा भाग. हे सर्व पुण्यलोक पावतात (व कर्मफलभोगानंतर पुन्हां परत येतात). ब्रह्मज्ञानी असेल तो मात्र मृत्युरहित होतो.१. प्रजापतीनें (भू, भुव इत्यादि) लोकांच्या उद्देशानें (त्यांच्यामधून सार ग्रहण करण्याकरितां) तप (ह्मणजे ध्यान) केलें. ध्यान केलेल्या त्या लोकांपासून त्रयी विद्या [ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद] उत्पन्न झाली. त्या विद्येचें प्रजापतीनें ध्यान केलें तेव्हां भूः, भुवः आणि स्वः हीं (व्याहृतिरूप) अक्षरें उत्पन्न झालीं.२. त्यांचें ध्यान केलें तेव्हां त्यांपासून ॐकार उत्पन्न झाला. ज्याप्रमाणें पानाच्या देंठानें सर्व पान [=पानाचे सर्व अवयव] व्याप्त असतात त्याप्रमाणें ॐकाररूपी ब्रह्मानें

संतृण्णान्येवमोंकारेण सर्वा वाक् संतृण्णोंकार एवेदँ सर्वमोंकार एवेदँ सर्वम् ॥३॥ इति त्रयोविंशः खंडः ॥२३॥

ब्रह्मवादिनो वदन्ति यद्वसूनां प्रातःसवनं रुद्राणां माध्यंदिनँ सवनमादित्यानां च विश्वेषां च देवानां तृतीयसवनम् ॥१॥ क्व तर्हि यजमानस्य लोक इति स यस्तं न विद्यात्कथं कुर्यादथ विद्वान्कुर्यात् ॥२॥ पुरा प्रातरनुवाकस्योपाकरणाज्जघनेन गार्हपत्यस्योदङ्मुख उपविश्य स वासवँ सामाभिगायति ॥३॥ लो३कद्वारमपावा३र्णू३३ पश्येम त्वा वयं रा३३३३३ हु३म् आ३३ ज्या३यो३ आ३२१११ इति ॥४॥ अथ जुहोति नमोऽग्नये पृथिवीक्षिते लोकक्षिते लोकं मे यजमानाय विन्दैष वै यजमानस्य लोक एतास्मि ॥५॥ अत्र यजमानः परस्तादायुषः स्वाहापजहि परिघमित्युक्त्वोत्तिष्ठति तस्मै वसवः प्रातः-

सर्व शब्दजात [वाणी] व्याप्त आहे. हे सर्व ॐकारच आहे.३.

ब्रह्मवादी ह्मणतात— प्रातःसवन वसूंचें (ह्मणून इहलोक वसूंचा), माध्यंदिन सवन रुद्रांचें (ह्मणून अंतरिक्षलोक रुद्रांचा) आणि तृतीय सवन आदित्य व विश्वेदेव यांचें (ह्मणून द्युलोक त्यांचा) आहे.१. मग आतां यजमानाला लोक राहिला कोणता ? लोक (प्राप्त कसा करून घ्यावा हें यजमानाला) माहीत नसेल तर तो (यज्ञहोमादि) कर्म कसें करील ? ह्मणून याचें ज्ञान करून घेऊन नंतर कर्म करावीं.२. (तें असें–) अगोदर प्रातरनुवाक सवनाच्या आरंभीं गार्हपत्य अग्नीकडे पाठ करून व उत्तरेकडे तोंड करून वसूंच्या सामाचें गायन करावें.३. (तें असें— हे अग्ने,) या (पृथिवी) लोकाच्या प्राप्तीकरितां द्वार उघड. ह्मणजे त्या द्वारानें आह्मी तुला अवलोकन करूं व (तुझ्या अनुज्ञेनें पृथिवीचे) भोग भोगूं.४. नंतर पुढील मंत्रानें आहुति द्यावी— हे पृथिवीलोकनिवासी अग्ने, यजमान जो मी त्या मला (हा) लोक प्राप्त करून दे. यजमान अशा माझा हा लोक आहे. या लोकीं हवन करणारा मी आयुष्य संपल्यावर [=मरण

सवन५ संप्रयच्छन्ति ॥६॥ पुरा माध्यंदिनस्य सवनस्योपाकरणाज्जघनेनाग्नीध्रीयस्योदङ्मुख उपविश्य स रौद्र५ सामाभिगायति ॥७॥ लो३कद्वारमपावा३र्णू३३ पश्येम त्वा वयं वैरा३३३३३ हु३म् आ३३ ज्या३यो३ आँ३२१११ इति ॥८॥ अथ जुहोति नमो वायवेऽन्तरिक्षक्षिते लोकक्षिते लोकं मे यजमानाय विन्दैष वै यजमानस्य लोक एतास्मि ॥९॥ अत्र यजमानः परस्तादायुषः स्वाहापजहि परिघमित्युक्त्वोत्तिष्ठति तस्मै रुद्रा माध्यंदिन५ सवन५ संप्रयच्छन्ति ॥१०॥ पुरा तृतीयसवनस्योपाकरणाज्जघनेनाहवनीयस्योदङ्मुख उपविश्य स आदित्य५ स वैश्वदेव५ सामाभिगायति ॥११॥ लो३कद्वारमपावा३र्णू३३ पश्येम त्वा वय५ स्वारा३३३३३ हु३म् आ३३

पावल्यावर] या लोकीं येईन. इति स्वाहा. (तेव्हां या) लोकद्वाराची अर्गळा तूं काढ. असा मंत्र ह्मणून उभे रहावे. त्याला वसु प्रातःसवन देतात [ह्मणजे हा लोक देतात].५.६. माध्यंदिन सवनाच्या आरभीं अग्निध्रिय अग्नीकडे पाठ करून व उत्तरेकडे तोंड करून रुद्रांच्या सामाचे गायन करावे.७. (ते असे— हे अग्ने,) या (अन्तरिक्ष) लोकाच्या प्राप्तीकरिता दार उघड. ह्मणजे त्या द्वाराने आह्मी तुला अवलोकन करू व (तुझ्या अनुज्ञेने अन्तरिक्षलोकाचे) भोग भोगूं.८. नंतर पुढील मंत्राने आहुति द्यावी— हे अन्तरिक्षलोकनिवासी वायो, यजमान जो मी त्या मला (अन्तरिक्ष) लोक प्राप्त करून दे. यजमान अशा माझा हा (अन्तरिक्ष) लोक आहे. या लोकीं हवन करणारा मी आयुष्य संपल्यावर [मरण पावल्यावर] त्या लोकीं येईन. इति स्वाहा. (तेव्हा अन्तरिक्ष—)लोकद्वाराची अर्गळा तूं काढ. असा मंत्र ह्मणून उभे रहावे. त्याला रुद्र माध्यंदिन सवन देतात [ह्मणजे अन्तरिक्ष लोक देतात].९.१०. तृतीय सवनाच्या आरभीं आहवनीय अग्नीकडे पाठ करून व उत्तरेकडे तोंड करून आदित्य व विश्वेदेव यांच्या सामाचे गायन करावे.११. (ते असे— हे अग्ने,) या

ज्या३यो३ आ३२१११ इति ॥१२॥ आदित्यमथ वैश्वदेवं लो३कद्वारमपावा३र्णू३३ पश्येम त्वा वयꣳ साम्रा३३३३३ हु३म् आ३३ ज्या३यो३ आ३२१११ इति ॥१३॥ अथ जुहोति नम आदित्येभ्यश्च विश्वेभ्यश्च देवेभ्यो दिविक्षिद्भ्यो लोकक्षिद्भ्यो लोकं मे यजमानाय विन्दत ॥१४॥ एष वै यजमानस्य लोक एतास्म्यत्र यजमानः परस्तायुषः स्वाहापहत परिघमित्युक्त्वोत्तिष्ठति ॥१५॥ तस्मा आदित्याश्च विश्वे च देवास्तृतीयꣳ सवनꣳ संप्रयच्छन्त्येष ह वै यज्ञस्य मात्रां वेद य एवं वेद य एवं वेद ॥१६॥ इति चतुर्विंशः खंडः ॥२४॥ इति द्वितीयोऽध्यायः ॥२॥

## अथ तृतीयोऽध्यायः ॥

ॐ असौ वा आदित्यो देवमधु तस्य द्यौरेव तिरश्चीनवंशोऽन्तरिक्षमपूपो मरीचयः पुत्राः ॥१॥ तस्य ये प्रांचो रश्मयस्ता एवास्य

(स्वर्ग–) लोकाच्या प्राप्तीकरितां दार उघड. ह्मणजे त्या द्वाराने आह्मी तुला अवलोकन करू व (तुझ्या अनुज्ञेने द्युलोकाचे) स्वातंत्र्य भोगूं.१२. १३. नंतर पुढील मंत्राने आहुति द्यावी– हे स्वर्गलोकनिवासी आदित्य व विश्वेदेवहो, यजमान जो मी त्या मला (स्वर्ग) लोक प्राप्त करून द्या.१४. यजमान अशा माझा हा (स्वर्ग) लोक आहे. या लोकीं हवन करणारा मी आयुष्य संपल्यावर [मरण पावल्यावर] त्या लोकीं येईन. इति स्वाहा. (तेव्हां स्वर्ग–) लोकद्वाराची अर्गळा तुह्मी काढा. असा मंत्र ह्मणून उभें रहावे.१५. त्याला आदित्य आणि विश्वेदेव तृतीय सवन देतात. याप्रमाणे यज्ञाचे यथार्थ स्वरूप यजमानाने जाणावें.१६.

## अध्याय तिसरा.

(आतां सवित्याची उपासना सागतात–) हा आदित्य देवांचा (जणूं काय) मधुच आहे. द्युलोक ही वृक्षाची फांदी, अंतरिक्ष हे पोळें. सूर्याचे किरण हे भ्रमरपुत्र.१. त्याचे [सूर्याचे] जे प्राच्य किरण ती

प्राच्यो मधुनाड्य ऋच एव मधुकृत ऋग्वेद एव पुष्पं ता अमृता आपस्ता वा एता ऋचः ॥२॥ एतमृग्वेदमभ्यतपंस्तस्याभितप्तस्य यशस्तेज इंद्रियं वीर्यमन्नाद्यं रसोऽजायत ॥३॥ तद्व्यक्षरत्तदादित्यमभितोऽश्रयत्तद्वा एतद्यदेतदादित्यस्य रोहितं रूपम् ॥४॥ इति प्रथमः खंडः॥

अथ येऽस्य दक्षिणा रश्मयस्ता एवास्य दक्षिणा मधुनाड्यो यजूंष्येव मधुकृतो यजुर्वेद एव पुष्पं ता अमृता आपः ॥१॥ तानि वा एतानि यजूंष्येतं यजुर्वेदमभ्यतपंस्तस्याभितप्तस्य यशस्तेज इंद्रियं वीर्यमन्नाद्यं रसोऽजायत ॥२॥ तद्व्यक्षरत्तदादित्यमभितोऽश्रयत्तद्वा एतद्यदेतदादित्यस्य शुक्लं रूपम् ॥३॥ इति द्वितीयः खंडः ॥२॥

मधाच्या पोळ्याचीं पूर्वेकडील छिद्रें. ऋचा हे मध करणारे भ्रमर. ऋग्वेद [ऋग्वेदविहित कर्म] हें (ज्यामधून मध आणतात तें) पुष्प. कर्मांचे ठिकाणीं प्रयुक्त असें सोम, आज्य, पय इत्यादि हें अत्यंत रसमय उदक. हीं घेऊन या ऋचा या ऋग्वेदाचें तपन करतात [ह्म० ज्याप्रमाणें भ्रमर पुष्पामधून रस घेऊन त्या पुष्पांना ताप देतात, त्याप्रमाणें हे मंत्र कर्मांमधून कर्मांचे ठिकाणीं स्थित असे उदकमय रस घेऊन त्यांचें तपन करतात]. या तप्त ऋग्वेदापासून यश, तेज, इंद्रियांची अविकलता, वीर्य, अन्न इत्यादि रस उत्पन्न होतो.२.३. तें (यशादि) आदित्यापर्यंत जातें, आदित्याचा आश्रय करतें. आदित्याचें रक्तवर्ण रूप तें हें होय.४.

आदित्याचे जे दक्षिण किरण तीं या पोळ्याचीं दक्षिणेकडील छिद्रें. यजु हे मध करणारे भ्रमर. यजुर्वेदविहित कर्म हें पुष्प. कर्मांचे ठिकाणीं प्रयुक्त असें आज्य इत्यादि हें अत्यंत रसमय उदक. हें घेऊन हे यजु या यजुर्वेदाचें तपन करतात. तप्त यजुर्वेदापासून यश, तेज, इंद्रियांची अविकलता, वीर्य, अन्न इत्यादि रस उत्पन्न होतो.१.२. तें (यशादि) आदित्यापर्यंत जातें, आदित्याचा आश्रय करतें. आदित्याचें शुक्ल रूप तें हें होय.३.

अथ येऽस्य प्रत्यंचो रश्मयस्ता एवास्य प्रतीच्यो मधुनाड्यः सामान्येव मधुकृतः सामवेद एव पुष्पं ता अमृता आपः ॥१॥ तानि वा एतानि सामान्येतँ सामवेदमभ्यतपंस्तस्याभितप्तस्य यशस्तेज इंद्रियं वीर्यमन्नाद्यं रसोऽजायत ॥२॥ तद्व्यक्षरत्तदादित्यमभितोऽश्रयत्तद्वा एतद्यदेतदादित्यस्य कृष्णं रूपम् ॥३॥ इति तृतीयः खंडः

अथ येऽस्योदंचो रश्मयस्ता एवास्योदीच्यो मधुनाड्योऽथर्वांगिरस एव मधुकृत इतिहासपुराणं पुष्पं ता अमृता आपः ॥१॥ ते वा एतेऽथर्वांगिरस एतदितिहासपुराणमभ्यतपंस्तस्याभितप्तस्य यशस्तेज इंद्रियं वीर्यमन्नाद्यं रसोऽजायत ॥२॥ तद्व्यक्षरत्तदादित्यमभितोऽश्रयत्तद्वा एतद्यदेतदादित्यस्य परं कृष्णं रूपम् ॥३॥ इति चतुर्थः खंडः ॥४॥

आदित्याचे जे पश्चिम किरण तीं या पोळ्याचीं पश्चिमेकडील छिद्रें. साम हे मध करणारे भ्रमर. सामवेदविहित कर्म हें पुष्प. कर्माचे ठिकाणीं प्रयुक्त असें आज्य इत्यादि हें अत्यंत रसमय उदक. हें घेऊन हे साम या सामवेदाचें तपन करतात. तप्त सामवेदापासून यश, तेज, इंद्रियांची अविकलता, वीर्य, अन्न इत्यादि रस उत्पन्न होतो.१.२. तें (यशादि) आदित्यापर्यंत जातें, आदित्याचा आश्रय करतें. आदित्याचें कृष्ण रूप तें हें होय.३.

आदित्याचे जे उत्तर किरण तीं या पोळ्याचीं उत्तरेकडील छिद्रें. अथर्वांगिरस मंत्र हे मध करणारे भ्रमर. इतिहासपुराण हें पुष्प. कर्माचे ठिकाणीं प्रयुक्त असें आज्य इत्यादि हें अत्यंत रसमय उदक. हे घेऊन हे अथर्वांगिरस या इतिहासपुराणाचें तपन करतात. तप्त इतिहासपुराणापासून यश, तेज, इंद्रियांची अविकलता, वीर्य, अन्न इत्यादि रस उत्पन्न होतो.१.२. तें (यशादि) आदित्यापर्यंत जातें, आदित्याचा आश्रय करतें. आदित्याचें अतिशय कृष्ण रूप तें हें होय.३.

अथ येऽस्योर्ध्वा रश्मयस्ता एवास्योर्ध्वा मधुनाड्यो गुह्या एवादेशा मधुकृतो ब्रह्मैव पुष्पं ता अमृता आपः ॥१॥ ते वा एते गुह्या आदेशा एतद्ब्रह्माभ्यतपंस्तस्याभितप्तस्य यशस्तेज इंद्रियं वीर्यमन्नाद्यं रसोऽजायत ॥२॥ तद्व्यक्षरत्तदादित्यमभितोऽश्रयत्तद्वा एतद्यदेतदादित्यस्य मध्ये क्षोभत इव ॥३॥ ते वा एते रसानां रसा वेदा हि रसास्तेषामेते रसास्तानि वा एतान्यमृतानाममृतानि वेदा ह्यमृतास्तेषामेतान्यमृतानि ॥४॥ इति पंचमः खंडः ॥५॥

तद्यत्प्रथममममृतं तद्वसव उपजीवन्त्यग्निना मुखेन न वै देवा अश्नन्ति न पिबन्त्येतदेवामृतं दृष्ट्वा तृप्यन्ति ॥१॥ त एतदेव रूपमभिसंविशन्त्येतस्माद्रूपादुद्यन्ति ॥२॥ स य एतदेवममृतं वेद वसूनामेवैको भूत्वाऽग्निनैव मुखेनैतदेवामृतं दृष्ट्वा तृप्यति स एतदेव रूप-

आदित्याचे जे ऊर्ध्व किरण तीं या पोळ्याचीं ऊर्ध्व छिद्रें. गूढ मंत्र हे मध करणारे भ्रमर. ब्रह्म हें पुष्प. कर्मांचे ठिकाणीं प्रयुक्त असें आज्य इत्यादि हें अत्यंत रसमय उदक. हें घेऊन हे गूढ मंत्र या ब्रह्माचें तपन करतात. तप्त ब्रह्मापासून यश, तेज, इंद्रियांची अविकलता, वीर्य, अन्न इत्यादि रस उत्पन्न होतो.१.२. तें (यशादि) आदित्यापर्यंत जातें, आदित्याचा आश्रय करतें. आदित्याचे मध्यभागीं जें (ज्ञान्याला) चलन पावत आहे असें दिसतें तें हें होय.३. याप्रमाणें रोहित इत्यादि जे सांगितले ते रसांचे रस होत. वेद हे रस आणि त्यांचे हे रस. हीं रोहित इत्यादि जीं रूपें तीं अमृतांचीं अमृतें. वेद हीं अमृतें आणि त्यांचीं हीं अमृतें.४.

(यांपैकीं) जें (रोहितरूपी) प्रथम अमृत तें वसु अग्निरूपी मुखानें सेवन करतात. देव खात नाहींत, पीत नाहींत, केवळ हे अमृत पाहूनच तृप्त होतात.१. ते याच रूपामध्यें प्रवेश करतात व याच रूपापासून उदय पावतात [बलसंपन्न होतात].२. याप्रमाणे हें अमृत जो जाणतो

मभिसंविशत्येतस्माद्रूपादुदेति ॥३॥ स यावदादित्यः पुरस्तादुदेता पश्चादस्तमेता वसूनामेव तावदाधिपत्यꣳ स्वाराज्यं पर्येता ॥४॥ इति षष्ठः खंडः ॥६॥

अथ यत् द्वितीयममृतं तद्रुद्रा उपजीवन्तींद्रेण मुखेन न वै देवा अश्नन्ति न पिबन्त्येतदेवामृतं दृष्ट्वा तृप्यन्ति ॥१॥ त एतदेव रूपमभिसंविशन्त्येतस्माद्रूपादुद्यन्ति ॥२॥ स य एतदेवममृतं वेद रुद्राणामेवैको भूत्वेंद्रेणैव मुखेनैतदेवामृतं दृष्ट्वा तृप्यति स एतदेव रूपमभिसंविशत्येतस्माद्रूपादुदेति ॥३॥ स यावदादित्यः पुरस्तादुदेता पश्चादस्तमेता द्विस्तावद्दक्षिणत उदेतोत्तरतोऽस्तमेता रुद्राणामेव तावदाधिपत्यꣳ स्वाराज्यं पर्येता ॥४॥ इति सप्तमः खंडः ॥७॥

अथ यत्तृतीयममृतं तदादित्या उपजीवन्ति वरुणेन मुखेन न

तो वसूंशीं एकरूप होत्साता अग्निरूपी मुखानें हें अमृत पाहून तृप्त होतो. तो याच रूपामध्ये प्रवेश करतो व यापासूनच उदय पावतो.३. जोपर्यंत सूर्य पूर्वेकडे उदय पावत राहील व पश्चिमेकडे अस्त पावत राहील, तोंपर्यंत त्याला वसूंप्रमाणें आधिपत्य व स्वातंत्र्य मिळेल.४.

(यांपैकीं) जे दुसरें अमृत तें रुद्र इंद्रमुखानें सेवन करतात. देव खात नाहींत, पीत नाहींत, केवळ हें अमृत पाहूनच तृप्त होतात.१. ते याच रूपामध्यें प्रवेश करतात व याच रूपापासून उदय पावतात.२. याप्रमाणें हें अमृत जो जाणतो तो रुद्रांशीं एकरूप होत्साता इंद्ररूपी मुखानें हें अमृत पाहून तृप्त होतो. तो याच रूपामध्यें प्रवेश करतो व यापासूनच उदय पावतो.३. जोंपर्यंत सूर्य पूर्वेकडे उदय पावत राहील व पश्चिमेकडे अस्त पावत राहील व त्यानंतर दक्षिणेकडे उदय पावत राहील व उत्तरेकडे अस्त पावत राहील तितका कालपर्यंत [ह्म० वसूंच्या दुप्पट] त्याला रुद्रांप्रमाणें आधिपत्य व स्वातंत्र्य मिळेल.४.

(यांपैकीं) जें तिसरें अमृत तें आदित्य वरुणमुखानें सेवन करतात.

वै देवा अश्नन्ति न पिबन्त्येतदेवामृतं दृष्ट्वा तृप्यन्ति ॥१। त एतदेव रूपमभिसंविशन्त्येतस्माद्रूपादुद्यन्ति ॥२॥ स य एतदेवममृतं वेदादित्यानामेवैको भूत्वा वरुणेनैव मुखेनैतदेवामृतं दृष्ट्वा तृप्यति स एतदेव रूपमभिसंविशत्येतस्माद्रूपादुदेति ॥३॥ स यावदादित्यो दक्षिणत उदेतोत्तरतोऽस्तमेता द्विस्तावत्पश्चादुदेता पुरस्तादस्तमेतादित्यानामेव तावदाधिपत्यꣳ स्वाराज्यं पर्येता ॥४॥ इत्यष्टमः खंडः॥

अथ यच्चतुर्थममृतं तन्मरुत उपजीवन्ति सोमेन मुखेन न वै देवा अश्नन्ति न पिबन्त्येतदेवामृतं दृष्ट्वा तृप्यन्ति ॥१॥ त एतदेव रूपमभिसंविशन्त्येतस्माद्रूपादुद्यन्ति ॥२॥ स य एतदेवममृतं वेद मरुतामेवैको भूत्वा सोमेनैव मुखेनैतदेवामृतं दृष्ट्वा तृप्यति स एतदेव रूपमभिसंविशत्येतस्माद्रूपादुदेति ॥३॥ स यावदादित्यः पश्चादु-

देव खात नाहींत, पीत नाहींत, केवळ हें अमृत पाहूनच तृप्त होतात.१. ते याच रूपामध्यें प्रवेश करतात व याच रूपापासून उदय पावतात.२. याप्रमाणें हें अमृत जो जाणतो तो आदित्यांशीं एकरूप होत्साता वरुणरूपी मुखानें हें अमृत पाहून तृप्त होतो. तो याच रूपामध्यें प्रवेश करतो व यापासूनच उदय पावतो.३. जोपर्यंत सूर्य दक्षिणेकडे उदय पावत राहील व उत्तरेकडे अस्त पावत राहील व त्यानंतर पश्चिमेकडे उदय पावत राहील व पूर्वेकडे अस्त पावत राहील तितका कालपर्यंत [ह्म० रुद्रांच्या दुप्पट] त्याला आदित्यांप्रमाणें आधिपत्य व स्वातंत्र्य मिळेल.४.

(यांपैकीं) जें चवथें अमृत तें मरुत् सोममुखानें सेवन करतात. देव खात नाहींत, पीत नाहींत, केवळ हें अमृत पाहूनच तृप्त होतात.१. ते याच रूपामध्यें प्रवेश करतात व याच रूपापासून उदय पावतात.२. याप्रमाणें हें अमृत जो जाणतो तो मरुतांशीं एकरूप होत्साता सोमरूपी मुखानें हें अमृत पाहून तृप्त होतो. तो याच रूपामध्यें प्रवेश करतो व यापासूनच उदय पावतो.३. जोंपर्यंत सूर्य पश्चिमेकडे उदय पावत राहील

देता पुरस्तादस्तमेता द्विस्तावदुत्तरत उदेता दक्षिणतोऽस्तमेता मरुतामेव तावदाधिपत्यꣳ स्वाराज्यं पर्येता ॥४॥ इति नवमः खंडः ॥९॥

अथ यत्पंचमममृतं तत्साध्या उपजीवन्ति ब्रह्मणा मुखेन न वै देवा अश्नन्ति न पिबन्त्येतदेवामृतं दृष्ट्वा तृप्यन्ति ॥१॥ त एतदेव रूपमभिसंविशन्त्येतस्माद्रूपादुद्यन्ति ॥२॥ स य एतदेवममृतं वेद साध्यानामेवैको भूत्वा ब्रह्मणैव मुखेनैतदेवामृतं दृष्ट्वा तृप्यति स एतदेव रूपमभिसंविशत्येतस्माद्रूपादुदेति ॥३॥ स यावदादित्य उत्तरत उदेता दक्षिणतोऽस्तमेता द्विस्तावदूर्ध्व उदेतार्वाङस्तमेता साध्यानामेव तावदाधिपत्यꣳ स्वाराज्यं पर्येता ॥४॥ इति दशमः खंडः

अथ तत ऊर्ध्व उदेत्य नैवोदेता नास्तमेतैकल एव मध्ये स्थाता

व पूर्वेकडे अस्त पावत राहील व त्यानंतर उत्तरेकडे उदय पावत राहील व दक्षिणेकडे अस्त पावत राहील तितका कालपर्यंत [ह्म० आदित्यांच्या दुप्पट] त्याला मरुतांप्रमाणें आधिपत्य व स्वातंत्र्य मिळेल.४.

(यांपैकीं) जें पांचवें अमृत तें साध्य ब्रह्ममुखानें सेवन करतात. देव खात नाहींत, पीत नाहींत, केवळ हें अमृत पाहूनच तृप्त होतात.१. ते याच रूपामध्यें प्रवेश करतात व याच रूपापासून उदय पावतात.२. याप्रमाणें हें अमृत जो जाणतो तो साध्यांशीं एकरूप होत्साता ब्रह्मारूपी मुखानें हें अमृत पाहून तृप्त होतो. तो याच रूपामध्यें प्रवेश करतो व यापासूनच उदय पावतो.३. जोंपर्यंत सूर्य उत्तरेकडे उदय पावत राहील व दक्षिणेकडे अस्त पावत राहील व त्यानंतर ऊर्ध्व दिशेकडे उदय पावत राहील व अधर दिशेकडे अस्त पावत राहील तितका कालपर्यंत [ह्म० मरुतांच्या दुप्पट] त्याला साध्यांप्रमाणें आधिपत्य व स्वातंत्र्य मिळेल.४.

(याप्रमाणें उदय व अस्त करून सर्व प्राण्यांचा आपले ठिकाणीं समावेश केल्या—) नंतर (पुन्हां आदित्य) प्रकट होऊन उदय किंवा अस्त न पावतां एकटाच मध्यें स्थित राहिला. (या प्रसंगीं कोणी वसु आदि

तदेष श्लोकः ॥१॥ न वै तत्र न निम्लोच नोदियाय कदाचन ॥ देवास्तेनाहꣳ सत्येन मा विराधिषि ब्रह्मणेति ॥२॥ न ह वा अस्मा उदेति न निम्लोचति सकृद्दिवा हैवास्मै भवति य एतामेवं ब्रह्मोपनिषदं वेद ॥३॥ तद्धैतत् ब्रह्मा प्रजापतय उवाच प्रजापतिर्मनवे मनुः प्रजाभ्यस्तद्धैतदुद्दालकायारुणये ज्येष्ठाय पुत्राय पिता ब्रह्म प्रोवाच॥४॥ इदं वाव तज्ज्येष्ठाय पुत्राय पिता ब्रह्म प्रब्रूयात्प्रणाय्याय वान्तेवासिने ॥५॥ नान्यस्मै कस्मैचन यद्यप्यस्मा इमामद्भिः परिगृहीतां धनस्य पूर्णां दद्यादेतदेव ततो भूय इत्येतदेव ततो भूय इति ॥६॥ इत्येकादशः खंडः ॥११॥

गायत्री वा इदꣳ सर्वं भूतं यदिदं किंच वाग्वै गायत्री वाग्वा

यांशीं समान असा पूर्वी सांगितलेल्या क्रमानें आदित्य आत्मरूप आहे असें जाणणारा हा मंत्र पाहून उत्पन्न होत्साता दुसऱ्या प्रश्नकर्त्याला पुढीलप्रमाणे बोलला—)१. (मी ज्या ब्रह्मलोकामधून आलों) तेथें सविता केव्हांहि अस्त पावत नाहीं अथवा उगवत नाहीं. हे देवहो, (मी सत्य बोलत आहें याला तुह्मी साक्षी आहांत) त्या सत्याचे बलानें मी ब्रह्मापासून वेगळा होऊं नये.२. याप्रमाणें (आदित्य हा देवमधु इत्यादि) हें ब्रह्माचें गूढ जो जाणतो त्याला (आदित्य) उदय पावत नाहीं अथवा अस्त पावत नाहीं. त्याला सर्वदा दिवसच असतो.३. हें (गूढ ज्ञान) ब्रह्मदेवानें प्रजापतीला सांगितलें, प्रजापतीनें मनूला सांगितलें, मनूनें (इक्ष्वाकु आदि) प्रजांना सांगितलें. तें हें (परंपरागत) ज्ञान अरुणीने आपला ज्येष्ठ पुत्र उद्दालक याला सांगितलें.४. हें ज्ञान त्याप्रमाणे पित्यानें आपल्या ज्येष्ठ पुत्राला सांगावें अथवा योग्य शिष्याला सांगावें.५. इतर कोणालाहि सांगूं नये. उदकानें वेष्टित व धनानें पूर्ण अशा पृथ्वीचें दान केलें तरी (त्याचा मोबदला ह्मणून) हें ब्रह्मज्ञान इतराला सांगूं नये. कारण पृथ्वीच्या दानापेक्षां या ज्ञानाच्या दानाची किंमत अधिक आहे.६.

इद९ँ सर्वं भूतं गायति च त्रायते च ॥१॥ या वै सा गायत्रीयं वाव सा येयं पृथिव्यस्या९ँ हीद९ँ सर्वं भूतं प्रतिष्ठितमेतामेव नातिशीयते ॥२॥ या वै सा पृथिवीयं वाव सा यदिदमस्मिन्पुरुषे शरीरमस्मिन्हीमे प्राणाः प्रतिष्ठिता एतदेव नातिशीयन्ते ॥३॥ यद्वै तत्पुरुषे शरीरमिदं वाव तद्यदिदमस्मिन्नन्तः पुरुषे हृदयमस्मिन्हीमे प्राणाः प्रतिष्ठिता एतदेव नातिशीयन्ते ॥४॥ सैषा चतुष्पदा षड्विधा गायत्री तदेतदृचाभ्यनूक्तम् ॥५॥ तावानस्य महिमा ततो ज्यायांश्च पूरुषः ॥ पादोऽस्य सर्वा भूतानि त्रिपादस्यामृतं दिवीति ॥६॥ यद्वै तद्ब्रह्मेतीदं वाव तद्योऽयं बहिर्धा पुरुषादाकाशो यो वै

गायत्री हें सर्व प्राणिजात अथवा स्थावरजंगमादिजात आहे. गायत्री ह्मणजे वाणी होय. वाणीच या सर्व प्राणिजाताला शब्द करण्यास लावते व सर्वांचें रक्षण करते.१. या लक्षणांनीं युक्त जी गायत्री ती पृथिवी होय. कारण या पृथिवीचे ठिकाणीं सर्व प्राणिजात स्थित आहेत. या पृथिवीहून इतर असें कांहीं नाहीं.२. या लक्षणांनीं युक्त जी पृथिवी ती या पुरुषाचें जें हें शरीर तेंच होय. कारण या शरीराचे ठिकाणीं सर्व प्राण स्थित आहेत. (प्राण) या शरीराहून इतर असे असूं शकत नाहीत.३. या लक्षणांनीं युक्त जे शरीर ते या पुरुषदेहाच्या अंतर्भागीं असलेले हृदय होय. कारण हृदयामध्यें सर्व प्राण स्थित आहेत. हृदयावांचून प्राण असूं शकत नाहींत.४. ती ही चतुष्पद [छंदाचे चार चरण] सहा प्रकारची [वाणी, भूतमात्र, पृथिवी, शरीर, हृदय व प्राण] गायत्री आहे. हे पुढील ऋचेनें स्पष्ट दाखविलें आहे.५. या (गायत्रीरूपी) ब्रह्माचा हा सर्व विभूतिविस्तार आहे. विकाररहित पुरुष याहून श्रेष्ठ आहे. सर्व भूतें हा याचा चतुर्थ भाग आहे [एक पाद आहे]. याचे मृत्युरहित पुरुषरूपी तीन भाग प्रकाशमान अशा स्वस्वरूपामध्यें स्थित आहेत.६. हें त्रिपाद अमृत (पुरुष) ह्मणजे ब्रह्म. पुरुषा-

स बहिर्धा पुरुषादाकाशः ॥७॥ अयं वाव स योऽयमंतः पुरुष आकाशो यो वै सोऽन्तः पुरुष आकाशः ॥८॥ अयं वाव स योऽयमंतर्हृदय आकाशस्तदेतत्पूर्णमप्रवर्ति पूर्णामप्रवर्तिनीꣳ श्रियं लभते य एवं वेद ॥९॥ इति द्वादशः खंडः ॥१२॥

तस्य ह् वा एतस्य हृदयस्य पंच देवसुषयः स योऽस्य प्राङ् सुषिः स प्राणस्तच्चक्षुः स आदित्यस्तदेतत्तेजोऽन्नाद्यमित्युपासीत तेजस्व्यन्नादो भवति य एवं वेद ॥१॥ अथ योऽस्य दक्षिणः सुषिः स व्यानस्तच्छ्रोत्रꣳ स चंद्रमास्तदेतच्छ्रीश्च यशश्चेत्युपासीत श्रीमान्यशस्वी भवति य एवं वेद ॥२॥ अथ योऽस्य प्रत्यङ् सुषिः सोऽपानः सा वाक् सोऽग्निस्तदेतद्ब्रह्मवर्चसमन्नाद्यमित्युपासीत ब्रह्मवर्चस्यन्नादो भवति य एवं वेद ॥३॥ अथ योऽस्योदङ् सुषिः स समान-

हून बाह्य जें आकाश तें बाह्य पुरुषरूपी आकाश.७. पुरुषाचे अंतर्भागीं जें आकाश [हृदयाकाश] तें अंतःपुरुषरूपी आकाश.८. हृदयकमलाचे ठिकाणीं जें आकाश तें हाच पुरुष (अथवा ब्रह्म) होय. हे पूर्ण [सर्वव्यापी] आहे व अप्रवर्ति [प्रवर्ति=एका ठिकाणाहून निघून दुसऱ्या ठिकाणीं जाणारें. अप्रवर्ति=त्याच्या उलट, कारण सर्वव्यापी] आहे. हें जो जाणतो त्याला पूर्ण व स्थिर असे वैभव प्राप्त होतें.९.

अशा या हृदयाचीं पांच द्वारें आहेत. याचें पूर्वेकडील द्वार ह्मणजे प्राण. तोच चक्षु व तोच आदित्य. त्याची तेज, अन्न इत्यादि प्रकारें उपासना करावी. हे जो जाणतो तो तेजस्वी व (पुष्कळ) अन्न खाण्यास समर्थ होतो.१. याचें जें दक्षिणेकडील द्वार तो व्यान, तोच श्रोत्र. तोच चंद्रमा. त्याची श्री व यश या रूपानें उपासना करावी. हें जो जाणतो तो श्रीनें व यशानें संपन्न होतो.२. याचें जें पाश्चिमेकडील द्वार तो अपान. तोच वाणी, तोच अग्नि. त्याची ब्रह्मतेज व अन्न इत्यादि रूपानें उपासना करावी. हें जो जाणतो तो ब्रह्मतेजानें संपन्न होतो,

स्तन्मनः स पर्जन्यस्तदेतत्कीर्तिश्च व्युष्टिश्चेत्युपासीत कीर्तिमान्व्युष्टिमान्भवति य एवं वेद ॥४॥ अथ योऽस्योर्ध्वः सुषिः स उदानः स वायुः स आकाशस्तदेतदोजश्च महश्चेत्युपासीतौजस्वी महस्वान्भवति य एवं वेद ॥५॥ ते वा एते पंच ब्रह्मपुरुषाः स्वर्गस्य लोकस्य द्वारपाः स य एतानेवं पंच ब्रह्मपुरुषान्स्वर्गस्य लोकस्य द्वारपान्वेदास्य कुले वीरो जायते प्रतिपद्यते स्वर्गं लोकं य एतानेवं पंच ब्रह्मपुरुषान्स्वर्गस्य लोकस्य द्वारपान्वेद ॥६॥ अथ यदतः परो दिवो ज्योतिर्दीप्यते विश्वतः पृष्ठेषु सर्वतः पृष्ठेष्वनुत्तमेषूत्तमेषु लोकेष्विदं वाव तद्यदिदमस्मिन्नन्तः पुरुषे ज्योतिस्तस्यैषा दृष्टिः यत्रैतदस्मिञ्छरीरे संस्पर्शेनोष्णिमानं विजानाति तस्यैषा श्रुतिर्यत्रैतत्कर्णावपिगृह्य निनदमिव नदथुरिवाग्नेरिव ज्वलत उपशृणोति तदेतत् दृष्टं च श्रुतं चेत्युपा-

(पुष्कळ) अन्न खाण्यास समर्थ होतो.३. याचें जें उत्तरेकडील द्वार तो समान. तोच मन, तोच पर्जन्य. त्याची कीर्ति आणि कान्ति या रूपानें उपासना करावी. हें जो जाणतो तो कीर्तिमान् व कान्तिमान् होतो.४. याचें जें ऊर्ध्व द्वार तो उदान. तोच वायु, तोच आकाश. त्याची ओज [बल] व महत्त्व या रूपानें उपासना करावी. हें जो जाणतो तो बलसंपन्न व महान् होतो.५. याप्रमाणें हे पांच (हृदयस्थ) ब्रह्माचे सेवक आहेत, (हृदयस्थ) स्वर्गलोकाचे द्वारपाल आहेत. स्वर्गलोकाच्या या पांच ब्रह्मसेवक द्वारपालांना जो जाणतो त्याच्या कुळामध्यें वीर पुत्र होतो. स्वर्गलोकाच्या या पांच ब्रह्मसेवक द्वारपालांना जो जाणतो त्याला स्वर्गलोक प्राप्त होतो.६. आतां या स्वर्गलोकाच्या पलीकडे, सर्व संसाराच्या पलीकडे, जी ज्योति अनुत्तम [ज्याहून उत्तम दुसरा नाहीं] अशा (परमात्म्याच्या सन्निध) उत्तम लोकामध्यें प्रकाशमान आहे ती ज्योति पुरुषाच्या अंतर्भागीं आहे. या शरीराला स्पर्श करून जी उष्णता जाणतां येते ती याची दृष्टि. कर्ण दाबले असतां जो मोठा (रथ चालल्यासारखा) आवाज,

सीत चक्षुष्यः श्रुतो भवति य एवं वेद य एवं वेद ॥७॥ इति त्रयोदशः खंडः ॥१३॥

सर्वं खल्विदं ब्रह्म तज्जलानिति शान्त उपासीताथ खलु क्रतुमयः पुरुषो यथाक्रतुरस्मिँल्लोके पुरुषो भवति तथेतः प्रेत्य भवति स क्रतुं कुर्वीत ॥१॥ मनोमयः प्राणशरीरो भारूपः सत्यसंकल्प आकाशात्मा सर्वकर्मा सर्वकामः सर्वगन्धः सर्वरसः सर्वमिदमभ्यात्तोऽवाक्यनादरः ॥२॥ एष म आत्मान्तर्हृदयेऽणीयान्व्रीहेर्वा यवाद्वा सर्षपाद्वा श्यामाकाद्वा श्यामाकतंडुलाद्वा एष म आत्मान्तर्हृदये ज्यायान्पृथिव्या ज्यायानंतरिक्षाज्ज्यायान्दिवो ज्यायानेभ्यो लोकेभ्यः ॥३॥ सर्वकर्मा सर्वकामः सर्वगंधः सर्वरसः सर्वमिदमभ्यात्तोऽ-

गर्जना अथवा प्रचंड अग्नि पेटत असतां होणाऱ्या आवाजाप्रमाणें आवाज ऐकूं येतो ती याची श्रुति. याची दृष्टि व श्रुति या रूपानें उपासना करावी. हें जो जाणतो तो (दिव्य) दृष्टीनें व श्रुतीनें युक्त होतो.७.

हें सर्व (नामरूपादि विकारयुक्त जगत्) ब्रह्म आहे. ब्रह्मापासून हें जगत् उत्पन्न होतें, ब्रह्मामध्यें लय पावतें आणि ब्रह्माचेच ठिकाणीं जिवंत रहातें, अशा संकल्पानें ह्मणजे ज्ञानानें युक्त, शान्त होत्साता याची उपासना करावी. कारण मनुष्य संकल्परूप आहे. या लोकीं मनुष्याचा जसा संकल्प असतो तसें त्याला मरण पावल्यावर फळ मिळतें. ह्मणून (तदनुरूप) संकल्प करावा.१. (तो असा—) मनोमय, प्राण हेंच ज्याचे शरीर आहे असा, तेजोरूप, सत्यसंकल्प, आकाशाप्रमाणें स्वरूप असलेला, हें सर्व ज्याचें कर्म आहे असा, सर्वकाम, सर्वगंध, सर्वरस, ज्यानें हे सर्व व्यापलें आहे, वाणीरहित [=इंद्रियरहित] आणि विकाररहित असा माझा आत्मा हृदयकमलाचे ठिकाणीं तांदुळ, यव, मोहरी, श्यामाक अथवा श्यामाकतंडुल यांहून लहान व पृथिवी, अंतरिक्ष, स्वर्ग आणि हे (सर्व) लोक यांहून मोठा, आणि सर्वकर्मा, सर्वकाम, सर्वगंध, सर्वरस, हें सर्व व्यापून असलेला, इंद्रियरहित

वाक्यनादर एष म आत्मान्तर्हृदय एतद्ब्रह्मैतमितः प्रेत्याभिसंभविता-
स्मीति यस्य स्यादद्धा न विचिकित्सास्तीति ह स्माह शांडिल्यः
शांडिल्यः ॥४॥ इति चतुर्दशः खंडः ॥१४॥

अंतरिक्षोदरः कोशो भूमिबुध्नो न जीर्यति दिशो ह्यस्य
स्रक्तयो द्यौरस्योत्तरं बिलꣳ स एष कोशो वसुधानस्तस्मिन्विश्वमिदꣳ
श्रितम् ॥१॥ तस्य प्राची दिग्जुहूर्नाम सहमाना नाम दक्षिणा
राज्ञी नाम प्रतीची सुभूता नामोदीची तासां वायुर्वत्सः स य एतमेवं
वायुं दिशां वत्सं वेद न पुत्ररोदं रोदिति सोऽहमेतमेवं वायुं दिशां
वत्सं वेद मा पुत्ररोदं रुदम् ॥२॥ अरिष्टं कोशं प्रपद्येऽ-
मुनाऽमुनाऽमुना प्राणं प्रपद्येऽमुनाऽमुनाऽमुना भूः प्रपद्येऽमुनाऽ-

आणि विकाररहित असा आहे. हाच ब्रह्म होय. या लोकांतून (मरण पाव-ल्यावर) पलीकडे गेलो ह्मणजे मी हाच होईन, अशी ज्याची खरोखर श्रद्धा असेल व याविषयीं ज्याला संशय नसेल तो त्याप्रमाणें (ब्रह्मरूप) होईल, असें शांडिल्य मुनींनीं सांगितलें आहे.२–४.

अंतरिक्ष हें ज्याचें उदर आहे असा हा (विश्वरूपी) कोश आहे. भूमि हें याचें मूळ आहे. हा (कधीं) नाश पावत नाहीं. दिशा हे याचे कोन आहेत. द्युलोक हें याचें उत्तर बिल आहे. या कोशामध्यें कर्मफल-रूपी धन सांठविलेलें आहे. सर्व विश्व यामध्यें स्थित आहे.१. त्याची जुहू नांवाची पूर्व दिशा [पूर्वेकडील भाग] आहे, सहमाना नांवाची दक्षिण दिशा आहे, राज्ञी नांवाची पश्चिम दिशा आहे, सुभूता नांवाची उत्तर दिशा आहे. या दिशांचे वायु हा वत्स आहे. याप्रमाणें या दिशांचें वत्स वायु जो जाणतो त्याला पुत्रनिमित्त रोदन करावें लागत नाहीं [ह्म० त्याचा पुत्र मरण पावत नाहीं]. याप्रमाणें वायु दिशांचें वत्स आहे असें मी जाणतों ह्मणून मला पुत्रनिमित्त रोदन न होवो.२. या अविनाशी कोशाला त्या पुत्राच्या निमित्तानें मी शरण आहें, प्राणाला शरण आहें,

मुनाऽमुना भुवः प्रपद्येऽमुनाऽमुनाऽमुना स्वः प्रपद्येऽमुनाऽमुनाऽमुना ॥३॥ स यदवोचं प्राणं प्रपद्य इति प्राणो वा इद॑ँ सर्वं भूतं यदिदं किंच तमेव तत्प्रापत्सि ॥४॥ अथ यदवोचं भूः प्रपद्य इति पृथिवीं प्रपद्येऽन्तरिक्षं प्रपद्ये दिवं प्रपद्य इत्येव तदवोचम् ॥५॥ अथ यदवोचं भुवः प्रपद्य इत्यग्निं प्रपद्ये वायुं प्रपद्य आदित्यं प्रपद्य इत्येव तदवोचम् ॥६॥ अथ यदवोच॑ँ स्वः प्रपद्य इत्यृग्वेदं प्रपद्ये यजुर्वेदं प्रपद्ये सामवेदं प्रपद्य इत्येव तदवोचं तदवोचम् ॥७॥ इति पंचदशः खंडः ॥१५॥

पुरुषो वाव यज्ञस्तस्य यानि चतुर्विंशतिवर्षाणि तत्प्रातःसवनं चतुर्विंशत्यक्षरा गायत्री गायत्रं प्रातःसवनं तदस्य वसवोऽन्वायत्ताः प्राणा वाव वसव एते हीद॑ँ सर्वं वासयन्ति ॥१॥ तं चेदेत-

भूला शरण आहें, भुवाला शरण आहें, स्वःला शरण आहें.३. "प्राणाला शरण आहें" असें जें मी बोललों त्याचें कारण हें जें कांहीं भूतमात्र आहे व हें जें जगत् आहे तें सर्व प्राण होय. ह्मणून त्याला मी शरण आहें.४. "भूला शरण आहें" असें जें मी बोललों त्याचा अर्थ पृथ्वीला शरण आहें, अन्तरिक्षाला शरण आहें आणि स्वर्गाला शरण आहें असा होय.५. "भुवाला शरण आहें" असें जें मी बोललों त्याचा अर्थ अग्नीला शरण आहें, वायूला शरण आहें आणि आदित्याला शरण आहें असा होय.६. "स्वःला शरण आहें" असें जें मी बोललों त्याचा अर्थ ऋग्वेदाला शरण आहें, यजुर्वेदाला शरण आहें आणि सामवेदाला शरण आहें असा होय.७.

पुरुष हाच यज्ञ होय. त्याचीं जीं (पहिलीं) चोवीस वर्षें तें प्रातःसवन. गायत्रीचीं चोवीस अक्षरें असतात आणि प्रातःसवन गायत्री मंत्रानें करतात. या प्रातःसवनरूपी चोवीस वर्षांचे स्वामी वसु आहेत. प्राण [इंद्रियें व वायु] हेच ते वसु होत. कारण प्राणच सर्व शरीराला रहाण्यास लावतात.१. या वयामध्यें त्याला [पुरुषाला] कांहीं (व्याधीची)

स्मिन्वयसि किंचिदुपतपेत्स ब्रूयात्प्राणा वसव इदं मे प्रातःसवनं माध्यंदिनꣳ सवनमनुसंतनुतेति माहं प्राणानां वसूनां मध्ये यज्ञो विलोप्सीयेत्युद्धैव तत एत्यगदो ह भवति ॥२॥ अथ यानि चतुश्चत्वारिंशद्वर्षाणि तन्माध्यंदिनꣳ सवनं चतुश्चत्वारिंशदक्षरा त्रिष्टुप् त्रैष्टुभं माध्यंदिनꣳ सवनं तदस्य रुद्रा अन्वायत्ताः प्राणा वाव रुद्रा एते हीदꣳ सर्वं रोदयन्ति ॥३॥ तं चेदेतस्मिन्वयसि किंचिदुपतपेत्स ब्रूयात् प्राणा रुद्रा इदं मे माध्यंदिनꣳ सवनं तृतीयसवनमनुसंतनुतेति माहं प्राणानां रुद्राणां मध्ये यज्ञो विलोप्सीयेत्युद्धैव तत एत्यगदो ह भवति ॥४॥ अथ यान्यष्टाचत्वारिंशद्वर्षाणि तत्तृतीयसवनमष्टाचत्वारिंशदक्षरा जगती जागतं तृतीयसवनं तदस्यादित्या अन्वायत्ताः प्राणा वावादित्या एते हीदꣳ सर्वमाददते ॥५॥ तं

पीडा झाली तर त्यानें "प्राणा०......विलोप्सीयेति" या मंत्राचा जप करावा [मंत्राचा अर्थ– हे वसुरूपी प्राणहो, (यज्ञरूपी) माझें हें प्रातःसवन माध्यंदिनसवनाशीं एकत्र कर. यज्ञरूपी मी तुह्मां वसुरूपी प्राणांमध्यें नाश पावूं नयें]. याप्रमाणें (जप व ध्यान) केल्यावर तो उठतो व रोगरहित होतो.२. त्याचीं जीं (चोविसांच्या पुढलीं) चव्वेचाळीस वर्षे तें माध्यंदिन सवन. त्रिष्टुप् छंदाचीं चव्वेचाळीस अक्षरें असतात आणि माध्यंदिन सवन त्रिष्टुप् छंदानें करतात. या माध्यंदिन सवनरूपी चव्वेचाळीस वर्षांचे स्वामी रुद्र आहेत. प्राण हेच ते रुद्र होत. कारण प्राणच या सर्व शरीराला रोदन करण्यास लावतात.३. या वयामध्यें त्याला कांहीं ताप झाला तर त्यानें "प्राणा रुद्रा......विलोप्सीयेति" या मंत्राचा जप करावा. याप्रमाणें (जप व ध्यान) केल्यावर तो उठतो व रोगरहित होतो.४. त्याचीं जीं (या चव्वेचाळीसांच्या ह्मणजे अडुसष्टांच्या पुढलीं) अठ्ठेचाळीस वर्षे तें तृतीय सवन. जगती छंदाचीं अठ्ठेचाळीस अक्षरें असतात आणि तृतीय सवन जगती छंदानें करतात. या तृतीय सवनरूपी अठ्ठेचाळीस

चेदेतस्मिन्वयसि किंचिदुपतपेत्स ब्रूयात्प्राणा आदित्या इदं मे तृतीयसवनमायुरनुसंतनुतेति माहं प्राणानामादित्यानां मध्ये यज्ञो विलोप्सीयेत्युद्धैव तत एत्यगदो हैव भवति ॥६॥ एतद्ध स्म वै तद्विद्वानाह महिदास ऐतरेयः स किं म एतदुपतपसि योऽहमनेन न प्रेष्यामीति स ह षोडशं वर्षशतमजीवत्प्र ह षोडशं वर्षशतं जीवति य एवं वेद ॥७॥ इति षोडशः खंडः ॥१६॥

स यदशिशिषति यत्पिपासति यन्न रमते ता अस्य दीक्षाः ॥१॥ अथ यदश्नाति यत्पिबति यद्रमते तदुपसदैरेति ॥२॥ अथ यद्धसति यज्जक्षति यन्मैथुनं चरति स्तुतशस्त्रैव तदेति ॥३॥ अथ यत्तपो दानमार्जवमहिंसा सत्यवचनमिति ता अस्य दक्षिणाः ॥४॥ तस्मादाहुः सोष्यत्यसोष्टेति पुनरुत्पादनमेवास्य तन्मरणमेवावभृथः ॥५॥ तद्धैत-

वर्षांचे स्वामी आदित्य आहेत. प्राण हेच ते आदित्य होत. कारण प्राणच हें सर्व शरीर घेतात.५. या वयामध्यें त्याला कांहीं ताप झाला तर त्यानें "प्राणा आदित्या०......विलोप्सीयेति" या मंत्राचा जप करावा. याप्रमाणें (जप व ध्यान) केल्यावर तो उठतो व रोगरहित होतो.६. हा (पुरुषरूपी यज्ञ) जाणणारा इतरेचा पुत्र महिदास (व्याधीला) ह्मणाला, "मला (व्यर्थ) कां ताप देतोस? मी कांहीं मरण पावणार नाहीं." तो एकशें सोळा वर्षे जगला. याप्रमाणें जो जाणतो तो एकशें सोळा वर्षे जगतो.७.

तो (पुरुष अथवा पुरुषरूपी यज्ञ) जी खाण्याची इच्छा करतो, पिण्याची इच्छा करतो व दुःख भोगतो त्या दीक्षा होत.१. जें खातो, पितो व सुख भोगतो तीं उपसदें होत.२. जें हंसतो, खातो, मैथुन करतो तीं स्तोत्रें व शस्त्रें होत.३. जें तप, दान, ऋजुता, अहिंसा व सत्य भाषण करतो त्या दक्षिणा होत.४. ह्मणून (त्याची माता त्याला प्रसवते तेव्हां) ह्मणतात कीं, "सोष्यति, असोष्ट." हें याचें पुनरुत्पादन होय. मरण हें याचें अवभृथ होय.५. हे ज्ञान आंगिरसगोत्रोत्पन्न घोर

घोर आंगिरसः कृष्णाय देवकीपुत्रायोक्त्वोवाचापिपास एव स बभूव सोऽन्तवेलायामेतत्त्रयं प्रतिपद्येताक्षितमस्यच्युतमसि प्राणसंशितमसीति तत्रैते द्वे ऋचौ भवतः ॥६॥ आदित्प्रत्नस्य रेतसः* । उद्वयं तमसस्परि ज्योतिः पश्यन्त उत्तरं देवं देवत्रा सूर्यमगन्म ज्योतिरुत्तममिति ज्योतिरुत्तममिति ॥७॥ इति सप्तदशः खंडः ॥१७॥

मनो ब्रह्मेत्युपासीतेत्यध्यात्ममथाधिदैवतमाकाशो ब्रह्मेत्युभयमादिष्टं भवत्यध्यात्मं चाधिदैवतं च ॥१॥ तदेतच्चतुष्पाद्ब्रह्म वाक् पादः प्राणः पादश्चक्षुः पादः श्रोत्रं पाद इत्यध्यात्ममथाधिदैवतमग्निः पादो

यानें देवकीपुत्र कृष्णाला सांगितलें; आणि म्हणाला, अंतकालीं "अक्षितमसि, अच्युतमसि, प्राणसंशितमसि" या तीन मंत्रांचा जप करावा. (हें ज्ञान जाणणाऱ्या) त्या घोराला दुसऱ्या कोणत्याहि ज्ञानाची इच्छा राहिली नाहीं. याविषयीं पुढील दोन मंत्र आहेत– "जगाच्या पुरातन बीजाची आदित्याप्रमाणें असलेली ब्रह्मरूपी ज्योति ब्रह्मज्ञानी प्रत्यक्ष पहातात. प्रकाशमान अशा ब्रह्मामध्यें [दिवि] ती ज्योति प्रकाश पावते. (अज्ञानरूपी) तमाचा नाश करणारी [तमसस्परि] वर (आदित्याचे ठिकाणीं) स्थित अशी ज्योति पहात आणि याच्याहून उत्कृष्टतर ज्योति आहे [उत्तरं देवं] व ती आमचे हृदयामध्ये स्थित आहे असें पहात [स्वः पश्यन्तः] देवामध्यें [देवत्रा] उत्तम ज्योति जो सूर्य त्याप्रत आह्मी गेलों [वयं उदगन्म].६.७.

मन हें ब्रह्म अशी (ब्रह्माची) उपासना करावी. हें आत्मविषयक दर्शन. आकाश हें ब्रह्म अशी उपासना करावी. हें देवताविषयक दर्शन. याप्रमाणें आत्मविषयक व देवताविषयक अशी दोन्ही प्रकारांनीं उपासना करावी.१. या ब्रह्माचे चार भाग आहेत– वाणी, प्राण, चक्षु आणि श्रोत्र हे आत्मविषयक ब्रह्माचे चार भाग; आणि अग्नि, वायु, आदित्य

* हा संपूर्ण मंत्र असा आहे— आदित्प्रत्नस्य रेतसो ज्योतिः पश्यन्ति वासरम् । परो यदिध्यते दिवि ॥

वायुः पाद आदित्यः पादो दिशः पाद इत्युभयमेवादिष्टं भवत्यध्यात्मं चवाधिदैवतं च ॥२॥ वागेव ब्रह्मणश्चतुर्थः पादः सोऽग्निना ज्योतिषा भाति च तपति च भाति च तपति च कीर्त्या यशसा ब्रह्मवर्चसेन य एवं वेद ॥३॥ प्राण एव ब्रह्मणश्चतुर्थः पादः स वायुना ज्योतिषा भाति च तपति च भाति च तपति च कीर्त्या यशसा ब्रह्मवर्चसेन य एवं वेद ॥४॥ चक्षुरेव ब्रह्मणश्चतुर्थः पादः स आदित्येन ज्योतिषा भाति च तपति च भाति च तपति च कीर्त्या यशसा ब्रह्मवर्चसेन य एवं वेद ॥५॥ श्रोत्रमेव ब्रह्मणश्चतुर्थः पादः स दिग्भिर्ज्योतिषा भाति च तपति च भाति च तपति च कीर्त्या यशसा ब्रह्मवर्चसेन य एवं वेद य एवं वेद ॥६॥ इत्यष्टादशः खंडः ॥१८॥

आदित्यो ब्रह्मेत्यादेशस्तस्योपव्याख्यानमसदेवेदमग्र आसीत्तत्सदासीत्तत्समभवत्तदांडं निरवर्तत तत्संवत्सरस्य मात्रामशयत तन्निर-

आणि दिशा हे देवताविषयक ब्रह्माचे चार भाग. दोन्ही प्रकारच्या ब्रह्माची उपासना करावी.२. वाणी हा ब्रह्माचा चतुर्थांश आहे. तो अग्निरूपी ज्योतीनें प्रकाश पावतो व प्रकाश पाडतो. हें जो जाणतो तो कीर्ति [प्रत्यक्ष], यश [परोक्ष कीर्ति] व ब्रह्मतेज यांनीं प्रकाशमान होतो.३. प्राण हा ब्रह्माचा चतुर्थांश आहे. तो वायुरूपी ज्योतीनें प्रकाश पावतो व प्रकाश पाडतो. हें जो जाणतो तो कीर्ति, यश व ब्रह्मतेज यांनीं प्रकाशमान होतो. ४. चक्षु हा ब्रह्माचा चतुर्थांश आहे. तो आदित्यरूपी ज्योतीनें प्रकाश पावतो व प्रकाश पाडतो. हें जो जाणतो तो कीर्ति, यश व ब्रह्मतेज यांनीं प्रकाशमान होतो.५. श्रोत्र हा ब्रह्माचा चतुर्थांश आहे. तो दिग्रूपी ज्योतीनें प्रकाश पावतो व प्रकाश पाडतो. हे जो जाणतो तो कीर्ति, यश व ब्रह्मतेज यांनीं प्रकाशमान होतो.६.

आदित्य हें ब्रह्म असा आदेश [उपदेश] सांगितला. याचें व्याख्यान सांगतात— प्रारंभीं हें (जगत्) असत् [नामरूपादिविशिष्टतारहित] होतें.

भिद्यत ते आंडकपाले रजतं च सुवर्णं चाभवताम् ॥१॥ तद्यद्रजतꣳ सेयं पृथिवी यत्सुवर्णꣳ सा द्यौर्यज्जरायु ते पर्वता यदुल्बꣳ स मेघो नीहारो या धमनयस्ता नद्यो यद्वास्तेयमुदकꣳ स समुद्रः ॥२॥ अथ यत्तदजायत सोऽसावादित्यस्तं जायमानं घोषा उलूलवोऽनूदतिष्ठन्त्सर्वाणि च भूतानि सर्वे च कामास्तस्मात्तस्योदयं प्रति प्रत्यायनं प्रति घोषा उलूलवोऽनूत्तिष्ठन्ति सर्वाणि च भूतानि सर्वे च कामाः ॥३॥ स य एतमेवं विद्वानादित्यं ब्रह्मेत्युपास्तेऽभ्याशो ह यदेनꣳ साधवो घोषा आ च गच्छेयुरुप च निम्रेडेरन्निम्रेडेरन् ॥४॥ इत्येकोनविंशः खंडः ॥१९॥ इति तृतीयोऽध्यायः ॥३॥

अथ चतुर्थोऽध्यायः ॥

ॐ जानुश्रुतिर्ह पौत्रायणः श्रद्धादेयो बहुदायी बहुपाक्य आस स ह सर्वत आवसथान्मापयांचक्रे सर्वत एव मेऽत्स्यन्तीति ॥१॥

तें सत् [कार्य करण्यास प्रवृत्त] होतें. नंतर तें (बीज अंकुररूपानें प्रकट होतें त्याप्रमाणें) प्रकट झालें. नंतर (एक) अंडें उत्पन्न झालें. तें एक वर्षपर्यंत (तसेंच) राहिलें. नंतर तें फुटलें व त्याचीं एक सुवर्णाचें व दुसरें रुप्याचें अशीं दोन छकलें झालीं.१. त्यांपैकीं जें रुप्याचें छकल ती ही पृथिवी आणि जें सुवर्णाचें छकल तो स्वर्ग. जरायु [गर्भाचें स्थूल वेष्टन] ते पर्वत. उल्ब [गर्भाचें सूक्ष्म वेष्टन] तें मेघांसह दंव. शिरा त्या नद्या. त्याचेमध्यें असलेलें उदक तो समुद्र.२. नंतर त्यापासून जें उत्पन्न झालें तो आदित्य होय. तो उत्पन्न होत असतां मोठे आनंदकारक आवाज निघाले. सर्व भूतें आणि सर्व विषय त्या आदित्यापासूनच उत्पन्न होतात. ह्मणून त्याच्या उदयाचे वेळीं व प्रत्युदयाचे वेळीं सर्व आनंदकारक आवाज निघतात, सर्व भूतमात्र व सर्व विषय जागृत होतात.३. याप्रमाणें जाणून जो आदित्यरूपी ब्रह्माची उपासना करतो त्याच्याकडे तत्काल शुभ असे आनंददायक ध्वनि येतात व त्याला सुख देतात.४.

अथ ह हंसा निशायामतिपेतुस्तद्धैवꣳ हंसो हंसमभ्युवाद हो होऽयि भल्लाक्ष भल्लाक्ष जानश्रुतेः पौत्रायणस्य समं दिवा ज्योतिराततं तन्मा प्रसांक्षीस्तत्त्वा मा प्रधाक्षीरिति ॥२॥ तमु ह परः प्रत्युवाच कम्वर एनमेतत्सन्तꣳ सयुग्वानमिव रैक्कमात्थेति यो नु कथꣳ सयुग्वा रैक्क इति ॥३॥ यथा कृतायविजितायाधरेयाः संयन्त्येवमेनꣳ सर्वं तदभिसमेति यत्किंच प्रजाः साधु कुर्वन्ति यस्तद्वेद यत्स वेद स मयैतदुक्त इति ॥४॥ तदु ह जानश्रुतिः पौत्रायण उपशुश्राव स ह संजिहान

अध्याय चवथा.

पूर्वी जनश्रुतीच्या पुत्राचा नातू जानश्रुति नावाचा राजा होता. तो श्रद्धेने दान करणारा, बहुत दान करणारा, ज्याच्या घरीं अतिथींकरितां पुष्कळ अन्न रोज शिजविले जात असे असा होता. त्याने अनेक ठिकाणीं माझ्या गृहामध्ये येऊन लोकांनीं अन्न भक्षण करावे याकरिता अनेक ठिकाणीं घरे [अन्नछत्रे] बांधलीं. १. एके दिवशीं रात्रीं (राजा गच्चीवर असताना) त्या ठिकाणीं हंस आले. एक हंस दुसऱ्या हंसास ह्मणाला, 'अबबब, अरे भद्राक्षा, जानश्रुतीच्या (कीर्तीचे अथवा पुण्याचे) तेज स्वर्गापर्यंत पसरलेले आहे. अरे त्याला स्पर्श करूं नकोस. (केलास तर) जळशील.'' २. त्याला दुसऱ्या हंसाने उत्तर दिले, '' अरे कवरा, कोणाविषयीं तू शकटयुक्त [गाडीने युक्त=सयुग्वा] रैक्वाप्रमाणे बोलतोस?'' पहिला हंस ह्मणाला, ''तो शकटयुक्त रैक्व कसा आहे?' ३. दुसरा हंस ह्मणाला, ज्याप्रमाणे (द्यूतांतील) चार अकांच्या फाशामध्ये इतर (कमी अकांच्या) फांशाचा अंतर्भाव होतो त्याप्रमाणे प्रजा जे सत्कर्म करतात त्या सर्वांचा या रैक्वाचे धर्मामध्ये अंतर्भाव होतो. तो जाणतो ते जो कोणी जाणील त्याच्या धर्मामध्ये देखील इतर सर्व सत्कर्मांचा अंतर्भाव होईल. मी बोलतों तो अशा ज्ञात्याविषयीं.''४. हें भाषण जानश्रुतीने ऐकले. (दुसरे दिवशीं) निद्रा झाल्याबरोबर सेवकाला

एव क्षत्तारमुवाचांगारे ह सयुग्वानमिव रैक्कमात्थेति यो नु कथꣳ सयुग्वा रैक्क इति ॥५॥ यथा कृतायविजितायाधरेयाः संयन्त्येवमेनꣳ सर्वं तदभिसमेति यत्किंच प्रजाः साधु कुर्वन्ति यस्तद्वेद यत्स वेद स मयैतदुक्त इति ॥६॥ स ह क्षत्तान्विष्य नाविदमिति प्रत्येयाय तꣳ होवाच यत्रारे ब्राह्मणस्यान्वेषणा तदेनमर्छेति ॥७॥ सोऽधस्ताच्छकटस्य पामानं कषमाणमुपोपविवेश तꣳ हाभ्युवाद त्वं नु भगवः सयुग्वा रैक्क इत्यहꣳ ह्यरा३ इति ह प्रतिजज्ञे स ह क्षत्ताविदमिति प्रत्येयाय ॥८॥ इति प्रथमः खंडः ॥१॥

तदु ह जानश्रुतिः पौत्रायणः षट् शतानि गवां निष्कमश्वत-

राजा ह्मणाला, "अरे, सयुग्वा रैक्क याच्याप्रमाणें तूं माझ्याविषयीं बोलतोस हें काय ? [=रैक्कच स्तुतीला योग्य आहे, मी नाहीं]." तो सेवक ह्मणाला, "महाराज, तो सयुग्वा रैक्क कसा आहे ?"५. राजानें उत्तर दिलें, "ज्याप्रमाणें (द्यूतांतील) चार अंकांच्या फांशामध्यें इतर (कमी अंकांच्या) फांशांचा अंतर्भाव होतो त्याप्रमाणें प्रजा जे सत्कर्म करतात त्या सर्वांचा या रैक्काचे धर्मामध्यें अंतर्भाव होतो. तो (रैक्क) जें जाणतो ते जो कोणी जाणील त्याच्या धर्मामध्यें देखील इतर सर्व सत्कर्मांचा अंतर्भाव होईल." ६. नंतर शहरामध्यें शोध करून तो सेवक "मला सांपडला नाहीं" ह्मणत परत (राजाकडे) आला. त्याला राजा ह्मणाला, "अरे, ज्या ठिकाणीं ब्रह्मज्ञान्यांचा [ब्राह्मणांचा] शोध करतात अशा ठिकाणीं जाऊन त्याचा शोध कर."७. त्याप्रमाणें तो सेवक (अरण्यांत) गेला व एका शकटाच्या खालीं खरूज खाजवीत बसलेल्या एका ब्राह्मणाला पाहून हा रैक्क असावा असें जाणून आदरानें त्याच्याजवळ गेला व त्याला ह्मणाला, "हे भगवन्, आपणच रैक्क काय ?" तो ह्मणाला, "होय." तेव्हां तो सेवक मला याचा शोध लागला असें जाणून परत (राजाकडे) आला.८.

तेव्हां जानश्रुति सहाशें गाई, सोन्याची कंठी [निष्कः] आणि एक

रीरथं तदादाय प्रतिचक्रमे तꣳ हाभ्युवाद ॥१॥ रैक्वेमानि षट् शतानि गवामयं निष्कोऽयमश्वतरीरथो नु म एतां भगवो देवताꣳ शाधि यां देवतामुपास्स इति ॥२॥ तमु ह परः प्रत्युवाचाह हारेत्वा शूद्र तवैव सह गोभिरस्त्विति तदु ह पुनरेव जानश्रुतिः पौत्रायणः सहस्रं गवां निष्कमश्वतरीरथं दुहितरं तदादाय प्रतिचक्रमे ॥३॥ तꣳ हाभ्युवाद रैक्वेदꣳ सहस्रं गवामयं निष्कोऽयमश्वतरीरथ इयं जायायं ग्रामो यस्मिन्नास्सेऽन्वेव मा भगवः शाधीति ॥४॥ तस्या ह मुखमुपोद्गृह्णन्नुवाचाजहारेमाः शूद्रानेनैव मुखेनालापयिष्यथा इति ते हैते रैक्वपर्णा नाम महावृषेषु यत्रास्मा उवास तस्मै होवाच ॥५॥ इति द्वितीयः खंडः ॥२॥

खेचरांचा रथ असें (धन) घेऊन (त्याच्याकडे) गेला आणि त्याला वंदन करून ह्मणाला, हे रैक्व, या सहाशें गाई, हा निष्क आणि हा खेचरांचा रथ. यांचें ग्रहण करा; (आणि) आपण ज्या देवतेची उपासना करतां त्या देवतेचा मला उपदेश करा. १.२. त्याला तो रैक्व ह्मणाला, अरे शूद्रा [शूद्राप्रमाणें धनदानानें विद्या घेणारा], तुझा तो हार, रथ आणि गाई तुझ्यापाशींच राहूं देत. तेव्हां जानश्रुति गेला व हजार गाई, निष्क, खेचरांचा रथ आणि आपली कन्या (रैक्वाला देण्याकरितां) घेऊन पुन्हां आला. ३. आल्यावर रैक्वाला ह्मणाला, या हजार गाई, हा निष्क, हा खेचरांचा रथ, ही (आपणाकरितां) भार्या आणि ज्या या गांवांत तुह्मी रहात आहां तो गांव यांचें ग्रहण करा; आणि हे भगवन्, मला उपदेश करा. ४. ती भार्या विद्यादानाचें द्वार आहे असें जाणून तो रैक्व ऋषि ह्मणाला, अरे शूद्रा, हें जें तूं आणलें आहेस हें चांगलें आहे. विद्याग्रहणाला मुख अशा हिच्या मुखानें तूं मला विचारीत आहेस. रैक्व ज्या ठिकाणीं रहात होता ते गांव रैक्वपर्ण नांवानें महावृष देशामध्यें प्रसिद्ध आहेत. नंतर तो रैक्व राजाला विद्या सांगता झाला.५.

वायुर्वाव संवर्गो यदा वा अग्निरुद्वायति वायुमेवाप्येति यदा सूर्योऽस्तमेति वायुमेवाप्येति यदा चन्द्रोऽस्तमेति वायुमेवाप्येति ॥१॥ यदाप उच्छुष्यन्ति वायुमेवापियन्ति वायुर्ह्येवैतान्सर्वान्संवृङ्क्त इत्यधिदैवतम् ॥२॥ अथाध्यात्मं प्राणो वाव संवर्गः स यदा स्वपिति प्राणमेव वागप्येति प्राणं चक्षुः प्राणꣳ श्रोत्रं प्राणं मनः प्राणो ह्येवैतान्सर्वान्संवृङ्क्त इति ॥३॥ तौ वा एतौ द्वौ संवर्गौ वायुरेव देवेषु प्राणः प्राणेषु ॥४॥ अथ ह शौनकं च कापेयमभिप्रतारिणं च काक्षसेनिं परिविष्यमाणौ ब्रह्मचारी बिभिक्षे तस्मा उ ह न ददतुः ॥५॥ स होवाच महात्मनश्चतुरो देव एकः कः स जगार भुवनस्य गोपास्तं कापेय नाभिपश्यन्ति मर्त्या अभिप्रतारिन्बहुधा वसन्तं

वायु हा (सर्वांचा) संग्राहक [संवर्ग] आहे. जेव्हां अग्नि शमन पावतो तेव्हां तो वायूप्रत जातो [वायुरूप होतो], जेव्हा सूर्य अस्त पावतो तेव्हा तो वायूप्रतच जातो; जेव्हा चंद्र अस्त पावतो तेव्हां तोहि वायूप्रतच जातो. १. जेव्हा उदक शोष पावते तेव्हा ते वायूप्रतच जाते. (साराश) वायुच या सर्वांचे संग्रहण (अथवा सवरण) करतो. याप्रमाणे देवताविषयक संवर्गज्ञान सांगितले. २. आता आत्मविषयक— प्राण हाच संवर्ग आहे. जेव्हा (मनुष्य) निजतो तेव्हां वाणी प्राणाप्रतच जाते; चक्षु, श्रोत्र आणि मन हीं देखील प्राणाप्रतच जातात. प्राणच या सर्वांचे संवरण करतो. ३. याप्रमाणे हे दोन संवर्ग आहेत. देवामध्ये वायु आणि इंद्रियामध्ये प्राण. ४. एकदा कपिगोत्रोत्पन्न शौनक आणि कक्षसेनाचा पुत्र अभिप्रतारिन् हे भोजनास बसले असतां, त्याचेकडे एक ब्रह्मचारी आला व त्याने भिक्षा मागितली. (हा ब्रह्मवेत्ता आहे असें पाहून हा काय बोलतो हे ऐकावे ह्मणून) त्यांनी भिक्षा दिली नाहीं. ५. तो ह्मणाला, हे शौनका, एक देव, सर्व भुवनाचा पालनकर्ता व चार महात्म्यांना ग्रासणारा असा कोण ? हे अभिप्रतारिन्, (अध्यात्म, अधिदैव,

**यस्मै वा एतदन्नं तस्मा एतन्न दत्तमिति ॥६॥ तदु ह शौनकः कापेयः प्रतिमन्वानः प्रत्येयायात्मा देवानां जनिता प्रजानाꣳ हिरण्यदंष्ट्रो बभसोऽनसूरिर्महान्तमस्य महिमानमाहुरनद्यमानो यदनन्नमत्तीति वै वयं ब्रह्मचारिन्नेदमुपास्महे दत्तास्मै भिक्षामिति ॥७॥ तस्मा उ ह ददुस्ते वा एते पंचान्ये पंचान्ये दश सन्तस्तत्कृतं तस्मात्सर्वासु दिक्ष्वन्नमेव दश कृतꣳ सैषा विराडन्नादी तयेदꣳ सर्वं दृष्टꣳ सर्वमस्येदं दृष्टं भवत्यन्नादो भवति य एवं वेद य एवं वेद ॥८॥ इति तृतीयः खंडः ॥३॥**

अधिभूत इत्यादि) अनेक प्रकारांनीं स्थित अशा त्या देवाला मनुष्य जाणीत नाहींत. ज्याच्याकरितां हे अन्न (तुह्मी रोज आणतां) त्याला हें तुह्मीं दिले नाहीं. [प्राणाकरितां अन्न आणतां आणि प्राण व मी एकरूप आहों; ह्मणून मला अन्न दिलें नाहीं ह्मणजे प्राणाला दिले नाही].६. (असें बोलून तो गेला). नंतर या भाषणाचा विचार करून शौनक त्याच्याकडे गेला व ह्मणाला, (होय आह्मी जाणतों. तो देव ह्मणजे) (अग्नि आदि) देवांचा आत्मा, (वाणी आदि) प्रजांचा (आपल्यामध्यें ग्रास करून पुन्हां) उत्पन्नकर्ता, ज्याची दंष्ट्रा अभंग आहे [सर्वांचा संहार करून देखील ग्लानि न पावणारी], भक्षणशील आणि बुद्धिमान् अशा या प्रजापतीचा महिमा मोठा आहे असे ब्रह्मवेत्ते सांगतात. कारण हा इतरांकडून भक्षण केला न जातां, अन्नाहून इतर [अनन्नं] (अग्नि, वाणी इत्यादि) भक्षण करतो. हे ब्रह्मचारिन्, आह्मी याची उपासना करतों. याप्रमाणें बोलून शौनक (आपल्या भृत्यांस ह्मणाला) याला भिक्षा द्या.७. त्यांनीं त्याला भिक्षा दिली. याप्रमाणें ते (वायुसहित अग्नि आदि) पांच व (प्राणांसहित वाणी आदि) पांच मिळून दहा. हे सर्व कृताप्रमाणे [कृत, त्रेता, द्वापर व कलि असे अनुक्रमें चतुरंक, त्र्यंक, द्व्यंक व एकांक द्यूताचे प्रकार] होत. ह्मणून सर्व (दहाहि) दिशांमध्यें अन्नच आहे. या

सत्यकामो ह जाबालो जबालां मातरमामंत्रयांचक्रे ब्रह्मचर्यं भवति विवत्स्यामि किंगोत्रो न्वहमस्मीति ॥१॥ सा हैनमुवाच नाहमेतद्वेद तात यद्गोत्रस्त्वमसि बह्वहं चरन्ती परिचारिणी यौवने त्वामलभे साहमेतन्न वेद यद्गोत्रस्त्वमसि जबाला तु नामाहमस्मि सत्यकामो नाम त्वमसि स सत्यकाम एव जाबालो ब्रुवीथा इति ॥२॥ स ह हारिद्रुमतं गौतममेत्योवाच ब्रह्मचर्यं भगवति वत्स्याम्युपेयां भगवन्तमिति ॥३॥ तꣳ होवाच किंगोत्रो नु सोम्यासीति स होवाच नाहमेतद्वेद भो यद्गोत्रोऽहमस्म्यपृच्छं मातरꣳ सा मा प्रत्य-

संख्येनें सर्व दृष्ट आहे. हें जो जाणतो त्याला हें सर्व दिसतें. तो (पुष्कळ) अन्न खाण्यास समर्थ होतो.८.

(श्रद्धा व तप हीं ब्रह्मोपासनेचीं अंगे आहेत हे दाखविण्याकरितां आख्यायिका सांगतात—) जबालानामक स्त्रीचा पुत्र सत्यकाम आपल्या मातेला हांक मारून ह्मणाला, आई, मी आचार्यगृहीं राहून ब्रह्मचर्य पालन करून (अध्ययन करूं इच्छितों). तर माझें गोत्र कोणतें?१. ती त्याला ह्मणाली, बाळा, तुझें गोत्र काय तें मला माहीत नाहीं. (पतिगृहीं) मी (अतिथिअभ्यागतादिकांच्या) सेवेमध्यें व इतर कामामध्यें अत्यंत व्यग्र होत्यें. शिवाय मी तरुण होत्ये तेव्हां तूं मला झालास (आणि तूं झाल्याबरोबर तुझा पिता मरण पावला). ह्मणून तुझें गोत्र काय तें मला माहीत नाहीं. मात्र माझें नांव जबाला आहे आणि तुझें नांव सत्यकाम आहे (एवढें मला माहीत आहे). तेव्हां "मी जबालेचा पुत्र सत्यकाम आहें" असें तूं सांग.२. नंतर तो गौतमगोत्री हारिद्रुमत याजकडे जाऊन ह्मणाला, हे भगवन्, आपल्या येथें ब्रह्मचर्यानें रहावें [अध्ययन करावें] याकरितां मी आपणांकडे आलों आहे.३. त्याला गौतम ह्मणाला, बाळा, तुझें गोत्र काय? तो ह्मणाला, भगवन्, माझें गोत्र काय हें मला माहीत नाहीं. मीं आईला विचारलें तेव्हां ती ह्मणाली, "तुझें गोत्र काय तें

ब्रवीद्बह्वहं चरन्ती परिचारिणी यौवने त्वामलभे साहमेतन्न वेद यद्गो-
त्रस्त्वमसि जबाला तु नामाहमस्मि सत्यकामो नाम त्वमसीति
सोऽह सत्यकामो जाबालोऽस्मि भो इति ॥४॥ त होवाच
नैतदब्राह्मणो विवक्तुमर्हति समिधं सोम्याहरोप त्वा नेष्ये न सत्या-
दगा इति तमुपनीय कृशानामबलानां चतुःशता गा निराकृत्योवाचेमाः
सोम्यानुसंव्रजेति ता अभिप्रस्थापयन्नुवाच नासहस्रेणावर्तेयेति स ह
वर्षगणं प्रोवास ता यदा सहस्र संपेदुः ॥५॥ इति चतुर्थः खंडः॥

अथ हैनमृषभोऽभ्युवाद सत्यकाम३ इति भगव इति ह
प्रतिशुश्राव प्राप्ताः सोम्य सहस्र स्मः प्रापय न आचार्यकुलम् ॥१॥
ब्रह्मणश्च ते पादं ब्रवाणीति ब्रवीतु मे भगवानिति तस्मै होवाच प्राची

मला माहीत नाहीं. (पतिगृहीं) मी सेवेमध्यें व इतर कामामध्यें अत्यंत व्यग्र होत्यें. शिवाय मी तरुण होत्यें तेव्हां तूं मला झालास. ह्मणून तुझें गोत्र काय तें मला माहीत नाहीं. मात्र माझें नांव जबाला आहे आणि तुझें नांव सत्यकाम आहे.'' ह्मणून हे भगवन्, मी जबालेचा पुत्र सत्य-काम नामक आहें.४. हें ऐकून गौतम ह्मणाले, (तूं ब्राह्मणच आहेस, कारण) ब्राह्मणेतर असें भाषण करणार नाहीं. तूं सत्यापासून परावृत्त झाला नाहींस. ह्मणून मी तुझें उपनयन करतों. समिधा घेऊन ये. (उप-नयन केल्यानंतर) कृश व अशक्त अशा चारशें गाई (गोठ्यांतून) सोडून गौतम त्याला ह्मणाला, बाळा, यांच्या मागें जा. त्यांना अरण्याकडे लावून तो सत्यकाम ह्मणाला, या गाई सहस्र झाल्याखेरीज मी परत येणार नाहीं. (नंतर) वर्षभर तो अरण्यांत (गाईच्या बरोबर) राहिला. तोंपर्यंत एक हजार गाई झाल्या.५.

तेव्हां (वायुदेवतेनें संचार केलेला) ऋषभ [बैल] त्याला ह्मणाला, सत्यकामा. सत्यकाम ह्मणाला, काय भगवन्? ऋषभ ह्मणाला, बाळा, आह्मी आतां सहस्र झालों. आह्मांला आचार्यांचे घरीं ने.१. तुला मी

दिक्कला प्रतीची दिक्कला दक्षिणा दिक्कलोदीची दिक्कलैष वै सोम्य चतुष्कल: पादो ब्रह्मण: प्रकाशवान्नाम ॥२॥ स य एतमेवं विद्वांश्चतुष्कलं पादं ब्रह्मण: प्रकाशवानित्युपास्ते प्रकाशवानस्मिँल्लोके भवति प्रकाशवतो ह लोकाञ्जयति य एतमेवं विद्वांश्चतुष्कलं पादं ब्रह्मण: प्रकाशवानित्युपास्ते ॥३॥ इति पंचम: खंड: ॥५॥

अग्निष्टे पादं वक्तेति स ह श्वोभूते गा अभिप्रस्थापयांचकार ता यत्राभि सायं बभूवुस्तत्राग्निमुपसमाधाय गा उपरुध्य समिधमाधाय पश्चादग्ने: प्राङुपोपविवेश ॥१॥ तमग्निरभ्युवाद सत्यकाम३ इति भगव इति ह प्रतिशुश्राव ॥२॥ ब्रह्मण: सोम्य ते पादं ब्रवाणीति ब्रवीतु मे भगवानिति तस्मै होवाच पृथिवी कलान्तरिक्षं कला द्यौ:

ब्रह्माचा (चतुर्थ) अंश सांगतों. सत्यकाम ह्मणाला, भगवन्, सांगा. ऋषभ ह्मणाला, पूर्व दिशा ही एक कला [षोडशांश], पश्चिम दिशा ही एक कला, दक्षिण दिशा ही एक कला आणि उत्तर दिशा ही एक कला. बाळा, या चार कला मिळून ब्रह्माचा प्रकाशवान् नांवाचा एक पाद [चतुर्थांश] होतो.२. याप्रमाणें चार कलांनीं युक्त असा ब्रह्माचा प्रकाशवान् नामक पाद जाणून जो त्याची उपासना करतो तो या लोकीं प्रकाशवान् होतो. त्याला प्रकाशवान् लोक प्राप्त होतात.३.

आतां तुला अग्नि (दुसरा) पाद सांगेल. असें बोलून ऋषभ [वायु] स्वस्थ राहिला. दुसरे दिवशीं सत्यकामाने गाई (आचार्यगृहाच्या) मार्गाकडे वळविल्या. ज्या ठिकाणीं त्याला संध्याकाळ झाली त्या ठिकाणीं समिधा आणून त्यानें अग्नि प्रदीप्त करून त्याची उपासना केली व (ऋषभाच्या भाषणाचें मनन करीत) तो त्याच्या सन्मुख बसला.१. त्याला अग्नि ह्मणाला, सत्यकामा. तो ह्मणाला, भगवन्.२. अग्नि ह्मणाला, बाळा, मी तुला ब्रह्माचा पाद सांगतों. सत्यकाम ह्मणाला, भगवन्, सांगा. अग्नि ह्मणाला पृथिवी ही एक कला, अंतरिक्ष ही एक कला, स्वर्ग ही एक कला आणि

कला समुद्रः कलैष वै सोम्य चतुष्कलः पादो ब्रह्मणोऽनन्तवान्नाम ॥३॥ स य एतमेवं विद्वांश्चतुष्कलं पादं ब्रह्मणोऽनंतवानित्युपास्तेऽनंतवानस्मिँल्लोके भवत्यनंतवतो ह लोकाञ्जयति य एतमेवं विद्वांश्चतुष्कलं पादं ब्रह्मणोऽनन्तवानित्युपास्ते ॥४॥ इति षष्ठः खंडः॥

हंसस्ते पादं वक्तेति स ह श्वोभूते गा अभिप्रस्थापयांचकार ता यत्राभि सायं बभूवुस्तत्राग्निमुपसमाधाय गा उपरुध्य समिधमाधाय पश्चादग्नेः प्राङुपोपविवेश ॥१॥ तꣳ हंस उपनिपत्याभ्युवाद सत्यकाम३ इति भगव इति ह प्रतिशुश्राव ॥२॥ ब्रह्मणः सोम्य ते पादं ब्रवाणीति ब्रवीतु मे भगवानिति तस्मै होवाचाग्निः कला सूर्यः कला चन्द्रः कला विद्युत्कलैष वै सोम्य चतुष्कलः पादो ब्रह्मणो ज्योतिष्मान्नाम ॥३॥ स य एतमेवं विद्वांश्चतुष्कलं पादं ब्रह्मणो

समुद्र ही एक कला. बाळा, या चार कला मिळून ब्रह्माचा अनन्तवान् नांवाचा एक पाद होतो.३. याप्रमाणें चार कलांनी युक्त असा ब्रह्माचा अनन्तवान् नामक पाद जाणून जो त्याची उपासना करतो तो या लोकीं अनन्तवान् होतो. त्याला अन्तरहित लोक प्राप्त होतात.४.

आतां तुला हंस (तिसरा) पाद सांगेल. असें बोलून अग्नि स्तब्ध राहिला. दुसरे दिवशी सत्यकामानें गाई (आचार्यगृहाच्या) मार्गाकडे वळविल्या. ज्या ठिकाणीं त्याला संध्याकाळ झाली त्या ठिकाणीं समिधा आणून त्यानें अग्नि प्रदीप्त करून त्याची उपासना केली व तो त्याच्या सन्मुख बसला.१. त्याच्यापुढें (आदित्यरूपी) हंस (वरून) खालीं येऊन ह्मणाला, सत्यकामा. तो ह्मणाला, भगवन्.२. हंस ह्मणाला, बाळा, मी तुला ब्रह्माचा पाद सांगतों. सत्यकाम ह्मणाला, भगवन्, सांगा. हंस ह्मणाला, अग्नि ही एक कला, सूर्य ही एक कला, चंद्र ही एक कला आणि विद्युत् ही एक कला. बाळा, या चार कला मिळून ब्रह्माचा ज्योतिष्मान् नांवाचा एक पाद होतो.३. याप्रमाणें चार कलांनी युक्त असा ब्रह्माचा

ज्योतिष्मानित्युपास्ते ज्योतिष्मानस्मिँल्लोके भवति ज्योतिष्मतो ह लोकाञ्जयति य एतमेवं विद्वांश्चतुष्कलं पादं ब्रह्मणो ज्योतिष्मानित्युपास्ते ॥४॥ इति सप्तमः खंडः ॥७॥

मद्गुष्टे पादं वक्तेति स ह श्वोभूते गा अभिप्रस्थापयांचकार ता यत्राभि सायं बभूवुस्तत्राग्निमुपसमाधाय गा उपरुध्य समिधमाधाय पश्चादग्नेः प्राङुपोपविवेश ॥१॥ तं मद्गुरुपनिपत्याभ्युवाद सत्यकाम३ इति भगव इति ह प्रतिशुश्राव ॥२॥ ब्रह्मणः सोम्य ते पादं ब्रवाणीति ब्रवीतु मे भगवानिति तस्मै होवाच प्राणः कला चक्षुः कला श्रोत्रं कला मनः कलैष वै सोम्य चतुष्कलः पादो ब्रह्मण आयतनवान्नाम ॥३॥ स य एतमेवं विद्वांश्चतुष्कलं पादं ब्रह्मण आयतनवानित्युपास्त आयतनवानस्मिँल्लोके भवत्यायतनवतो ह लोका-

ज्योतिष्मान् नामक पाद जाणून जो त्याची उपासना करतो तो या लोकीं ज्योतिष्मान् होतो. त्याला ज्योतिष्मान् लोक प्राप्त होतात.४.

आतां तुला मद्गु [या नांवाचा उदकचर पक्षी] (चवथा) पाद सांगेल. असें बोलून हंस स्तब्ध राहिला. दुसरे दिवशीं सत्यकामानें गाई (आचार्यगृहाच्या) मार्गाकडे वळविल्या. ज्या ठिकाणीं त्याला संध्याकाळ झाली त्या ठिकाणीं समिधा आणून त्यानें अग्नि प्रदीप्त करून त्याची उपासना केली व तो त्याच्या सन्मुख बसला.१. त्याच्यापुढें (प्राणरूपी) मद्गु (वरून) खालीं येऊन ह्मणाला, सत्यकामा. तो ह्मणाला, भगवन्. २. मद्गु ह्मणाला, बाळा, मी तुला ब्रह्माचा पाद सांगतों. सत्यकाम ह्मणाला, भगवन्, सांगा. मद्गु ह्मणाला, प्राण ही एक कला, चक्षु ही एक कला, श्रोत्र ही एक कला आणि मन ही एक कला. बाळा, या चार कला मिळून ब्रह्माचा आयतनवान् [आश्रयवान्] नांवाचा एक पाद होतो.३. याप्रमाणें चार कलांनीं युक्त असा ब्रह्माचा आयतनवान् नामक पाद जाणून जो त्याची उपासना करतो तो या लोकीं सर्वांचा आश्रयरूप

र्जयति य एतमेवं विद्वांश्चतुष्कलं पादं ब्रह्मण आयतनवानित्युपास्ते ॥४॥ इत्यष्टमः खंडः ॥८॥

प्राप हाचार्यकुलं तमाचार्योऽभ्युवाद सत्यकाम३ इति भगव इति ह प्रतिशुश्राव ॥१॥ ब्रह्मविदिव वै सोम्य भासि को नु त्वानुशशासेत्यन्ये मनुष्येभ्य इति ह प्रतिजज्ञे भगवांस्त्वेव मे कामे ब्रूयात् ॥२॥ श्रुतँ ह्येव मे भगवद्दृशेभ्य आचार्याद्धैव विद्या विदिता साधिष्ठं प्रापतीति तस्मै हैतदेवोवाचात्र ह न किंचन वीयायेति वीयायेति ॥३॥ इति नवमः खंडः ॥९॥

उपकोसलो ह वै कामलायनः सत्यकामे जाबाले ब्रह्मचर्यमुवास तस्य ह द्वादश वर्षाण्यग्नीन्परिचचार स ह स्मान्यानन्तेवासिनः समावर्तयंस्तँ ह स्मैव न समावर्तयति ॥१॥ तं जायोवाच तप्तो

होतो. त्याला आश्रययुक्त असे लोक प्राप्त होतात.४.

नंतर तो आचार्यगृहीं आला. आचार्य त्याला ह्मणाला, सत्यकामा. तो ह्मणाला, हे भगवन्.१. आचार्य ह्मणाला, बाळा, तूं ब्रह्मवेत्याप्रमाणें दिसतोस. तुला कोणीं उपदेश केला ? सत्यकामानें उत्तर दिलें, मनुष्याहून इतर (अशा देवता) इत्यादिकांनीं. (परंतु) माझी इच्छा आपणच तें सांगावें अशी आहे.२. आपल्यासारख्या (इतर) गुरूंकडून मीं ज्ञान संपादन केलें. परंतु जी विद्या आचार्यापासून ज्ञात होते तीच अत्यंत कल्याणकारक होते. हें ऐकून आचार्य त्याला ह्मणाला, तूं जें (षोडशकलात्मक ब्रह्माचें) ज्ञान जाणलें आहेस त्या ज्ञानाहून अधिक ज्ञान कांहींच (उरलें) नाहीं.३.

कमलपुत्र उपकोसल सत्यकाम जाबालाच्या गृहीं ब्रह्मचर्यानें (अध्ययनासाठीं) राहिला. त्याने सत्यकामाच्या अग्नींची बारा वर्षें परिचर्या [सेवा] केली. (बारा वर्षांनीं) सत्यकामानें इतर सर्व शिष्यांचें समावर्तन केलें, पण उपकोसलाचें समावर्तन केलें नाहीं.१. (तेव्हां) सत्यकामाची भार्या

ब्रह्मचारी कुशलमग्नीन्परिचचारीन्मा त्वाग्नयः परिप्रवोचन् प्रब्रूह्यस्मा इति तस्मै हाप्रोच्यैव प्रवासांचक्रे ॥२॥ स ह व्याधिनानशितुं दध्रे तमाचार्यजायोवाच ब्रह्मचारिन्नशान किंनु नाश्नासीति स होवाच बहव इमेऽस्मिन्पुरुषे कामा नानात्यया व्याधिभिः प्रतिपूर्णोऽस्मि नाशिष्यामीति ॥३॥ अथ हाग्नयः समूदिरे तप्तो ब्रह्मचारी कुशलं नः पर्यचारीद्धन्तास्मै प्रब्रवामेति तस्मै होचुः प्राणो ब्रह्म कं ब्रह्म खं ब्रह्मेति ॥४॥ स होवाच विजानाम्यहं यत्प्राणो ब्रह्म कं च तु खं च न विजानामीति ते होचुर्यद्वाव कं तदेव खं यदेव खं तदेव कमिति प्राणं च हास्मै तदाकाशं चोचुः ॥५॥ इति दशमः खंडः॥

सत्यकामाला ह्मणाली, या ब्रह्मचाऱ्यानें अग्नींची फार चांगली परिचर्या केली. (तरी आपण याला ब्रह्मज्ञान सांगत नाहीं ह्मणून) अग्नींनीं आपली निंदा करूं नये. याकरितां याला (ब्रह्मज्ञान) सांगा. (पण) सत्यकाम न सांगतां प्रवासाला निघून गेला.२. (तेव्हां) उपकोसलानें मानसिक दुःखा-मुळें अनशन आरंभलें. आचार्यपत्नी त्याला ह्मणाली, हे ब्रह्मचारिन्, (कांहीं) खा. तूं कां खात नाहींस? तो ह्मणाला, नाना मार्गांनीं जाणाऱ्या अनेक इच्छा मनुष्याला असतात. अशा (इच्छारूप) व्याधींनीं मी ग्रस्त आहें. मी (कांहीं) खात नाहीं.३. तेव्हां या ब्रह्मचाऱ्यानें तप आचरण केलें आहे, आमची फार चांगली परिचर्या केली, तर आतां आपण याला (ज्ञान) सांगावें अशा उद्देशानें (तीन) अग्नि प्रकट झाले व ह्मणाले, प्राण हे ब्रह्म, सुख हें ब्रह्म आणि आकाश हें ब्रह्म.४. तो (उपकोसल) ह्मणाला, प्राण हे ब्रह्म हें मला समजलें. पण सुख ब्रह्म व आकाश ब्रह्म ह्मणतां तें मला समजले नाहीं. ते (अग्नि) ह्मणाले, जें सुख तेंच आकाश आणि जें आकाश तेंच सुख [दोन्ही एकरूप आहेत व लौकिक सुख व आकाश यांहून भिन्न आहेत. ह्मणजे सुख=अनंतत्व आणि अनंतत्व= सुख]. याप्रमाणें अग्नींनीं त्या ब्रह्मचाऱ्याला प्राण आणि त्या प्राणाचें

अथ हैनं गार्हपत्योऽनुशशास पृथिव्यग्निरन्नमादित्य इति य एष आदित्ये पुरुषो दृश्यते सोऽहमस्मि स एवाहमस्मीति ॥१॥ स य एतमेवं विद्वानुपास्तेऽपहते पापकृत्यां लोकी भवति सर्वमायुरेति ज्योग्जीवति नास्यावरपुरुषाः क्षीयन्त उप वयं तं भुंजामोऽस्मिंश्च लोकेऽमुष्मिंश्च य एतमेवं विद्वानुपास्ते ॥२॥ इत्येकादशः खंडः॥११॥

अथ हैनमन्वाहार्यपचनोऽनुशशासापो दिशो नक्षत्राणि चंद्रमा इति य एष चंद्रमसि पुरुषो दृश्यते सोऽहमस्मि स एवाहमस्मीति॥१॥ स य एतमेवं विद्वानुपास्तेऽपहते पापकृत्यां लोकी भवति सर्वमायुरेति ज्योग्जीवति नास्यावरपुरुषाः क्षीयन्त उप वयं तं भुंजामोऽस्मिंश्च लोकेऽमुष्मिंश्च य एतमेवं विद्वानुपास्ते ॥२॥ इति द्वादश खंडः ॥

आकाश [=हृदयाकाश, ह्म० प्राण व हृदयाकाश हीं दोन्ही ब्रह्मच होत] असें सांगितलें.५.

(याप्रमाणें तीन अग्नींनीं मिळून ब्रह्माचें स्वरूप सांगितल्यावर प्रत्येक अग्नि उपकोसलाला स्वतःचें स्वरूप सांगता झाला—) नंतर त्याला गार्हपत्य अग्नि ह्मणाला, पृथिवी, अग्नि, अन्न आणि आदित्य हीं चार माझीं शरीरें आहेत. आदित्याचे ठिकाणीं जो पुरुष दिसतो तो मी आहें, तोच मी आहें.१. याप्रमाणें या गार्हपत्य अग्नीला जाणून जो त्याची उपासना करतो तो (आपल्या) पापकर्मांचा नाश करतो, (अग्नीचा) लोक पावतो, (या लोकीं) पूर्णायुषी होतो, त्याचें जीवन तेजस्वी होतें, त्याचें कुळ क्षय पावत नाहीं. या लोकीं आणि परलोकीं आह्मी (अग्नि) त्याचें रक्षण करतों.२.

नंतर त्याला अन्वाहार्यपचन अग्नि ह्मणाला, उदक, दिशा, नक्षत्रे आणि चंद्रमा हीं चार माझीं शरीरें आहेत. चंद्राचे ठिकाणीं जो पुरुष दिसतो तो मी आहें, तोच मी आहें.१. याप्रमाणे अन्वाहार्यपचन अग्नीला जाणून जो त्याची उपासना करतो तो (आपल्या) पापकर्मांचा नाश करतो, (अग्नीचा) लोक पावतो, (या लोकीं) पूर्णायुषी होतो, त्याचें

अथ हैनमाहवनीयोऽनुशशास प्राण आकाशो द्यौर्विद्युदिति य एष विद्युति पुरुषो दृश्यते सोऽहमस्मि स एवाहमस्मीति ॥१॥ स य एतमेवं विद्वानुपास्तेऽपहते पापकृत्यां लोकी भवति सर्वमायुरेति ज्योग्जीवति नास्यावरपुरुषाः क्षीयन्त उप वयं तं भुंजामोऽस्मिंश्च लोकेऽमुष्मिंश्च य एतमेवं विद्वानुपास्ते ॥२॥ इति त्रयोदशः खंडः॥

ते होचुरुपकोसलैषा सोम्य तेऽस्मद्विद्यात्मविद्या चाचार्यस्तु ते गतिं वक्तेत्याजगाम हास्याचार्यस्तमाचार्योऽभ्युवादोपकोसल३ इति ॥१॥ भगव इति ह प्रतिशुश्राव ब्रह्मविद इव सोम्य ते मुखं भाति को नु त्वानुशशासेति को नु मानुशिष्याद्भो इतीहापेव निह्नुत इमे नूनमीदृशा अन्यादृशा इतीहाग्नीनभ्यूदे किं नु सोम्य किल

जीवन तेजस्वी होतें, त्याचें कुळ क्षय पावत नाहीं. या लोकीं आणि परलोकीं आह्मी (अग्नि) त्याचें रक्षण करतों.२.

नंतर त्याला आहवनीय अग्नि ह्मणाला, प्राण, आकाश, द्युलोक [स्वर्ग] आणि विद्युत् हीं चार माझीं शरीरें आहेत. विजेचे ठिकाणीं जो पुरुष दिसतो तो मी आहें, तोच मी आहें.१. याप्रमाणें या आहवनीय अग्नीला जाणून जो त्याची उपासना करतो तो (आपल्या) पापकर्माचा नाश करतो, (अग्नीचा) लोक पावतो, (या लोकीं) पूर्णायुषी होतो, त्याचें जीवन तेजस्वी होतें, त्याचें कुळ क्षय पावत नाहीं. या लोकीं आणि परलोकीं आह्मी (अग्नि) त्याचें रक्षण करतों.२.

नंतर ते अग्नि ह्मणाले, बाळा उपकोसला, ही आमची विद्या आणि आत्मविद्या [प्राण हें ब्रह्म इत्यादि] आह्मीं तुला सांगितली. (ब्रह्मवेत्त्याचा) पुढील मार्ग आचार्य तुला सांगेल. नंतर कालान्तरानें त्याचा आचार्य आला. तो त्याला ह्मणाला, उपकोसला.१. उपकोसल ह्मणाला, भगवन्. आचार्य ह्मणाला, बाळा, तुझें मुख ब्रह्मज्ञान्याच्या मुखासारखें दिसत आहे. तुला कोणीं ज्ञान सांगितलें? उपकोसल ह्मणाला, मला (दुसरे) कोण सांग

तेऽवोचन्निति ॥२॥ इदमिति ह प्रतिजज्ञे लोकान्वाव किल सोम्य तेऽवोचन्नहं तु ते तद्वक्ष्यामि यथा पुष्करपलाश आपो न श्लिष्यन्त एवमेवंविदि पापं कर्म न श्लिष्यत इति ब्रवीतु मे भगवानिति तस्मै होवाच ॥३॥ इति चतुर्दशः खंडः ॥१४॥

य एषोऽक्षिणि पुरुषो दृश्यत एष आत्मेति होवाचैतदमृत-मभयमेतद्ब्रह्मेति तद्यद्यप्यस्मिन्सर्पिर्वोदकं वा सिंचन्ति वर्त्मनी एव गच्छति ॥१॥ एतꣳ संयद्वाम इत्याचक्षत एतꣳ हि सर्वाणि वामान्यभिसंयन्ति सर्वाण्येनं वामान्यभिसंयन्ति य एवं वेद ॥२॥ एष उ एव वामनीरेष हि सर्वाणि वामानि नयति सर्वाणि वामानि नयति य एवं वेद ॥३॥ एष उ एव भामनीरेष हि सर्वेषु लोकेषु

णार? हे अग्नि तुह्मी आल्यापासून जणूं काय कंप पावत आहेत. यांच्या-सारखे दुसरे अग्नि होते त्यांनीं सांगितलें. आचार्य ह्मणाला, बाळा, तुला ते काय ह्मणाले? २. तेव्हां त्यानें अग्नींनी सांगितलेलें ज्ञान निवेदन केलें. आचार्य ह्मणाला, बाळा, तुला त्यांनीं लोक सांगितले (संपूर्ण ब्रह्म सांगितलें नाहीं); तें मी सांगतों. ज्याप्रमाणें कमलपत्राला उदक स्पर्श करीत नाहीं, त्याप्रमाणें हें ब्रह्म जाणणाऱ्याला पापकर्म स्पर्श करीत नाहीं. उपकोसल ह्मणाला, भगवन्, तें ब्रह्म सांगा. ३.

या चक्षूचे ठिकाणीं जो पुरुष दिसतो तो आत्मा. हा मरणरहित व भयरहित आहे. हाच ब्रह्म होय. या चक्षूवर घृत अथवा उदक पडलें तर (कमलपत्राला ज्याप्रमाणें उदकाचा स्पर्श होत नाहीं त्याप्रमाणें चक्षूला त्याचा स्पर्श न होतां) तें बाजूलाच जातें. १. या पुरुषाला संयद्वाम असें ह्मणतात. कारण सर्व शोभन वस्तु याचे ठिकाणीं एकत्र होतात. हे जो जाणतो त्याचे ठिकाणीं सर्व शोभन वस्तु एकत्र होतात. २. हाच वामनी होय. कारण हाच सर्व वाम ह्म० पुण्यकर्मांचीं फलें प्राप्त करून देतो. हें जो जाणतो तो सर्व पुण्यकर्मफलें प्राप्त करून देतो. ३. हाच भामनी

भाति सर्वेषु लोकेषु भाति य एवं वेद ॥४॥ अथ यदु चैवास्मिञ्छव्यं कुर्वन्ति यदि च नार्चिषमेवाभिसंभवन्त्यर्चिषोऽहरह्न आपूर्यमाणपक्षमापूर्यमाणपक्षाद्यान्षडुदङ्ङेति मासांस्तान्मासेभ्यः संवत्सरꣳ संवत्सरादादित्यमादित्याच्चंद्रमसं चन्द्रमसो विद्युतं तत्पुरुषोऽमानवः स एनान्ब्रह्म गमयत्येष देवपथो ब्रह्मपथ एतेन प्रतिपद्यमाना इमं मानवमावर्तं नावर्तन्ते नावर्तन्ते ॥५॥ इति पंचदशः खंडः ॥१५॥

एष ह वै यज्ञो योऽयं पवत एष ह यन्निदꣳ सर्वं पुनाति यदेष यन्निदꣳ सर्वं पुनाति तस्मादेष एव यज्ञस्तस्य मनश्च वाक्च वर्तनी ॥१॥ तयोरन्यतरां मनसा संस्करोति ब्रह्मा वाचा होताध्वर्युरुद्गातान्यतराꣳ स यत्रोपाकृते प्रातरनुवाके पुरा परिधानीयाया

होय. कारण हा सर्व लोकांमध्यें भाति ह्म० प्रकाश पावतो. हें जो जाणतो तो सर्व लोकांमध्यें प्रकाश पावतो.४. असे ब्रह्मवेत्ते मरण पावल्यावर त्यांचें शवकर्म कोणी करोत वा न करोत. ते आर्चिष देवतेप्रत जातात. तेथून दिवसाप्रत [दिवसाभिमानिनी देवतेप्रत] जातात. तेथून शुक्लपक्षाप्रत. तेथून ज्या सहा महिन्यांमध्यें (सूर्य) उत्तरेकडे जातो त्या मासांप्रत [ह्म० उत्तरायणाप्रत]. तेथून संवत्सराप्रत. तेथून आदित्याप्रत. तेथून चंद्राप्रत. तेथून विजेप्रत. तेथें कोणी (ब्रह्मलोकींचा) अमानव पुरुष येऊन त्यांना ब्रह्माप्रत नेतो. तो देवपथ. तोच ब्रह्मपथ. या मार्गानें जाणारे पुन्हां या मानव [मनूच्या] भोंवऱ्याप्रत येत नाहींत.५.

जो वहातो तो हा (वायु) यज्ञ होय. कारण हा वहात असतां [यन्] हें सर्व (जग) शुद्ध करतो. ज्या अर्थी हा वहात असतां हें सर्व शुद्ध करतो त्या अर्थी हाच यज्ञ होय. मन आणि वाक् हे त्याचे मार्ग आहेत.१. यांपैकीं एका मार्गाचा संस्कार ब्रह्मा मनानें करतो. दुसऱ्या मार्गाचा संस्कार होता, अध्वर्यु आणि उद्गाता हे वाणीनें करतात. प्रातरनुवाकाला आरंभ झाला असतां परिधानीया ऋचेच्या पूर्वी जर ब्रह्मा

ब्रह्मा व्यववदति ॥२॥ अन्यतरामेव वर्तनीꣳ संस्करोति हीयतेऽ-
न्यतरा स यथैकपाद्व्रजन्रथो वैकेन चक्रेण वर्तमानो रिष्यत्येवमस्य
यज्ञो रिष्यति यज्ञं रिष्यन्त यजमानोऽनुरिष्यति स इष्ट्वा पापीयान्भ-
वति ॥३॥ अथ यत्रोपाकृते प्रातरनुवाके न पुरा परिधानीयाया
ब्रह्मा व्यववदत्युभे एव वर्तनी संस्कुर्वन्ति न हीयतेऽन्यतरा ॥४॥
स यथोभयपाद्व्रजन्रथो वोभाभ्यां चक्राभ्यां वर्तमानः प्रतितिष्ठत्येव-
मस्य यज्ञः प्रतितिष्ठति यज्ञं प्रतितिष्ठन्तं यजमानोऽनुप्रतितिष्ठति स
इष्ट्वा श्रेयान्भवति ॥५॥ इति षोडशः खंडः ॥१६॥

प्रजापतिर्लोकानभ्यतपत्तेषां तप्यमानानां रसान्प्रावृहदग्निं पृ-
थिव्या वायुमतरिक्षादादित्यं दिवः ॥१॥ स एतास्तिस्रो देवता

मौनाचा त्याग करील तर तो एकाच मार्गाचा [वर्तनी] सस्कार करतो, दुसऱ्या मार्गाचा नाश होतो. ज्याप्रमाणे एकपाद मनुष्य (मार्गाने) चालला असता नाश पावतो अथवा एका चाकाने चालणारा रथ नाश पावतो, त्याप्रमाणे अशा यजमानाचा यज्ञ (ब्रह्मयाच्या चुकीमुळे) नाश पावतो. यज्ञाचा नाश झाला असता यजमानाचा नाश होतो. असा यज्ञ केल्याने यजमान अधिक पापयुक्त होतो.२.३. (पण) प्रातरनुवाकाला आरभ झाला असता परिधानीया ऋचेचे पूर्वी जर ब्रह्मा मौनाचा त्याग न करील तर तो दोन्ही मार्गाचा सस्कार करतो. कोणत्याहि मार्गाचा नाश होत नाही.४. ज्याप्रमाणे दोन पाय असलेला पुरुष चालतो अथवा ज्याप्रमाणे दोन चाकानी युक्त असलेला रथ उभा रहातो, त्याप्रमाणे तो यज्ञ प्रतिष्ठा पावतो [तडीस जातो]. यज्ञ प्रतिष्ठा पावला ह्मणजे यजमान प्रतिष्ठा पावतो. असा यज्ञ केल्याने यजमान श्रेष्ठ होतो.५.

लोकाना उद्देशून प्रजापतीने (ध्यानरूप) तप केले. त्या तप्त लोका-पासून त्याने रस ग्रहण केले. ते असे— पृथिवीपासून अग्नि, अंतरिक्षापासून वायु आणि द्युलोकापासून आदित्य.१. (नंतर) त्याने या तीन देवताना

अभ्यतपत्तासां तप्यमानानां रसान्प्रावृहदग्नेर्ऋचो वायोर्यजूंषि सामान्यादित्यात् ॥२॥ स एतां त्रयीं विद्यामभ्यतपत्तस्यास्तप्यमानाया रसान् प्रावृहद्भूरित्यृग्भ्यो भुवरिति यजुर्भ्यः स्वरिति सामभ्यः ॥३॥ तद्यदृक्तो रिष्येद्भूः स्वाहेति गार्हपत्ये जुहुयादृचामेव तद्रसेनर्चां वीर्येणर्चां यज्ञस्य विरिष्टꣳ संदधाति ॥४॥ अथ यदि यजुष्टो रिष्येद्भुवः स्वाहेति दक्षिणाग्नौ जुहुयाद्यजुषामेव तद्रसेन यजुषां वीर्येण यजुषां यज्ञस्य विरिष्टꣳ संदधाति ॥५॥ अथ यदि सामतो रिष्येत्स्वः स्वाहेत्याहवनीये जुहुयात्साम्नामेव तद्रसेन साम्नां वीर्येण साम्नां यज्ञस्य विरिष्टꣳ संदधाति ॥६॥ तद्यथा लवणेन सुवर्णꣳ संदध्यात्सुवर्णेन रजतं रजतेन त्रपु त्रपुणा सीसꣳ सीसेन लोहं लोहेन दारु दारु चर्मणा ॥७॥ एवमेषां लोकानामासां देवतानामस्यास्त्रय्या विद्याया

उद्देशून तप केले. त्या तप्त देवतांपासून त्याने रस ग्रहण केले. ते असे— अग्नीपासून ऋचा, वायूपासून यजु आणि आदित्यापासून साम.२. (नंतर) त्यानें या त्रयी विद्येला उद्देशून तप केले. त्या तप्त विद्येपासून त्यानें रस ग्रहण केले. ते असे— ऋचांपासून भूः, यजूंपासून भुवः आणि सामांपासून स्वः३. ह्मणून ऋचेसंबंधाने (यज्ञांत) दोष घडला तर "भूः स्वाहा" या मंत्राने गार्हपत्य अग्नीमध्ये हवन करावे. ऋचांच्या रसाने व वीर्यानें ऋग्यज्ञाचा दोष दूर होतो.४. जर यजूंसंबंधाने दोष घडला तर "भुवः स्वाहा" या मंत्रानें दक्षिणाग्नीमध्यें हवन करावें. यजूंच्या रसानें व वीर्यानें यजुर्यज्ञाचा दोष दूर होतो.५. जर सामांसंबंधानें दोष घडला तर "स्वः स्वाहा" या मंत्राने आहवनीय अग्नीमध्यें हवन करावे. सामांच्या रसानें व वीर्यानें सामयज्ञाचा दोष दूर होतो.६. ज्याप्रमाणें टांकणखारानें सुवर्ण सांधलें जातें, सुवर्णानें रजत सांधलें जातें, रजतानें कथील, कथिलानें शिसें, शिश्यानें लोखंड, लोखंडानें लांकूड, अथवा कातड्यानें लांकूड सांधलें जातें, त्याप्रमाणें हे लोक, या देवता व ही त्रयी विद्या यांचे तेजानें

वीर्येण यज्ञस्य विरिष्टꣳ संदधाति भेषजकृतो ह वा एष यज्ञो यत्रैवंविद्ब्रह्मा भवति ॥८॥ एष ह वा उदक्प्रवणो यज्ञो यत्रैवंविद्ब्रह्मा भवत्येवंविदꣳ ह वा एषा ब्रह्माणमनुगाथा यतो यत आवर्तते तत्तद्गच्छति ॥९॥ मानवो ब्रह्मैवैक ऋत्विक्कुरूनश्वाभिरक्षत्येवंविद्ध वै ब्रह्मा यज्ञं यजमानꣳ सर्वाꣳश्चर्त्विजोऽभिरक्षति तस्मादेवंविदमेव ब्रह्माणं कुर्वीत नानेवंविदं नानेवंविदम् ॥१०॥ इति सप्तदशः खंडः ॥१७॥ इति चतुर्थोऽध्यायः ॥४॥

अथ पंचमोऽध्यायः ॥

ॐ यो ह वै ज्येष्ठं च श्रेष्ठं च वेद ज्येष्ठश्च ह वै श्रेष्ठश्च भवति प्राणो वाव ज्येष्ठश्च श्रेष्ठश्च ॥१॥ यो ह वै वसिष्ठं वेद वसिष्ठो ह स्वानां भवति वाग्वाव वसिष्ठः ॥२॥ यो ह वै प्रतिष्ठां वेद प्रति

यज्ञांतील दोष सांधला जातो. हें जाणणारा ब्रह्मा ज्यामध्यें असतो तो यज्ञ औषधरूपच होय.७.८. ज्या यज्ञामध्यें हें (प्रायश्चित्त) जाणणारा ब्रह्मा असतो तो यज्ञ याप्रमाणें उत्तरगामी होतो. ह्मणून ब्रह्मयाच्या स्तुतिपर पुढील गाथा आहे– "यतो यत आवर्तते तत्तद्गच्छति" [अर्थ=ज्या ज्या ठिकाणीं यज्ञामध्यें प्रमाद होतो तो तो ब्रह्मा सांधतो].९. (अशा प्रकारचा ज्ञानी) मननशील ब्रह्मा हाच (खरा) ऋत्विज् होय. ज्याप्रमाणें घोडी योद्ध्याचें रक्षण करते त्याप्रमाणें यज्ञ, यजमान आणि सर्व ऋत्विज यांचें ब्रह्मा रक्षण करतो. ह्मणून हें (प्रायश्चित्त) जाणणाराच ब्रह्मा (यज्ञामध्यें) घ्यावा, हें न जाणणारा घेऊं नये.१०.

## अध्याय पांचवा.

जो (वयानें) ज्येष्ठ व (गुणांनीं) श्रेष्ठ अशाला जाणतो तो (स्वतः) ज्येष्ठ व श्रेष्ठ होतो. प्राण हाच ज्येष्ठ व श्रेष्ठ आहे.१. जो धनवत्तर अशाला जाणतो तो स्वजनांमध्यें धनवत्तर होतो. वाणी हीच धनवत्तर आहे.२. जो प्रतिष्ठा [स्थिति] जाणतो तो या लोकीं व परलोकीं प्रतिष्ठा

ह तिष्ठत्यस्मिंश्च लोकेऽमुष्मिंश्च चक्षुर्वाव प्रतिष्ठा ॥३॥ यो ह वै संपदं वेद सꣳ हास्मै कामाः पद्यन्ते दैवाश्च मानुषाश्च श्रोत्रं वाव संपत् ॥४॥ यो ह वा आयतनं वेदायतनꣳ ह स्वानां भवति मनो ह वा आयतनम् ॥५॥ अथ ह प्राणा अहंश्रेयसि व्यूदिरेऽहꣳ श्रेयानस्म्यहꣳ श्रेयानस्मीति ॥६॥ ते ह प्राणाः प्रजापतिं पितरमेत्योचुर्भगवन्को नः श्रेष्ठ इति तान्होवाच यस्मिन्व उत्क्रान्ते शरीरं पापिष्ठतरमिव दृश्येत स वः श्रेष्ठ इति ॥७॥ सा ह वागुच्चक्राम सा संवत्सरं प्रोष्य पर्येत्योवाच कथमशकतर्ते मज्जीवितुमिति यथा कला अवदन्तः प्राणन्तः प्राणेन पश्यन्तश्चक्षुषा शृण्वन्तः श्रोत्रेण ध्यायन्तो मनसैवमिति प्रविवेश ह वाक् ॥८॥ चक्षुर्होच्चक्राम तत्संवत्सरं प्रोष्य पर्येत्योवाच कथमशकतर्ते मज्जीवितुमिति यथांधा

पावतो. चक्षु हीच प्रतिष्ठा आहे.३. जो संपत्ति जाणतो त्याला दैवी व मानुष असे सर्व काम पावतात. श्रोत्र हीच संपत्ति आहे.४. जो आयतन [आश्रयस्थान] जाणतो तो स्वजनांचें आयतन होतो. मन हेंच आयतन आहे.५. एकदां इंद्रियें आपणांमध्यें श्रेष्ठ कोण यासंबंधानें ह्मणूं लागलीं, 'मीच श्रेष्ठ आहें' 'मीच श्रेष्ठ आहें.'६. तेव्हां तीं आपला पिता जो प्रजापति त्याकडे जाऊन ह्मणालीं, हे भगवन्, आमच्यांमध्यें श्रेष्ठ कोण? प्रजापति त्यांना ह्मणाला, तुमच्यामध्यें जो गेला असतां शरीर अत्यंत पापयुक्त [अशुद्ध, अस्पृश्य] दिसतें तो श्रेष्ठ होय.७. तेव्हां वाणी निघून गेली. ती एक वर्षपर्यंत बाहेर राहून पुन्हां आली (तरी इतर जिवंत आहेत असे पाहून) ह्मणाली, माझ्यावांचून तुह्मी कसे जगूं शकलां? तीं ह्मणालीं, जसे मुके मनुष्य बोलतां येत नसलें तरी, प्राणानें श्वास घेणारे, चक्षूनें पहाणारे, श्रोत्रानें ऐकणारे व मनानें ध्यान करणारे असे असतात तसे आह्मी होतों. हें ऐकून वाणीनें (आपण श्रेष्ठ नाहीं असें जाणून) पुन्हां त्यांच्यामध्यें प्रवेश केला.८. नंतर चक्षु निघून

अपश्यन्तः प्राणन्तः प्राणेन वदन्तो वाचा शृण्वन्तः श्रोत्रेण ध्यायन्तो मनसैवमिति प्रविवेश ह चक्षुः ॥९॥ श्रोत्रं होच्चक्राम तत्संवत्सरं प्रोष्य पर्येत्योवाच कथमशकतर्ते मज्जीवितुमिति यथा बधिरा अशृण्वन्तः प्राणन्तः प्राणेन वदन्तो वाचा पश्यन्तश्चक्षुषा ध्यायन्तो मनसैवमिति प्रविवेश ह श्रोत्रम् ॥१०॥ मनो होच्चक्राम तत्संवत्सरं प्रोष्य पर्येत्योवाच कथमशकतर्ते मज्जीवितुमिति यथा बाला अमनसः प्राणन्तः प्राणेन वदन्तो वाचा पश्यन्तश्चक्षुषा शृण्वन्तः श्रोत्रेणैवमिति प्रविवेश ह मनः ॥११॥ अथ ह प्राण उच्चिक्रमिषन्स

गेला. तो एक वर्षपर्यंत बाहेर राहून पुन्हां आला (तरी इतर जिवंत आहेत असे पाहून) ह्मणाला, माझ्यावांचून तुह्मी कसे राहूं शकलां ? तीं ह्मणालीं, जसे अंधळे मनुष्य दिसत नसले तरी, प्राणानें श्वास घेणारे, वाणीनें बोलणारे, श्रोत्रानें ऐकणारे व मनानें ध्यान करणारे असे असतात तसे आह्मी होतों. हे ऐकून चक्षूनें (आपण श्रेष्ठ नाहीं असें जाणून) पुन्हां त्यांच्यामध्ये प्रवेश केला.९. नंतर श्रोत्र निघून गेलें. ते एक वर्षपर्यंत बाहेर राहून पुन्हां आलें (तरी इतर जिवंत आहेत असें पाहून) ह्मणाले, माझ्यावांचून तुह्मी कसे राहूं शकलां ? तीं ह्मणालीं, जसे बहिरे मनुष्य ऐकूं येत नसले तरी, प्राणानें श्वास घेणारे, वाणीनें बोलणारे, चक्षूनें पहाणारे व मनानें ध्यान करणारे असे असतात तसे आह्मी होतों. हे ऐकून श्रोत्राने (आपण श्रेष्ठ नाहीं असें जाणून) पुन्हां त्यांच्यामध्यें प्रवेश केला.१०. नंतर मन निघून गेलें. तें एक वर्षपर्यंत बाहेर राहून पुन्हां आले (तरी इतर जिवंत आहेत असें पाहून) ह्मणालें, माझ्यावांचून तुह्मी कसे राहूं शकलां ? तीं ह्मणालीं, जसे बालक कोवळ्या मनाचे असले तरी, प्राणाने श्वास घेणारे, वाणीनें बोलणारे, चक्षूनें पहाणारे व श्रोत्रानें ऐकणारे असे असतात तसे आह्मी होतों. हे ऐकून मनानें (आपण श्रेष्ठ नाहीं असें जाणून) पुन्हां त्यांच्यामध्यें प्रवेश केला.११. नंतर प्राण

यथा सुहयः पड्वीशशंकून्संखिदेदेवमितरान्प्राणान्समखिदत्तँ हाभिसमेत्योचुर्भगवन्नेधि त्वं नः श्रेष्ठोऽसि मोत्क्रमीरिति ॥१२॥ अथ हैनं वागुवाच यदहं वसिष्ठोऽस्मि त्वं तद्वसिष्ठोऽसीत्यथ हैनं चक्षुरुवाच यदहं प्रतिष्ठास्मि त्वं तत्प्रतिष्ठासीति ॥१३॥ अथ हैन श्रोत्रमुवाच यदहँ संपदस्मि त्वं तत्संपदसीत्यथ हैनं मन उवाच यदहमायतनमस्मि त्वं तदायतनमसीति ॥१४॥ न वै वाचो न चक्षूंषि न श्रोत्राणि न मनांसीत्याचक्षते प्राणा इत्येवाचक्षते प्राणो ह्येवैतानि सर्वाणि भवति ॥१५॥ इति प्रथमः खंडः ॥१॥

स होवाच किं मेऽन्नं भविष्यतीति यत्किंचिदिदमा श्वभ्य आ शकुनिभ्य इति होचुस्तद्वा एतदनस्यान्नमनो ह वै नाम प्रत्यक्षं न ह वा एवंविदि किंचनानन्नं भवतीति ॥१॥ स होवाच किं मे वासो

निघून जाऊं लागला तेव्हां, ज्याप्रमाणें चांगला अश्व पायांत बांधलेले बंधन तोडून टाकतो त्याप्रमाणें, त्यानें इतर (वागादि) इंद्रियांना तोडलें. त्याबरोबर तीं सर्व त्याच्याकडे येऊन ह्मणालीं, भगवन्, मागें ये. आमच्यामध्यें तूंच श्रेष्ठ आहेस. जाऊं नकोस.१२. नंतर वाणी त्याला ह्मणाली, माझ्यामध्यें जी धनवत्ता आहे ती तुझी आहे. चक्षु ह्मणाला, माझ्यामध्ये जी प्रतिष्ठा आहे ती तुझी आहे.१३. श्रोत्र ह्मणालें, माझ्यामध्यें जी संपत्ति आहे ती तुझी आहे. मन ह्मणालें, माझ्यामध्ये जें आयतन आहे तें तुझें आहे.१४. या सर्वांना कोणी वाणी असें ह्मणत नाहीं, चक्षु असें नाहीं, श्रोत्रें नाही, मनें असें नाहीं; तर सर्वांना प्राण असेंच ह्मणतात. (कारण) प्राण हीं सर्व (वाणी आदि) होतो.१५.

तो प्राण (वाणी इत्यादींना) ह्मणाला, माझें अन्न कोणतें? तीं ह्मणालीं, कुत्रे, पक्षी इत्यादिकांचें जें अन्न तेंच तुझें अन्न. हे जें सर्व अन्न आहे हें प्राणाचेंच अन्न. अन हे प्राणाचें प्रत्यक्ष नांव. हें (प्राणाचें माहात्म्य) जो जाणील त्याला सर्व अन्न मिळेल.१. प्राण ह्मणाला, माझें वस्त्र

भविष्यतीत्याप इति होचुस्तस्माद्वा एतदशिष्यन्तः पुरस्ताच्चोपरिष्टा-च्चाद्भिः परिदधति लम्भुको ह वासो भवत्यनग्नो ह भवति ॥२॥ तद्धैतत्सत्यकामो जाबालो गोश्रुतये वैयाघ्रपद्यायोक्त्वोवाच यद्यप्येन-च्छुष्काय स्थाणवे ब्रूयाज्जायेरन्नेवास्मिञ्छाखाः प्ररोहेयुः पलाशानीति ॥३॥ अथ यदि महज्जिगमिषेदमावास्यायां दीक्षित्वा पौर्णमास्यां रात्रौ सर्वौषधस्य मन्थं दधिमधुनोरुपमथ्य ज्येष्ठाय श्रेष्ठाय स्वाहेत्यग्ना-वाज्यस्य हुत्वा मन्थे संपातमवनयेत् ॥४॥ वसिष्ठाय स्वाहेत्यग्ना-वाज्यस्य हुत्वा मन्थे संपातमवनयेत्प्रतिष्ठायै स्वाहेत्यग्नावाज्यस्य हुत्वा मंथे संपातमवनयेत्संपदे स्वाहेत्यग्नावाज्यस्य हुत्वा मन्थे संपातमवनयेदायतनाय स्वाहेत्यग्नावाज्यस्य हुत्वा मन्थे संपा-

कोणतें? तीं ह्मणालीं, उदक. ह्मणून अन्न खाण्याच्या अगोदर व नंतर (ब्राह्मण) उदकानें प्राणाचें परिधान करतात. हे जो जाणतो तो वस्त्रांनीं पूर्ण होतो, तो कधीं वस्त्रहीन असत नाहीं.२. हें ज्ञान जाबाल सत्यकामानें व्याघ्रपदाचा पुत्र गोश्रुति याला सांगितले आणि ह्मणाला, हे ज्ञान जरी कोरड्या खांबाला सांगितले तरी त्याला शाखा फुटतील व पालवी फुटेल (मग जिवंत मनुष्याला सांगितलें असतां किती फल येईल!)३. आतां जर महत्त्व प्राप्त व्हावें अशी इच्छा असेल तर अमावास्येचे दिवशीं (भूमि-शयन, तप, सत्य, ब्रह्मचर्य इत्यादि नियमांची) दीक्षा घेऊन पूर्णिमेचे रात्रीं सर्व (ग्राम्य व आरण्य) ओषधी घेऊन त्यांचे दहीं व मध यांच्यामध्यें मंथन करावें. ''ज्येष्ठाय श्रेष्ठाय स्वाहा'' या मंत्रानें अग्नीमध्यें पळीनें आहुति देऊन पळी मंथामध्ये रिकामी करावी.४. ''वसिष्ठाय स्वाहा'' या मंत्रानें अग्नीमध्यें घृताची आहुति देऊन पळी मथामध्ये रिकामी करावी. ''प्रति-ष्ठायै स्वाहा'' या मंत्रानें अग्नीमध्यें घृताची आहुति देऊन पळी मंथामध्यें रिकामी करावी. ''संपदे स्वाहा'' या मंत्रानें अग्नीमध्यें घृताची आहुति देऊन पळी मंथामध्यें रिकामी करावी. ''आयतनाय स्वाहा'' या मंत्रानें

तमवनयेत् ॥५॥ अथ प्रतिसृप्यांजलौ मन्थमाधाय जपत्यमो नामास्यमा हि ते सर्वमिदꣳ स हि ज्येष्ठः श्रेष्ठो राजाधिपतिः स मा ज्यैष्ठ्यꣳ श्रैष्ठ्यं राज्यमाधिपत्यं गमयत्वहमेवेदꣳ सर्वमसानीति ॥६॥ अथ खल्वेतयर्चा पच्छ आचामति तत्सवितुर्वृणीमह इत्याचामति वयं देवस्य भोजनमित्याचामति श्रेष्ठꣳ सर्वधातममित्याचामति तुरं भगस्य धीमहीति सर्वं पिबति ॥ निर्णिज्य कंसं चमसं वा पश्चादग्नेः संविशति चर्मणि वा स्थंडिले वा वाचंयमोऽप्रसाहः स यदि स्त्रियं पश्येत्समृद्धं कर्मेति विद्यात् ॥७॥ तदेष श्लोकः ॥ यदा कर्मसु

अग्नीमध्यें घृताची आहुति देऊन पळी मंथामध्यें रिकामी करावी.५. नंतर अग्नीपासून जरा बाजूला होऊन ओंजळीमध्ये मंथ घ्यावा व "अमोनामासि अमा हि ते०......" [अर्थ— तुझे नांव अमः आहे. कारण हें सर्व (जगत्) तुझ्या बरोबर [=सह=अमा] आहे. हा प्राणरूपी मंथ सर्वांमध्यें ज्येष्ठ, श्रेष्ठ, राजा व अधिपति आहे. हा मला ज्येष्ठत्व, श्रेष्ठत्व, राज्य आणि आधिपत्य देवो. हें सर्व मला प्राप्त होवो] असा मंत्र ह्मणावा.६. नंतर त्या मंथाचें पुढील ऋचेनें पादशः आचमन [एकेका पादानें एकेक आचमन] करावे-"तत्सवितुर्वृणीमहे;" आचमन करावें. "वयं देवस्य भोजनं;" आचमन करावें. "श्रेष्ठं सर्वधातमं;" आचमन करावें. "तुरं भगस्य धीमहि" असें ह्मणून सर्व प्राशन करावें [मंत्राचा अर्थ– सर्वांचा प्रसविता जो आदित्यरूपी प्राण त्याचे मंथरूप जें हे श्रेष्ठ, सर्व जगताचें धारण करणारें असें भोजन त्याची आह्मी प्रार्थना करतों. त्या सवित्याच्या स्वरूपाचें आह्मी शीघ्र ध्यान करतों]. नंतर तें कंसाकार अथवा चमसाकार पात्र धुऊन ठेवावें. अग्नीच्या पश्चिमेस पूर्वाभिमुख होत्साता कृष्णाजिनावर अथवा केवल भूमीवर शयन करावे. वाणीचें नियमन करावें व घाबरूं नये [संयतचित्त असावें]. जर (स्वप्नामध्यें) स्त्री दिसेल तर कर्म सफळ झालें असें समजावें.७. याविषयीं पुढील मंत्र

काम्येषु स्त्रियꣳ स्वप्नेषु पश्यति ॥ समृद्धिं तत्र जानीयात्तस्मिन्स्वप्रनिदर्शने तस्मिन्स्वप्रनिदर्शने ॥८॥ इति द्वितीयः खंडः ॥२॥

श्वेतकेतुर्हारुणेयः पंचालानाꣳ समितिमेयाय तꣳह प्रवाहणो जैवलिरुवाच कुमारानु त्वाशिषत्पितेत्यनु हि भगव इति ॥१॥ वेत्थ यदितोऽधि प्रजाः प्रयन्तीति न भगव इति वेत्थ यथा पुनरावर्तन्त३ इति न भगव इति वेत्थ पथोर्देवयानस्य पितृयाणस्य च व्यावर्तना३ इति न भगव इति ॥२॥ वेत्थ यथासौ लोको न संपूर्यत३ इति न भगव इति वेत्थ यथा पंचम्यामाहुतावापः पुरुषवचसो भवन्तीति नैव भगव इति ॥३॥ अथानु किमनुशिष्टोऽवोचथा यो हीमानि न विद्यात्कथꣳ सोऽनुशिष्टो ब्रुवीतेति स हायस्तः पितुरर्धमेयाय तꣳ

आहे— काम्य कर्म झालें ह्मणजे जर स्वप्नांमध्ये स्त्री दिसेल तर त्या स्वप्नदर्शनामध्यें समृद्धि आहे असें जाणावें.८.

आरुणीचा पुत्र श्वेतकेतु पंचालांच्या सभेमध्यें गेला. तेथें त्याला जीवलपुत्र (राजा) प्रवाहण ह्मणाला, कुमारा, तुला तुझ्या पित्यानें विद्या शिकविली आहे काय ? तो ह्मणाला, भगवन्, होय.१. प्रवाहण ह्मणाला, या लोकांतून प्रजा वर जातात हे तूं जाणतोस काय ? श्वेतकेतु ह्मणाला, भगवन् नाहीं. प्रवाहण ह्मणाला, प्रजा वर गेल्यानंतर या लोकीं परत येतात हें जाणतोस काय ? श्वेतकेतु ह्मणाला, भगवन् नाहीं. प्रवाहण ह्मणाला, देवयान व पितृयाण या दोन मार्गाचें भिन्न होण्याचें स्थान कोणतें तूं जाणतोस काय ? श्वेतकेतु ह्मणाला, भगवन् नाहीं.२. प्रवाहण ह्मणाला, तो पितृलोक कां पूर्ण होत नाहीं तूं जाणतोस काय ? श्वेतकेतु ह्मणाला, नाहीं. प्रवाहण ह्मणाला, पांच आहुति हवन केल्यानंतर (सहावी आहुति जें) उदक (तें) पुरुष असें नाम पावतें हे तूं जाणतोस काय ? श्वेतकेतु ह्मणाला, भगवन् नाहीं.३. तेव्हां प्रवाहण ह्मणाला, तर मग मी विद्या शिकलों आहें असें तूं ह्मणालास तें काय ? (मीं विचारलेल्या)

होवाचाननुशिष्य वाव किल मा भगवानब्रवीदनु त्वाशिषमिति ॥४॥ पंच मा राजन्यबन्धुः प्रश्नानप्राक्षीत्तेषां नैकंचनाशकं विवक्तुमिति स ह होवाच यथा मा त्वं तदैतानवदो यथाहमेषां नैकंचन वेद यद्यहमिमानवेदिष्यं कथं ते नावक्ष्यमिति ॥५॥ स ह गौतमो राज्ञोऽर्धमेयाय तस्मै ह प्राप्तायार्हांचकार स ह प्रातः सभाग उदेयाय तꣳ होवाच मानुषस्य भगवन्गौतम वित्तस्य वरं वृणीथा इति स होवाच तवैव राजन्मानुषं वित्तं यामेव कुमारस्यान्ते वाचमभाषथास्तामेव मे ब्रूहीति स ह कृच्छ्रीबभूव ॥६॥ तꣳ ह चिरं वसेत्याज्ञापयांचकार तꣳ होवाच यथा मा त्वं गौतमावदो यथेयं न प्राक् त्वत्तः पुरा

या प्रश्नांचें उत्तर ज्याला माहीत नाहीं त्याला विद्यायुक्त कसें ह्मणावें? तेव्हां तो राजानें त्रास दिलेला श्वेतकेतु आपल्या बापाच्या घरीं आला आणि त्याला ह्मणाला, (समावर्तनकालीं) तुला विद्या शिकविली असें आपण मला विद्या न शिकवितां सांगितलें.४. त्या मूर्खानें मला पांच प्रश्न केले पण त्यांतल्या एकाचेंहि उत्तर मी देऊं शकलों नाहीं. पिता ह्मणाला, ज्याप्रमाणें तूं एकाचेंहि उत्तर देऊं शकला नाहींस त्याप्रमाणें मीहि तें जाणीत नाहीं. मी जर जाणीत असतों तर तुला कां वरें सांगितलें नसतें?५. तो गौतम (—गोत्रोत्पन्न आरुणि) राजाच्या स्थानाप्रत गेला. तो आलेला पाहून राजानें त्याचें आतिथ्य केलें. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं राजा सभेला गेला तेव्हां (तेथें सभेंत) गौतम उभा राहिला. त्याला राजा ह्मणाला, भगवन् गौतम, मानुष वित्ताचा वर मागा. गौतम ह्मणाला, राजा, मानुष वित्त तुझें तुजपाशींच राहूं दे. माझ्या कुमाराला तूं जें भाषण बोललास तेंच माझ्याबरोबर बोल. हें ऐकून राजा दुःखी झाला.६. तेव्हां त्यानें गौतमाला तूं येथें बराच काळ रहा अशी आज्ञा केली आणि सांगितलें, गौतमा, कारण ती विद्या मला सांगा असें तूं मला ह्मणत आहेस ह्मणून. तुझ्या अगोदर [ह्म० अद्यापपर्यंत] ही विद्या ब्राह्मणांकडे गेलेली

विद्या ब्राह्मणान्गच्छति तस्मादु सर्वेषु लोकेषु क्षत्रस्यैव प्रशासनमभूदिति तस्मै होवाच ॥७॥ इति तृतीयः खंडः॥३॥

असौ वाव लोको गौतमाग्निस्तस्यादित्य एव समिद्रश्मयो धूमोऽहरर्चिश्चन्द्रमा अंगारा नक्षत्राणि विस्फुलिंगाः ॥१॥ तस्मिन्नेतस्मिन्नग्नौ देवाः श्रद्धां जुह्वति तस्या आहुतेः सोमो राजा संभवति ॥२॥ इति चतुर्थः खंडः ॥४॥

पर्जन्यो वाव गौतमाग्निस्तस्य वायुरेव समिदभ्रं धूमो विद्युदर्चिरशनिरंगारा ह्रादनयो विस्फुलिंगाः ॥१॥ तस्मिन्नेतस्मिन्नग्नौ देवाः सोमं राजानं जुह्वति तस्या आहुतेर्वर्षं संभवति ॥२॥ इति पंचमः खंडः ॥५॥

पृथिवी वाव गौतमाग्निस्तस्याः संवत्सर एव समिदाकाशो धूमो रात्रिरर्चिर्दिशोऽगारा अवान्तरदिशो विस्फुलिंगाः ॥१॥ तस्मि-

नाहीं. ह्मणून सर्व लोकांमध्यें क्षत्रियांकडून (या विद्येचें) शिक्षण (शिष्यांना) मिळत आलें. याप्रमाणें सांगून राजा त्याला विद्या सांगता झाला.७.

हे गौतमा, हा लोक ह्मणजे अग्नि होय. आदित्य ही याची समिधा, आदित्याचे किरण हा धूम, दिवस ही ज्वाला, चंद्रमा हे निखारे आणि नक्षत्रें या ठिणग्या.१. अशा या अग्नीमध्यें देव श्रद्धेचें हवन करतात. त्या आहुतीपासून सोम राजा उत्पन्न होतो.२.

हे गौतमा, पर्जन्य हा अग्नि होय. वायु ही त्याची समिधा, अभ्रें हा धूम, वीज ही ज्वाला, इंद्रधनुष्य हे निखारे आणि मेघगर्जना या ठिणग्या.१. अशा या अग्नीमध्यें देव सोम राजाचें हवन करतात. त्या आहुतीपासून वृष्टि उत्पन्न होते.२.

हे गौतमा, पृथिवी हा अग्नि होय. संवत्सर ही त्याची समिधा, आकाश हा धूम, रात्र ही ज्वाला, दिशा हे निखारे आणि उपदिशा या ठिणग्या.१. अशा या अग्नीमध्यें देव वृष्टीचें हवन करतात. त्या आहुती-

न्नेतस्मिन्नग्नौ देवा वर्षं जुह्वति तस्या आहुतेरन्नꣳ संभवति ॥२॥ इति षष्ठः खंडः ॥६॥

पुरुषो वाव गौतमाग्निस्तस्य वागेव समित्प्राणो धूमो जिह्वार्चिश्चक्षुरंगाराः श्रोत्रं विस्फुलिंगाः ॥१॥ तस्मिन्नेतस्मिन्नग्नौ देवा अन्नं जुह्वति तस्या आहुते रेतः संभवति ॥२॥ इति सप्तमः खंडः ॥७॥...॥८॥

इति तु पंचम्यामाहुतावापः पुरुषवचसो भवन्तीति स उल्बावृतो गर्भो दश वा नव वा मासानन्तः शयित्वा यावद्वाथ जायते ॥१॥ स जातो यावदायुषं जीवति तं प्रेतं दिष्टमितोऽग्नय एव हरन्ति यत एवेतो यतः संभूतो भवति ॥२॥ इति नवमः खंडः ॥

तद्य इत्थं विदुर्ये चेमेऽरण्ये श्रद्धा तप इत्युपासते तेऽर्चिषम-

पासून अन्न उत्पन्न होते.२.

हे गौतमा, पुरुष हा अग्नि होय. वाणी ही त्याची समिधा, प्राण हा धूम, जिह्वा ही ज्वाला, चक्षु हे निखारे, आणि श्रोत्र या ठिणग्या.१. अशा या अग्नीमध्ये देव अन्नाचें हवन करतात. त्या आहुतीपासून रेत उत्पन्न होतें.२. ...

याप्रमाणें पांच आहुति झाल्या ह्मणजे उदकाला पुरुष ही संज्ञा प्राप्त होते. तो उल्बानें वेष्टित असा गर्भ दहा अथवा नऊ महिने अथवा यांहून कमी अधिक कालपर्यंत आंत राहिल्यानंतर जन्म पावतो.१. जन्म पावल्यावर (कर्मानुसार) जितकें आयुष्य असेल तितका जगतो. तो मरण पावला ह्मणजे (कर्मानें) निर्दिष्ट अशा लोकाप्रत (जाण्यासाठीं) त्याला येथून [घरांतून अथवा ग्रामांतून] अग्नीप्रत—ज्याच्यापासून तो इकडे आला व ज्याच्यापासून तो उत्पन्न झाला त्या अग्नीप्रत—नेतात.२.

याप्रमाणें हें (पंचाग्निदर्शन) जे (गृहस्थ) जाणतात आणि जे (वानप्रस्थ व संन्यासी) अरण्यामध्यें श्रद्धा आणि तप यांची उपासना कर-

भिसंभवन्त्यर्चिषोऽहरह्न आपूर्यमाणपक्षमापूर्यमाणपक्षाद्यान्षडुङ्ङेति मासांस्तान् ॥१॥ मासेभ्यः संवत्सरꣳ संवत्सरादादित्यमादित्याच्चंद्रमसं चंद्रमसो विद्युतं तत्पुरुषोऽमानवः स एनान्ब्रह्म गमयत्येष देवयानः पंथा इति ॥२॥ अथ य इमे ग्राम इष्टापूर्ते दत्तमित्युपासते ते धूममभिसंभवन्ति धूमाद्रात्रिं रात्रेरपरपक्षमपरपक्षाद्यान्षड्दक्षिणैति मासांस्तान्नैते संवत्सरमभिप्राप्नुवन्ति ॥३॥ मासेभ्यः पितृलोकं पितृलोकादाकाशमाकाशाच्चंद्रमसमेष सोमो राजा तद्देवानामन्नं तं देवा भक्षयन्ति ॥४॥ तस्मिन्यावत्संपातमुषित्वाथैतमेवाध्वानं पुनर्निवर्तन्ते यथेतमाकाशमाकाशाद्वायुं वायुर्भूत्वा धूमो भवति धूमो भूत्वाभ्रं भवति ॥५॥ अभ्रं भूत्वा मेघो भवति मेघो भूत्वा प्रवर्षति त इह व्रीहियवा ओषधिवनस्पतयस्तिलमाषा इति जायन्तेऽतो

तात ते सर्व अर्चिरभिमानिनी देवतेप्रत जातात. अर्चीपासून दिवस, दिवसापासून शुक्ल पक्ष, शुक्ल पक्षापासून उत्तरायणाचे सहा मास, त्या मासांपासून संवत्सर, संवत्सरापासून आदित्य, आदित्यापासून चंद्र आणि चंद्रापासून विद्युत्. त्या ठिकाणीं (ब्रह्मलोकींचा) अमानव पुरुष येऊन त्यांना ब्रह्माकडे नेतो. हा देवयान मार्ग होय.१.२. जे गांवामध्यें [ह्म० गृहस्थ] इष्ट [अग्निहोत्रादि], पूर्त [वापीतडागादि] आणि दान यांची उपासना करतात ते धूमाप्रत जातात. धूमापासून रात्र, रात्रीपासून कृष्ण पक्ष, कृष्ण पक्षापासून दक्षिणायनाचे सहा मास. दक्षिणायनापासून हे संवत्सराप्रत जात नाहींत.३. दक्षिणायनापासून पितृलोक, पितृलोकापासून आकाश, आकाशापासून चंद्र. हाच सोम राजा होय. हाच देवाचें अन्न. याला देव भक्षण करतात.४. कर्माचा क्षय होईपर्यंत याचे ठिकाणीं वास करून पुन्हां याच मार्गानें परत येतात. ह्मणजे–या चंद्रापासून आकाश, आकाशापासून वायु, वायु होऊन धूम होतो, धूम होऊन अभ्र होतो.५. अभ्र होऊन मेघ होतो, मेघ होऊन वर्षाव करतो.

वै खलु दुर्निष्प्रपतरं यो यो ह्यन्नमत्ति यो रेतः सिंचति तद्भूय एव भवति ॥६॥ तद्य इह रमणीयचरणा अभ्याशो ह यत्ते रमणीयां योनिमापद्येरन्ब्राह्मणयोनिं वा क्षत्रिययोनिं वा वैश्ययोनिं वाथ य इह कपूयचरणा अभ्याशो ह यत्ते कपूयां योनिमापद्येरन् श्वयोनिं वा सूकरयोनिं वा चंडालयोनिं वा ॥७॥ अथैतयोः पथोर्न कतरेणचन तानीमानि क्षुद्राण्यसकृदावर्तीनि भूतानि भवन्ति जायस्व म्रियस्वेत्ये-तत्तृतीयꣳ स्थानं तेनासौ लोको न संपूर्यते तस्माज्जुगुप्सेत तदेष श्लोकः ॥८॥ स्तेनो हिरण्यस्य सुरां पिबंश्च गुरोस्तल्पमावसन्ब्रह्महा चैते पतन्ति चत्वारः पंचमश्चाचरंस्तैरिति ॥९॥ अथ ह य एतानेवं पंचाग्नीन्वेद न स ह तैरप्याचरन्पाप्मना लिप्यते शुद्धः पूतः पुण्यलोको भवति य एवं वेद य एवं वेद ॥१०॥ इति दशमः खंडः ॥१०॥

तेव्हां ते (प्राणी) व्रीहि, यव, ओषधी, वनस्पति, तीळ, उडीद इत्यादि प्रकारें जन्म पावतात. त्यापासून, बाहेर निघण्यास कठिण असें अन्न होतें. हे अन्न जो भक्षण करतो त्याच्या आकृतीचा (प्राणी) उत्पन्न होतो. ६. या लोकीं जे पुण्याचरणी असतात त्यांना तत्काल (पुन्हां) ब्राह्मण, क्षत्रिय अथवा वैश्य असा पुण्य जन्म प्राप्त होतो. पण जे अशुभाचरणी असतात त्यांना कुत्रा, शूकर, चंडाल असा अशुभ जन्म प्राप्त होतो. ७. या दोन्ही पंथांपैकीं जे कोणत्याहि पंथानें जात नाहींत ते क्षुद्र, वारंवार जन्म पावणारे प्राणी होतात. उत्पन्न व्हावें आणि मरण पावावें असें यांचें तिसरें स्थान आहे. ह्मणून (तो) पितृलोक कधीं पूर्ण होत नाहीं. ह्मणून (या तृतीय पंथापासून) अलिप्त रहावें. याविषयीं पुढील श्लोक आहे. ८. ब्राह्मणाचें धन चोरणारा, दारु पिणारा ब्राह्मण, गुरुतल्पग आणि ब्राह्मणहत्या करणारा हे चार आणि यांच्याशीं संबंध ठेवणारा हे सर्व पतन पावतात. ९. याप्रमाणें जो या पांच अग्नींना जाणतो तो आणि त्याच्याशी संबंध ठेवणारा देखील पापानें लिप्त होत नाहीं. तो शुद्ध,

प्राचीनशाल औपमन्यवः सत्ययज्ञः पौलुषिरिंद्रद्युम्नो भाल्लवेयो जनः शार्कराक्ष्यो बुडिल आश्वतराश्विस्ते हैते महाशाला महाश्रोत्रियाः समेत्य मीमांसां चक्रुः को न आत्मा किं ब्रह्मेति ॥१॥ ते ह संपादयांचक्रुरुद्दालको वै भगवन्तोऽयमारुणिः संप्रतीममात्मानं वैश्वानरमध्येति तꣳ हन्ताभ्यागच्छामेति तꣳ हाभ्याजग्मुः ॥२॥ स ह संपादयांचकार प्रक्ष्यन्ति मामिमे महाशाला महाश्रोत्रियास्तेभ्यो न सर्वमिव प्रतिपत्स्ये हन्ताहमन्यमभ्यनुशासानीति ॥३॥ तान्होवाचाश्वपतिर्वै भगवन्तोऽयं कैकेयः संप्रतीममात्मानं वैश्वानरमध्येति तꣳ हन्ताभ्यागच्छामेति तꣳ हाभ्याजग्मुः ॥४॥ तेभ्यो ह प्राप्तेभ्यः पृथगर्हाणि कारयांचकार स ह प्रातः संजिहान उवाच न मे स्तेनो जनपदे न कदर्यो न मद्यपो नानाहिताग्निर्नाविद्वान्न स्वैरी

पवित्र व पुण्यलोकगामी होतो.१०.

उपमन्यूचा पुत्र प्राचीनशाल, पुलुषाचा पुत्र सत्ययज्ञ, भाल्लवीचा पुत्र इंद्रद्युम्न, शर्कराक्षाचा पुत्र जन आणि अश्वतराश्वाचा पुत्र बुडिल हे सर्व महागृहस्थ, श्रुतिसंपन्न ब्राह्मण एकत्र जमले व "आमचा आत्मा कोण?" "ब्रह्म ह्मणजे काय?" याचा विचार करूं लागले.१ त्या सर्व थोर ब्राह्मणांनीं विचार ठरविला कीं, अरुणपुत्र उद्दालक या वैश्वानर आत्म्याला जाणतो; आपण त्याच्याकडे जाऊं. त्याप्रमाणें ते त्याच्याकडे गेले.२. त्यानें आपणाशीं विचार केला कीं, हे महागृहस्थ, महाश्रोत्रिय मला प्रश्न करतील. त्यांना मी (कांहीं) सर्व सांगूं शकणार नाहीं. करितां मीं दुसऱ्या शास्त्याचें नांव सांगावें.३. (तेव्हां) तो (त्यांना) ह्मणाला, हे भगवन्तः केकयपुत्र अश्वपति (राजा) सांप्रत या वैश्वानर [विश्वाचा मित्र] आत्म्याला जाणतो. तेव्हां आपण त्याच्याकडे जाऊं. त्याप्रमाणें ते त्याच्याकडे गेले.४. ते आलेले पाहून त्यानें [अश्वपतीनें] प्रत्येकाचें पृथक् आतिथ्य केलें. (दुसरे दिवशीं) प्रात:काळीं (शयन) त्यागून

स्वैरिणी कुतो यक्ष्यमाणो वै भगवन्तोऽहमस्मि यावदेकैकस्मा ऋत्विजे धनं दास्यामि तावद्भगवद्भ्यो दास्यामि वसन्तु भगवन्त इति ॥५॥ ते होचुर्येन हैवार्थेन पुरुषश्चरेत्तꣳ हैव वदेदात्मानमेवेमं वैश्वानरꣳ संप्रत्यध्येषि तमेव नो ब्रूहीति ॥६॥ तान्होवाच प्रातर्वः प्रतिवक्तास्मीति ते ह समित्पाणयः पूर्वाह्णे प्रतिचक्रमिरे तान्हानुपनीयैवैतदुवाच ॥७॥ इत्येकादशः खंडः ॥११॥

औपमन्यव कं त्वमात्मानमुपास्स इति दिवमेव भगवो राजन्निति होवाचैष वै सुतेजा आत्मा वैश्वानरो यं त्वमात्मानमुपास्से तस्मात्तव सुतं प्रसुतमासुतं कुले दृश्यते ॥१॥ अत्स्यन्नं पश्यसि

उठल्यावर तो राजा ह्मणाला, माझ्या राज्यामध्यें (कोणी) चोर नाहीं, अनुदार नाहीं, मद्यपी नाहीं, (कोणी ब्राह्मण) अनाहिताग्नि नाहीं, अविद्वान् नाहीं, कोणी स्वैर नाहीं, मग स्वैरिणी कोठून असणार ? हे भगवन्तः मी यज्ञ करणार आहें. एकेका ऋत्विजाला जितकें धन देईन तितकेंच आपणांलाहि देईन. करितां (यज्ञप्रसंगीं) आपण येथें रहावें.५. ते ह्मणाले, ज्या कार्याकरितां मनुष्य (दुसऱ्याकडे) जातो तें कार्य त्याला सांगावें. तूं वैश्वानर आत्म्याला जाणतोस. तो आह्मांला सांग.६. राजा त्यांना ह्मणाला, उद्यां सकाळीं तुह्मांला सांगेन. त्याप्रमाणें दुसरे दिवशीं सकाळीं ते हातांत समिधा घेऊन राजाकडे गेले. तेव्हां त्यांचें उपनयन न करितां त्यांना राजा बोलता झाला.७.

हे उपमन्युपुत्र, तूं कोणत्या (वैश्वानर) आत्म्याची उपासना करतोस ? तो ह्मणाला, हे भगवन् राजा, मी द्युलोकाची उपासना करतों. राजा ह्मणाला, ज्याची तूं उपासना करतोस तो चांगल्या तेजानें युक्त असा वैश्वानर आत्मा आहे. ह्मणून तुझ्या कुळामध्यें (सोमाचें) सवन, प्रसुत आणि (सत्रादिकांचे प्रसंगीं) आसुत हीं चांगलीं दिसतात [ह्मणजे तुझ्या कुळांतील मनुष्य कर्मी आहेत].१. तूं (पुष्कळ) अन्न खाशील, प्रिय

प्रियमत्त्यन्नं पश्यति प्रियं भवत्यस्य ब्रह्मवर्चसं कुले य एतमेवमात्मानं वैश्वानरमुपास्ते मूर्धा त्वेष आत्मन इति होवाच मूर्धा ते व्यपतिष्य-द्यन्मां नागमिष्य इति ॥२॥ इति द्वादशः खंडः ॥१२॥

अथ होवाच सत्ययज्ञं पौलुषिं प्राचीनयोग्य कं त्वमात्मानमु-पास्स इत्यादित्यमेव भगवो राजन्निति होवाचैष वै विश्वरूप आत्मा वैश्वानरो यं त्वमात्मानमुपास्से तस्मात्तव बहु विश्वरूपं कुले दृश्यते ॥१॥ प्रवृत्तोऽश्वतरीरथो दासीनिष्कोऽत्स्यन्नं पश्यसि प्रियमत्यन्नं पश्यति प्रियं भवत्यस्य ब्रह्मवर्चसं कुले य एतमेवमात्मानं वैश्वानरमु-पास्ते चक्षुष्ट्वेतदात्मन इति होवाचांधोऽभविष्यद्यन्मां नागमिष्य इति ॥२॥ इति त्रयोदशः खंडः ॥१३॥

(पुत्रपौत्रादि) पहाशील. जो या प्रकारें वैश्वानर आत्म्याची उपासना करतो तो (पुष्कळ) अन्न खातो, प्रिय (पुत्रपौत्रादि) पहातो, त्याच्या कुलामध्यें ब्रह्मतेज रहातें. हा (द्युलोक) आत्म्याचें शिर आहे [सर्व नाहीं]. (ह्मणून संपूर्ण आत्म्याच्या ज्ञानाकरितां) जर मजकडे आला नसतास तर तुझें मस्तक तुटून पडलें असतें. २.

नंतर तो राजा पुलुषपुत्र सत्ययज्ञाला ह्मणाला, हे प्राचीनयोग्या [?], तूं कोणत्या वैश्वानर आत्म्याची उपासना करतोस? तो ह्मणाला, हे भगवन् राजा, मी आदित्याची उपासना करतों. राजा ह्मणाला, ज्याची तूं उपासना करतोस तो विश्वरूप [शुक्ल इत्यादि सर्वरूप] असा वैश्वानर आत्मा आहे. ह्मणून तुझ्या कुलामध्यें पुष्कळ विश्वरूप [इहलोकाच्या व पर-लोकाच्या अर्थासाठीं नाना प्रकारचीं पुण्यकर्मादि साधनें] दिसतें. १. खेच्च-रांचा रथ, दासी व निष्क [कंठी] यांनीं तूं युक्त रहाशील, (पुष्कळ) अन्न खाशील, प्रिय (पुत्रपौत्रादि) पहाशील. जो याप्रकारें वैश्वानर आत्म्याची उपासना करतो तो (पुष्कळ) अन्न खातो, प्रिय (पुत्रपौत्रादि) पहातो, त्याच्या कुलामध्यें ब्रह्मतेज रहातें. हा (आदित्य) आत्म्याचा चक्षु आहे.

अथ होवाचेन्द्रद्युम्नं भाल्लवेयं वैयाघ्रपद्य कं त्वमात्मानमुपास्स इति वायुमेव भगवो राजन्निति होवाचैष वै पृथग्वर्त्मात्मा वैश्वानरो यं त्वमात्मानमुपास्से तस्मात्त्वां पृथग्वलय आयन्ति पृथग्रथश्रेणयोऽनुयन्ति ॥१॥ अत्स्यन्नं पश्यसि प्रियमत्त्यन्नं पश्यति प्रियं भवत्यस्य ब्रह्मवर्चसं कुले य एतमेवमात्मानं वैश्वानरमुपास्ते प्राणस्त्वेष आत्मन इति होवाच प्राणस्त उदक्रमिष्यद्यन्मां नागमिष्य इति ॥२॥ इति चतुर्दशः खंडः ॥१४॥

अथ होवाच जनं शार्कराक्ष्य कं त्वमात्मानमुपास्स इत्याकाशमेव भगवो राजन्निति होवाचैष वै बहुल आत्मा वैश्वानरो यं त्वमात्मानमुपास्स तस्मात्त्व ऽसि प्रजया च धनेन च ॥१॥

ह्मणून जर मजकडे आला नसतास तर तूं अंधळा झाला असतास.२.

नंतर तो राजा भाल्लविपुत्र इंद्रद्युम्नाला ह्मणाला, हे वैयाघ्रपद्या [?], तूं कोणत्या वैश्वानर आत्म्याची उपासना करतोस ? तो ह्मणाला, हे भगवन् राजा, मी वायूची उपासना करतो. राजा ह्मणाला, ज्याची तूं उपासना करतोस तो पृथग्वर्त्मा [नाना प्रकारचे मार्ग असलेला] असा वैश्वानर आत्मा आहे. ह्मणून तुला (वस्त्र, अन्न इत्यादि) नाना प्रकारचे बलि प्राप्त होतात. नाना प्रकारचे अनेक रथ मिळतात.१. तूं (पुष्कळ) अन्न खाशील, प्रिय (पुत्र-पौत्रादि) पहाशील. जो या प्रकारें वैश्वानर आत्म्याची उपासना करतो तो (पुष्कळ) अन्न खातो, प्रिय (पुत्रपौत्रादि) पहातो, त्याच्या कुलामध्यें ब्रह्मतेज रहातें. हा (वायु) आत्म्याचा प्राण आहे. ह्मणून जर मजकडे आला नसतास तर तुझा प्राण निघून गेला असता.२.

नंतर तो राजा शार्कराक्षपुत्र जनाला ह्मणाला, तूं कोणत्या आत्म्याची उपासना करतोस ? तो ह्मणाला, हे भगवन् राजा, मी आकाशाची उपासना करतों. राजा ह्मणाला, ज्याची तूं उपासना करतोस तो बहुगत [सर्वगत] असा वैश्वानर आत्मा आहे. ह्मणून तूं (पुत्रपौत्रादि) प्रजा व

अत्स्यन्नं पश्यसि प्रियमत्त्यन्नं पश्यति प्रियं भवत्यस्य ब्रह्मवर्चसं य एतमेवमात्मानं वैश्वानरमुपास्ते संदेहस्त्वेष आत्मन इति होवाच संदेहस्ते व्यशीर्यद्यन्मां नागमिष्य इति ॥२॥ इति पंचदशः खंडः॥

अथ होवाच बुडिलमाश्वतराश्विं वैयाघ्रपद्य कं त्वमात्मानमुपास्स इत्यप एव भगवो राजन्निति होवाचैष वै रयिरात्मा वैश्वानरो यं त्वमात्मानमुपास्से तस्मात्त्वं रयिमान्पुष्टिमानसि ॥१॥ अत्स्यन्नं पश्यसि प्रियमत्त्यन्नं पश्यति प्रियं भवत्यस्य ब्रह्मवर्चसं कुले य एतमेवमात्मानं वैश्वानरमुपास्ते बस्तिस्त्वेष आत्मन इति होवाच बस्तिस्ते व्यभेत्स्यद्यन्मां नागमिष्य इति ॥२॥ इति षोडशः खंडः॥

अथ होवाचोद्दालकमारुणिं गौतम कं त्वमात्मानमुपास्स इति

धन यांनीं समृद्ध आहेस.१. तूं (पुष्कळ) अन्न खाशील, प्रिय (पुत्रपौत्रादि) पहाशील. जो याप्रकारें वैश्वानर आत्म्याची उपासना करतो तो (पुष्कळ) अन्न खातो, प्रिय (पुत्रपौत्रादि) पहातो, त्याच्या कुलामध्यें ब्रह्मतेज रहातें. हा (आकाश) आत्म्याचें मध्यम शरीर आहे. ह्मणून जर मजकडे आला नसतास तर तुझें शरीर क्षय पावून नष्ट झालें असतें.२.

नंतर तो राजा अश्वतराश्वपुत्र बुडिलाला ह्मणाला, हे वैयाघ्रपद्या, तूं कोणत्या आत्म्याची उपासना करतोस? तो ह्मणाला, हे भगवन् राजा, मी उदकाची उपासना करतों. राजा ह्मणाला, ज्याची तूं उपासना करतोस तो अन्नरूपी (अथवा धनरूपी) असा वैश्वानर आत्मा आहे. ह्मणून तूं अन्नवान् व पुष्ट आहेस.१. तूं (पुष्कळ) अन्न खाशील, प्रिय (पुत्रपौत्रादि) पहाशील. जो याप्रकारें वैश्वानर आत्म्याची उपासना करतो तो (पुष्कळ) अन्न खातो, प्रिय (पुत्रपौत्रादि) पहातो, त्याच्या कुलामध्यें ब्रह्मतेज रहातें. हे (उदक) आत्म्याचा बस्ति होय. ह्मणून जर मजकडे आला नसतास तर तुझा बस्ति फुटला असता.२.

नंतर तो राजा अरुणपुत्र उद्दालकाला ह्मणाला, गौतमा, तूं कोणत्या

पृथिवीमेव भगवो राजन्निति होवाचैष वै प्रतिष्ठात्मा वैश्वानरो यं त्वमात्मानमुपास्से तस्मात्त्वं प्रतिष्ठितोऽसि प्रजया च पशुभिश्च ॥१॥ अत्स्यन्नं पश्यसि प्रियमत्त्यन्नं पश्यति प्रियं भवत्यस्य ब्रह्मवर्चसं कुले य एतमेवमात्मानं वैश्वानरमुपास्ते पादौ त्वेतावात्मन इति होवाच पादौ ते व्यम्लास्येतां यन्मां नागमिष्य इति ॥२॥ इति सप्तदशः खंडः॥

तान्होवाचैते वै खलु यूयं पृथगिवेममात्मानं वैश्वानरं विद्वांसोऽन्नमत्थ यस्त्वेतमेवं प्रादेशमात्रमभिविमानमात्मानं वैश्वानरमुपास्ते स सर्वेषु लोकेषु सर्वेषु भूतेषु सर्वेष्वात्मस्वन्नमत्ति ॥१॥ तस्य ह वा एतस्यात्मनो वैश्वानरस्य मूर्धैव सुतेजाश्चक्षुर्विश्वरूपः प्राणः

आत्म्याची उपासना करतोस ? तो ह्मणाला, हे भगवन् राजा, मी पृथिवीची उपासना करतों. राजा ह्मणाला, ज्याची तूं उपासना करतोस तो प्रतिष्ठारूपी [=पाय] असा वैश्वानर आत्मा आहे. ह्मणून (पुत्रादि) प्रजा व पशु यांनीं प्रतिष्ठायुक्त आहेस.१. तूं (पुष्कळ) अन्न खाशील, प्रिय (पुत्रपौत्रादि) पहाशील. जो याप्रकारें वैश्वानर आत्म्याची उपासना करतो तो (पुष्कळ) अन्न खातो, प्रिय (पुत्रपौत्रादि) पहातो, त्याच्या कुलामध्यें ब्रह्मतेज रहातें. ही (पृथिवी) वैश्वानराचे पाय होत. ह्मणून जर मजकडे आला नसतास तर तुझे पाय गळून पडले असते.२.

(नंतर) तो राजा त्यांना ह्मणाला, तुह्मी प्रत्येकजण निरनिराळ्या (एकेका अंगानें) या वैश्वानर [सर्व लोकाना पुण्यपापानुरूप गतीला नेणाऱ्या] आत्म्याला जाणून अन्न भक्षण करतां [=जगतां]. परंतु जो (द्युमूर्धादि) सर्व अवयवांनीं युक्त (अथवा शास्त्रोपदिष्ट द्युलोकादि परिमाणयुक्त) [प्रादेशमात्रः] व प्रत्यगात्मतेनें [=प्रतिशरीरीं संचार करणारा हा एकच आहे अशा ज्ञानानें] जाणल्या जाणाऱ्या अशा या वैश्वानर आत्म्याची जो उपासना करतो तो सर्व लोकांमध्यें, सर्व भूतांमध्यें, सर्व आत्म्यांमध्यें (आपण एकरूप आहोंत असें जाणून) अन्न भक्षण करतो.१. त्या या वैश्वानर

पृथग्वर्त्मात्मा संदेहो बहुलो बस्तिरेव रयिः पृथिव्येव पादावुर एव वेदिर्लोमानि बर्हिर्हृदयं गार्हपत्यो मनोऽन्वाहार्यपचन आस्यमाहवनीयः ॥२॥ इत्यष्टादशः खंडः ॥१८॥

तद्यद्भक्तं प्रथममागच्छेत्तद्धोमीयꣳ स यां प्रथमामाहुतिं जुहुयात्तां जुहुयात्प्राणाय स्वाहेति प्राणस्तृप्यति ॥१॥ प्राणे तृप्यति चक्षुस्तृप्यति चक्षुषि तृप्यत्यादित्यस्तृप्यत्यादित्ये तृप्यति द्यौस्तृप्यति दिवि तृप्यन्त्यां यत्किंच द्यौश्चादित्यश्चाधितिष्ठतस्तत्तृप्यति तस्यानुतृप्तिं तृप्यति प्रजया पशुभिरन्नाद्येन तेजसा ब्रह्मवर्चसेनेति ॥२॥ इत्येकोनविंशः खंडः ॥१९॥

अथ यां द्वितीयां जुहुयात्तां जुहुयाद्व्यानाय स्वाहेति व्यानस्तृप्यति ॥१॥ व्याने तृप्यति श्रोत्रं तृप्यति श्रोत्रे तृप्यति चंद्रमास्तृप्यति

आत्म्याचा सुतेज असा (द्युलोक) हें शिर, विश्वरूप आदित्य हा चक्षु, पृथग्वर्त्मा वायु हा प्राण, बहुगत आकाश हा मध्य शरीरस्थ आत्मा, अन्न हा बस्ति, पृथिवी हे पाय, उर ही वेदि, (उरस्थ) लोम हे दर्भ, गार्हपत्य अग्नि हें हृदय, अन्वाहार्यपचन अग्नि हें मन आणि आहवनीय अग्नि हें मुख होय.२.

(भोजनकाळीं) जें अन्न प्रथम पुढें येतें ते होमद्रव्य होय. (त्याचें जाठर अग्नीमध्यें हवन करावें). जी पहिली आहुति हवन करावयाची ती ''प्राणाय स्वाहा'' असें ह्मणून हवन करावी. ह्मणजे प्राण तृप्त होतो.१. प्राण तृप्त झाला ह्मणजे चक्षु तृप्त होतो. चक्षु तृप्त झाला ह्मणजे आदित्य तृप्त होतो. आदित्य तृप्त झाला ह्मणजे द्युलोक तृप्त होतो. द्युलोक तृप्त झाला ह्मणजे, द्युलोक व आदित्य हे ज्याच्या अधिष्ठानाने रहातात तें [=वैश्वानर आत्मा] तृप्त होतें. ह्मणजे मग स्वतः भोजन करणारा तृप्त होतो; प्रजा, पशु, भक्षणीय अन्न, (शरीरस्थ) तेज व ब्रह्मतेज यांनीं युक्त होतो.२.

जी दुसरी आहुति हवन करावयाची ती ''व्यानाय स्वाहा'' असें ह्मणून हवन करावी. ह्मणजे व्यान तृप्त होतो.१. व्यान तृप्त झाला

चंद्रमसि तृप्यति दिशस्तृप्यन्ति दिक्षु तृप्यन्तीषु यत्किंच दिशश्च चंद्रमाश्चाधितिष्ठन्ति तत्तृप्यति तस्यानु तृप्तिं तृप्यति प्रजया पशुभिरन्नाद्येन तेजसा ब्रह्मवर्चसेनेति ॥२॥ इति विंशः खंडः ॥२०॥

अथ यां तृतीयां जुहुयात्तां जुहुयादपानाय स्वाहेत्यपानस्तृप्यति ॥१॥ अपाने तृप्यति वाक्तृप्यति वाचि तृप्यन्त्यामग्निस्तृप्यत्यग्नौ तृप्यति पृथिवी तृप्यति पृथिव्यां तृप्यन्त्यां यत्किंच पृथिवी चाग्निश्चाधितिष्ठतस्तत्तृप्यति तस्यानु तृप्तिं तृप्यति प्रजया पशुभिरन्नाद्येन तेजसा ब्रह्मवर्चसेनेति ॥२॥ इत्येकविंशः खंडः ॥२१॥

अथ यां चतुर्थीं जुहुयात्तां जुहुयात्समानाय स्वाहेति समानस्तृप्यति ॥१॥ समाने तृप्यति मनस्तृप्यति मनसि तृप्यति पर्जन्य-

ह्मणजे श्रोत्र तृप्त होतें. श्रोत्र तृप्त झालें ह्मणजे चंद्रमा तृप्त होतो. चंद्रमा तृप्त झाला ह्मणजे दिशा तृप्त होतात. दिशा तृप्त झाल्या ह्मणजे दिशा व चंद्रमा हीं ज्याच्या अधिष्ठानानें रहातात तें तृप्त होतें. ह्मणजे मग स्वतः भोजन करणारा तृप्त होतो; प्रजा, पशु, भक्षणीय अन्न, (शरीरस्थ) तेज व ब्रह्मतेज यांनीं युक्त होतो.२.

जी तिसरी आहुति हवन करावयाची ती "अपानाय स्वाहा" असें ह्मणून हवन करावी. ह्मणजे अपान तृप्त होतो.१. अपान तृप्त झाला ह्मणजे वाणी तृप्त होते. वाणी तृप्त झाली ह्मणजे अग्नि तृप्त होतो. अग्नि तृप्त झाला ह्मणजे पृथिवी तृप्त होते. पृथिवी तृप्त झाली ह्मणजे पृथिवी व अग्नि हीं ज्याच्या अधिष्ठानानें रहातात तें तृप्त होतें. ह्मणजे मग स्वतः भोजन करणारा तृप्त होतो; प्रजा, पशु, भक्षणीय अन्न, (शरीरस्थ) तेज व ब्रह्मतेज यांनीं युक्त होतो.२.

जी चवथी आहुति हवन करावयाची ती "समानाय स्वाहा" असें ह्मणून हवन करावी. ह्मणजे समान तृप्त होतो.१. समान तृप्त झाला ह्मणजे मन तृप्त होतें. मन तृप्त झालें ह्मणजे पर्जन्य तृप्त होतो. पर्जन्य

स्तृप्यति पर्जन्ये तृप्यति विद्युत्तृप्यति विद्युति तृप्यन्त्यां यत्किंच विद्युच्च पर्जन्यश्चाधितिष्ठतस्तत्तृप्यति तस्यानु तृप्तिं तृप्यति प्रजया पशुभिरन्नाद्येन तेजसा ब्रह्मवर्चसेनेति ॥२॥ इति द्वाविंशः खंडः ॥

अथ यां पंचमीं जुहुयात्तां जुहुयादुदानाय स्वाहेत्युदानस्तृप्यति ॥१॥ उदाने तृप्यति त्वक् तृप्यति त्वचि तृप्यन्त्यां वायुस्तृप्यति वायौ तृप्यत्याकाशस्तृप्यत्याकाशे तृप्यति यत्किंच वायुश्चाकाशश्चाधितिष्ठतस्तत्तृप्यति तस्यानु तृप्तिं तृप्यति प्रजया पशुभिरन्नाद्येन तेजसा ब्रह्मवर्चसेनेति ॥२॥ इति त्रयोविंशः खंडः ॥२३॥

स य इदमविद्वानग्निहोत्रं जुहोति यथांगारानपोह्य भस्मनि जुहुयात्तादृक्तत्स्यात् ॥१॥ अथ य एतदेवं विद्वानग्निहोत्रं जुहोति तस्य सर्वेषु लोकेषु सर्वेषु भूतेषु सर्वेष्वात्मसु हुतं भवति ॥२॥

तृप्त झाला ह्मणजे विद्युत् तृप्त होते. विद्युत् तृप्त झाली ह्मणजे विद्युत् व पर्जन्य हीं ज्याच्या अधिष्ठानानें रहातात तें तृप्त होतें. ह्मणजे मग स्वतः भोजन करणारा तृप्त होतो; प्रजा, पशु, भक्षणीय अन्न, (शरीरस्थ) तेज व ब्रह्मतेज यांनीं युक्त होतो.२.

जी पांचवी आहुति हवन करावयाची ती ''उदानाय स्वाहा'' असें ह्मणून हवन करावी. ह्मणजे उदान तृप्त होतो.१. उदान तृप्त झाला ह्मणजे त्वचा तृप्त होते. त्वचा तृप्त झाली ह्मणजे वायु तृप्त होतो. वायु तृप्त झाला ह्मणजे आकाश तृप्त होतें. आकाश तृप्त झालें ह्मणजे वायु व आकाश ही ज्याच्या अधिष्ठानानें रहातात तें तृप्त होतें. ह्मणजे मग स्वतः भोजन करणारा तृप्त होतो; प्रजा, पशु, भक्षणीय अन्न, (शरीरस्थ) तेज व ब्रह्मतेज यांनीं युक्त होतो.२.

हें न जाणतां जो कोणी अग्निहोत्राचें हवन करतो, त्याचें तें हवन निखाऱ्यांवांचून असलेल्या भस्मामध्यें हवन केल्याप्रमाणें होतें.१. पण जो हें सर्व जाणून अग्निहोत्राचें हवन करतो त्याचें तें हवन सर्व लोकां-

तद्यथेषीकातूलमग्नौ प्रोतं प्रदूयेतैवꣳ हास्य सर्वे पाप्मानः प्रदूयन्ते य एतदेवं विद्वानग्निहोत्रं जुहोति ॥३॥ तस्मादु हैवं विद्यद्यपि चंडालायोच्छिष्टं प्रयच्छेदात्मनि हैवास्य तद्वैश्वानरे हुतꣳ स्यादिति तदेष श्लोकः ॥४॥ यथेह क्षुधिता बाला मातरं पर्युपासते ॥ एवꣳ सर्वाणि भूतान्यग्निहोत्रमुपासत इत्यग्निहोत्रमुपासत इति ॥५॥ इति चतुर्विंशः खंडः ॥२४॥ इति पंचमोऽध्यायः ॥५॥

अथ षष्ठोऽध्यायः ॥

ॐ श्वेतकेतुर्हारुणेय आस तꣳ ह पितोवाच श्वेतकेतो वस ब्रह्मचर्यं न वै सोम्यास्मत्कुलीनोऽननूच्य ब्रह्मबंधुरिव भवतीति ॥१॥ स ह द्वादशवर्ष उपेत्य चतुर्विंशतिवर्षः सर्वान्वेदानधीत्य महामना

मध्यें, सर्व भूतांमध्ये, सर्व आत्म्यांमध्ये (आपण एकरूप आहोंत या ज्ञानानें युक्त) असें हवन होतें.२. हें जाणून जो अग्निहोत्राचें हवन करतो त्याचीं सर्व पापें, समिधेचें अग्र अग्नीमध्यें टाकल्याबरोबर जसें पेट घेतें त्याप्रमाणें, नाश पावतात.३. ह्मणून त्यानें जरी (उच्छिष्ट देण्याला अपात्र असा जो) चंडाल त्याला उच्छिष्ट दिलें तरी तें वैश्वानर आत्म्यामध्येंच हवन केल्याप्रमाणें होय. याविषयीं पुढील श्लोक आहे.४. ज्याप्रमाणें क्षुधित बालक मातेची उपासना करतात त्याप्रमाणें सर्व भूतमात्र अग्निहोत्राची उपासना करतात [ह्म० सर्व जग भोजनानें तृप्त होतें].५.

अध्याय सहावा.

आरुणीचा [अरुणपुत्राचा] श्वेतकेतु नामें पुत्र होता. त्याला [श्वेतकेतूला] पिता ह्मणाला, श्वेतकेतु, (आपल्या कुलगुरूकडे जाऊन अध्ययन करीत) ब्रह्मचर्यानें रहा. नाहींतर बाळा, आमच्या कुळांत जन्माला येऊन अध्ययन न केल्यामुळें ब्रह्मबंधु [ब्राह्मणाचा बंधु= स्वतः ब्राह्मणगुणांनीं युक्त नाहीं असा] होणें हें योग्य नाहीं.१. (त्याप्रमाणें) बारा वर्षांचा श्वेतकेतु आचार्याकडे आला. चोवीस वर्षांचा होईपर्यंत त्यानें

अनूचानमानी स्तब्ध एयाय तँ ह पितोवाच श्वेतकेतो यन्नु सोम्येदं महामना अनूचानमानी स्तब्धोऽस्युत तमादेशमप्राक्ष्यः ॥२॥ येनाश्रुतँ श्रुतं भवत्यमतं मतमविज्ञातं विज्ञातमिति कथं नु भगवः स आदेशो भवतीति ॥३॥ यथा सोम्यैकेन मृत्पिंडेन सर्वं मृन्मयं विज्ञातँ स्याद्वाचारंभणं विकारो नामधेयं मृत्तिकेत्येव सत्यम् ॥४॥ यथा सोम्यैकेन लोहमणिना सर्वं लोहमयं विज्ञातँ स्याद्वाचारंभणं विकारो नामधेयं लोहमित्येव सत्यम् ॥५॥ यथा सोम्यैकेन नखनिकृंतनेन सर्वं कार्ष्णायसं विज्ञातँ स्याद्वाचारंभणं विकारो नामधेयं कृष्णायसमित्येव सत्यमेवँ सोम्य स आदेशो भवतीति ॥६॥ न वै

सर्व वेदांचें अध्ययन केलें. तेव्हां आपल्यासमान (ज्ञाता) कोणी नाहीं असे त्याला वाटूं लागलें [महामनाः], आपण कोणत्याहि प्रश्नाचें उत्तर देण्यास समर्थ आहोंत असें तो समजूं लागला [अनूचानमानी=अनुवचनसमर्थः] व त्याचा स्वभाव विनयरहित [स्तब्धः] झाला. तो परत आला तेव्हां पित्यानें त्याला विचारलें, बाळा, श्वेतकेतु, तूं महामना, अनूचानमानी व स्तब्ध झाला आहेस; तर (ज्याचे योगानें परब्रह्म दर्शविलें जातें) तो आदेश [ज्ञान अथवा तत्त्व] तूं गुरूला विचारलास काय? २. ज्या आदेशाचे ज्ञानानें अश्रुत गोष्टी श्रुत होतात, अतर्कित गोष्टी तर्कित होतात आणि अज्ञात गोष्टी ज्ञात होतात तो आदेश. श्वेतकेतु ह्मणाला, भगवन्, असा आदेश कोणता? ३. पिता ह्मणाला, बाळा, ज्याप्रमाणें मृत्तिकेच्या एका भांड्यानें इतर सर्व मृत्तिकाविकार जाणतां येतो, कारण विकार हें नुसतें वाणीचें अवलंबन आहे, मृत्तिका हेंच केवळ सत्य आहे; ४. बाळा, ज्याप्रमाणें सुवर्णाच्या एका वस्तूनें इतर सर्व (कटककेयूरादि) सुवर्णविकार जाणतां येतो, कारण विकार हें नुसते वाणीचें अवलंबन आहे, सुवर्ण हेंच केवळ सत्य आहे; ५. बाळा, ज्याप्रमाणें एखाद्या नराणीनें इतर सर्व लोकविकार जाणतां येतो, कारण विकार हें

नूनं भगवंतस्त एतदवेदिषुर्यद्ध्येतदवेदिष्यन् कथं मे नावक्ष्यन्निति भगवांस्त्वेव मे तद्ब्रवीत्विति तथा सोम्येति होवाच ॥७॥ इति प्रथमः खंडः॥

सदेव सोम्येदमग्र आसीदेकमेवाद्वितीयं तद्धैक आहुरसदेवेदमग्र आसीदेकमेवाद्वितीयं तस्मादसतः सज्जायत ॥१॥ कुतस्तु खलु सोम्यैवꣳ स्यादिति होवाच कथमसतः सज्जायेतेति सत्त्वेव सोम्येदमग्र आसीदेकमेवाद्वितीयम् ॥२॥ तदैक्षत बहु स्यां प्रजायेयेति तत्तेजोऽसृजत तत्तेज ऐक्षत बहु स्यां प्रजायेयेति तदपोऽसृजत ॥ तस्माद्यत्र क्व च शोचति स्वेदते वा पुरुषस्तेजस एव तदध्यापो जायन्ते ॥३॥ ता आप ऐक्षन्त बह्व्यः स्याम प्रजायेमहीति ता

नुसतें वाणीचें अवलंबन आहे, लोह हेंच केवळ सत्य आहे; त्याप्रमाणें मी ह्मणतों हा आदेश आहे.६. श्वेतकेतु ह्मणाला, त्या माझ्या गुरूला हें तत्त्व (अथवा हा आदेश) माहीत नाहीं. कारण जर माहीत असता तर त्यांनीं मला कां बरें सांगितला नसता ! तेव्हां (हें तत्त्व) आपणच मला सांगा. पिता ह्मणाला, बाळा ठीक आहे, सांगतों.७.

बाळा, जगाच्या उत्पत्तीचे पूर्वीं [अग्रे] एक, अद्वितीय असें सत् मात्र होतें. (तें न समजल्यामुळें) कोणी ह्मणतात, पूर्वी एक, अद्वितीय असें असत् होतें व त्या असतापासून सत् उत्पन्न झालें.१. पण बाळा, असें असतापासून सत् उत्पन्न होणें कसें शक्य होईल ! (होणे शक्य नाहीं). ह्मणून पूर्वीं सत्च— एक व अद्वितीय असेंच— होतें.२. त्यानें पाहिलें कीं, मीं बहुत व्हावें आणि मीं (अधिक) उत्पन्न व्हावें. (तेव्हां) त्यानें तेज उत्पन्न केलें. त्या तेजानें [तेजोरूपी सतानें] पाहिलें कीं, मीं बहुत व्हावें आणि अधिक उत्पन्न व्हावें. (तेव्हां) त्यानें उदक उत्पन्न केलें, ह्मणून जेव्हां कोणी मनुष्य तप्त होतो [शोचति] अथवा स्वेद पावतो तेव्हां तेजापासूनच उदक उत्पन्न होतें (असें आपण पहातों).३. त्या उदकानें [उदकरूपी तेजानें] पाहिलें कीं, आपण बहुत व्हावें आणि

अन्नमसृजन्त तस्माद्यत्र क्व च वर्षति तदेव भूयिष्ठमन्नं भवत्यद्भ्य एव तदध्यन्नाद्यं जायते ॥४॥ इति द्वितीय खंडः ॥२॥

तेषां खल्वेषां भूतानां त्रीण्येव बीजानि भवन्त्यांडजं जीवजमुद्भिज्जमिति ॥१॥ सेयं देवतैक्षत हन्ताहमिमास्तिस्रो देवता अनेन जीवेनात्मनानुप्रविश्य नामरूपे व्याकरवाणीति ॥२॥ तासां त्रिवृतं त्रिवृतमेकैकां करवाणीति सेयं देवतेमास्तिस्रो देवता अनेनैव जीवेनात्मनानुप्रविश्य नामरूपे व्याकरोत् ॥३॥ तासां त्रिवृतं त्रिवृतमेकैकामकरोद्यथा नु खलु सोम्येमास्तिस्रो देवतास्त्रिवृत्त्रिवृदेकैका भवति तन्मे विजानीहीति ॥४॥ इति तृतीय खंडः ॥३॥

यदग्ने रोहितं रूपं तेजसस्तद्रूपं यच्छुक्लं तदपां यत्कृष्णं तदन्न-

अधिक उत्पन्न करावें. (तेव्हां) त्यानें अन्न उत्पन्न केलें. ह्मणून ज्या कोठें वृष्टि होते तेथेंच पुष्कळ अन्न उत्पन्न होतें. ह्मणून उदकापासूनच आद्य असें अन्न उत्पन्न होतें.४.

या (पक्षी, मनुष्य, पशु आदि) भूतांच्या उत्पत्तीचीं तीन बीजें आहेत— अंडज, जीवज आणि उद्भिज.१. ती (सत्) देवता पहाती झाली कीं, या तीन (तेज, उदक व अन्न) देवतारूपी मीं या (स्वबुद्धिस्थ) जीव [=प्राणधारण कर्ता] आत्म्यामध्यें प्रवेश करून नाम व रूप हीं स्पष्ट करावीं.२. त्यांपैकीं प्रत्येकाचें त्रिवृत करावें [ह्मणजे प्रत्येकामध्यें तीन गुण, त्यांपैकीं एकाचे प्राधान्य आणि बाकी दोहोंचे अंश]. त्याप्रमाणें याच (सद्रूपी) देवतेनें याच जीव आत्म्यामध्ये या तीन देवतांचा प्रवेश करवून प्रत्येकाचीं नामें व रूपें स्पष्ट केलीं.३. त्यांपैकीं प्रत्येकीचें तिनें त्रिवृत केलें. बाळा, या त्रिवृत अशा (तेज, उदक व अन्न) देवता त्रिवृत होऊन प्रत्येक एकेक कशा झाल्या तें (मी तुला सांगतों) श्रवण कर.४.

अग्नीचें जें तांबडें रूप तें तेजाचें रूप होय, जें शुक्ल रूप तें उदकाचें आणि कृष्ण रूप तें अन्नाचे. याप्रमाणें अग्नीचें अग्नित्व गेलें. जो ह्मणून

स्यापागादग्नेरग्नित्वं वाचारंभणं विकारो नामधेयं त्रीणि रूपाणीत्येव सत्यम् ॥१॥ यदादित्यस्य रोहितं रूपं तेजसस्तद्रूपं यच्छुक्लं तदपां यत्कृष्णं तदन्नस्यापागादादित्यादादित्यत्वं वाचारंभणं विकारो नामधेयं त्रीणि रूपाणीत्येव सत्यम् ॥२॥ यच्चंद्रमसो रोहितं रूपं तेजसस्तद्रूपं तदपां यत्कृष्णं तदन्नस्यापागाच्चंद्राच्चंद्रत्वं वाचारंभणं विकारो नामधेयं त्रीणि रूपाणीत्येव सत्यम् ॥३॥ यद्विद्युतो रोहितं रूपं तेजसस्तद्रूपं यच्छुक्लं तदपां यत्कृष्णं तदन्नस्यापागाद्विद्युतो विद्युत्त्वं वाचारंभणं विकारो नामधेयं त्रीणि रूपाणीत्येव सत्यम् ॥४॥ एतद्ध स्म वै तद्विद्वांस आहुः पूर्वे महाशाला महाश्रोत्रिया न नोऽद्य कश्चनाश्रुतममतमविज्ञातमुदाहरिष्यतीति ह्येभ्यो विदांचक्रुः ॥५॥ यदु रोहितमिवाभूदिति तेजसस्तद्रूपमिति तद्विदांचक्रुर्यदु शुक्लमिवा-

विकार तो केवळ वाचेचा अवलंब होय. हीं तीन रूपें हेंच सत्य होय.१. आदित्याचें जें तांबडें रूप तें तेजाचें रूप, शुक्ल रूप तें उदकाचें आणि कृष्ण रूप तें अन्नाचें. याप्रमाणें आदित्याचें आदित्यत्व गेलें, जो ह्मणून विकार तो केवळ वाचेचा अवलंब होय. हीं तीन रूपें हेंच सत्य होय.२. चंद्राचें जें तांबडें रूप तें तेजाचें रूप, शुक्ल रूप तें उदकाचें आणि कृष्ण रूप तें अन्नाचें. याप्रमाणें चंद्राचें चंद्रत्व गेलें. जो ह्मणून विकार तो केवळ वाचेचा अवलंब होय. हीं तीन रूपें हेंच सत्य होय.३. विजेचें जें तांबडें रूप तें तेजाचें रूप, शुक्ल रूप तें उदकाचें आणि कृष्ण रूप तें अन्नाचें. याप्रमाणें विजेचें विद्युत्त्व गेलें. जो ह्मणून विकार तो केवळ वाचेचा अवलंब होय. हीं तीन रूपें हेंच सत्य होय.४. हें जाणणाऱ्या पूर्वींच्या महाशाल व महाश्रोत्रिय विद्वानांनीं ह्मटलें आहे कीं, "आमच्या कुळांतला कोणीहि आपणांला अश्रुत, अमत अथवा अविज्ञात कांहीं आहे असें ह्मणणार नाहीं." या (त्रिवृत्कृत) तीन रूपांपासूनच त्यांना हें ज्ञान झालें.५. जें ह्मणून तांबडें झालें तें तेजाचें रूप होय असें त्यांनीं जाणलें. जें शुक्ल झालें तें उदकाचें रूप असें

भूदित्यपां रूपमिति तद्विदांचक्रुर्यदु कृष्णमिवाभूदित्यन्नस्य रूपमिति तद्विदांचक्रुः ॥६॥ यद्वविज्ञातमिवाभूदित्येतासामेव देवतानाꣳसमास इति तद्विदांचक्रुर्यथा नु खलु सोम्येमातिस्रो देवताः पुरुषं प्राप्य त्रिवृत्त्रिवृदेकैका भवति तन्मे विजानीहीति ॥७॥ इति चतुर्थः खंडः ॥

अन्नमशितं त्रेधा विधीयते तस्य यः स्थविष्ठो धातुस्तत्पुरीषं भवति यो मध्यमस्तन्मांसं योऽणिष्ठस्तन्मनः ॥१॥ आपः पीतास्त्रेधा विधीयन्ते तासां यः स्थविष्ठो धातुस्तन्मूत्रं भवति यो मध्यमस्तल्लोहितं योऽणिष्ठः स प्राणः ॥२॥ तेजोऽशितं त्रेधा विधीयते तस्य यः स्थविष्ठो धातुस्तदस्थि भवति यो मध्यमः स मज्जा योऽणिष्ठः सा वाक् ॥३॥ अन्नमयꣳहि सोम्य मन आपोमयः प्राणस्तेजोमयी वागिति भूय एव मा भगवान्विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥४॥ इति पंचमः खंडः ॥५॥

त्यांनीं जाणलें. जें कृष्ण झालें तें अन्नाचें रूप असें त्यांनीं जाणलें.६. जें अविज्ञात असें राहिलें तें याच देवतांचें समुदायरूप असें त्यांनीं जाणलें. बाळा, आतां या तीन देवता (शिर, हस्त आदि लक्षणयुक्त) पुरुषाप्रत येऊन प्रत्येक त्रिवृत करशी होते तें मजपासून श्रवण कर.७.

भक्षण केलेलें अन्न तीन प्रकारांनीं विभाग पावतें. त्याचा जो अत्यंत स्थूल भाग तो पुरीष होतो; जो मध्यम तो मांस होतो; आणि जो अत्यंत लहान तो मन होतो.१. प्राशन केलेलें उदक तीन प्रकारांनीं विभाग पावतें. त्याचा जो अत्यंत स्थूल भाग तो मूत्र होतो; जो मध्यम तो रक्त होतो; आणि जो अत्यंत लहान तो प्राण होतो.२. भक्षण केलेलें तेज [तेल, घृत इत्यादि] तीन प्रकारांनीं विभाग पावतें. त्याचा जो अत्यंत स्थूल भाग तो अस्थि होतो; जो मध्यम तो मज्जा होतो; आणि जो अत्यंत लहान तो वाणी होतो.३. (याप्रमाणें) हे बाळा, मन हें अन्नमय आहे, प्राण उदकमय आहे आणि वाणी तेजोमय

दध्नः सोम्य मथ्यमानस्य योऽणिमा स ऊर्ध्वः समुदीषति तत्सर्पिर्भवति ॥१॥ एवमेव खलु सोम्यान्नस्याश्यमानस्य योऽणिमा स ऊर्ध्व समुदीषति तन्मनो भवति ॥२॥ अपाꣳसोम्य पीयमानानां योऽणिमा स ऊर्ध्वः समुदीषति स प्राणो भवति ॥३॥ तेजसः सोम्याश्यमानस्य योऽणिमा स ऊर्ध्वः समुदीषति सा वाग्भवति ॥४॥ अन्नमयꣳहि सोम्य मन आपोमयः प्राणस्तेजोमयी वागिति भूय एव मा भगवान्विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥५॥ इति षष्ठः खंडः ॥६॥

षोडशकलः सोम्य पुरुषः पंचदशाहानि माशीः काममपः पिबापोमयः प्राणो नपिबतो विच्छेत्स्यत इति ॥१॥ स ह पंचदशाहानि नाशाथ हैनमुपससाद किं ब्रवीमि भो इत्यृचः सोम्य यजूंषि

आहे. तो श्वेतकेतु ह्मणाला, भगवन्, आपण मला आणखी ज्ञान सांगा. पिता ह्मणाला, बरें आहे, बाळा, सांगतों.४.

बाळा, दहीं मंथन केलें ह्मणजे त्याचा जो अत्यंत सूक्ष्म भाग तो (लोण्याच्या रूपानें) वर येतो. त्याचें तूप होतें.१. त्याप्रमाणेंच बाळा, भक्षण केल्या जाणाऱ्या अन्नाचा जो अत्यंत सूक्ष्म भाग तो वर येतो. तो मन होतो.२. बाळा, प्राशन केल्या जाणाऱ्या उदकाचा जो अत्यंत सूक्ष्म भाग तो वर येतो. तो प्राण होतो.३. बाळा, भक्षण केल्या जाणाऱ्या तेजाचा जो अत्यंत सूक्ष्म भाग तो वर येतो. त्याची वाणी होते.४. (याप्रमाणें) बाळा, मन अन्नमय आहे, प्राण उदकमय आहे आणि वाणी तेजोमय आहे. श्वेतकेतु ह्मणाला, भगवन्, आपण मला आणखी ज्ञान सांगा. पिता ह्मणाला, बरें आहे बाळा, सांगतों.५.

बाळा, पुरुषाच्या सोळा कला आहेत. तूं पंधरा दिवस (कांहीं) भक्षण करूं नकोस. वाटेल तितकें उदक प्राशन कर. कारण प्राण उदकमय आहे. उदक न पिणाऱ्या मनुष्याचा प्राण नाश पावतो.१. तेव्हां

श्वनायः पुरुषनाय इत्येवं तदप आचक्षतेऽशनायेति तत्रैतच्छुंगमुत्पतितꣳ सोम्य विजानीहि नेदममूलं भविष्यतीति ॥३॥ तस्य क्व मूलꣳ स्यादन्यत्रान्नादेवमेव खलु सोम्यान्नेन शुंगेनापो मूलमन्विच्छाद्भिः सोम्य शुंगेन तेजो मूलमन्विच्छ तेजसा सोम्य शुंगेन सन्मूलमन्विच्छ सन्मूलाः सोम्येमाः सर्वाः प्रजाः सदायतनाः सत्प्रतिष्ठाः ॥४॥ अथ यत्रैतत्पुरुषः पिपासति नाम तेज एव तत्पीतं नयते तद्यथा गोनायोऽश्वनायः पुरुषनाय इत्येवं तत्तेज आचष्ट उदन्येति तत्रैतदेव शुंगमुत्पतितꣳ सोम्य विजानीहि नेदममूलं भविष्यतीति ॥५॥ तस्य क्व मूलꣳ स्यादन्यत्राद्भ्योऽद्भिः सोम्य शुंगेन तेजो मूलमन्विच्छ तेजसा सोम्य शुंगेन सन्मूलमन्विच्छ सन्मूलाः

णाम करून जिरवितें [नयन्ते] ह्मणून उदकालाच 'अशनाया' [=अन्नाचा नेता] असें नांव आहे; ज्याप्रमाणें गोनाय [=गुराखी], अश्वनाय [=घोडेस्वार], पुरुषनाय [=राजा किंवा सेनापति] हीं नांवें असतात तद्वत्. जसा वटवृक्षाचा अंकुर उत्पन्न होतो तसें हे शरीर त्या अन्नापासून अंकुराप्रमाणें उत्पन्न आहे असें जाण. हें कांहीं मूळरहित नाहीं. ३. त्याचें मूळ अन्नाखेरीज इतर कोणतें असणार? (अर्थात् अन्न हे पुरुषरूपी अंकुराचें मूळ आहे). बाळा, याप्रमाणेंच अन्नरूपी अंकुराचें मूळ उदक आहे असें जाण. उदकरूपी अंकुराचें मूळ तेज आहे. तेजोरूपी अंकुराचें मूळ सत् आहे. बाळा, सत् हेंच या सर्व प्रजांचें मूळ आहे, आयतन [आश्रय] आहे आणि प्रतिष्ठा [लय] आहे. ४. जेव्हां हा पुरुष (उदक) प्राशन करण्याची इच्छा करतो तेव्हां त्यानें प्राशन केलेलें उदक तेज नेतें [=शोषण करतें] ह्मणून गोनाय, अश्वनाय, पुरुषनाय यांच्याप्रमाणें तेजालाच उदन्य असें नांव आहे. ह्मणून बाळा, उदकापासून हें शरीर अंकुराप्रमाणे उत्पन्न झालें आहे असें जाण. हें कांहीं मूळरहित नाहीं. ५. याचें उदकाशिवाय दुसरें कोणतें मूळ असणार? बाळा, याप्रमाणेंच उदकरूपी अंकुराचें मूळ

सोम्येमाः सर्वाः प्रजाः सदायतनाः सत्प्रतिष्ठा यथा नु खलु सोम्येमास्तिस्रो देवताः पुरुषं प्राप्य त्रिवृत्त्रिवृदेकैका भवति तदुक्तं पुरस्तादेव भवत्यस्य सोम्य पुरुषस्य प्रयतो वाङ्‌ मनसि संपद्यते मनः प्राणे प्राणस्तेजसि तेजः परस्यां देवतायाम् ।।६।। स य एषोऽणिमैतदात्म्यमिद॑ सर्वं तत्सत्य॑ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति भूय एव मा भगवान्‌ विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ।।७।। इत्यष्टमः खंडः ।।८।।

यथा सोम्य मधु मधुकृतो निस्तिष्ठन्ति नानात्ययानां वृक्षाणां रसान्समवहारमेकतां रसं गमयन्ति ।।१।। ते यथा तत्र न विवेकं लभन्तेऽमुष्याहं वृक्षस्य रसोऽस्म्यमुष्याहं वृक्षस्य रसोऽस्मीत्येवमेव खलु सोम्येमाः सर्वाः प्रजाः सति संपद्य न विदुः सति संपद्या-

तेज आहे असें जाण. तेजोरूपी अंकुराचें मूळ सत् आहे. बाळा, सत् हेंच या सर्व प्रजांचें मूळ आहे, आयतन आहे आणि प्रतिष्ठा आहे. बाळा, या (तेज, उदक व अन्न अशा) तीन देवता पुरुषाप्रत येऊन प्रत्येक त्रिवृत कशी होते हें पूर्वीं सांगितलेंच आहे. हा पुरुष मरूं लागला ह्मणजे याची वाणी मनामध्यें लय पावते, मन प्राणामध्यें लय पावतें, प्राण तेजामध्यें लय पावतो आणि तेज (सर्वांचें मूळ जी) परदेवता तिच्यामध्ये लय पावतें.६. ती देवता ह्मणजे सत्. तें अणुप्रमाण आहे. तें या सर्वांचा आत्मा आहे. तें सत्य आहे. तें आत्मा आहे. श्वेतकेतो, तो आत्मा तूंच आहेस. श्वेतकेतु ह्मणाला, भगवन्, आपण मला आणखी ज्ञान सांगा. पिता ह्मणाला, बरें आहे, बाळा, सांगतों.७.

बाळा, ज्याप्रमाणें मधुमक्षिका मध तयार करतात, नानाप्रकारच्या दिशांना असलेल्या वृक्षांचे रस आणून त्यांचा एक मध असा रस तयार करतात, ते रस ज्याप्रमाणें मी या वृक्षाचा रस आहें, मी त्या वृक्षाचा रस आहें, इत्यादि विशिष्टता जाणीत नाहींत, त्याप्रमाणें बाळा, या सर्व प्रजा

मह इति ॥२॥ त इह व्याघ्रो वा सिंहो वा वृको वा वराहो वा कीटो वा पतंगो वा दंशो वा मशको वा यद्यद्भवन्ति तदाभवन्ति ॥३॥ स य एषोऽणिमैतदात्म्यमिदꣳ सर्वं तत्सत्यꣳ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति भूय एव मा भगवान् विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥४॥ इति नवमः खंडः ॥९॥

इमाः सोम्य नद्यः पुरस्तात्प्राच्यः स्यन्दन्ते पश्चात्प्रतीच्यस्ताः समुद्रात्समुद्रमेवापियन्ति स समुद्र एव भवति ता यथा तत्र न विदुरियमहमस्मीयमहमस्मीति ॥१॥ एवमेव खलु सोम्येमाः सर्वाः प्रजाः सत आगम्य न विदुः सत आगच्छामह इति त इह व्याघ्रो वा सिंहो

(प्रत्यहीं सुषुप्तिकालीं अथवा अखेरीस मरणकालीं) सत्चे ठिकाणीं लय पावतात तरी सत्चे ठिकाणीं आपण लय पावलों हें जाणीत नाहींत. १. २. ह्मणून ते (सत्मध्यें लय पावल्यानंतर) पुन्हां या लोकीं आले ह्मणजे वाघ, सिंह, लांडगा, डुकर, कीटक, पतंग, दंश करणारा प्राणी, अथवा मशक जसे (पूर्वकालीं अथवा पूर्वजन्मीं) असतात तसेच होतात. ३. या प्रजा ज्याच्यामध्यें प्रवेश करून पुन्हां प्रकट होतात तें सत् अणुप्रमाण आहे. तें या सर्वांचा आत्मा आहे. तें सत्य आहे. तोच आत्मा आहे. श्वेतकेतो, तो तूं आहेस. श्वेतकेतु ह्मणाला, भगवन्, आपण मला आणखी ज्ञान सांगा. पिता ह्मणाला, बरें आहे बाळा, सांगतों. ४.

बाळा, ज्याप्रमाणें पूर्वगामी नद्या पूर्वेकडे जातात आणि पश्चिमगामी नद्या पश्चिमेकडे जातात (आणि सर्व समुद्राला मिळतात) आणि त्या पुन्हां समुद्रांतून (बाष्परूपानें वर जाऊन मेघांतून खालीं येतात व) समुद्रालाच प्राप्त होतात व त्या सर्व मिळून समुद्रच होतात; तेव्हां त्या जशा मी अमुक नदी आहें, मी तमुक नदी आहें असें जाणीत नाहींत; त्याप्रमाणें बाळा, या सर्व प्रजा सत्पासून उत्पन्न झाल्या तरी आपण सत्पासून आलों हें जाणीत नाहींत. ते (सत्मध्यें लय पावल्यानंतर) पुन्हां या लोकीं आले

वा वृको वा वराहो वा कीटो वा पतंगो वा दंशो वा मशको वा यद्यद्भवन्ति तदाभवन्ति ॥२॥ स य एषोऽणिमैतदात्म्यमिदꣳ सर्वं तत्सत्यꣳ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति भूय एव मा भगवान् विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥३॥ इति दशमः खंडः ॥१०॥

अस्य सोम्य महतो वृक्षस्य यो मूलेऽभ्याहन्याज्जीवन् स्रवेद्यो मध्येऽभ्याहन्याज्जीवन्स्रवेद्योऽग्रेऽभ्याहन्याज्जीवन्स्रवेत्स एष जीवेनात्मनानुप्रभूतः पेपीयमानो मोदमानस्तिष्ठति ॥१॥ अस्य यदेकाꣳ शाखां जीवो जहात्यथ सा शुष्यति द्वितीयां जहात्यथ सा शुष्यति तृतीयां जहात्यथ सा शुष्यति सर्वं जहाति सर्वः शुष्यति ॥२॥ एवमेव खलु सोम्य विद्धीति होवाच जीवापेतं वाव किलेदं म्रियते

ह्मणजे वाघ, सिंह, लांडगा, डुकर, कीटक, पतंग, दंश अथवा मशक जसे (पूर्वी) असतात तसेच होतात. १.२. या प्रजा ज्याच्यामध्यें प्रवेश करून पुन्हां प्रकट होतात तें सत् अणुप्रमाण आहे. तें या सर्वांचा आत्मा आहे. तें सत्य आहे. तोच आत्मा आहे. श्वेतकेतो, तो तूं आहेस. श्वेतकेतु ह्मणाला, भगवन्, आपण मला आणखी ज्ञान सांगा. पिता ह्मणाला, बरें आहे बाळा, सांगतों. ३.

बाळा, या (समोर दिसणाऱ्या) मोठ्या वृक्षाच्या मूळभागीं कोणीं प्रहार केला तर तो वृक्ष जिवंत आहे ह्मणून त्यांतून रस गळूं लागेल; मध्यभागीं प्रहार केला तर तो जिवंत आहे ह्मणून त्यांतून रस गळूं लागेल; अग्रभागीं प्रहार केला तर तो जिवंत आहे ह्मणून त्यांतून रस गळूं लागेल. ह्मणून (याप्रमाणें रस गळत असेल तर) तो वृक्ष जीवरूपी आत्म्यानें व्याप्त आहे, तो (उदक व भूमिसंबंधी रस यांचें) प्राशन करतो व (तेणेंकरून) आनंदित असा रहातो. १. जेव्हां वृक्ष आपली (कुजलेली अथवा तोडलेली) एक शाखा टाकून देतो तेव्हां ती शुष्क होते; दुसरी टाकतो तेव्हां ती शुष्क होते; तिसरी टाकतो तेव्हां ती शुष्क होते. सर्व शाखा टाकतो

न जीवो म्रियत इति स य एषोऽणिमैतदात्म्यमिदꣳ सर्वं तत्सत्यꣳ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति भूय एव मा भगवान् विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥३॥ इत्येकादशः खंडः ॥११॥

न्यग्रोधफलमत आहरेतीदं भगव इति भिन्धीति भिन्नं भगव इति किमत्र पश्यसीत्यण्व्य इवेमा धाना भगव इत्यासामङ्गैकां भिन्धीति भिन्ना भगव इति किमत्र पश्यसीति न किंचन भगव इति ॥१॥ तꣳ होवाच यं वै सोम्यैतमणिमानं न निभालयस एतस्य वै सोम्यैषोऽणिम्न एव महान्यग्रोधस्तिष्ठति श्रद्धत्स्व सोम्येति ॥२॥ स य एषोऽणिमैतदात्म्यमिदꣳ सर्वं तत्सत्यꣳ स आत्मा तत्त्वमसि

तेव्हां (तो) सर्व वृक्ष शुष्क होतो.२. ह्मणून बाळा तूं असें जाण की, हें (शरीर) जीवरहित झालें ह्मणजे मरण पावतें. जीव मरण पावत नाहीं. या प्रजा ज्याच्यामध्यें प्रवेश करून पुन्हां प्रकट होतात तें सत् अणुप्रमाण आहे. तें या सर्वांचा आत्मा आहे. ते सत्य आहे. तोच आत्मा आहे. श्वेतकेतो, तो तूं आहेस. श्वेतकेतु ह्मणाला, भगवन् आपण मला आणखी ज्ञान सांगा. पिता ह्मणाला, बरें आहे बाळा, सांगतों.३.

पिता ह्मणाला, या वटवृक्षाचें एक फळ आण. श्वेतकेतु ह्मणाला, भगवन् हें आणलें. पिता ह्मणाला, तें फोड. श्वेतकेतु ह्मणाला, भगवन् हें फोडलें. पिता ह्मणाला, त्यांत तुला काय दिसतें ? पुत्र ह्मणाला, भगवन्, अणुप्रमाण अशीं बीजें दिसतात. पिता ह्मणाला, यांतली एक बी फोड. पुत्र ह्मणाला, भगवन्, फोडली. पिता ह्मणाला, त्यांत तुला काय दिसतें ? पुत्र ह्मणाला, भगवन्, कांहीं दिसत नाहीं.१. पिता त्याला ह्मणाला, बाळा, या वटबीजांतलें सूक्ष्म प्रमाण तुला दिसत नाहीं. तथापि या सूक्ष्म प्रमाणापासूनच उत्पन्न झालेला हा मोठा वटवृक्ष येथें उभा आहे हें लक्षांत आण.२. या प्रजा ज्याच्यामध्यें प्रवेश करून पुन्हां प्रकट होतात तें सत् अणुप्रमाण आहे. तें या सर्वांचा आत्मा आहे. तें सत्य आहे. तोच

श्वेतकेतो इति भूय एव मा भगवान् विज्ञापयत्विति तथा सोम्येति हो-वाच ॥३॥ इति द्वादशः खंडः ॥१२॥

लवणमेतदुदकेऽवधायाथ मा प्रातरुपसीदथा इति स ह तथा चकार तँ होवाच यद्दोषा लवणमुदकेऽवाधा अंग तदाहरेति तद्धाव-मृश्य न विवेद ॥१॥ यथा विलीनमेवांगास्यांतादाचामेति कथ-मिति लवणमिति मध्यादाचामेति कथमिति लवणमित्यंतादाचामेति कथमिति लवणमित्यभिप्रास्यैनदथ मोपसीदथा इति तद्ध तथा चकार तच्छश्वत्संवर्तते तँ होवाचात्र वाव किल सत्सोम्य न निभालयसेऽत्रैव किलेति ॥२॥ स य एषोऽणिमैतदात्म्यमिदँ सर्वं तत्सत्यँ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति भूय एव मा भगवान् विज्ञापयत्विति

आत्मा आहे. श्वेतकेतो, तो तूं आहेस. श्वेतकेतु ह्मणाला, भगवन्, आपण मला आणखी ज्ञान सांगा. पिता ह्मणाला, बरें आहे बाळा, सांगतों.३.

हें मीठ (आज) पाण्यांत टाकून ठेव आणि (उद्यां) सकाळीं माझ्याकडे ये. श्वेतकेतूनें त्याप्रमाणें केलें. पिता त्याला ह्मणाला, रात्रीं जें मीठ तूं उदकांत टाकलेंस तें काढ. श्वेतकेतु हात घालून पाहूं लागला पण तें त्याला सांपडले नाहीं.१. कारण तें उदकांत लुप्त झालें होतें. पिता ह्मणाला, आतां त्या उदकापैकीं वरच्या भागांतलें थोडें घेऊन आचमन कर. (पुत्रानें त्याप्रमाणें केलें). "कसें आहे?" "खारट आहे." "मध्य-भागांतलें घेऊन आचमन कर. कसें आहे?" "खारट आहे." "खालच्या भागांतलें घेऊन आचमन कर. कसें आहे?" "खारट आहे." "आतां तें उदक टाकून दे आणि मजकडे ये." श्वेतकेतु तें उदक टाकून "ते लवण उदकांत टाकलें ह्मणजे नेहमीं रहातें" असे ह्मणत पित्याकडे आला. पिता त्याला ह्मणाला, बाळा, याच (तेज, उदक, अन्न इत्यादिकांच्या कार्यरूपी) शरीरामध्यें सत् आहे. (पण) तें तुला दिसत नाहीं तरी तें येथेंच आहे. २. या प्रजा ज्याच्यामध्यें प्रवेश करून पुन्हां प्रकट होतात तें सत् अणु-

तथा सोम्येति होवाच ॥३॥ इति त्रयोदशः खंडः ॥१३॥

यथा सोम्य पुरुषं गंधारेभ्योऽभिनद्धाक्षमानीय तं ततोऽतिजने विसृजेत्स यथा तत्र प्राङ्वोदङ्वाऽधराङ्वा प्रत्यङ्वा प्रध्मायीताभिनद्धाक्ष आनीतोऽभिनद्धाक्षो विसृष्टः ॥१॥ तस्य यथाभिनहनं प्रमुच्य प्रब्रूयादेतां दिशं गंधारा एतां दिशं व्रजेति स ग्रामाद्ग्रामं पृच्छन् पंडितो मेधावी गंधारानेवोपसंपद्येतैवमेवेहाचार्यवान् पुरुषो वेद तस्य तावदेव चिरं यावन्न विमोक्ष्येऽथ संपत्स्य इति ॥२॥ स य एषोऽणिमैतदात्म्यमिदꣳ सर्वं तत्सत्यꣳ स आत्मा तत्त्वमसि

प्रमाण आहे. तें या सर्वांचा आत्मा आहे. तें सत्य आहे. तोच आत्मा आहे. श्वेतकेतो, तो तूं आहेस. श्वेतकेतु ह्मणाला, भगवन्, आपण मला आणखी ज्ञान सांगा. पिता ह्मणाला, बरें आहे बाळा, सांगतों.३.

बाळा, ज्याप्रमाणें गंधार देशांतून (तस्करांनीं) एखाद्या मनुष्याचे डोळे बांधून त्याला अरण्यांत आणले व अत्यंत निर्जन प्रदेशामध्यें सोडून दिलें असतां तो पूर्वेकडे, उत्तरेकडे, दक्षिणेकडे अथवा पश्चिमेकडे तोंड करून "माझे डोळे बांधून मला येथें आणलें व तसेंच सोडून दिले" असें ओरडतो, आणि त्याला कोणी कारुणिक मनुष्य भेटून त्यानें त्याचे डोळे सोडल्यावर आणि अमुक दिशेला गंधार देश आहे, तिकडे जा, असें सांगितलें ह्मणजे, तो जर विद्वान् व बुद्धिमान् असेल तर एका गांवाहून दुसऱ्या गांवीं रस्ता विचारीत गंधार देशालाच परत जातो; त्याप्रमाणेंच (मी मूळचा आत्मस्वरूपापासून पापपुण्यादि तस्करांनीं या संसारामध्यें आणलेला आहें असें) (दयाळु) आचार्यानें युक्त असा पुरुष जाणतो. (हें जाणलें ह्मणजे त्या पुरुषाची कर्मक्षयापासून) सुटका होईपर्यंतच त्याचें (संसारांत) रहाणें होतें. सुटका झाली कीं, तो (पुन्हां) सत्स्वरूप होतो.१.२. या प्रजा ज्याच्यामध्यें प्रवेश करून पुन्हां प्रकट होतात तें सत् अणुप्रमाण आहे. तें या सर्वांचा आत्मा आहे. तें सत्य आहे. तोच आत्मा आहे.

श्वेतकेतो इति भूय एव मा भगवान्विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥३॥ इति चतुर्दशः खंडः ॥१४॥

पुरुषꣳ सोम्योतोपतापिनं ज्ञातयः पर्युपासते जानासि मां जानासि मामिति तस्य यावन्न वाङ्मनसि संपद्यते मनः प्राणे प्राणस्तेजसि तेजः परस्यां देवतायां तावज्जानाति ॥१॥ अथ यदास्य वाङ्मनसि संपद्यते मनः प्राणे प्राणस्तेजसि तेजः परस्यां देवतायामथ न जानाति ॥२॥ स य एषोऽणिमैतदात्म्यमिदꣳ सर्वं तत्सत्यꣳ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति भूय एव मा भगवान् विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥३॥ इति पंचदशः खंडः ॥

पुरुषꣳ सोम्योत हस्तगृहीतमानयन्त्यपहार्षीत्स्तेयमकार्षीत्परशु-

श्वेतकेतो, तो तूं आहेस. श्वेतकेतु ह्मणाला, भगवन्, आपण मला आणखी ज्ञान सांगा. पिता ह्मणाला, बरें आहे बाळा, सांगतों.३.

बाळा, (मरणकाळीं ज्वरादिकांनीं) तप्त झालेल्या मनुष्याच्या भोंवतीं त्याच्या गोतांतली मंडळी जमून "मला ओळखतोस का?" "मला ओळखतोस का?" असें विचारतात. जोंपर्यंत त्याची वाणी मनामध्यें लुप्त झालेली नसते, मन प्राणामध्यें लुप्त झालेलें नसतें, प्राण तेजामध्यें लुप्त झालेला नसतो आणि तेज (सद्रूपी) परमेश्वरामध्यें लुप्त झालेलें नसते तोंपर्यंत तो (आपल्या मंडळीला) ओळखतो.१. पण जेव्हां वाणी मनामध्यें लोप पावते, मन प्राणामध्यें लोप पावतें, प्राण तेजामध्यें लोप पावतो आणि तेज (सद्रूपी) परमेश्वरामध्यें लोप पावतें तेव्हां तो मनुष्य (आपल्या मंडळीला) ओळखीत नाहीं.२. या प्रजा ज्याच्यामध्यें प्रवेश करून पुन्हां प्रकट होतात तें सत् अणुप्रमाण आहे. ते या सर्वांचा आत्मा आहे. तें सत्य आहे. तोच आत्मा आहे. श्वेतकेतो, तो तूं आहेस. श्वेतकेतु ह्मणाला, भगवन्, आपण मला आणखी ज्ञान सांगा. पिता ह्मणाला, बरें आहे बाळा, सांगतों.३.

मस्मै तपतेति स यदि तस्य कर्ता भवति तत एवानृतमात्मानं कुरुते सोऽनृताभिसंधोऽनृतेनात्मानमन्तर्धाय परशुं तप्तं प्रतिगृह्णाति स दह्यतेऽथ हन्यते ॥१॥ अथ यदि तस्याकर्ता भवति तत एव सत्यमात्मानं कुरुते स सत्याभिसंधः सत्येनात्मानमन्तर्धाय परशुं तप्तं प्रतिगृह्णाति स न दह्यतेऽथ मुच्यते ॥२॥ स यथा तत्र नादाह्येतैतदात्म्यमिदꣳ सर्वं तत्सत्यꣳ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति तद्धास्य विजज्ञाविति विजज्ञाविति ॥३॥ इति षोडशः खंडः ॥ इति षष्ठोऽध्यायः

अथ सप्तमोऽध्यायः ॥

ॐ अधीहि भगव इति होपससाद सनत्कुमारं नारदस्तꣳ होवाच

बाळा, (राजसेवक) (चोर) मनुष्याचे हात बांधून (अधिकाऱ्यापुढें) आणतात. ते ह्मणतात, यानें (धनाचा) अपहार केला, चोरी केली. (तो ह्मणतो, मीं चोरी केली नाहीं). (तो अधिकारी ह्मणतो,) हा परशु तापवा. त्या मनुष्यानें जर चोरी केली असेल तर तो स्वतःच स्वतःला खोटा करतो. अंतरामध्यें असत्य धारण करणारा तो असत्यभाषी तप्त परशु हातांत घेतो; (पण) त्याचा हात भाजतो आणि मग त्याला मारतात.१. त्यानें जर तें चौर्यकर्म केलें नसेल तर तो स्वतःला खरा करतो. अंतरामध्यें सत्य धारण करणारा तो सत्यप्रतिज्ञ तप्त परशु हातांत घेतो; त्याचा हात भाजत नाहीं आणि मग त्याला सोडून देतात.२. त्याचा सत्स्वरूप हात ज्याप्रमाणे भाजत नाहीं त्याप्रमाणें सत्स्वरूपी मनुष्य मरणानंतर (पुन्हां जन्म न पावतां) सत्स्वरूप होतो. तें सत् या सर्वांचा आत्मा आहे. तें सत्य आहे. तोच आत्मा आहे. श्वेतकेतो, तो तूं आहेस. (याप्रमाणें) पित्यानें सांगितलेलें सत्स्वरूपाचें ज्ञान श्वेतकेतु जाणता झाला.३.

अध्याय सातवा.

"हे भगवन्, मला ज्ञान सांगा" असें (देवर्षि) नारद सनत्कुमाराकडे येऊन ह्मणाला. सनत्कुमार ह्मणाले, तुला अगोदर किती ज्ञान

यद्वेत्थ तेन मोपसीद ततस्त ऊर्ध्वं वक्ष्यामीति स होवाच ॥१॥ ऋग्वेदं भगवोऽध्येमि यजुर्वेदꣳ सामवेदमाथर्वणं चतुर्थमितिहासपुराणं पंचमं वेदानां वेदं पित्र्यं राशिं दैवं निधिं वाकोवाक्यमेकायनं देवविद्यां ब्रह्मविद्यां भूतविद्यां क्षत्रविद्यां नक्षत्रविद्याꣳ सर्पदेवजनविद्यामेतद्भगवोऽध्येमि ॥२॥ सोऽहं भगवो मन्त्रविदेवास्मि नाऽत्मविच्छ्रुतꣳ ह्येव मे भगवद्दृशेभ्यस्तरति शोकमात्मविदिति सोऽहं भगवः शोचामि तं मा भगवाञ्छोकस्य पारं तारयत्विति तꣳ होवाच यद्वै किंचैतदध्यगीष्ठा नामैवैतत् ॥३॥ नाम वा ऋग्वेदो यजुर्वेदः सामवेद आथर्वणश्चतुर्थ इतिहासपुराणः पंचमो वेदानां वेदः पित्र्यो राशिर्दैवो निधिर्वाकोवाक्यमेकायनं देवविद्या ब्रह्मविद्या भूतविद्या क्षत्र-

प्रात झालेलें आहे तें मला सांग. ह्मणजे त्याच्या पुढचें मी तुला सांगेन.१. नारद ह्मणाला, हे भगवन्, मीं ऋग्वेदाचें अध्ययन केलें आहे. तसेंच यजुर्वेद, सामवेद, चवथा अथर्ववेद, पांचवा (भारतादि) इतिहासपुराण, व्याकरण [=वेदांचा वेद], श्राद्धकल्प, गणित [राशिं], उत्पातादिकांचें ज्ञान [दैवं], महाकालादिशास्त्र [निधिं], तर्कशास्त्र [वाकोवाक्यं], नीतिशास्त्र [एकायनं], निरुक्त [देवविद्या], ऋग्वेदादि वेदविद्या [ब्रह्मविद्या], भूततंत्र, धनुर्वेद, ज्योतिष, सर्पविद्या आणि नृत्यगीतवाद्यशिल्पादि विद्या यांचें मीं अध्ययन केलें आहे.२. भगवन्, तथापि मी केवळ शब्दार्थ मात्र जाणणारा आहें; मला आत्मज्ञान झालें नाहीं. "आत्मज्ञानी मनस्तापाच्या [शोकाच्या] पलीकडे जातो" असें मीं आपणांसारख्या थोर पुरुषांकडून ऐकलें आहे. हे भगवन्, पण माझें मन ताप पावत आहे. करितां आपण मला शोकाच्या पैलतीरीं न्या. सनत्कुमार ह्मणाले, तुला जें ज्ञान झालें आहे तें केवळ नाममात्र आहे.३. ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, चवथा अथर्ववेद, पांचवा इतिहासपुराण, व्याकरण, श्राद्धकल्प, गणित, उत्पातादि ज्ञान, निधि, तर्कशास्त्र, नीतिशास्त्र, निरुक्त, वेदविद्या, भूततंत्र,

विद्या नक्षत्रविद्या सर्पदेवजनविद्या नामैवैतन्नामोपास्स्वेति ॥४॥ स यो नाम ब्रह्मेत्युपास्ते यावन्नाम्नो गतं तत्रास्य यथाकामचारो भवति यो नाम ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगवो नाम्नो भूय इति नाम्नो वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥५॥ इति प्रथमः खंडः ॥१॥

वाग्वाव नाम्नो भूयसी वाग्वा ऋग्वेदं विज्ञापयति यजुर्वेदꣳ सामवेदमाथर्वणं चतुर्थमितिहासपुराणं पंचमं वेदानां वेदं पित्र्यं राशिं दैवं निधिं वाकोवाक्यमेकायनं देवविद्यां ब्रह्मविद्यां भूतविद्यां क्षत्रविद्यां नक्षत्रविद्याꣳ सर्पदेवजनविद्यां दिवं च पृथिवीं च वायुं चाकाशं चापश्च तेजश्च देवांश्च मनुष्यांश्च पशूंश्च वयांसि च तृणवनस्पतीञ्छ्वापदान्याकीटपतंगपिपीलिकं धर्मं चाधर्मं च सत्यं चानृतं च साधु चासाधु च हृदयज्ञं चाहृदयज्ञं च यद्वै वाङ्नाभविष्यन्न धर्मो नाधर्मो

धनुर्वेद, ज्योतिष, सर्पविद्या, ललितविद्या हें सर्व ज्ञान नाममात्र आहे. या सर्व नामाची ब्रह्मबुद्धीनें उपासना कर.४. जो या नामब्रह्माची उपासना करतो त्याला जेथपर्यंत या नामाची गति आहे तेथपर्यंत संचार करतां येतो. नारद ह्मणाला, भगवन्, नामाहून अधिक कांहीं आहे काय? सनत्कुमार ह्मणाले, होय, नामाहून अधिक आहे. नारद ह्मणाला, भगवन्, तें आपण मला सांगा.५.

नामाहून अधिक वाणी आहे. वाणी ऋग्वेदाचें ज्ञान करून देते. यजुर्वेद, सामवेद, चवथा अथर्व, पांचवा इतिहासपुराण, व्याकरण, श्राद्धकल्प, गणित, दैव, निधि, तर्कशास्त्र, नीतिशास्त्र, निरुक्त, वेदविद्या, भूततंत्र, धनुर्वेद, ज्योतिष, सर्पविद्या, ललितविद्या, स्वर्ग, पृथिवी, वायु, आकाश, उदक, तेज, देव, मनुष्य, पशु, पक्षी, गवत, वनस्पती, किडे–पतंग–पिपीलिकादि सर्व श्वापदें, धर्म, अधर्म, सत्य, असत्य, साधु, असाधु, हृदयाला प्रिय, हृदयाला अप्रिय, इत्यादि या सर्वांचें वाणी ज्ञान करून देते. जर वाणी नसती तर धर्म–अधर्म, सत्य- असत्य, साधु–असाधु,

व्यज्ञापयिष्यन्न सत्यं नानृतं न साधु नासाधु न हृदयज्ञो नाहृदयज्ञो वागेवैतत्सर्वं विज्ञापयति वाचमुपास्स्वेति ॥१॥ स यो वाचं ब्रह्मेत्युपास्ते यावद्वाचो गतं तत्रास्य यथाकामचारो भवति यो वाचं ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगवो वाचो भूय इति वाचो वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥२॥ इति द्वितीयः खंडः ॥२॥

मनो वाव वाचो भूयो यथा वै द्वे वामलके द्वे वा कोले द्वौ वाक्षौ मुष्टिरनुभवत्येवं वाचं च नाम च मनोऽनुभवति स यदा मनसा मनस्यति मन्त्रानधीयीयेत्यथाधीते कर्माणि कुर्वीयेत्यथ कुरुते पुत्रांश्च पशूंश्चेच्छेयेत्यथेच्छत इमं च लोकममुं चेच्छेयेत्यथेच्छते मनो ह्यात्मा मनो हि लोको मनो हि ब्रह्म मन उपास्स्वेति ॥१॥ स यो

हृदयप्रिय–हृदयाप्रिय यांचें ज्ञान झाले नसतें. या सर्वांचे ज्ञान वाणीच करून देते. ह्मणून वाणीची उपासना कर.१. जो या वाणीरूपी ब्रह्माची उपासना करतो त्याला जेथपर्यंत वाणीची गति आहे तेथपर्यंत संचार करतां येतो. नारद ह्मणाला, भगवन्, वाणीहून अधिक कांहीं आहे काय? सनत्कुमार ह्मणाले, होय, वाणीहून अधिक आहे. नारद ह्मणाला, भगवन्,ते आपण मला सांगा.२.

वाणीहून अधिक मन आहे. ज्याप्रमाणे दोन आंवळे, दोन बोरें अथवा दोन मणी मुठीमध्ये रहातात त्याप्रमाणें वाणी आणि मन ही दोन्ही मनामध्ये रहातात. "मी मंत्रांचा उच्चार करावा" असें जेव्हां मनुष्याच्या मनांत येते तेव्हां तो मंत्रांचा उच्चार करूं लागतो. "मीं कर्मे करावीं" असें मनांत येते तेव्हां तो कर्मे करूं लागतो. "मला पुत्र, पशु, इत्यादि प्राप्त व्हावे" अशी मनानें इच्छा करतो तेव्हां तो त्यांच्या प्राप्तीचा उद्योग करतो व त्यांची त्याला प्राप्ति होते. "हा लोक आणि परलोक प्राप्त व्हावे" अशी मनानें इच्छा करतो तेव्हां त्याला ते प्राप्त होतात. (सारांश,) मन हाच आत्मा आहे, मन लोक आहे, मन ब्रह्म आहे. ह्मणून मनाची उपासना

मनो ब्रह्मेत्युपास्ते यावन्मनसो गतं तत्रास्य यथाकामचारो भवति यो मनो ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगवो मनसो भूय इति मनसो वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥२॥ इति तृतीयः खंडः ॥३॥

संकल्पो वाव मनसो भूयान्यदा वै संकल्पयतेऽथ मनस्यत्यथ वाचमीरयति तामु नाम्नीरयति नाम्नि मंत्रा एकं भवन्ति मंत्रेषु कर्माणि ॥१॥ तानि ह वा एतानि संकल्पैकायनानि संकल्पात्मकानि संकल्पे प्रतिष्ठितानि समक्लृपतां द्यावापृथिवी समकल्पेतां वायुश्चाकाशं च समकल्पन्तापश्च तेजश्च तेषाꣳ संक्लृप्त्यै वर्षꣳ संकल्पते वर्षस्य संक्लृप्त्या अन्नꣳ संकल्पतेऽन्नस्य संक्लृप्त्यै प्राणाः संकल्पन्ते प्राणानाꣳ संक्लृप्त्यै मंत्राः संकल्पन्ते मंत्राणाꣳ संक्लृप्त्यै कर्माणि संकल्पन्ते कर्मणाꣳ संक्लृप्त्यै लोकः संकल्पते लोकस्य

कर.१. जो या मनोरूपी ब्रह्माची उपासना करतो त्याला जेथपर्यंत मनाची गति आहे तेथपर्यंत संचार करतां येतो. नारद ह्मणाला, भगवन्, मनाहून अधिक कांहीं आहे काय? सनत्कुमार ह्मणाले, होय, मनाहून अधिक आहे. नारद ह्मणाला, भगवन्, तें आपण मला सांगा.

मनाहून अधिक संकल्प आहे. जेव्हां मनुष्य संकल्प करतो तेव्हां त्याच्या मनांत जे विचार येतात, ते विचार तो वाणीनें प्रकट करतो, त्यांना नांव देतो, त्या नांवामध्यें मंत्र [शब्द] एकत्र होतात मंत्रांमध्यें [=शब्दांमध्यें] कर्मांचा अंतर्भाव होतो. (ह्मणजे मंत्रांचे योगानें कर्में होतात).१. या (मन आदि) सर्वांचा संकल्पामध्यें अंतर्भाव होतो. हीं सर्व संकल्परूप आहेत. संकल्पामध्यें स्थित आहेत. स्वर्ग व पृथिवी यांनीं जणू काय संकल्पच केला आहे. वायु व आकाश यांनीं संकल्प केला आहे. उदक व तेज यांनीं संकल्प केला आहे. त्यांच्या संकल्पामुळेंच वृष्टि होते. वृष्टीमुळे अन्न होतें. अन्नामुळे प्राण होतात. प्राणांमुळें मंत्र होतात. मंत्रांमुळें कर्में होतात. कर्मांमुळें कर्मफल [=लोक] होतें. कर्मफलामुळें सर्व

संक्लृप्त्यै सर्वꣳ संकल्पते स एष संकल्पः संकल्पमुपास्स्वेति ॥२॥ स यः संकल्पं ब्रह्मेत्युपास्ते क्लृप्तान्वै स लोकान् ध्रुवान् ध्रुवः प्रतिष्ठितान् प्रतिष्ठितोऽव्यथमानानव्यथमानोऽभिसिध्यति यावत्संकल्पस्य गतं तत्रास्य यथाकामचारो भवति यः संकल्पं ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगवः संकल्पाद्भूय इति संकल्पाद्वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥३॥ इति चतुर्थः खंडः ॥४॥

चित्तं वाव संकल्पाद्भूयो यदा वै चेतयतेऽथ संकल्पयतेऽथ मनस्यत्यथ वाचमीरयति तामु नाम्नीरयति नाम्नि मंत्रा एकं भवन्ति मंत्रेषु कर्माणि ॥१॥ तानि ह वा एतानि चित्तैकायनानि चित्तात्मानि चित्ते प्रतिष्ठितानि तस्माद्यद्यपि बहुविदचित्तो भवति नायमस्तीत्येवैनमाहुर्यदयं वेद यद्वा अयं विद्वान्नेत्थमचित्तः स्यादित्यथ

होतें. अशा प्रकारचा हा संकल्प आहे. ह्मणून संकल्पाची उपासना कर.२. जो या संकल्परूपी ब्रह्माची उपासना करतो तो स्वतः ध्रुव [शाश्वत], प्रतिष्ठायुक्त व व्यथारहित होत्साता ध्रुव, प्रतिष्ठायुक्त व व्यथारहित असे लोक पावतो. जेथपर्यंत संकल्पाची गति आहे तेथपर्यंत त्याला संचार करतां येतो. नारद ह्मणाला, भगवन्, संकल्पाहून अधिक कांहीं आहे काय? सनत्कुमार ह्मणाले, होय, संकल्पाहून अधिक आहे. नारद ह्मणाला, भगवन्, तें आपण मला सांगा.३.

संकल्पाहून अधिक चित्त आहे. जेव्हां मनुष्याला चैतन्य उत्पन्न होतें तेव्हां तो संकल्प करतो, त्याच्या मनांत विचार येतात. ते विचार तो वाणीनें प्रकट करतो, त्यांना नांव देतो, त्या नांवांमध्यें मंत्र एकत्र होतात. मंत्रांमध्यें कर्मांचा अंतर्भाव होतो.१. या (मन आदि) सर्वांचा चित्तामध्यें अंतर्भाव होतो. हीं सर्व चित्तरूप आहेत. चित्तामध्यें स्थित आहेत. ह्मणून कोणी मनुष्य पुष्कळ ज्ञानी असला तरी तो जर चित्तरहित असेल तर त्याचें तें सर्व ज्ञान नाहीं असें ह्मणतात. कारण जर याला

यद्यल्पविच्चित्तवान्भवति तस्मा एवोत शुश्रूषन्ते चित्तꣳ ह्येवैषामेकायनं चित्तमात्मा चित्तं प्रतिष्ठा चित्तमुपास्स्वेति ॥२॥ स यश्चित्तं ब्रह्मेत्युपास्ते चित्तान्वै स लोकान् ध्रुवान् ध्रुवः प्रतिष्ठितान् प्रतिष्ठितोऽव्यथमानानव्यथमानोऽभिसिद्ध्यति यावच्चित्तस्य गतं तत्रास्य यथाकामचारो भवति यश्चित्तं ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगवश्चित्ताद्भूय इति चित्ताद्वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥३॥ इति पंचमः खंडः ॥५॥

ध्यानं वाव चित्ताद्भूयो ध्यायतीव पृथिवी ध्यायतीवान्तरिक्षं ध्यायतीव द्यौर्ध्यायन्तीवापो ध्यायन्तीव पर्वता ध्यायन्तीव देवमनुष्यास्तस्माद्य इह मनुष्याणां महत्तां प्राप्नुवन्ति ध्यानापादांशा इवैव ते भवन्त्यथ येऽल्पाः कलहिनःपिशुना उपवादिनस्तेऽथ ये प्रभवो ध्यानापादांशा

ज्ञान असतें तर हा चित्तरहित कसा असता? पण अल्पज्ञ असून चित्तयुक्त असेल तर त्याजपासून त्याचें ज्ञान श्रवण करण्याची लोक इच्छा करतात. ह्मणून या (मन आदि) सर्वांचा चित्तामध्यें अंतर्भाव आहे. चित्त हा आत्मा आहे, चित्त आधार आहे. चित्ताची उपासना कर.२. जो या चित्तरूपी ब्रह्माची उपासना करतो तो स्वतः ध्रुव, प्रतिष्ठायुक्त व व्यथारहित होत्साता ध्रुव, प्रतिष्ठायुक्त व व्यथारहित असे लोक पावतो. जेथपर्यंत चित्ताची गति आहे तेथपर्यंत त्याला संचार करतां येतो. नारद ह्मणाला, भगवन्, चित्ताहून अधिक कांहीं आहे काय? सनत्कुमार ह्मणाले, होय, चित्ताहून अधिक आहे. नारद ह्मणाला, भगवन्, तें आपण मला सांगा.३.

चित्ताहून अधिक ध्यान आहे. पृथिवी जणूं काय ध्यान करते. अंतरिक्ष जणूं काय ध्यान करतें. स्वर्ग जणूं काय ध्यान करतो. उदक जणूं काय ध्यान करतें. पर्वत जणूं काय ध्यान करतात. देव व मनुष्य जणूं काय ध्यान करतात. ह्मणून या लोकीं जे मनुष्यांमध्यें महत्त्व पावतात ते आपल्या ध्यानाच्या फलाचाच अंश उपभोगीत आहेत असें समजावें. ज्यांना ध्यान नसतें ते कलहप्रिय, परदोष परोक्ष आणि प्रत्यक्ष सांगणारे

इवैव ते भवन्ति ध्यानमुपास्स्वेति ॥१॥ स यो ध्यानं ब्रह्मेत्युपास्ते यावद्ध्यानस्य गतं तत्रास्य यथाकामचारो भवति यो ध्यानं ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगवो ध्यानाद्भूय इति ध्यानाद्वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥२॥ इति षष्ठः खंडः ॥६॥

विज्ञानं वाव ध्यानाद्भूयो विज्ञानेन वा ऋग्वेदं विजानाति यजुर्वेदꣳ सामवेदमाथर्वणं चतुर्थमितिहासपुराणं पंचमं वेदानां वेदं पित्र्यं राशिं दैवं निधिं वाकोवाक्यमेकायनं देवविद्यां ब्रह्मविद्यां भूतविद्यां क्षत्रविद्यां नक्षत्रविद्याꣳ सर्पदेवजनविद्यां दिवं च पृथिवीं च वायुं चाकाशं चापश्च तेजश्च देवांश्च मनुष्यांश्च पशूंश्च वयांसि च तृणवनस्पतीञ्छ्वापदान्याकीटपतंगपिपीलकं धर्मं चाधर्मं च सत्यं चानृतं च साधु चासाधु च हृदयज्ञं चाहृदयज्ञं चान्नं च रसं चेमं च लोकममुं च विज्ञानेनैव विजानाति विज्ञानमुपास्स्वेति ॥१॥ स यो

असे (क्षुद्र) होतात. जे ऐश्वर्ययुक्त असतात ते आपल्या ध्यानाच्या फलाचा अंश उपभोगतात. ह्मणून ध्यानाची उपासना कर. १. जो या ध्यानरूपी ब्रह्माची उपासना करतो त्याला जेथपर्यंत ध्यानाची गति आहे तेथपर्यंत संचार करतां येतो. नारद ह्मणाला, भगवन्, ध्यानाहून अधिक कांहीं आहे काय? सनत्कुमार ह्मणाले, होय, ध्यानाहून अधिक आहे. नारद ह्मणाला, भगवन्, ते आपण मला सांगा. २.

ध्यानाहून अधिक विज्ञान [=विशिष्ट ज्ञान] आहे. विज्ञानाचे योगानें मनुष्याला ऋग्वेदाचें ज्ञान होतें. यजुर्वेद, सामवेद, चवथा अथर्व, पांचवा इतिहासपुराण, व्याकरण, श्राद्धकल्प, गणित, दैव, निधि, तर्कशास्त्र, नीतिशास्त्र, निरुक्त, वेदविद्या, भूततंत्र, धनुर्वेद, ज्योतिष, सर्पविद्या, ललितविद्या, स्वर्ग, पृथिवी, वायु, आकाश, उदक, तेज, देव, मनुष्य, पशु, पक्षी, गवत, वनस्पति, किडे–पतंग–पिपीलिकादि सर्व श्वापदें, धर्म, अधर्म, सत्य, असत्य, साधु, असाधु, हृदयाला प्रिय, हृदयाला अप्रिय, अन्न, रस,

विज्ञानं ब्रह्मेत्युपास्ते विज्ञानवतो वै स लोकाञ्ज्ञानवतोऽभिसिद्ध्यति यावद्विज्ञानस्य गतं तत्रास्य यथाकामचारो भवति यो विज्ञानं ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगवो विज्ञानाद्भूय इति विज्ञानाद्वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥२॥ इति सप्तमः खंडः ॥७॥

बलं वाव विज्ञानाद्भूयोऽपि ह शतं विज्ञानवतामेको बलवानाकंपयते स यदा बली भवत्यथोत्थाता भवत्युत्तिष्ठन्परिचरिता भवति परिचरन्नुपसत्ता भवत्युपसीदन्द्रष्टा भवति श्रोता भवति मन्ता भवति बोद्धा भवति कर्ता भवति विज्ञाता भवति बलेन वै पृथिवी तिष्ठति बलेनांतरिक्षं बलेन द्यौर्बलेन पर्वता बलेन देवमनुष्या बलेन पशवश्च वयांसि च तृणवनस्पतयः श्वापदान्याकीटपतंगपिपीलिकं बलेन लोकस्तिष्ठति बलमुपास्स्वेति ॥१॥ स यो बलं ब्रह्मेत्युपास्ते यावद्बलस्य गतं तत्रास्य

इहलोक, परलोक या सर्वांचें ज्ञान विज्ञानाचेच योगानें होतें. म्हणून विज्ञानाची उपासना कर.१. जो या विज्ञानरूपी ब्रह्माची उपासना करतो त्याला विज्ञानयुक्त व ज्ञानयुक्त लोक प्राप्त होतात. जेथपर्यंत विज्ञानाची गति आहे तेथपर्यंत त्याला संचार करतां येतो. नारद म्हणाला, भगवन्, विज्ञानाहून अधिक कांहीं आहे काय? सनत्कुमार म्हणाले, होय, विज्ञानाहून अधिक आहे. नारद म्हणाला, भगवन्, तें आपण मला सांगा.२.

विज्ञानाहून अधिक बल आहे. शंभर विज्ञानयुक्त मनुष्यांना देखील एक बलवान् मनुष्य कंप पावण्यास लावतो. मनुष्य जेव्हां बलवान् असतो तेव्हां तो उठून उभा रहातो, उभा राहून (गुरूच्या समीप जाऊन गुरूची) सेवा करतो. सेवा केल्यावर गुरूला प्रिय होतो. प्रिय झाला म्हणजे तो द्रष्टा होतो, श्रोता होतो, मननशील होतो, ज्ञानी होतो, कर्ता होतो, विज्ञानयुक्त होतो. बलाचे योगानें पृथिवी स्थित आहे; अंतरिक्ष, स्वर्ग, पर्वत, देव, मनुष्य, पशु, पक्षी, गवत, वनस्पति, किडे—पतंग—पिपीलिकादि सर्व श्वापदें हीं सर्व स्थित आहेत. बलानें लोक स्थित आहे. म्हणून बलाची

यथाकामचारो भवति यो बलं ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगवो बलाद्भूय इति बलाद्वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥२॥ इत्यष्टमः खंडः

अन्नं वाव बलाद्भूयस्तस्माद्यद्यपि दश रात्रीर्नाश्नीयाद्यद्यु ह जीवेदथवाऽद्रष्टाऽश्रोताऽमन्ताऽबोद्धाऽकर्ताऽविज्ञाता भवत्यथाऽन्नस्यायै द्रष्टा भवति श्रोता भवति मन्ता भवति बोद्धा भवति कर्ता भवति विज्ञाता भवत्यन्नमुपास्स्वेति ॥१॥ स योऽन्नं ब्रह्मेत्युपास्तेऽन्नवतो वै स लोकान्पानवतोऽभिसिद्ध्यति यावदन्नस्य गतं तत्रास्य यथाकामचारो भवति योऽन्नं ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगवोऽन्नाद्भूय इत्यन्नाद्वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥२॥ इति नवमः खंडः ॥९॥

आपो वावान्नाद्भूयस्तस्माद्यदा सुवृष्टिर्न भवति व्याधीयन्ते

उपासना कर.१. जो या बलरूपी ब्रह्माची उपासना करतो त्याला जेथपर्यंत बलाची गति आहे तेथपर्यंत संचार करतां येतो. नारद ह्मणाला, भगवन्, बलाहून अधिक कांहीं आहे काय ? सनत्कुमार ह्मणाले, होय, बलाहून अधिक आहे. नारद ह्मणाला, भगवन्, तें आपण मला सांगा.२.

बलाहून अधिक अन्न आहे. सतत दहा दिवसपर्यंत अन्न खाल्लें नाहीं तर मनुष्य जर कदाचित् जिवंत राहिला तर तो अद्रष्टा, अश्रोता, मननरहित, ज्ञानरहित, कर्तृत्वरहित, विज्ञानरहित होतो. ज्याला अन्नाची प्राप्ति होते तोच द्रष्टा होतो, श्रोता होतो, मननशील होतो, ज्ञानी होतो, कर्ता होतो, विज्ञानयुक्त होतो. ह्मणून अन्नाची उपासना कर.१. जो या अन्नरूपी ब्रह्माची उपासना करतो त्याला अन्नानें व उदकानें युक्त अशा लोकांची प्राप्ति होते. जेथपर्यंत अन्नाची गति आहे तेथपर्यंत त्याला संचार करतां येतो. नारद ह्मणाला, भगवन्, अन्नाहून अधिक कांहीं आहे काय ? सनत्कुमार ह्मणाले, होय, अन्नाहून अधिक आहे. नारद ह्मणाला, भगवन्, तें आपण मला सांगा.२.

अन्नाहून अधिक उदक आहे. कारण जर वृष्टि झाली नाहीं तर

प्राणा अन्नं कनीयो भविष्यतीत्यथ यदा सुवृष्टिर्भवत्यानंदिनः प्राणा भवन्त्यन्नं बहु भविष्यतीत्याप एवेमा मूर्ता येयं पृथिवी यदंतरिक्षं यद् द्यौर्यत्पर्वता यद्देवमनुष्या यत्पशवश्च वयांसि च तृणवनस्पतयः श्वापद्यान्याकीटपतंगपिपीलकमाप एवेमा मूर्ता अप उपास्स्वेति ॥१॥ स योऽपो ब्रह्मेत्युपास्त आप्नोति सर्वान्कामांस्तृप्तिमान्भवति यावदपां गतं तत्रास्य यथाकामचारो भवति योऽपो ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगवोऽद्भ्यो भूय इत्यद्भ्यो वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥२॥ इति दशमः खंडः ॥१०॥

तेजो वावाद्भ्यो भूयस्तद्वा एतद्वायुमागृह्याकाशमभितपति तदाहुर्निशोचति नितपति वर्षिष्यति वा इति तेज एव तत्पूर्वं दर्शयित्वाऽथापः सृजते तदेतदूर्ध्वाभिश्च तिरश्चीभिश्च विद्युद्भिराह्रादाश्चरन्ति तस्मादाहुर्विद्योतते स्तनयति वर्षिष्यति वा इति तेज एव तत्पूर्वं

(यंदा) अन्न कमी होईल ह्मणून प्राणी दुःखित होतात. जेव्हां सुवृष्टि होते तेव्हां अन्न पुष्कळ होईल ह्मणून प्राणी आनंदयुक्त होतात. ही पृथिवी, अंतरिक्ष, स्वर्ग, पर्वत, देव, मनुष्य, पशु, पक्षी, गवत, वनस्पति, किडे–पतंग–पिपीलिकादि सर्व श्वापदें हीं सर्व मूर्तिमंत उदक होत. ह्मणून उदकाची उपासना कर.१. जो या उदकरूपी ब्रह्माची उपासना करतो त्याला सर्व मनोरथ प्राप्त होतात. त्याची तृप्ति होते. जेथपर्यंत उदकाची गति आहे तेथपर्यंत त्याला संचार करतां येतो. नारद ह्मणाला, भगवन्, उदकाहून अधिक कांहीं आहे काय? सनत्कुमार ह्मणाले, होय, उदकाहून अधिक आहे. नारद ह्मणाला, भगवन्, तें आपण मला सांगा.२.

उदकाहून अधिक तेज आहे. ते तेज वायूला घेऊन आकाश व्यापतें व तृप्त करतें. तेव्हां "उष्मा होत आहे, घाम येत आहे, आतां वृष्टि होईल" असें लोक ह्मणतात. अगोदर तेज (वृष्टीची) सूचना करतें व नंतर उदक वर्षाव करतें. ऊर्ध्वमुख, वांकड्या व आवाज करणाऱ्या

दर्शयित्वाऽथापः सृजते तेज उपास्स्वेति ॥१॥ स यस्तेजो ब्रह्मेत्युपास्ते तेजस्वी वै स तेजस्वतो लोकान्भास्वतोऽपहततमस्कानभिसिद्ध्यति यावत्तेजसो गतं तत्रास्य यथाकामचारो भवति यस्तेजो ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगवस्तेजसो भूय इति तेजसो वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥२॥ इत्येकादशः खंडः ॥११॥

आकाशो वाव तेजसो भूयानाकाशे वै सूर्याचंद्रमसावुभौ विद्युन्नक्षत्राण्यग्निराकाशेनाह्वयत्याकाशेन शृणोत्याकाशेन प्रतिशृणोत्याकाशे रमत आकाशे न रमत आकाशे जायत आकाशमभिजायत आकाशमुपास्स्वेति ॥१॥ स य आकाशं ब्रह्मेत्युपास्त आकाशवतो वै स लोकान्प्रकाशवतोऽसंबाधानुरुगायवतोऽभिसिध्यति यावदाकाश-

अशा विजांनीं उदक आकाशांत संचार करतें. ह्मणून, वीज चमकत आहे, गडगडत आहे, वर्षाव होत आहे असें ह्मणतात. याप्रमाणें तेजानेंच वृष्टीची सूचना दर्शविल्यावर उदक वृष्टि करतें. ह्मणून तेजाची उपासना कर.१. जो या तेजोरूपी ब्रह्माची उपासना करतो तो तेजस्वी होतो. त्याला तेजस्वी प्रभासंपन्न, अंधकाररहित असे लोक प्राप्त होतात. जेथपर्यंत तेजाची गति असते तेथपर्यंत त्याला संचार करतां येतो. नारद ह्मणाला, भगवन्, तेजाहून अधिक कांहीं आहे काय ? सनत्कुमार ह्मणाले, होय, तेजाहून अधिक आहे. नारद ह्मणाला, भगवन्, तें आपण मला सांगा.२.

तेजाहून अधिक आकाश आहे. सूर्य, चंद्र, वीज, नक्षत्रें, अग्नि हीं सर्व आकाशामध्येंच आहेत. आकाशामुळें मनुष्य हांक मारतो, आकाशामुळें ऐकतो, आकाशामुळें (दुसरा त्याला) उत्तर देतो, आकाशामध्यें मनुष्य रममाण होतो, आकाशामध्यें दुःखी होतो. आकाशामध्यें व आकाशामुळें सर्व उत्पन्न होतें. ह्मणून आकाशाची उपासना कर.१. जो या आकाशरूपी ब्रह्माची उपासना करतो त्याला विस्तृत, प्रकाशयुक्त, पीडारहित व विस्तीर्णगति असे लोक प्राप्त होतात. जेथपर्यंत आकाशाची गति

स्य गतं तत्रास्य यथाकामचारो भवति य आकाशं ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगव आकाशाद्भूय इत्याकाशाद्वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवी- त्विति ॥२॥ इति द्वादशः खंडः ॥१२॥

स्मरो वावाकाशाद्भूयस्तस्माद्यद्यपि बह्व आसीरन्न स्मरन्तो नैव ते कंचन शृणुयुर्न मन्वीरन्न विजानीरन्यदा वाव ते स्मरेयुरथ शृणु- युरथ मन्वीरन्नथ विजानीरन्स्मरेण वै पुत्रान्विजानाति स्मरेण पशून् स्मरमुपास्स्वेति ॥१॥ स यः स्मरं ब्रह्मेत्युपास्ते यावत्स्मरस्य गतं तत्रास्य यथाकामचारो भवति यः स्मरं ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगवः स्मरा- द्भूय इति स्मराद्वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥२॥ इति त्रयोदशः खंडः ॥१३॥

आशा वाव स्मराद्भूयस्याशेद्धो वै स्मरो मंत्रानधीते कर्माणि

असते तेथपर्यंत त्याला संचार करतां येतो. नारद ह्मणाला, भगवन्, आकाशाहून अधिक कांहीं आहे काय ? सनत्कुमार ह्मणाले, होय, आकाशाहून अधिक आहे. नारद ह्मणाला, भगवन्, तें आपण मला सांगा.२.

आकाशाहून अधिक स्मरण आहे. पुष्कळ मनुष्य जरी (एकत्र) बसले असले पण त्यांना स्मरण नसेल तर त्यांपैकीं कोणाचें कोणाला ऐकूं येणार नाहीं, कोणी मनन करणार नाहीं, कोणी विचार करणार नाहीं. जेव्हां त्यांना स्मरण करतां येईल तेव्हांच त्यांना ऐकूं येईल, मनन करतां येईल, विचार करतां येईल. स्मरणानेंच मनुष्य आपल्या पुत्रांना ओळ- खतो, पशूंना ओळखतो. ह्मणून स्मरणाची उपासना कर.१. जो या स्मरणरूपी ब्रह्माची उपासना करतो, त्याला जेथपर्यंत स्मरणाची गति असते तेथपर्यंत संचार करतां येतो. नारद ह्मणाला, भगवन्, स्मरणाहून अधिक कांहीं आहे काय ? सनत्कुमार ह्मणाले, होय, स्मरणाहून अधिक आहे. नारद ह्मणाला, भगवन्, तें आपण मला सांगा.२.

स्मरणाहून अधिक आशा आहे. आशेनें प्रेरित होऊन मनुष्य

कुरुते पुत्रांश्च पशूंश्चेच्छत इमं च लोकममुं चेच्छत आशामुपास्स्वेति ॥१॥ स य आशां ब्रह्मेत्युपास्त आशयास्य सर्वे कामाः समृद्ध्यन्त्यमोघा ह्यस्याशिषो भवन्ति यावदाशाया गतं तत्रास्य यथाकामचारो भवति य आशां ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगव आशाया भूय इत्याशाया वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥२॥ इति चतुर्दशः खंडः

प्राणो वा आशाया भूयान्यथा वा अरा नाभौ समर्पिता एवमस्मिन् प्राणे सर्वꣳ समर्पितं प्राणः प्राणेन याति प्राणः प्राणं ददाति प्राणाय ददाति प्राणो ह पिता प्राणो माता प्राणो भ्राता प्राणः स्वसा प्राण आचार्यः प्राणो ब्राह्मणः ॥१॥ स यदि पितरं वा मातरं वा भ्रातरं वा स्वसारं वाचार्यं वा ब्राह्मणं वा किंचिद् भृशमिव प्रत्याह धिक्त्वाऽस्त्वित्येवैनमाहुः पितृहा वै त्वमसि मातृहा वै त्वमसि भ्रातृहा

मंत्रांचें अध्ययन करतो, कर्म करतो, पुत्र-पशु इत्यादिकांची इच्छा करतो, इहलोकाची आणि परलोकाची इच्छा करतो. ह्मणून आशेची उपासना कर.१. जो या आशारूपी ब्रह्माची उपासना करतो त्याचे सर्व मनोरथ आशेनें पूर्ण होतात. त्याच्या प्रार्थना फलदायी होतात. जेथपर्यंत आशेची गति आहे तेथपर्यंत त्याला संचार करतां येतो. नारद ह्मणाला, भगवन्, आशेहून अधिक कांहीं आहे काय ? सनत्कुमार ह्मणाले, होय, आशेहून अधिक आहे. नारद ह्मणाला, भगवन्, तें आपण मला सांगा.२.

आशेहून अधिक प्राण आहे. ज्याप्रमाणें चक्राचे मध्यभागीं अरा येऊन मिळालेल्या असतात त्याप्रमाणें हें सर्व कांहीं प्राणामध्यें येऊन मिळालें आहे. प्राण प्राणाचेच योगानें [=दुसऱ्यावर अवलंबून न रहातां] गमन करतो, प्राण प्राणच देतो, प्राणालाच देतो, प्राणच पिता, माता, भ्राता, भगिनी, आचार्य, ब्राह्मण हीं सर्व कांहीं आहे.१. जर कोणी पिता, माता, बंधु, भगिनी, आचार्य अथवा ब्राह्मण यांपैकीं कोणाला अयोग्य भाषण बोलला तर त्याला लोक "तुला धिक्कार असो" असें ह्मणतात.

वै त्वमसि स्वसृहा वै त्वमस्याचार्यहा वै त्वमसि ब्राह्मणहा वै त्वमसीति ॥२॥ अथ यद्यप्येनानुत्क्रान्तप्राणान् शूलेन समासं व्यतिषंदहेन्नैवैनं ब्रूयुः पितृहासीति न मातृहासीति न भ्रातृहासीति न स्वसृहासीति नाचार्यहासीति न ब्राह्मणहासीति ॥३॥ प्राणो ह्येवैतानि सर्वाणि भवति स वा एष एवं पश्यन्नेवं मन्वान एवं विजानन्नतिवादी भवति तं चेद्ब्रूयुरतिवाद्यसीत्यतिवाद्यस्मीति ब्रूयान्नापह्नुवीत ॥४॥ इति पंचदशः खंडः ॥१५॥

एष तु वा अतिवदति यः सत्येनातिवदति सोऽहं भगवः सत्येनातिवदानीति सत्यं त्वेव विजिज्ञासितव्यमिति सत्यं भगवो विजिज्ञास इति ॥१॥ इति षोडशः खंड. ॥१६॥

"तूं पितृघ्न, मातृघ्न, भ्रातृघ्न, स्वसृघ्न, आचार्यघ्न आणि ब्राह्मणघ्न आहेस" असें ह्मणतात.२. (पण) पिता इत्यादि मरण पावले ह्मणजे त्यांना एकत्र अथवा भागशः काष्ठांनी दहन करणाराला "तू पितृघ्न, मातृघ्न, भ्रातृघ्न, स्वसृघ्न, आचार्यघ्न अथवा ब्राह्मणघ्न आहेस" असें ह्मणूं नये.३. प्राणच हे (पित्रादि) सर्व होतो. याप्रकारें सर्व पाहून, मनन करून आणि उपपत्तिसहित जाणल्यानें मनुष्य अतिवादी [नामापासून आशेपर्यंत सर्वांच्या अति ह्मणजे पलीकडील प्राणासंबंधानें बोलणारा अथवा जाणणारा] होतो. त्याला जर कोणी "तूं अतिवादी आहेस काय?" असें ह्मणाला तर त्यानें 'होय, मी अतिवादी आहे' असेंच ह्मणावें. (कांहीं) लपवूं नये.४.

सनत्कुमार ह्मणाले, (प्राणविद् अतिवादी होय असें सांगितलें खरें, परंतु खरोखर) जो सत्य [परमार्थतत्त्व] जाणून अतिवादी [नामापासून प्राणापर्यंत सर्वांहून श्रेष्ठ जें परमार्थतत्त्व तें जाणून त्यासंबंधानें बोलणारा] होतो तो अतिवादी होय. नारद ह्मणाला, भगवन्, मी सत्यानें अतिवाद करीन असें मला ज्ञान द्या. सनत्कुमार ह्मणाले, तर तूं सत्य जाणलें पाहिजेस. नारद ह्मणाला, भगवन्, आपणांपासून सत्याचें ज्ञान करून घेण्याची माझी इच्छा आहे.१.

यदा वै विजानात्यथ सत्यं वदति नाविजानन् सत्यं वदति विजानन्नेव सत्यं वदति विज्ञानं त्वेव विजिज्ञासितव्यमिति विज्ञानं भगवो विजिज्ञास इति ॥१॥ इति सप्तदशः खंडः ॥१७॥

यदा वै मनुतेऽथ विजानाति नामत्वा विजानाति मत्वैव विजानाति मतिस्त्वेव विजिज्ञासितव्येति मतिं भगवो विजिज्ञास इति ॥१॥ इत्यष्टादशः खंडः ॥१८॥

यदा वै श्रद्धात्यथ मनुते नाश्रद्दधन्मनुते श्रद्दधदेव मनुते श्रद्धा त्वेव विजिज्ञासितव्येति श्रद्धां भगवो विजिज्ञास इति ॥१॥ इत्येकोनविंशः खंडः ॥१९॥

यदा वै निस्तिष्ठत्यथ श्रद्दधाति नानिस्तिष्ठञ्श्रद्दधाति निस्तिष्ठन्नेव श्रद्दधाति निष्ठा त्वेव विजिज्ञासितव्येति निष्ठां भगवो विजिज्ञास इति ॥१॥ इति विंशः खंडः ॥२०॥

सनत्कुमार ह्मणाले, (हें सत्य आहे असें) जेव्हां ज्ञान होतें तेव्हां मनुष्य सत्यच बोलतो. ज्याला ज्ञान झालेलें नाहीं तो सत्य बोलत नाहीं, ज्याला ज्ञान झालेलें असेल तोच सत्य बोलतो. ह्मणून ज्ञान जाणलें पाहिजे. नारद ह्मणाला, भगवन्, आपणांपासून ज्ञान जाणण्याची माझी इच्छा आहे. १.

जेव्हां मनन करतो तेव्हां मनुष्याला ज्ञान होतें. मनन केलें नसेल तर ज्ञान होत नाहीं. मनन केलें तरच ज्ञान होतें. ह्मणून मननाचें ज्ञान करून घेतलें पाहिजे. नारद ह्मणाला, भगवन्, आपणांपासून मननाचें ज्ञान करून घेण्याची माझी इच्छा आहे. १.

जेव्हां श्रद्धा ठेवतो तेव्हांच मनुष्य मनन करतो. श्रद्धा नसेल तर मनन होत नाहीं. श्रद्धा असेल तरच मनन होतें. ह्मणून श्रद्धेचें ज्ञान करून घेतले पाहिजे. नारद ह्मणाला, भगवन्, आपणांपासून श्रद्धेचें ज्ञान करून घेण्याची माझी इच्छा आहे. १.

जेव्हां (ब्रह्मज्ञानाचे ठिकाणीं) निष्ठा असेल तेव्हां मनुष्य श्रद्धा

यदा वै करोत्यथ निस्तिष्ठति नाकृत्वा निस्तिष्ठति कृत्वैव निस्तिष्ठति कृतिस्त्वेव विजिज्ञासितव्येति कृतिं भगवो विजिज्ञास इति ॥१॥ इत्येकविंशः खंडः ॥२१॥

यदा वै सुखं लभतेऽथ करोति नासुखं लब्ध्वा करोति सुखमेव लब्ध्वा करोति सुखं त्वेव विजिज्ञासितव्यमिति सुखं भगवो विजिज्ञास इति ॥१॥ इति द्वाविंशः खंडः ॥२२॥

यो वै भूमा तत्सुखं नाल्पे सुखमस्ति भूमैव सुखं भूमा त्वेव विजिज्ञासितव्य इति भूमानं भगवो विजिज्ञास इति ॥१॥ इति त्रयोविंशः खंडः ॥२३॥

यत्र नान्यत्पश्यति नान्यच्छृणोति नान्यद्विजानाति स भूमा-

ठेवतो. निष्ठा नसेल तर श्रद्धा असत नाहीं. निष्ठा असेल तरच श्रद्धा येते. ह्मणून निष्ठेचें ज्ञान करून घेतलें पाहिजे. नारद ह्मणाला, भगवन्, आपणांपासून निष्ठेचें ज्ञान करून घेण्याची माझी इच्छा आहे.१.

जेव्हां (इंद्रियसंयमादि) कृति करतो तेव्हां मनुष्याला निष्ठा येते. कृति नसेल तर निष्ठा असत नाहीं. कृति असेल तरच निष्ठा येते. ह्मणून कृतीचें ज्ञान करून घेतलें पाहिजे. नारद ह्मणाला, भगवन्, आपणांपासून कृतीचें ज्ञान करून घेण्याची माझी इच्छा आहे.१.

जेव्हां निरतिशय सुख प्राप्त होण्याची आशा असते तेव्हां मनुष्य (इंद्रियसंयमादि) कृति करतो. सुख नसेल तर कृति करीत नाहीं. सुख असेल तरच करतो. ह्मणून सुखाचें ज्ञान करून घेतलें पाहिजे. नारद ह्मणाला, भगवन्, आपणांपासून सुखाचें ज्ञान करून घेण्याची माझी इच्छा आहे.१.

जें अत्यंत असतें तेंच (खरें) सुख. अल्पामध्यें सुख नाहीं. निरतिशयत्व [भूमन्] हेंच सुख. ह्मणून निरतिशयत्वाचें ज्ञान करून घेतलें पाहिजे. नारद ह्मणाला, भगवन्, आपणांपासून निरतिशयत्वाचें ज्ञान करून घेण्याची माझी इच्छा आहे.१.

ऽथ यत्रान्यत्पश्यत्यन्यच्छृणोत्यन्यद्विजानाति तदल्पं यो वै भूमा तदमृतमथ यदल्पं तन्मर्त्यꣳ स भगवः कस्मिन्प्रतिष्ठित इति स्वे महिम्नि यदि वा न महिम्नीति ॥१॥ गोअश्वमिह महिमेत्याचक्षते हस्तिहिरण्यं दासभार्यं क्षेत्राण्यायतनानीति नाहमेवं ब्रवीमि ब्रवीमीति होवाचान्यो ह्यन्यस्मिन्प्रतिष्ठित इति ॥२॥ इति चतुर्विंशः खंडः ॥

स एवाधस्तात्स उपरिष्टात्स पश्चात्स पुरस्तात्स दक्षिणतः स उत्तरतः स एवेदꣳ सर्वमित्यथातोऽहंकारादेश एवाहमेवाधस्तादहमुपरिष्टादहं पश्चादहं पुरस्तादहं दक्षिणतोऽहमुत्तरतोऽहमेवेदꣳ सर्वमिति ॥१॥ अथात आत्मादेश एवात्मैवाधस्तादात्मोपरिष्टादात्मा पश्चादात्मा पुरस्तादात्मा दक्षिणत आत्मोत्तरत आत्मैवेदꣳ सर्वमिति स वा

जेव्हां दुसरें कांहीं दिसत नाहीं, दुसरें कांहीं ऐकूं येत नाहीं, दुसरें कांहीं जाणतां येत नाहीं, तेव्हां त्याचें नांव निरतिशयत्व [भूमन्]. जेव्हां दुसरें पहातां येतें, ऐकतां येतें, जाणतां येतें, तेव्हां त्याचें नांव अल्प. जें भूमन् तें मृत्युरहित, जें अल्प तें मर्त्य. नारद ह्मणाला, भगवन्, तो भूमन् कशामध्यें स्थित आहे ? तो स्वतःच्याच विभूतीमध्यें [माहात्म्यामध्यें] स्थित आहे; आणि तो विभूतीमध्यें स्थित नाहींहि.१. गाई, अश्व, हत्ती, सुवर्ण, दास, भार्या, शेतवाडी, घरें इत्यादिकांना महिमा समजतात. हा महिमा ज्याच्याजवळ असतो तो मनुष्य ज्याप्रमाणें (त्या महिम्याहून अन्य असून) अन्याचे ठिकाणीं स्थित असतो तसा हा भूमन् नाहीं असें मी सांगतों.२.

तो खालीं आहे, वर आहे, पाठीमागें, पुढें, उजवीकडे, डावीकडे तोच आहे. तोच हें सर्व आहे. (तो भूमन् जीवाहून इतर कोणी नाहीं असें दर्शविण्यासाठीं) अहंकारादेश सांगतात— मीच खालीं आहें, मीच वर आहें, पाठीमागें, पुढें, उजवीकडे, डावीकडे मीच आहें. हें सर्व मीच आहें.१. आतां आत्मादेश सांगतात — आत्माच खालीं आहे, वर आहे, पाठीमागें, पुढें, उजवीकडे, डावीकडे आत्माच आहे. हें सर्व

एष एवं पश्यन्नेवं मन्वान एवं विजानन्नात्मरतिरात्मक्रीड आत्ममिथुन आत्मानंदः स स्वराड् भवति तस्य सर्वेषु लोकेषु कामचारो भवति। अथ येऽन्यथाऽतो विदुरन्यराजानस्ते क्षय्यलोका भवन्ति तेषाꣳसर्वेषु लोकेष्वकामचारो भवति ॥२॥ इति पंचविंशः खंडः ॥२५॥

तस्य ह वा एतस्यैवं पश्यत एवं मन्वानस्यैवं विजानत आत्मतः प्राण आत्मत आशात्मतः स्मर आत्मत आकाश आत्मतस्तेज आत्मत आप आत्मत आविर्भावतिरोभावावात्मतोऽन्नमात्मतो बलमात्मतो विज्ञानमात्मतो ध्यानमात्मतश्चित्तमात्मतः संकल्प आत्मतो मन आत्मतो वागात्मतो नामात्मतो मंत्रा आत्मतः कर्माण्यात्मत एवेदꣳ सर्वमिति ॥१॥ तदेष श्लोको न पश्यो मृत्युं पश्यति न रोगं नोत दुःखताꣳसर्वꣳ ह पश्यः पश्यति सर्वमाप्नोति सर्वश इति स एकधा भवति त्रिधा भवति

आत्माच आहे. याप्रमाणें सर्वत्र हा आत्माच (आहे असें) पहाणारा, मनन करणारा व जाणणारा मनुष्य आत्म्याचे [=स्वतःचे] ठिकाणीं रममाण होतो, आत्म्याचे बरोबर क्रीडा करतो, (अद्वैत) आत्म्याबरोबरच (द्वंद्वजनित) सुख भोगतो, आत्म्याबरोबर आनंद पावतो. तोच स्वतंत्र होतो. तो सर्व लोकांमध्यें संचार करण्यास समर्थ होतो. जे याहून इतर (ह्मणजे द्वैतभाव) मानतात ते परतंत्र होतात, क्षय पावणाऱ्या लोकांप्रत जातात, ते सर्व लोकांमध्यें संचार करण्यास असमर्थ असतात. २.

याप्रमाणें (सर्व आत्मरूप आहे असें) पहाणाऱ्या, मनन करणाऱ्या व जाणणाऱ्या मनुष्याचीं आत्म्यापासूनच प्राण, आत्म्यापासूनच आशा, स्मरण, आकाश, तेज, उदक, आविर्भवन, तिरोभवन, अन्न, बल, विज्ञान, ध्यान, चित्त, संकल्प, मन, वाणी, नाम, मंत्र, कर्मे आणि सर्व कांहीं होतात. १. याविषयीं पुढील मंत्र आहे– हें जाणणाऱ्या मनुष्याला मरण येत नाहीं, रोग नाहीं, दुःख नाहीं, तो सर्व कांहीं पहातो, त्याला सर्व कांहीं सर्व प्रकारें प्राप्त होतें. तो (सृष्टिपूर्वकालीं) एक असतो ते

पंचधा सप्तधा नवधा चैव पुनश्चैकादश स्मृतः शतं च दश चैकश्च सहस्राणि च विंशतिराहारशुद्धौ सत्त्वशुद्धिः सत्त्वशुद्धौ ध्रुवा स्मृतिः स्मृतिलंभे सर्वग्रंथीनां विप्रमोक्षस्तस्मै मृदितकषायाय तमसस्पारं दर्शयति भगवान् सनत्कुमारस्तꣲ स्कन्द इत्याचक्षते तꣲ स्कन्द इत्याचक्षते ॥२॥ इति षड्विंशः खंडः ॥२६॥ इति सप्तमोऽध्यायः ॥७॥

अथ अष्टमोऽध्यायः ॥

अथ यदिदमस्मिन्ब्रह्मपुरे दहरं पुंडरीकं वेश्म दहरोऽस्मिन्नन्तराकाशस्तस्मिन्यदन्तस्तदन्वेष्टव्यं तद्वाव विजिज्ञासितव्यमिति ॥१॥ तं चेद्ब्रूयुर्यदिदमस्मिन्ब्रह्मपुरे दहरं पुंडरीकं वेश्म दहरोऽस्मिन्नन्तराकाशः किं तदत्र विद्यते यदन्वेष्टव्यं यद्वाव विजिज्ञासितव्यमिति स

तीन प्रकारांनीं होतो; पांच, सात, नऊ, अकरा, एकशें अकरा, वीस हजार इत्यादि प्रकारांनीं तोच (सृष्टिकालीं) होतो (आणि पुन्हां प्रलयकालीं एकच होतो). शुद्ध आहार असला ह्मणजे अंतःकरण [सत्त्व] शुद्ध होतें, अंतःकरण शुद्ध असलें ह्मणजे निश्चित स्मृति होते. स्मृति असली ह्मणजे (अविद्यादि) सर्व ग्रंथीचा नाश होतो. ज्याचा (रागद्वेषादि) कषाय (ज्ञानवैराग्यरूपी क्षारानें) नष्ट झाला होता अशा त्या नारदाला भगवान् सनत्कुमारानीं तमाचें (अथवा अविद्येचें) पैलतीर दाखविलें. त्या सनत्कुमारांना स्कंद असें ह्मणतात.२.

## अध्याय आठवा.

या ब्रह्मपुरामध्ये [शरीरामध्यें] अत्यंत लहान कमलाकार घर [=हृदय] आहे. त्यामध्यें त्याहून अत्यंत लहान असें आकाश आहे. त्या आकाशामध्यें जें (ब्रह्म) आहे तें शोधलें पाहिजे. तें जाणण्याची इच्छा केली पाहिजे.१. (असें सांगणाऱ्या) आचार्याला जर शिष्य ह्मणाले कीं, "या शरीरामधील कमलाकार सूक्ष्म स्थानामध्यें सूक्ष्मतर आकाश आहे; तर तेथें शोध करण्यासारखें व जिज्ञासेला योग्य असें काय अस-

ब्रूयात् ॥२॥ यावान्वा अयमाकाशस्तावानेषोऽतर्हृदय आकाश उभे अस्मिन् द्यावापृथिवी अंतरेव समाहिते उभावग्निश्च वायुश्च सूर्याचंद्रमसावुभौ विद्युन्नक्षत्राणि यच्चास्येहास्ति यच्च नास्ति सर्वं तदस्मिन्समाहितमिति ॥३॥ तं चेद्ब्रूयुरस्मिंश्चेदिदं ब्रह्मपुरे सर्वꣳ समाहितꣳ सर्वाणि च भूतानि सर्वे च कामा यदैनज्जरावाप्नोति प्रध्वंसते वा किं ततोऽतिशिष्यत इति ॥४॥ स ब्रूयान्नास्य जरयैतज्जीर्यति न वधेनास्य हन्यत एतत्सत्यं ब्रह्मपुरमस्मिन्कामाः समाहिता एष आत्मापहतपाप्मा विजरो विमृत्युर्विशोको विजिघत्सोऽपिपासः सत्यकामः सत्यसंकल्पो यथा ह्येवेह प्रजा अन्वाविशन्ति यथानुशासनं यं यमन्तमभिकामा भवन्ति यं जनपदं यं क्षेत्रभागं तं तमेवोपजीवन्ति॥५॥

णार ?'' तर त्यांना आचार्यानें सांगावें कीं, हे (स्थूल) आकाश जेवढें (विस्तृत) आहे तेवढें आकाश या हृदयाचे आंत आहे. स्वर्ग व पृथिवी हीं दोन्ही या सूक्ष्म ब्रह्माकाशामध्यें स्थित आहेत. अग्नि, वायु, सूर्य, चंद्र, विद्युत्, नक्षत्रें, या देहाचें जें कांहीं (आत्मरूपानें) आहे व जें (आत्मरूपानें) नाहीं तें सर्व या हृदयाकाशामध्यें स्थित आहे.२.३. आचार्याला जर शिष्य ह्मणाले कीं, या ब्रह्मपुरामध्यें जर हें सर्व स्थित आहे, सर्व भूतमात्र व सर्व काम स्थित आहेत, तर मग जेव्हां याला जरा प्राप्त होते अथवा हें नाश पावतें तेव्हां याचें कांहीं तरी शिल्लक रहातें काय ?''४. यावर आचार्यानें सांगावें कीं, या शरीराच्या जरेनें याला [अंतराकाशरूपी ब्रह्माला] जरा येत नाहीं, शरीराच्या वधानें याला मरण येत नाहीं. हें (अंतराकाश) खरें ब्रह्मपुर आहे (शरीर हें खरें ब्रह्मपुर नव्हे). याच्यामध्यें सर्व काम (स्वतःसिद्ध) स्थित आहेत. हाच आत्मा होय. हा पापरहित, जरारहित, मृत्युरहित, शोकरहित, बुभुक्षारहित, पिपासारहित, सत्यकाम व सत्यसंकल्प आहे. (असा हा आत्मा जाणला पाहिजे. नाहींतर) ज्याप्रमाणें या लोकीं लोक आपल्यापैकीं कोणाला तरी राजा करून त्याच्या आज्ञेप्रमाणें

तद्यथेह कर्मजितो लोकः क्षीयत एवमेवामुत्र पुण्यजितो लोकः क्षीयते तद्य इहात्मानमननुविद्य व्रजन्त्येतांश्च सत्यान् कामांस्तेषाꣳ सर्वेषु लोकेष्वकामचारो भवत्यथ य इहात्मानमनुविद्य व्रजन्त्येतांश्च सत्यान् कामांस्तेषाꣳ सर्वेषु लोकेषु कामचारो भवति ॥६॥ इति प्रथमः खंडः ॥१॥

स यदि पितृलोककामो भवति संकल्पादेवास्य पितरः समुत्तिष्ठन्ति तेन पितृलोकेन संपन्नो महीयते ॥१॥ अथ यदि मातृलोककामो भवति संकल्पादेवास्य मातरः समुत्तिष्ठन्ति तेन मातृलोकेन संपन्नो महीयते ॥२॥ अथ यदि भ्रातृलोककामो भवति संकल्पादेवास्य भ्रातरः समुत्तिष्ठन्ति तेन भ्रातृलोकेन संपन्नो महीयते

वर्तन करतात आणि ज्या गांवाची अथवा शेताची इच्छा करतात तेवढ्याचाच उपभोग घेतात (ह्मणजे वास्तविक स्वतंत्र असतां परतंत्र होतात), त्याप्रमाणें (या स्वतंत्र आत्म्याचें ज्ञान नसलेले) लोक ज्या ज्या कामाची इच्छा करतात तेवढा काम पावतात (पण ज्ञानी न झाल्यामुळें पूर्णपणें स्वतंत्र होत नाहींत).५. या लोकीं ज्याप्रमाणें पराधीन होऊन सेवादि कर्मांनीं मिळाविलेलें फळ क्षय पावतें त्याप्रमाणें पुण्यानें मिळविलेलें फळ परलोकीं क्षय पावतें. इहलोकीं जे मनुष्य आत्म्याचें आणि या शाश्वत कामांचे ज्ञान प्राप्त करून न घेतां मरण पावतात ते सर्व लोकांमध्यें संचार करण्यास समर्थ होत नाहींत. पण जे इहलोकीं आत्म्याचें आणि या शाश्वत कामांचें ज्ञान प्राप्त करून घेऊन मरण पावतात ते सर्व लोकांमध्यें संचार करण्यास समर्थ होतात.६.

अशा (आत्मज्ञानी) मनुष्याला जर पितरांची इच्छा झाली तर (केवळ त्या) संकल्पानेंच त्याला पितरांची प्राप्ति होते. तेणेंकरून तो पितरांनीं युक्त होत्साता महत्त्व पावतो.१. जर मातांची इच्छा झाली तर संकल्पानेंच त्याला मातांची प्राप्ति होते. तेणेंकरून तो मातांनीं युक्त होत्साता महत्त्व पावतो.२. जर बंधुवर्गाची इच्छा झाली तर संक-

॥३॥ अथ यदि स्वसृलोककामो भवति संकल्पादेवास्य स्वसारः समुत्तिष्ठन्ति तेन स्वसृलोकेन संपन्नो महीयते ॥४॥ अथ यदि सखिलोककामो भवति संकल्पादेवास्य सखायः समुत्तिष्ठन्ति तेन सखिलोकेन संपन्नो महीयते ॥५॥ अथ यदि गंधमाल्यलोककामो भवति संकल्पादेवास्य गंधमाल्ये समुत्तिष्ठतस्तेन गंधमाल्यलोकेन संपन्नो महीयते ॥६॥ अथ यद्यन्नपानलोककामो भवति संकल्पादेवास्यान्नपाने समुत्तिष्ठतस्तेनान्नपानलोकेन संपन्नो महीयते ॥७॥ अथ यदि गीतवादितलोककामो भवति संकल्पादेवास्य गीतवादिते समुत्तिष्ठतस्तेन गीतवादितलोकेन संपन्नो महीयते ॥८॥ अथ यदि स्त्रीलोककामो भवति संकल्पादेवास्य स्त्रियः समुत्तिष्ठन्ति तेन स्त्रीलोकेन संपन्नो महीयते ॥९॥ यं यमन्तमभिकामो भवति यं कामं

त्यानेंच त्याला बंधूंची प्राप्ति होते. तेणेंकरून तो बंधूंनीं युक्त होत्साता महत्त्व पावतो. ३. जर भगिनींची इच्छा झाली तर संकल्पानेंच त्याला भगिनींची प्राप्ति होते. तेणेंकरून तो भगिनींनीं युक्त होत्साता महत्त्व पावतो. ४. जर मित्रांची इच्छा झाली तर संकल्पानेंच त्याला मित्रांची प्राप्ति होते. तेणेंकरून तो मित्रांनीं युक्त होत्साता महत्त्व पावतो. ५. जर गंध, माला इत्यादिकांची इच्छा झाली तर संकल्पानेंच त्याला गंधमालादिकांची प्राप्ति होते. तेणेंकरून तो गंधमालांनीं युक्त होत्साता महत्त्व पावतो. ६. जर अन्नपानांची इच्छा झाली तर संकल्पानेंच त्याला अन्नपानांची प्राप्ति होते. तेणेंकरून तो अन्नपानांनीं युक्त होत्साता महत्त्व पावतो. ७. जर गीतवाद्यांची इच्छा झाली तर संकल्पानेंच त्याला गीतवाद्यांची प्राप्ति होते. तेणेंकरून तो गीतवाद्यांनीं युक्त होत्साता महत्त्व पावतो. ८. जर स्त्रियांची इच्छा झाली तर संकल्पानेंच त्याला स्त्रियांची प्राप्ति होते. तेणेंकरून तो स्त्रियांनीं युक्त होत्साता महत्त्व पावतो. ९. ज्या ज्या ठिकाणाची आणि गोष्टीची इच्छा होईल त्याची त्याची त्याला

कामयते सोऽस्य संकल्पादेव समुत्तिष्ठति तेन संपन्नो महीयते ॥१०॥
इति द्वितीयः खंडः ॥२॥

त इमे सत्याः कामा अनृतापिधानास्तेषाꣳ सत्यानाꣳ सतामनृतमपिधानं यो यो ह्यस्येतः प्रैति न तमिह दर्शनाय लभते ॥१॥ अथ ये चास्येह जीवा ये च प्रेता यच्चान्यदिच्छन्न लभते सर्वं तदत्र गत्वा विन्दतेऽत्र ह्यस्यैते सत्याः कामा अनृतापिधानास्तद्यथापि हिरण्यनिधिं निहितमक्षेत्रज्ञा उपर्युपरि संचरन्तो न विंदेयुरेवमेवेमाः सर्वाः प्रजा अहरहर्गच्छन्त्य एतं ब्रह्मलोकं न विंदन्त्यनृतेन हि प्रत्यूढाः ॥२॥ स वा एष आत्मा हृदि तस्यैतदेव निरुक्तꣳ हृद्यमिति तस्माद्धृदयमहरहर्वा एवंवित्स्वर्गं लोकमेति ॥३॥ अथ य एष संप्र-

केवळ संकल्पानेच प्राप्ति होते. त्यानें युक्त होत्साता तो महत्त्व पावतो. १०.

ते हे (आत्मस्थ) काम सत्य असून (स्त्री, अन्न इत्यादि बाह्य विषयतृष्णारूपी) अनृतानें आच्छादिलेले आहेत. त्या सत्य कामांवर अनृताचें झांकण आहे. मनुष्याचा जो जो ह्मणून इष्ट मनुष्य इहलोकांतून जातो (असें वाटतें) तो तो (त्याच्या आत्मस्थ असून) त्याला दिसत नाहीं. १. मनुष्याचे जे जे कोणी (संबंधी) जिवंत असतात अथवा जे कोणी मेलेले असतात ते आणि इतर इष्ट वस्तु हीं सर्व मनुष्याला मिळत नाहींत (असें वाटतें) तीं सर्व या हृदयाकाशरूपी ब्रह्माचे ठिकाणीं गेलें असतां प्राप्त होतात. कारण ते याचे सत्य काम अनृतानें आच्छादिलेले असतात. ज्याप्रमाणें पुरून ठेवलेल्या सुवर्णनिधीची जागा न जाणणारे लोक वर संचार करीत असतात पण त्याना निधि प्राप्त होत नाहीं, त्याप्रमाणें हे सर्व लोक दररोज (निद्राकाळीं) या (हृदयाकाशरूपी) ब्रह्मलोकाप्रत जातात पण त्यांना याची प्राप्ति होत नाहीं. कारण अविद्या त्यांना मागें ओढते. २. तो हा आत्मा हृदयामध्यें आहे. त्याचें हेंच हृदि+अयं असें नांव आहे. ह्मणून याला 'हृदय' ह्मणतात. जो हें जाणतो तो खरोखर दररोज स्वर्गाप्रत

सादोऽस्माच्छरीरात्समुत्थाय परं ज्योतिरुपसंपद्य स्वेन रूपेणाभिनिष्पद्यत एष आत्मेति होवाचैतदमृतमभयमेतद्ब्रह्मेति तस्य ह वा एतस्य ब्रह्मणो नाम सत्यमिति ॥४॥ तानि ह वा एतानि त्रीण्यक्षराणि सतीयमिति तद्यत्सत्तदमृतमथ यत्ति तन्मर्त्यमथ यद्यं तेनोभे यच्छति यदनेनोभे यच्छति तस्माद्यमहरहर्वा एवंवित्स्वर्गं लोकमेति ॥५॥ इति तृतीयः खंडः ॥३॥

अथ य आत्मा स सेतुर्विधृतिरेषां लोकानामसंभेदाय नैतꣳ सेतुमहोरात्रे तरतो न जरा न मृत्युर्न शोको न सुकृतं न दुष्कृतꣳ सर्वे पाप्मानोऽतो निवर्तन्तेऽपहतपाप्मा ह्येष ब्रह्मलोकः ॥१॥ तस्माद्वा एतꣳ सेतुं तीर्त्वान्धः सन्ननंधो भवति विद्धः सन्नविद्धो भवत्युपतापी सन्ननुपतापी भवति तस्माद्वा एतꣳ सेतुं तीर्त्वापि नक्तमहरेवाभिनिष्पद्यते सकृद्विभातो ह्येवैष ब्रह्मलोकः ॥२॥ तद्य एवैतं

जातो.३. हा प्रसन्नतारूप आत्मा (मरणकालीं) या शरीराच्या बाहेर येऊन अत्यंत श्रेष्ठ अशा ज्योतीला प्राप्त होत्साता स्वतःच्या रूपाशीं युक्त होतो. हाच आत्मा असें शिष्यांना सांगावें. हा मरणरहित, भयरहित आहे. हाच ब्रह्म होय. त्या या ब्रह्मालाच सत्य असें नांव आहे.४. तीं हीं 'सतीयं' [सकार, तकार व यकार] अशीं तीन ब्रह्माचीं अक्षरें आहेत. सत् हें अमृत; ति हें मर्त्य; आणि यं यानें दोन्ही अक्षरांचें नियमन होतें. हें जो जाणतो तो दररोज स्वर्गलोकीं गमन करतो.५.

हा (वर सांगितलेला) आत्मा या (भू इत्यादि) लोकांचा नाश न करणारा सेतु व आधार होय. या (आत्मरूपी) सेतूला दिवस, रात्र, जरा, मृत्यु, शोक, सुकृत, दुष्कृत हीं नाहींत. सर्व पापें यापासून परावृत्त होतात. कारण हा ब्रह्मलोक पापरहित आहे.१. म्हणून हा सेतु ज्यांना प्राप्त होतो ते अंध असले तरी अनंध होतात, दुःखयुक्त असले तरी दुःखरहित होतात. रोगयुक्त असतात ते रोगमुक्त होतात. म्हणून या सेतूला प्राप्त झाल्यावर रात्र

ब्रह्मलोकं ब्रह्मचर्येणानुविन्दन्ति ब्रह्मलोकस्तषाꣳ सर्वेषु कामचारो भवति ॥३॥ इति चतुर्थः खंडः ॥४॥

अथ यद्यज्ञ इत्याचक्षते ब्रह्मचर्यमेव तद्ब्रह्मचर्येण ह्येव यो ज्ञाता तं विंदतेऽथ यदिष्टमित्याचक्षते ब्रह्मचर्यमेव तद्ब्रह्मचर्येण ह्येवेष्ट्वात्मानमनुविंदते ॥१॥ अथ यत्सत्त्रायणमित्याचक्षते ब्रह्मचर्यमेव तद्ब्रह्मचर्येण ह्येव सत आत्मनस्त्राणं विंदतेऽथ यन्मौनमित्याचक्षते ब्रह्मचर्यमेव तद्ब्रह्मचर्येण ह्येवात्मानमनुविद्य मनुते ॥२॥ अथ यदनाशकायनमित्याचक्षते ब्रह्मचर्यमेव तदेष ह्यात्मा न नश्यति यं ब्रह्मचर्येणानुविंदतेऽथ यदरण्यायनमित्याचक्षते ब्रह्मचर्यमेव तत्तदरश्च ह वै ण्यश्चार्णवौ ब्रह्मलोके तृतीयस्यामितो दिवि तदैरं मदीयꣳ सरस्तदश्वत्थः

असली तरी ती दिवस होते. कारण हा ब्रह्मलोक सर्वदा प्रकाशरूप आहे.२. ह्मणून जे ब्रह्मचर्याचे योगानें हा ब्रह्मलोक प्राप्त करून घेतात त्यांनाच याची प्राप्ति होते. ते सर्व लोकांमध्यें संचार करण्यास समर्थ होतात.३.

ज्याला यज्ञ ह्मणतात तें ब्रह्मचर्यच होय. कारण जो ज्ञानी असतो त्याला ब्रह्मचर्याचे योगानें याची प्राप्ति होते. ज्याला पूजन ह्मणतात तेंहि ब्रह्मचर्यच होय. कारण ब्रह्मचर्यानें (ईश्वराचें) पूजन करून आत्म्याची प्राप्ति होते.१. ज्याला सत्त्रायण ह्मणतात तेंहि ब्रह्मचर्यच होय. कारण ब्रह्मचर्याचे योगानें सद्रूपी आत्म्याचें त्राण होतें. ज्याला मौन ह्मणतात तेंहि ब्रह्मचर्यच होय. कारण ब्रह्मचर्याचे योगानें आत्म्याचें ज्ञान होऊन मनन करतां येतें.२. ज्याला अनाशकायन ह्मणतात तें ब्रह्मचर्यच होय. कारण ब्रह्मचर्यानें प्राप्त होणारा आत्मा नाश पावत नाहीं. ज्याला अरण्यायन ह्मणतात तें ब्रह्मचर्यच होय. या लोकापासून तिसऱ्या स्वर्गलोकीं त्या ब्रह्मलोकामध्यें 'अर' आणि 'ण्य' असे दोन समुद्र आहेत; 'ऐर' नामक मद उत्पन्न करणारें असें सरोवर आहे. तेथें ज्याच्यामधून अमृत [सोम] निघतें असा अश्वत्थ वृक्ष आहे. तेथेच इतरांस प्राप्त होण्यास अशक्य अशी ब्रह्म-

सोमसवनस्तदपराजिता पूर्ब्रह्मणः प्रभुविमितꣳ हिरण्मयम् ॥३॥ तद्य एवैतावरं च ण्यं चार्णवौ ब्रह्मलोके ब्रह्मचर्येणानुविन्दन्ति तेषामेवैष ब्रह्मलोकस्तेषाꣳ सर्वेषु लोकेषु कामचारो भवति ॥४॥ इति पंचमः खंडः

अथ या एता हृदयस्य नाड्यस्ताः पिंगलस्याणिम्नस्तिष्ठन्ति शुक्लस्य नीलस्य पीतस्य लोहितस्येत्यसौ वा आदित्यः पिंगल एष शुक्ल एष नील एष पीत एष लोहितः ॥१॥ तद्यथा महापथ आतत उभौ ग्रामौ गच्छतीमं चामुं चैवमेवैता आदित्यस्य रश्मय उभौ लोकौ गच्छन्तीमं चामुं चामुष्मादादित्यात्प्रतायन्ते ता आसु नाडीषु सृप्ता आभ्यो नाडीभ्यः प्रतायन्ते तेऽमुष्मिन्नादित्ये सृप्ताः॥२॥ तद्यत्रैतत्सुप्तः समस्तः संप्रसन्नः स्वप्नं न विजानात्यासु तदा नाडीषु सृप्तो भवति तं न कश्चन पाप्मा स्पृशति तेजसा हि तदा संपन्नो

पुरी आहे. ही प्रभूनें निर्माण केलेली व हिरण्मय अशी आहे.३. हे 'अर' आणि 'ण्य' असे समुद्र ब्रह्मचर्याचे योगानें ब्रह्मलोकीं जे मिळवितात त्यांचाच हा ब्रह्मलोक होय. ते सर्व लोकांमध्यें संचार करण्यास समर्थ होतात.४.

ज्या हृदयाच्या नाडी आहेत त्या पिंगल, शुक्ल, नील, पीत, लोहित रसांच्या सूक्ष्म रसानें पूर्ण आहेत. हा आदित्य पिंगल तेजानें युक्त आहे, शुक्ल, नील, पीत व लोहित आहे.१. ज्याप्रमाणें विस्तीर्ण असा मोठा रस्ता अलीकडल्या व पलीकडल्या अशा दोन्ही ग्रामांकडे जातो त्याप्रमाणेंच आदित्याचे किरण इहलोकीं येतात आणि परलोकींहि जातात. त्या आदित्यमंडलापासून ज्या प्रसरण पावतात त्या या (वर सांगितलेल्या) नाडींमध्यें प्रविष्ट होतात. या नाडींपासून प्रसरण पावतात त्या आदित्यमंडलामध्यें प्रविष्ट होतात.२. जेव्हां हा जीव सर्व इंद्रियवृत्ति अस्ताप्रत गेलेल्या व प्रसन्न अशा रीतीनें सुप्त होतो तेव्हां त्याला स्वप्नाचा अनुभव येत नाहीं. तेव्हां तो या (सूर्यतेजानें पूर्ण अशा) नाडींमध्यें प्रविष्ट होतो. तेव्हां त्याला कोणतेंहि (धर्माधर्मरूपी) पाप स्पर्श करीत नाहीं. तेव्हां तो तेजानें संपन्न

भवति ॥३॥ अथ यत्रैतदबलिमानं नीतो भवति तमभित आसीना आहुर्जानासि मां जानासि मामिति स यावदस्माच्छरीरादनुत्क्रान्तो भवति तावज्जानाति ॥४॥ अथ यत्रैतदस्माच्छरीरादुत्क्रामत्यथैतैरेव रश्मिभिरूर्ध्वमाक्रमते स ओमिति वा होद्वा मीयते स यावत्क्षिप्येन्मनस्तावदादित्यं गच्छत्येतद्वै खलु लोकद्वारं विदुषां प्रपदनं निरोधोऽविदुषाम् ॥५॥ तदेष श्लोकः । शतं चैका च हृदयस्य नाड्यस्तासां मूर्धानमभिनिःसृतैका । तयोर्ध्वमायन्नमृतत्वमेति विष्वङ्ङन्या उत्क्रमणे भवन्त्युत्क्रमणे भवन्ति ॥६॥ इति षष्ठः खंडः ॥६॥

य आत्मापहतपाप्मा विजरो विमृत्युर्विशोको विजिघत्सोऽपिपासः सत्यकामः सत्यसंकल्पः सोऽन्वेष्टव्यः स विजिज्ञासितव्यः स सर्वांश्च लोकानाप्नोति सर्वांश्च कामान्यस्तमात्मानमनुविद्य विजानातीति

होतो.३. जेव्हां हा जीव बलरहितत्वाप्रत नेला जातो (ह्मणजे मृत्युसमीप जातो) तेव्हां त्याच्या सभोंवतीं बसलेले "मला ओळखतोस का?" "मला ओळखतोस का?" असें ह्मणतात. जोंपर्यंत तो या शरीरांतून निघून गेला नाहीं तोंपर्यंत (इतरांना) ओळखतो.४. जेव्हां शरीरांतून निघून जातो तेव्हां तो त्याच किरणांनीं वर जातो. 'ॐ' असें आत्म्याचें ध्यान करीत वर जातो अथवा (कर्माप्रमाणें) खालीं जातो. मनाला जाण्याला जितका वेळ लागतो तितक्या (ह्मणजे अल्प) वेळांत तो आदित्यलोकीं जातो. (आदित्य) हेंच ज्ञात्यांचें ब्रह्मलोक प्राप्त करून देणारें द्वार आहे. जे आत्मज्ञानी नसतात त्यांना येथें निरोध होतो.५. याविषयीं पुढील श्लोक आहे— हृदयाच्या एकशें एक नाडी आहेत. त्यांपैकीं एक मस्तकांतून वर गेली आहे. उत्क्रमणकालीं तिच्यामधून जीव वर गेला ह्मणजे अमृतत्वाप्रत जातो. बाकीच्या वांकड्या होतात.६.

पापरहित, जरारहित, मृत्युरहित, शोकरहित, क्षुधारहित, पिपासारहित, सत्यकाम, सत्यसंकल्प अशा आत्म्याचा शोध करावा. त्याचें ज्ञान

ह प्रजापतिरुवाच ॥१॥ तद्धोभये देवासुरा अनुबुबुधिरे ते होचु-
र्हन्त तमात्मानमन्विच्छामो यमात्मानमन्विष्य सर्वांश्च लोकानाप्नोति
सर्वांश्च कामानितीन्द्रो हैव देवानामभिप्रवव्राज विरोचनोऽसुराणां तौ
हासंविदानावेव समित्पाणी प्रजापतिसकाशमाजग्मतुः ॥२॥ तौ
ह द्वात्रिंशतं वर्षाणि ब्रह्मचर्यमूषतुस्तौ ह प्रजापतिरुवाच किमिच्छन्ता-
ववास्तमिति तौ होचतुर्य आत्मापहतपाप्मा विजरो विमृत्युर्विशोको
विजिघत्सोऽपिपासः सत्यकामः सत्यसंकल्पः सोऽन्वेष्टव्यः स विजि-
ज्ञासितव्यः स सर्वांश्च लोकानाप्नोति सर्वांश्च कामान्यस्तमात्मानमनु-
विद्य विजानातीति भगवतो वचो वेदयन्ते तमिच्छन्तावबास्तमिति
॥३॥ तौ ह प्रजापतिरुवाच य एषोऽक्षिणि पुरुषो दृश्यत एष

करून घ्यावें. जो त्या आत्म्याचा शोध करून त्याला जाणतो त्याला सर्व लोक प्राप्त होतात, त्याचे सर्व काम पूर्ण होतात, असें प्रजापतीनें सांगितलें आहे. १. हें (प्रजापतीचें वचन) देव व असुर या दोघांना (परंपरेनें) समजलें. ते आपआपसांत ह्मणाले, "अहो, ज्या आत्म्याचा शोध केला असतां सर्व लोक प्राप्त होतात व सर्व काम पूर्ण होतात त्या आत्म्याचा आपण शोध करूं." तेव्हां देवांपैकीं इंद्र आणि असुरांपैकीं विरोचन हातांत समिधा घेऊन व एकमेकांशीं स्पर्धा करीत निघाले ते प्रजापतीकडे आले. २. ते बत्तीस वर्षंपर्यंत ब्रह्मचर्य पालन करून राहिले. तेव्हां प्रजापति त्यांना ह्मणाला, "तुह्मी येथें काय इच्छा करून राहिलांत?" ते ह्मणाले, पापरहित, जरारहित, मृत्युरहित, शोकरहित, क्षुधारहित, पिपासारहित, सत्यकाम, सत्यसंकल्प अशा आत्म्याचा शोध करावा; त्याचें ज्ञान करून घ्यावें; जो त्या आत्म्याचा शोध करून त्याला जाणतो त्याला सर्व लोक प्राप्त होतात, त्याचे सर्व काम पूर्ण होतात असें आपले वचन आहे असें ज्ञाते सांगतात. त्या आत्म्याची इच्छा करीत आह्मी येथें राहिलों."३. त्यांना प्रजापति ह्मणाला, "हा जो डोळ्याचे ठिकाणीं पुरुष दिसतो तो आत्मा होय. तो

आत्मेति होवाचैतदमृतमभयमेतद्ब्रह्मेत्यथ योऽयं भगवोऽप्सु परिख्यायते यश्चायमादर्शे कतम एष इत्येष उ एवैषु सर्वेष्वंतेषु परिख्यायत इति होवाच ॥४॥ इति सप्तमः खंडः ॥७॥

उदशराव आत्मानमवेक्ष्य यदात्मनो न विजानीथस्तन्मे प्रब्रूतमिति तौ होदशरावेऽवेक्षांचक्राते तौ ह प्रजापतिरुवाच किं पश्यथ इति तौ होचतुः सर्वमेवेदमावां भगव आत्मानं पश्याव आ लोमभ्य आ नखेभ्यः प्रतिरूपमिति ॥१॥ तौ ह प्रजापतिरुवाच साध्वलंकृतौ सुवसनौ परिष्कृतौ भूत्वोदशरावेऽवेक्षेथामिति तौ ह साध्वलंकृतौ सुवसनौ परिष्कृतौ भूत्वोदशरावेऽवेक्षांचक्राते तौ ह प्रजापतिरुवाच किं पश्यथ इति ॥२॥ तौ होचतुर्यथैवेदमावां भगवः साध्वलंकृतौ सुवसनौ परिष्कृतौ स्व एवमेवेमौ भगवः साध्वलंकृतौ सुवसनौ परिष्कृतावित्येष आत्मेति होवाचैतदमृतमभयमेतद्ब्रह्मेति तौ ह

मृत्युरहित व भयरहित आहे. तोच ब्रह्म होय.'' इंद्र व विरोचन (यांनीं याचा अर्थ छायापुरुष असा केला व ते) ह्मणाले, ''हे भगवन्, उदकामध्यें जो (प्रतिबिंबरूपानें) दिसतो व जो आरशामध्यें दिसतो तो कोण ?'' प्रजापति ह्मणाला, ''तोच हा या सर्वांचे मध्यें दिसतो.४.

उदकानें भरलेल्या परातीमध्यें तुह्मी पहा आणि तुह्मांला आत्म्याचें जें कांहीं जाणतां येणार नाहीं तें विचारा.'' त्याप्रमाणें त्यांनीं उदकपूर्ण परातीमध्ये पाहिलें. त्यांना प्रजापति ह्मणाला, ''तुह्मांला काय दिसतें ?'' ते ह्मणाले, ''हे भगवन्, यामध्ये लोमनखांपासून आमचें सर्व प्रतिरूप आह्मांला दिसत आहे.''१. प्रजापति त्यांना ह्मणाला, ''सुंदर अलंकारांनीं व चांगल्या वस्त्रांनीं युक्त असे होऊन मग त्या परातीमध्यें पहा.'' त्यांनीं चांगले अलंकार व वस्त्रे धारण करून परातीमध्यें पाहिलें. तेव्हां त्यांना प्रजापति ह्मणाला, ''तुह्मांला काय दिसतें ?''२. ते ह्मणाले, ''हे भगवन्, आह्मी ज्याप्रमाणें चांगल्या अलंकारांनीं व वस्त्रांनीं युक्त आहोंत तसेच हे चांगले अलं-

शान्तहृदयौ प्रवव्रजतुः ॥३॥ तौ हान्वीक्ष्य प्रजापतिरुवाचानुपलभ्यात्मानमननुविद्य व्रजतो यतर एतदुपनिषदो भविष्यन्ति देवा वासुरा वा ते पराभविष्यन्तीति स ह शान्तहृदय एव विरोचनोऽसुराञ्जगाम तेभ्यो हैतामुपनिषदं प्रोवाचात्मैवेह मह्य्य आत्मा परिचर्य आत्मानमेवेह महयन्नात्मानं परिचरन्नुभौ लोकाववाप्नोतीमं चामुं चेति ॥४॥ तस्मादप्यद्येहाददानमश्रद्दधानमयजमानमाहुरासुरो बतेत्यसुराणाꣳ ह्येषोपनिषत्प्रेतस्य शरीरं भिक्षया वसनेनालंकारेणेति संस्कुर्वन्त्येतेन ह्यमुं लोकं जेष्यन्तो मन्यन्ते ॥५॥ इत्यष्टमः खंडः॥

अथ हेंद्रोऽप्राप्यैव देवानेतद्भयं ददर्श यथैव खल्वयमस्मिञ्छ-

कार व वस्त्रें धारण केलेले यामध्ये दिसत आहेत." (यांना अद्याप विवेकसामर्थ्य नाहीं असें पाहून) प्रजापति ह्मणाला, "हाच आत्मा होय. हा मृत्युरहित व भयरहित आहे. हाच ब्रह्म होय." तेव्हां (छायापुरुष आत्मा होय असें समजून) ते शान्तचित्त होत्साते तेथून निघून गेले.३. ते जात असलेले पाहून त्यांना प्रजापति ह्मणाला, आत्म्याची प्राप्ति व ज्ञान न होतां तुह्मी दोघे चाललां आहांत. देव अथवा असुर यांपैकीं जे एवढ्याच ज्ञानानें युक्त होतील ते पराभव पावतील." विरोचन शान्तहृदय होत्साता असुरांकडे गेला आणि त्यांना त्यानें असे ज्ञान सांगितलें कीं, "या लोकीं आत्म्याचीच [ह्म० स्वतःचीच] पूजा करावी, स्वतःचीच सेवा करावी. स्वतःचीच पूजा व सेवा करणाराला इहलोक व परलोक असे दोन्ही प्राप्त होतात."४. ह्मणून या लोकीं दान न देणारा, श्रद्धा न ठेवणारा, यजन न करणारा असा अद्याप असुरांचा स्वभाव आहे असें शहाणे सांगतात. कारण असुरांचें ज्ञान एवढेंच. मरण पावलेल्या मनुष्याचें शरीर इतरांपासून भिक्षा मागून आणून देखील वस्त्रे व अलंकार यांनीं ते सजवितात. या योगानें त्या मनुष्याला परलोक प्राप्त होतो असें त्यांना वाटतें.५.

परंतु इंद्र देवांकडे जाण्याचे अगोदर त्याला भय उत्पन्न झालें कीं,

रीरे साध्वलंकृते साध्वलंकृतो भवति सुवसने सुवसनः परिष्कृते परिष्कृत एवमेवायमस्मिन्नन्धेऽन्धो भवति स्रामे स्रामः परिवृक्णे परिवृक्णोऽस्यैव शरीरस्य नाशमन्वेष नश्यति ॥१॥ नाहमत्र भोग्यं पश्यामीति स समित्पाणिः पुनरेयाय तꣳ ह प्रजापतिरुवाच मघवन्यच्छान्तहृदयः प्राव्राजीः सार्धं विरोचनेन किमिच्छन् पुनरागम इति स होवाच यथैव खल्वयं भगवोऽस्मिञ्छरीरे साध्वलंकृते साध्वलंकृतो भवति सुवसने सुवसनः परिष्कृते परिष्कृत एवमेवायमस्मिन्नन्धेऽन्धो भवति स्रामे स्रामः परिवृक्णे परिवृक्णोऽस्यैव शरीरस्य नाशमन्वेष नश्यति नाहमत्र भोग्यं पश्यामीति ॥२॥ एवमेवैष मघवन्निति होवाचैतं त्वेव

ज्याप्रमाणें हें शरीर सुंदर अलंकारांनीं युक्त केलें असतां हा सुंदर अलंकारांनीं युक्त दिसतो, चांगल्या वस्त्रांनीं युक्त केलें असतां हा चांगल्या वस्त्रांनीं युक्त दिसतो, नखलोमादिकांनीं रहित केले असतां हाहि तसाच दिसतो, त्याप्रमाणेंच हें शरीर अंध असेल तर हाहि अंध होतो, एकनेत्र असेल तर एकनेत्र होतो, चक्षु अथवा नासिका सदा गळत असेल तर तसाच होतो, छिन्नावयव असेल तर छिन्नावयवच होतो आणि या शरीराचा नाश झाला ह्मणजे याचाहि नाश होतो. १. ह्मणून यामध्ये मला कांहीं फल दिसत नाहीं. ह्मणून तो हातांत समिधा घेऊन पुन्हां प्रजापतीकडे आला. प्रजापति त्याला ह्मणाला, "इंद्रा, तूं शान्तहृदय होत्साता विरोचनाबरोबर गेला होतास तो काय इच्छा करून पुन्हां आला आहेस?" इंद्र ह्मणाला, "भगवन्, ज्याप्रमाणें हें शरीर सुंदर अलंकारांनीं युक्त केलें असतां हा सुंदर अलंकारांनीं युक्त दिसतो, चांगल्या वस्त्रांनीं युक्त केलें असतां हा चांगल्या वस्त्रांनीं युक्त दिसतो, नखलोमादिकांनीं रहित केले असतां हाहि तसाच दिसतो, त्याप्रमाणेंच हें शरीर अंध असेल तर हाहि अंध होतो, एकनेत्र असेल तर एकनेत्र होतो, चक्षु अथवा नासिका सदा गळत असेल तर तसाच होतो, छिन्नावयव असेल तर छिन्नावयवच होतो आणि या शरी-

ते भूयोऽनुव्याख्यास्यामि वसापराणि द्वात्रिंशतं वर्षाणीति स हापराणि द्वात्रिंशतं वर्षाण्युवास तस्मै होवाच ॥३॥ इति नवमः खंडः ॥९॥

य एष स्वप्ने महीयमानश्चरत्येष आत्मेति होवाचैतदमृतमभयमेतद्ब्रह्मेति स ह शान्तहृदयः प्रवव्राज स हाप्राप्यैव देवानेतद्भयं ददर्श तद्यद्यपीदꣳ शरीरमन्धं भवत्यनन्धः स भवति यदि स्राममस्रामो नैवैषोऽस्य दोषेण दुष्यति ॥१॥ न वधेनास्य हन्यते नास्य स्राम्येण स्रामो घ्नन्ति त्वेवैनं विच्छादयन्तीवाप्रियवेत्तेव भवत्यपि रोदितीव नाहमत्र भोग्यं पश्यामीति ॥२॥ समित्पाणिः पुनरेयाय तꣳ ह प्रजापतिरुवाच मघवन्यच्छान्तहृदयः प्राव्राजीः किमिच्छन् पुनरागम

राचा नाश झाला म्हणजे याचाहि नाश होतो. म्हणून यामध्यें मला कांहीं फल दिसत नाहीं.''२. प्रजापति म्हणाला, ''इंद्रा, तुझें म्हणणें बरोबर आहे. म्हणून तुला मात्र मी पुन्हां या आत्म्याचें ज्ञान सांगेन. आणखी बत्तीस वर्षे (ब्रह्मचर्य पालन करून) रहा.'' त्याप्रमाणें तो इंद्र आणखी बत्तीस वर्षे राहिला. त्यानंतर त्याला प्रजापति म्हणाला.३.

प्रजापति म्हणाला, ''स्वप्नामध्यें जो नानाविध भोग भोगतो तो आत्मा होय. हा मृत्युरहित व भयरहित आहे, हाच ब्रह्म होय.'' तेव्हां इंद्र शान्तचित्त होत्साता तेथून निघाला. पण देवांकडे जाण्यापूर्वीं त्याला असें भय वाटलें कीं, ''हें शरीर जरी अंध झालें तरी हा स्वप्नात्मा अंध होत नाहीं. चक्षु अथवा नासिका गळत असली तरी तशी याची गळत नाहीं. या शरीराच्या दोषानें स्वप्नात्म्याला दूषण येत नाहीं.१. याच्या वधानें हा नष्ट होत नाहीं, अथवा याचा चक्षु अथवा नासिका गळत असली तरी या आत्म्याची तशी गळत नाहीं. परंतु या स्वप्नात्म्याला (स्वतंत्रपणें) जणूं काय मारतात, याला जणूं काय पळवायला लावतात, (पुत्रादिकांच्या मरणादिकानें) याला जणूं काय अप्रिय वाटतें, हा जणूं काय रडतो. म्हणून यामध्यें मला कांहीं फल दिसत नाहीं.''२. म्हणून इंद्र हातांत समिधा

इति स होवाच तद्यद्यपीदं भगव; शरीरमन्धं भवत्यनन्धः स भवति यदि स्राममस्रामो नैवैषोऽस्य दोषेण दुष्यति ॥३॥ न वधेनास्य हन्यते नास्य स्राम्येण स्रामो घ्नन्ति त्वेवैनं विच्छादयन्तीवाप्रियवेत्तेव भवत्यपि रोदितीव नाहमत्र भोग्यं पश्यामीत्येवमेवैष मघवन्निति होवाचैतं त्वेव ते भूयोऽनुव्याख्यास्यामि वसापराणि द्वात्रिंशतं वर्षाणीति स हापराणि द्वात्रिंशतं वर्षाण्युवास तस्मै होवाच ॥४॥ इति दशमः खंडः

तद्यत्रैतत् सुप्तः समस्तः संप्रसन्नः स्वप्नं न विजानात्येष आत्मेति होवाचैतदमृतमभयमेतद्ब्रह्मेति स ह शान्तहृदयः प्रवव्राज स

घेऊन पुन्हां परत आला. प्रजापति त्याला ह्मणाला, "इंद्रा, तूं शान्तहृदय होत्साता गेला होतास तो काय इच्छा करून पुन्हां आला आहेस ?" इंद्र ह्मणाला, "भगवन्, हें शरीर जरी अंध झालें तरी हा अंध होत नाहीं. चक्षु अथवा नासिका गळत असली तरी तशी याची गळत नाहीं. या शरीराच्या दोषानें स्वप्नात्म्याला दूषण येत नाहीं. ३. याच्या वधानें हा नष्ट होत नाहीं अथवा याचा चक्षु अथवा नासिका गळत असली तरी या आत्म्याची तशी गळत नाहीं. परंतु या स्वप्नात्म्याला जणूं काय मारतात, जणूं काय पळवायला लावतात, (पुत्रादिकांच्या मरणादिकानें) याला जणूं काय अप्रिय वाटतें, हा जणूं काय रडतो. ह्मणून यामध्यें मला कांहीं फल दिसत नाहीं." प्रजापति ह्मणाला, "इंद्रा, तुझें ह्मणणें बरोबर आहे. ह्मणून तुला मात्र मी पुन्हां या आत्म्याचें ज्ञान सांगेन. आणखी बत्तीस वर्षे (ब्रह्मचर्यानें) रहा." त्याप्रमाणें तो आणखी बत्तीस वर्षे राहिला. नंतर प्रजापति त्याला ह्मणाला .४.

प्रजापति ह्मणाला, "जेव्हां हा जीव सर्व इंद्रियवृत्ति अस्ताप्रत गेलेल्या व प्रसन्न अशा रीतीनें सुप्त होतो तेव्हां ज्याला स्वप्नाचा अनुभव येत नाहीं तो आत्मा होय. हा मृत्युरहित व भयरहित आहे. हाच ब्रह्म होय." तेव्हां इंद्र शान्तहृदय होत्साता निघून गेला. देवांकडे जाण्यापूर्वींच त्याला भय वाटलें कीं, "हा (सुषुप्तस्थ) आत्मा देखील 'हा

ह्यप्राप्यैव देवानेतद्भयं ददर्श नाह खल्वयमेवꣲ संप्रत्यात्मानं जानात्य-
यमहमस्मीति नो एवेमानि भूतानि विनाशमेवापीतो भवति नाहमत्र
भोग्यं पश्यामीति ॥१॥ स समित्पाणिः पुनरेयाय तꣲ ह प्रजापति-
रुवाच मघवन्यच्छान्तहृदयः प्राव्राजीः किमिच्छन्पुनरागम इति स
होवाच नाह खल्वयं भगव एवꣲ संप्रत्यात्मानं जानात्ययमहमस्मीति
नो एवेमानि भूतानि विनाशमेवापीतो भवति नाहमत्र भोग्यं पश्या-
मीति ॥२॥ एवमेवैष मघवन्निति होवाचैतं त्वेव ते भूयोऽनुव्या-
ख्यास्यामि नो एवान्यत्रैतस्माद्वसापराणि पंच वर्षाणीति स ह्यपराणि
पंच वर्षाण्युवास तान्येकशतꣲ संपेदुरेतत्तद्यदाहुरेकशतꣲ ह वै वर्षाणि
मघवान्प्रजापतौ ब्रह्मचर्यमुवास तस्मै होवाच ॥३॥ इत्येकादशः खंडः

मघवन्मर्त्यं वा इदꣲ शरीरमात्तं मृत्युना तदस्यामृतस्याशरी-

मी आहें' आणि 'हीं भूतें आहेत' असें जाणीत नाहीं. ह्मणून हा देखील जणूं काय विनाशीच आहे. ह्मणून यामध्यें मला कांहीं फल दिसत नाहीं." १. ह्मणून इंद्र हातांत समिधा घेऊन पुन्हां प्रजापतीकडे आला. प्रजापति त्याला ह्मणाला, "इंद्रा, तूं शान्तहृदय होत्साता गेला होतास तो काय इच्छा करून पुन्हां आला आहेस?" इंद्र ह्मणाला, "भगवन्, हा आत्मा देखील 'हा मी आहें' आणि 'हीं भूतें आहेत' असें जाणीत नाहीं. ह्मणून हा देखील जणूं काय विनाशीच आहे. ह्मणून यामध्यें मला कांहीं फल दिसत नाहीं." २. प्रजापति ह्मणाला, "इंद्रा, तुझें ह्मणणें बरोबर आहे. ह्मणून तुला मात्र मी पुन्हां याहून वेगळ्या नव्हे तर याच आत्म्याचें ज्ञान सांगेन. आणखी पांच वर्षे (ब्रह्मचर्य पालन करून) रहा." त्याप्रमाणें तो इंद्र आणखी पांच वर्षे राहिला. मिळून एकंदर एकशें एक वर्षे झालीं. ह्मणून ह्मणतात कीं, इंद्र एकशें एक वर्षे ब्रह्मचर्य पालन करून प्रजापतीजवळ राहिला. नंतर प्रजापति त्याला ह्मणाला. ३.

"इंद्रा, हें शरीर मर्त्य आहे, मृत्यूनें ग्रासलेलें आहे. हें या मृत्यु-

रस्यात्मनोऽधिष्ठानमात्तो वै सशरीरः प्रियाप्रियाभ्यां न वै सशरीरस्य सतः प्रियाप्रिययोरपहतिरस्त्यशरीरं वाव सन्तं न प्रियाप्रिये स्पृशतः ॥१॥ अशरीरो वायुरभ्रं विद्युत्स्तनयित्नुरशरीराण्येतानि तद्यथैतान्यमुष्मादाकाशात्समुत्थाय परं ज्योतिरुपसंपद्य स्वेन रूपेणाभिनिष्पद्यन्ते ॥२॥ एवमेवैष संप्रसादोऽस्माच्छरीरात्समुत्थाय परं ज्योतिरुपसंपद्य स्वेन रूपेणाभिनिष्पद्यते स उत्तमः पुरुषः स तत्र पर्येति जक्षत्क्रीडन्रममाणः स्त्रीभिर्वा यानैर्वा ज्ञातिभिर्वा नोपजनꣳ स्मरन्निदꣳ शरीरꣳ स यथा प्रयोग्य आचरणे युक्त एवमेवायमस्मिञ्छरीरे प्राणो युक्तः ॥३॥ अथ यत्रैतदाकाशमनुविषण्णं चक्षुः स चाक्षुषः पुरुषो दर्शनाय चक्षुरथ यो वेदेदं जिघ्राणीति स आत्मा गन्धाय

रहित व शरीररहित आत्म्याचे अधिष्ठान आहे. हा आत्मा शरीरानें युक्त होतो तेव्हां प्रिय व अप्रिय यांनीं ग्रस्त होतो. तो जोंपर्यंत शरीरयुक्त असतो तोपर्यंत प्रिय व अप्रिय हीं नष्ट होत नाहींत. जेव्हां शरीररहित असतो तेव्हां याला प्रिय व अप्रिय स्पर्श करीत नाहींत. १. वायु, अभ्र, विद्युत्, मेघगर्जना हीं सर्व शरीररहित आहेत. हीं ज्याप्रमाणें या आकाशापासून वर निघून श्रेष्ठ अशा (सूर्याच्या) ज्योतीला प्राप्त होऊन स्वतःच्या रूपानें युक्त होतात, त्याप्रमाणे हा देखील (आत्मज्ञान प्राप्त झाल्यावर) प्रसन्नचित्त होत्साता (मरणसमयीं) या शरीरांतून वर निघून श्रेष्ठ अशा (ईश्वराच्या) ज्योतीप्रत प्राप्त होऊन स्वतःच्या रूपानें युक्त होतो. तो उत्तम पुरुष (आत्मा ब्रह्मलोकीं) भक्षण करीत, क्रीडा करीत, स्त्रिया—यानें—आप्त इत्यादिकांशीं रममाण होत व स्त्रीपुरुषसंयोगानें प्राप्त होणारें हें शरीर न स्मरत असा रहातो. ज्याप्रमाणें ठराविक कर्माचे ठिकाणीं अधिकारी नेमलेला असतो त्याप्रमाणें या शरीरामध्यें प्राणाची नेमणूक केलेली असते. २. ३. चक्षुगत आकाशामध्यें स्थित असा जो (अशरीर) आत्मा तो चाक्षुष होय; त्याला पहाण्याकरितां चक्षु आहे. मी याचा वास घेतों असें जो जाणतो तो

घ्राणमथ यो वेदेदमभिव्याहराणीति स आत्माभिव्याहाराय वागथ यो वेदेद१ँ श्रृणवानीति स आत्मा श्रवणाय श्रोत्रम् ॥४॥ अथ यो वेदेदं मन्वानीति स आत्मा मनोऽस्य दैवं चक्षुः स वा एष एतेन दैवेन चक्षुषा मनसैतान् कामान् पश्यन् रमते य एते ब्रह्मलोके ॥५॥ तं वा एतं देवा आत्मानमुपासते तस्मात्तेषां सर्वे च लोका आत्ताः सर्वे च कामाः स सर्वांश्च लोकानाप्नोति सर्वांश्च कामान्यस्तमात्मानमनुविद्य विजानातीति ह प्रजापतिरुवाच प्रजापतिरुवाच ॥६॥ इति द्वादशः खंडः ॥१२॥

श्यामाच्छबलं प्रपद्ये शबलाच्छ्यामं प्रपद्येऽश्व इव रोमाणि विधूय पापं चंद्र इव राहोर्मुखात्प्रमुच्य धूत्वा शरीरमकृतं कृतात्मा ब्रह्मलोकमभिसंभवामीत्यभिसंभवामीति ॥१॥ इति त्रयोदशः खंडः ॥१३॥

आत्मा; त्याला वास घेण्याकरितां घ्राण आहे. मी बोलतों असें जो जाणतो तो आत्मा; त्याला उच्चार करण्याकरितां वाणी आहे. मी ऐकतों असें जो जाणतो तो आत्मा; त्याला श्रवण करण्याला श्रोत्र आहे.४. मी हें मनन करतों असें जो जाणतो तो आत्मा; (त्याला मनन करण्याकरितां मन आहे). मन हा याचा दिव्य चक्षु होय. या दिव्य चक्षुरूपी मनानें हा ब्रह्मलोकीं हे काम पाहून रममाण होतो.५. अशा या (इंद्राला प्रजापतीनें सांगितलेल्या) आत्म्याची देव उपासना करतात. ह्मणून त्यांना सर्व लोक व सर्व काम प्राप्त झालेले अहेत. जो या आत्म्याचें पूर्ण ज्ञान करून घेऊन याला जाणतो त्याला सर्व लोक व सर्व काम प्राप्त होतात असें प्रजापतीचें वचन आहे.६.

हृदयस्थ ब्रह्माचें ध्यान करून मी ब्रह्मलोकाप्रत जाईन. कारण मी ब्रह्मापासूनच या लोकीं आलों आहे. ज्याप्रमाणें अश्व (चालून आल्यावर) केस झाडतो, चंद्र राहूच्या मुखांतून निघून पुन्हां निर्मळ होतो, त्याप्रमाणें शरीर टाकून पाप झाडून कृतकृत्य होत्साता मी ब्रह्मलोकीं जाईन.१.

आकाशो वै नाम नामरूपयोर्निर्वहिता ते यदंतरा तद्ब्रह्म तदमृतं स आत्मा प्रजापतेः सभां वेश्म प्रपद्ये यशोऽहं भवामि ब्राह्मणानां यशो राज्ञां यशो विशां यशोऽहमनुप्रापत्सि स हाहं यशसां यशः श्येतमदत्कमदत्कं श्येतं लिंदु माभिगां लिंदु माभिगाम् ॥१॥ इति चतुर्दशः खंडः ॥१४॥

तद्धैतद्ब्रह्मा प्रजापतय उवाच प्रजापतिर्मनवे मनुः प्रजाभ्य आचार्यकुलाद्वेदमधीत्य यथाविधानं गुरोः कर्मातिशेषेणाभिसमावृत्य कुटुंबे शुचौ देशे स्वाध्यायमधीयानो धार्मिकान्विदधदात्मनि सर्वेंद्रियाणि संप्रतिष्ठाप्याहिंसन्सर्वभूतान्यन्यत्र तीर्थेभ्यः स खल्वेवं वर्तयन्यावदायुषं ब्रह्मलोकमभिसंपद्यते न च पुनरावर्तते न च पुनरावर्तते ॥१॥ इति पंचदशः खंडः ॥१५॥ इत्यष्टमोऽध्यायः ॥८॥

ॐ आप्यायन्तु ममांगानि वाक्प्राणश्चक्षुः श्रोत्रमथो बलमिंद्रियाणि च ॥ सर्वाणि सर्वं ब्रह्मौपनिषदं माहं ब्रह्म निराकुर्यां मा मा ब्रह्म निराकरोदनिराकरणमस्त्वनिराकरणं मेऽस्तु तदात्मनि निरते य उपनिषत्सु धर्मास्ते मयि सन्तु ते मयि सन्तु ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

इति सामवेदीया छांदोग्योपनिषत्समाप्ता ॥

आत्मा [आकाशः] हा नाम व रूप हीं स्पष्ट करतो. नाम व रूप हीं ज्याच्यामध्यें रहातात तें ब्रह्म. तें मृत्युरहित आहे. तोच आत्मा होय. प्रजापतीच्या मोठ्या गृहीं मी जाईन. मी (आत्मा) ब्राह्मणांचें यश होईन, राजांचें यश होईन, वैश्यांचें यश होईन. त्या यशाप्रत प्राप्त व्हावें अशी माझी इच्छा आहे. तेंच सर्वांमध्यें श्रेष्ठ यश (अथवा आत्मा) आहे. कारण मीं पुन्हां गर्भवासाप्रत जाऊं नये.१.

हें सर्व आत्मज्ञान ब्रह्मदेवानें प्रजापतीला सांगितलें. प्रजापतीनें मनूला सांगितलें. मनूनें प्रजांना सांगितलें. आचार्यांचे गृहीं आचार्याचें

काम करून उरलेल्या वेळांत विधिपूर्वक वेदाचें अध्ययन करून गृहस्थाश्रमी होऊन शुद्ध ठिकाणीं स्वाध्यायाचें अध्ययन करणारा व पुत्रशिष्यादिकांना धर्मयुक्त करणारा, सर्व इंद्रियें आत्म्याचे ठिकाणीं स्थित करून, भूत-मात्राला तीर्थाटनादि शास्त्रोक्त खेरीज करून पीडा न देतां, जो याप्रमाणें वर्तन करतो तो ब्रह्मलोक पावतो, तो पुन्हां परत येत नाहीं. १.

# बृहदारण्यकोपनिषत् ॥१०॥

ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते ॥ पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

ॐ उषा वा अश्वस्य मेध्यस्य शिरः ॥ सूर्यश्चक्षुर्वातः प्राणो व्यात्तमग्निर्वैश्वानरः संवत्सर आत्माश्वस्य मेध्यस्य ॥ द्यौः पृष्ठमंतरिक्षमुदरं पृथिवी पाजस्यम् । दिशः पार्श्वे अवान्तरदिशः पर्शव ऋतवोऽगानि मासाश्चार्धमासाश्च पर्वाण्यहोरात्राणि प्रतिष्ठा नक्षत्राण्यस्थीनि नभो मांसानि ऊवध्यं सिकताः सिंधवो गुदा यकृच्च क्लोमानश्च पर्वता ओषधयश्च वनस्पतयश्च लोमानि उद्यन् पूर्वार्धो निम्लोचञ्जघनार्धो यद्विजृंभते तद्विद्योतते यद्विधूनुते तत्स्तनयति यन्मेहति तद्वर्षति वागेवास्य वाक् ॥१॥ अहर्वा अश्वं पुरस्तान्महिमान्वजायत

## बृहदारण्यकोपनिषत्.



### अध्याय पहिला.

यज्ञिय अशा अश्वाचें उषा हें शिर आहे. सूर्य हा चक्षु, वायु हा प्राण, वैश्वानर अग्नि हें मुख, संवत्सर हा आत्मा, स्वर्गलोक हें पृष्ठ, अंतरिक्ष हें उदर, पृथिवी हें पायांचें स्थान, दिशा या बाजू [पार्श्व], अवान्तर दिशा या पार्श्वास्थि, ऋतु हे अवयव, मास व पक्ष हीं पर्वें [सांधे], अहोरात्र हे पाय, नक्षत्रें हीं हाडें, नभ हें मांस, वाळु हें उदरांतील अर्धजीर्ण अन्न, नद्या हें गुद, पर्वत हे यकृत् आणि क्लोमन् [हृदयाखालील दक्षिणोत्तर मांसखंड], ओषधि व वनस्पति हे लोम, उदयापासून मध्याह्नापर्यंत पूर्वार्ध, मध्याह्नापासून अस्तापर्यंत दुसरा अर्ध, वीज चमकणें ही जांभई, मेघगर्जना हें अंग झाडणें, वर्षाव होणें हें मूत्र आणि शब्द हा शब्दच होय. १. या अश्वाच्या पुढें दिवस हा ग्रह [महिमा]

तस्य पूर्वे समुद्रे योनी रात्रिरेनं पश्चान्महिमान्वजायत तस्यापरे समुद्रे योनिरेतौ वा अश्वं महिमानावभितः संबभूवतुः । हयो भूत्वा देवानवहद्वाजी गंधर्वानर्वाऽसुरानश्वो मनुष्यान् समुद्र एवास्य बंधुः समुद्रो योनिः ॥२॥ इति प्रथमं ब्राह्मणम् ॥१॥

नैवेह किंचनाग्र आसीन्मृत्युनैवेदमावृतमासीत् । अशनाययाशनाया हि मृत्युस्तन्मनोऽकुरुतात्मन्वी स्यामिति ॥ सोऽर्चन्नचरत्तस्यार्चत आपोऽजायन्तार्चते वै मेकमभूदिति तदेवार्कस्यार्कत्वम् कꣳ ह वा अस्मै भवति य एवमेतदर्कस्यार्कत्वं वेद ॥१॥ आपो वा अर्कस्तद्यदपाꣳ शर आसीत्समहन्यत । सा पृथिव्यभवत्तस्यामश्राम्यत्तस्य श्रान्तस्य तप्तस्य तेजो रसो निरवर्तताग्निः ॥२॥ स त्रेधा-

उत्पन्न झाला; पूर्व समुद्र हें याचें जननस्थान होय. पाठीमागें रात्र उत्पन्न झाली; पश्चिम समुद्र हें तिचें जननस्थान होय. हे दोघे मोठे ग्रह अश्वाच्या पुढें व मागें उत्पन्न झाले. हा हय होऊन देवांना वहन करिता झाला. वाजी होऊन गंधर्वांना वहन करिता झाला. अर्वा होऊन असुरांना वहन करिता झाला. आणि अश्व होऊन मनुष्यांना वहन करिता झाला. समुद्र हेंच याचें बंधन आणि समुद्र हेंच याचें उत्पत्तिस्थान.२.

(सृष्टीच्या) आरंभीं कांहींहि नव्हतें. हें सर्व अशनायारूपी मृत्यूनें आवृत होतें. मृत्यु ह्मणजे अशनाया [=भक्षण करण्याची इच्छा]. त्यानें आत्मवान् व्हावें या इच्छेनें मन (निर्माण) केलें. तो अर्चन करीत राहिला. तो अर्चन करीत असतां "अर्चन करणाऱ्या मला काय होईल" असें वाटून उदक उत्पन्न झालें. (अर्चते कं) ह्मणून अग्नीला अर्क हें नांव आहे. याप्रमाणें अर्काचें [अग्नीचें] अर्कत्व जो जाणतो त्याला उदक (अथवा सुख) प्राप्त होतें.१. उदक हेंच अर्क होय. उदकाची जी साय होती ती एकत्र होऊन तिची पृथिवी झाली. ती पृथ्वी उत्पन्न झाली तेव्हां मृत्यूला [प्रजापतीला] श्रम झाले. श्रम झालेल्या व (त्या योगानें) तप्त झालेल्या त्या

त्मानं व्यकुरुतादित्यं तृतीयं वायुं तृतीयꣳ स एष प्राणस्त्रेधा विहितः । तस्य प्राची दिक्छिरोऽसौ चासौ चेर्मौ । अथास्य प्रतीची दिक् पुच्छमसौ चासौ च सक्थ्यौ दक्षिणा चोदीची च पार्श्वे द्यौः पृष्ठमंतरिक्षमुदरमियमुरः स एषोऽप्सु प्रतिष्ठितो यत्र क्व चैति तदेव प्रतितिष्ठत्येवं विद्वान् ॥३॥ सोऽकामयत द्वितीयो म आत्मा जायेतेति स मनसा वाचं मिथुनꣳ समभवदशनाया मृत्युस्तद्यद्रेत आसीत्स संवत्सरोऽभवत् । न ह पुरा ततः संवत्सर आस तमेतावन्तं कालमबिभः । यावान्संवत्सरस्तमेतावतः कालस्य परस्तादसृजत । तं जातमभिव्याददात्स भाणकरोत्सैव वागभवत् ॥४॥ स ऐक्षत यदि वा इममभिमंस्ये कनीयोऽन्नं करिष्य इति स तया वाचा तेनात्मनेदꣳ

मृत्यूपासून तेजोरस झाला तोच अग्नि होय.२. त्या प्रजापतीनें आपले आदित्य, अग्नि आणि वायु असे तीन विभाग केले. तोच हा (सर्व जगताचा) प्राण या तीन रूपांनीं विभागलेला आहे. पूर्व दिशा हें त्याचें शिर आणि ईशान्य व आग्नेय हे बाहू. पश्चिम दिशा हें त्याचें पुच्छ आणि वायव्य व नैर्ऋत्य या सक्थिनी. दक्षिण आणि उत्तर या दोन बाजू. स्वर्गलोक पृष्ठ, अंतरिक्ष उदर, ही पृथिवी छाती. हा प्रजापतिरूप अग्नि उदकाचे ठिकाणीं स्थित आहे. हें जो जाणतो तो ज्या ज्या ठिकाणीं जाईल त्या त्या ठिकाणीं स्थित होतो.३. आपला दुसराहि एक आत्मा असावा अशी त्या अशनायारूप मृत्यूला इच्छा झाली. ह्मणून त्यानें मन व वाणी यांचें मिथुन केलें. त्याचे जें रेत तें संवत्सर झालें. त्याच्या पूर्वीं संवत्सर नसे. इतका कालपर्यंत [=एक संवत्सर] मृत्यूनें संवत्सर निर्माण करणाऱ्या प्रजापतीला (अंडरूपानें) धारण केलें. संवत्सराचा जितका काल तितका काल गेल्यानंतर त्याला [=प्रजापतीला=अग्नीला] निर्माण केलें. उत्पन्न झालेल्या त्या अग्नीला खाण्याकरितां मृत्यूनें आपलें तोंड उघडलें. त्या अग्नीनें भीतीनें 'भाण्' असा शब्द केला. तीच वाणी झाली.४. तेव्हां त्या

सर्वमसृजत यदिदं किंचर्चो यजूंषि सामानि छन्दांसि यज्ञान् प्रजाः पशून् । स यद्यदेवासृजत तत्तदत्तुमध्रियत सर्वं वा अत्तीति तददितेरदितित्वꣳ सर्वस्यैतस्यात्ता भवति सर्वमस्यान्नं भवति य एवमेतददितेरदितित्वं वेद ॥५॥ सोऽकामयत भूयसा यज्ञेन भूयो यजेयेति सोऽश्राम्यत्स तपोऽतप्यत तस्य श्रान्तस्य तप्तस्य यशोवीर्यमुदक्रामत् प्राणा वै यशो वीर्यं तत्प्राणेषूत्क्रान्तेषु शरीरꣳ श्वयितुमध्रियत तस्य शरीर एव मन आसीत् ॥६॥ सोऽकामयत मेध्यं म इदꣳ स्यादात्मन्व्यनेन स्यामिति ततोऽश्वः समभवद्यदश्वत्तन्मेध्यमभूदिति तदेवाश्वमेधस्याश्वमेधत्वम् । एष ह वा अश्वमेधं वेद य एनमेवं वेद तमनवरुध्यैवामन्यत तꣳ संवत्सरस्य परस्तादात्मन आलभत पशू-

मृत्यूला वाटलें कीं, मीं जर याला मारलें तर मला थोडें अन्न होईल. ह्मणून (त्याला भक्षण न करितां) त्यानें त्याच वाणी व मन यांच्या मिथुनानें हें सर्व उत्पन्न केलें—जें कांहीं ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, छंद, यज्ञ, प्रजा, पशु इत्यादि. त्यानें जें जें कांहीं निर्माण केलें तें तें खाण्याची तो इच्छा करूं लागला. ह्मणून मृत्यूला 'अदिति' असें नांव प्रसिद्ध आहे. जो याप्रमाणे अदितिनामक मृत्यूचें अदितित्व जाणतो तो सर्वांचा भक्षणकर्ता होतो व सर्व त्याचें अन्न होतें.५. त्याला पुन्हां मोठ्या यज्ञानें पुन्हां यजन करण्याची इच्छा झाली. ह्मणून त्यानें श्रम केले व तप आचरण केलें. श्रान्त व तप्त अशा त्याचीं यश व वीर्य हीं निघून गेलीं. (चक्षु आदि) प्राण हेंच तें यश व वीर्य होय. याप्रमाणें प्राण निघून गेल्यावर त्या प्रजापतीचें शरीर अमेध्य झालें. परंतु त्याच शरीरामध्यें प्रजापतीचें मन राहिलें होतें.६. हें माझें शरीर मेध्य व्हावें, यानेंच मीं आत्मवान् व्हावें अशी त्याला इच्छा झाली. (ह्मणून त्यानें त्यांत पुन्हां प्रवेश केला). तेव्हां अश्व उत्पन्न झाला. अर्थात् तो (अश्वरूपी प्रजापति) मेध्य झाला. ह्मणून अश्वमेधाला अश्वमेध ह्मणतात. जो याप्रमाणें अश्वाला अग्निरूप जाणतो तोच

न्देवताभ्यः प्रत्यौहत् तस्मात्सर्वदेवत्यं प्रोक्षितं प्राजापत्यमालभन्त। एष ह वा अश्वमेधो य एष तपति तस्य संवत्सर आत्मायमग्निरर्कस्तस्येमे लोका आत्मानस्तावेतावर्काश्वमेधौ सोपुनरेकैव देवता भवति मृत्युरेवाप पुनर्मृत्युं जयति नैनं मृत्युराप्नोति मृत्युरस्यात्मा भवत्येतासां देवतानामेको भवति ॥७॥ इति द्वितीयं ब्राह्मणम् ॥२॥

द्वया ह प्राजापत्या देवाश्चासुराश्च ततः कानीयसा एव देवा ज्यायसा असुरास्त एषु लोकेष्वस्पर्धन्त ते ह देवा ऊचुर्हन्तासुरान्यज्ञ उद्गीथेनात्ययामेति ॥१॥ ते ह वाचमूचुस्त्वं न उद्गायेति तथेति तेभ्यो वागुदगायत् यो वाचि भोगस्तं देवेभ्य आगायत् यत् कल्याणं वदति तदात्मने ते विदुरनेन वै न उद्गात्रात्येष्यन्तीति तमभिद्रुत्य

अश्वमेध जाणतो. पुन्हां यज्ञ करण्याच्या इच्छेनें प्रजापतीनें त्या पशूला मोकळा सोडला. एक संवत्सरानंतर त्याला त्यानें स्वतःकरितां मारला तेव्हां सर्व पशूंना त्यानें त्या त्या देवतांकडे पाठविलें. ह्मणून यज्ञामध्ये सर्वदेवत्य अशा पशूला मारतात. हा जो आदित्य तपन पावतो तोच अश्वमेध होय. संवत्सर हा त्याचा आत्मा, अग्नि हा अर्क, हे तीन लोक त्याचे शरीरावयव. अग्नि व आदित्य हे अर्क व अश्वमेध. हे दोन्ही मिळून एकच देवता होय. ती देवता मृत्यु. जो या अश्वमेधरूपी मृत्यूला जाणतो तो मृत्यूला जिंकतो. त्याला मृत्यु येत नाहीं. कारण मृत्यु हा त्याचा आत्मा होतो. या सर्व देवतांचें मिळून फल मृत्युच होतो.७.

प्रजापतीची दोन प्रकारची संतति झाली-देव आणि असुर. त्यांपैकीं देव हे लहान आणि असुर हे ज्येष्ठ. दोघांची या लोकांमध्यें स्पर्धा चालली. तेव्हां देव ह्मणाले कीं, आपण या (ज्योतिष्टोम) यज्ञामध्यें उद्गीथाचे योगानें देवांना मागें टाकूं.१. देव वाणीला ह्मणाले, तूं आमचें उद्गातृकर्म कर. 'होय' असें ह्मणून वाणीनें उद्गान केलें. (पहिल्या तीन स्तोत्रांमध्यें) जें वाणीचें फल तें तिनें देवांकरितां गायन केलें आणि जें (बाकीच्या नऊ

पाप्मनाविध्यन्स यः स पाप्मा यदेवेदमप्रतिरूपं वदति स एव स पाप्मा ॥२॥ अथ ह प्राणमूचुस्त्वं न उद्गायेति तथेति तेभ्यः प्राण उदगायद्यः प्राणभोगस्तं देवेभ्य आगायद्यत् कल्याणं जिघ्रति तदात्मने । ते विदुरनेन वै न उद्गात्रात्येष्यन्तीति तमभिद्रुत्य पाप्मनाऽविध्यन्स यः स पाप्मा यदेवेदमप्रतिरूपं जिघ्रति स एव स पाप्मा ॥३॥ अथ ह चक्षुरूचुस्त्वं न उद्गायेति तथेति तेभ्यश्चक्षुरुदगायत् यश्चक्षुषि भोगस्तं देवेभ्य आगायद्यत्कल्याणं पश्यति तदात्मने । ते विदुरनेन वै न उद्गात्रात्येष्यन्तीति तमभिद्रुत्य पाप्मनाविध्यन्स यः स पाप्मा यदेवेदमप्रतिरूपं पश्यति स एव स पाप्मा ॥४॥ अथ ह श्रोत्रमूचुस्त्वं न उद्गायेति तथेति तेभ्यः श्रोत्र-

स्तोत्रांचें आर्त्विज्य) कल्याणकारक भाषण तें स्वतःकरितां गायन केलें. या उद्गात्याचे योगानें देव आपली वरचढ करतात असे जाणून असुर उद्गात्याकडे धांवून गेले आणि त्याला त्यांनीं पापानें ताडन केलें. (प्रजापतीच्या पूर्वजन्मीं वाणीचे ठिकाणीं आलेलें) पाप तें हेंच होय. जेव्हां शास्त्रप्रतिषिद्ध वचन बोलतो तेव्हां तें पाप होय.२. नंतर देव प्राणाला ह्मणाले, तूं आमचें उद्गातृकर्म कर. 'होय' असें ह्मणून प्राणानें उद्गान केलें. जें प्राणाचें फल तें त्यानें देवांकरितां गायन केलें आणि जो कल्याणकारक सुगंध त्याचें स्वतःकरितां गायन केलें. या उद्गात्याचे योगानें देव आपली वरचढ करतात असें जाणून असुर उद्गात्याकडे धांवून गेले आणि त्याला त्यांनीं पापानें ताडन केलें. तें हेंच पाप होय. जेव्हां शास्त्रप्रतिषिद्ध गंध घेतो तेव्हां तें पाप होय.३. नंतर देव चक्षूला ह्मणाले, तूं आमचें उद्गातृकर्म कर. 'होय' असें ह्मणून चक्षूनें उद्गान केलें. जें चक्षूचें फल तें त्यानें देवांकरितां गायन केले आणि जे कल्याणकारक दर्शन त्याचें स्वतःकरितां गायन केलें. या उद्गात्याचे योगानें देव आपली वरचढ करतात असें जाणून असुर उद्गात्याकडे धांवून गेले आणि त्याला त्यांनी पापानें ताडन केलें. तें हेंच पाप होय.

मुदगायद्यः श्रोत्रे भोगस्तं देवेभ्य आगायद्यत्कल्याणꣳ शृणोति तदात्मने । ते विदुरनेन वै न उद्गात्रात्येष्यन्तीति तमभिद्रुत्य पाप्मनाऽविध्यन्स यः स पाप्मा यदेवेदमप्रतिरूपꣳ शृणोति स एव स पाप्मा ॥५॥ अथ ह मन ऊचुस्त्वं न उद्गायेति तथेति तेभ्यो मन उदगायद्यो मनसि भोगस्तं देवेभ्य आगायद्यत् कल्याणꣳ संकल्पयति तदात्मने । ते विदुरनेन वै न उद्गात्रात्येष्यन्तीति तमभिद्रुत्य पाप्मनाऽविध्यन्स यः स पाप्मा यदेवेदमप्रतिरूपꣳ संकल्पयति स एव स पाप्मैवमु खल्वेता देवताः पाप्मभिरुपासृजन्नेवमेनाः पाप्मनाविध्यन् ॥६॥ अथ हेममासन्यं प्राणमूचुस्त्वं न उद्गायेति तथेति तेभ्य एष प्राण उदगायत्ते विदुरनेन वै न उद्गात्रात्येष्यन्तीति तदभिद्रुत्य पाप्मनाविव्यत्सन्स यथाश्मानमृत्वा लोष्टो विध्वंसेतैवꣳ हैव

जेव्हां शास्त्रप्रतिषिद्ध पहातो तेव्हां तें पाप होय.४. नंतर देव श्रोत्राला ह्मणाले, तूं आमचें उद्गातृकर्म कर. 'होय' असें ह्मणून श्रोत्रानें उद्गान केलें. जें श्रोत्राचें फल ते त्यानें देवांकरितां गायन केलें आणि जें कल्याणकारक श्रवण त्याचें स्वतःकरितां गायन केलें. या उद्गात्याचे योगानें देव आपली वरचढ करतात असें जाणून असुर उद्गात्याकडे धांवून गेले आणि त्याला त्यांनीं पापानें ताडन केलें. तें हेंच पाप होय. जेव्हां शास्त्रप्रतिषिद्ध श्रवण करतो तेव्हां तें पाप होय.५. नंतर देव मनाला ह्मणाले, तूं आमचें उद्गातृकर्म कर. 'होय' असें ह्मणून मनानें उद्गान केलें. जें मनाचें फल तें त्यानें देवांकरिता गायन केलें आणि जो कल्याणकारक संकल्प त्याचें स्वतःकरितां गायन केलें. या उद्गात्याचे योगाने देव आपली वरचढ करतात असें जाणून असुर उद्गात्याकडे धांवून गेले आणि त्याला त्यांनीं पापानें ताडन केलें. तें हेंच पाप होय. जेव्हां शास्त्रप्रतिषिद्ध संकल्प करतो तेव्हां तें पाप होय. याप्रमाणें असुरांनीं सर्व देवतांना पापानें युक्त केलें.६. नंतर (मुखाचे ठिकाणीं) स्थित अशा प्राणाला देव ह्मणाले, तूं आमचें उद्गातृकर्म कर. 'होय

विध्वंसमाना विष्वंचो विनेशुस्ततो देवा अभवन् पराऽसुरा भवत्यात्मना परास्य द्विषन्भ्रातृव्यो भवति य एवं वेद ॥७॥ ते होचुः क नु सोऽभूद्यो न इत्थमसक्तेत्ययमास्येऽन्तरिति सोऽयास्य आंगिरसोंगानाꣳ हि रसः ॥८॥ सा वा एषा देवता दूर्नाम दूरꣳ ह्यस्या मृत्युर्दूरꣳ ह वा अस्मान्मृत्युर्भवति य एवं वेद ॥९॥ सा वा एषा देवतैतासां देवतानां पाप्मानं मृत्युमपहत्य यत्रासां दिशामन्तस्तद्गमयांचकार तदासां पाप्मनो विन्यदधात्तस्मान्न जनमियान्नान्तमियान्नेत्पाप्मानं मृत्युमन्ववायानीति ॥१०॥ सा वा एषा देवतैतासां

असें ह्मणून प्राणानें देवांकरितां उद्गान केलें. या उद्गात्याचे योगानें देव आपली वरचढ करतात असें जाणून असुर उद्गात्याकडे धांवून गेले आणि त्याला त्यांनीं पापानें ताडन केलें. तेव्हां ढेंकूळ ज्याप्रमाणें दगडावर गेलें असतां नाश पावतें त्याप्रमाणें ते नानागति असुर नाश पावले. तेव्हां वागादिकांना पूर्वरूप प्राप्त झालें आणि असुरांचा पराभव होऊन नाश झाला. हें जो जाणतो त्याचा द्वेष करणारा भ्राता नाश पावतो.७. ते (वागादि प्राण) ह्मणाले, ज्यानें आह्मांला या देवभावाप्रत आणलें तो (मुख्य प्राण) कोठें आहे? तेव्हां तो या मुखाचे आंत आहे (असें ते जाणते झाले). ज्या अर्थी तो प्राण वागादिकांचा आश्रय न करितां वागादिकांचे ठिकाणीं सक्त झाला त्या अर्थी त्याला आंगिरस ह्मणतात. कारण तो अंगांचा [करणांचा] रस [सार] आहे.८. (ज्यावर असुर हापटून नष्ट झाले) ती ही 'दूः' नामक देवता [प्राण] आहे. कारण हिच्यापासून मृत्यु दूर आहे. हे जो जाणतो त्याच्यापासून मृत्यु दूर होतो.९. ती ही देवता वागादि देवतांच्या पापरूपी मृत्यूला मारून ज्या ठिकाणीं या (प्राच्यादि) दिशांचा शेवट होतो तेथपर्यंत गेली. तेथें हिनें त्यांच्या [वागादिकांच्या] पापांना विविध प्रकारांनीं खालीं स्थापन केलें. ह्मणून त्या अन्त्य [खालच्या=दक्षिणेकडच्या?] जनांकडे जाऊं नये. त्या खालच्या [=दक्षिण] दिशेकडे जाऊं नये. "तिकडे गेलों असतां पापरूप

देवतानां पाप्मानं मृत्युमपहत्याथैना मृत्युमत्यवहत् ॥११॥ स वै वाचमेव प्रथमामत्यवहत्सा यदा मृत्युमत्यमुच्यत सोऽग्निरभवत्सोऽयमग्निः परेण मृत्युमतिक्रान्तो दीप्यते ॥१२॥ अथ ह प्राणमत्यवहत्स यदा मृत्युमत्यमुच्यत स वायुरभवत्सोऽयं वायुः परेण मृत्युमतिक्रान्तः पवते ॥१३॥ अथ चक्षुरत्यवहत्तद्यदा मृत्युमत्यमुच्यत स आदित्योऽभवत्सोऽसावादित्यः परेण मृत्युमतिक्रान्तस्तपति ॥१४॥ अथ श्रोत्रमत्यवहत्तद्यदा मृत्युमत्यमुच्यत ता दिशोऽभवंस्ता इमा दिशः परेण मृत्युमतिक्रान्ताः ॥१५॥ अथ मनोऽत्यवहत्तद्यदा मृत्युमत्यमुच्यत स चंद्रमा अभवत्सोऽसौ चंद्रः परेण मृत्युमतिक्रान्तो भात्येवं ह वा एनमेषा देवता मृत्युमतिवहति य एवं वेद ॥१६॥

मृत्यूच्या मार्गे मी जाईन" अशा भीतीनें तिकडे जाऊं नये.१०. ती ही देवता वागादि देवतांच्या पापरूपी मृत्यूला मारून त्यांना पुन्हां स्वस्वरूपाप्रत प्राप्त करती झाली.११. या देवतेनें [=प्राणानें] प्रथम वाणीला स्वस्वरूपाप्रत प्राप्त केलें. ती जेव्हां मृत्यूपासून मुक्त झाली तेव्हां (पूर्वींप्रमाणेंच) अग्नि झाली. तो हा अग्नि मृत्यूच्या पलीकडे गेल्यावर (चांगला) दीप्यमान होत आहे.१२. नंतर प्राणानें घ्राणाला स्वस्वरूपाप्रत प्राप्त केलं. ते जेव्हां मृत्यूपासून मुक्त झालें तेव्हां (पूर्वींप्रमाणेंच) वायु झाले. तो हा वायु मृत्यूच्या पलीकडे गेल्यावर (चांगला) वहात आहे.१३. नंतर प्राणानें चक्षूला स्वस्वरूपाप्रत प्राप्त केलें. तो जेव्हां मृत्यूपासून मुक्त झाला तेव्हा (पूर्वींप्रमाणेंच आदित्य) झाला. तो हा आदित्य मृत्यूच्या पलीकडे गेल्यावर (चांगला) तपन पावत आहे.१४. नंतर प्राणानें श्रोत्राला स्वस्वरूपाप्रत प्राप्त केलें. तें जेव्हां मृत्यूपासून मुक्त झालें तेव्हां (पूर्वींप्रमाणेंच) दिशा झालें. त्या या दिशा मृत्यूच्या पलीकडे गेलेल्या आहेत.१५. नंतर प्राणाने मनाला स्वस्वरूपाप्रत प्राप्त केलें. तें जेव्हां मृत्यूपासून मुक्त झालें तेव्हां (पूर्वींप्रमाणेंच) चंद्र झालें. तो हा चंद्र मृत्यूच्या पलीकडे गेल्यावर (चांगला) प्रकाशत आहे. या-

अथात्मनेऽन्नाद्यमागायद्यद्धि किंचान्नमद्यतेऽनेनैव तदद्यत इह प्रतितिष्ठति ॥१७॥ ते देवा अब्रुवन्नेतावद्वा इदꣳ सर्वं यदन्नं तदात्मन आगासीरनु नोऽस्मिन्नन्न आभजस्वेति ते वै माभिसंविशतेति तथेति तꣳ समन्तं परिण्यविशन्त तस्माद्यदनेनान्नमत्ति तेनैतास्तृप्यन्त्येव ह वा एनꣳ स्वा अभिसंविशन्ति भर्ता स्वानाꣳ श्रेष्ठः पुर एता भवत्यन्नादोऽधिपतिर्य एवं वेद । य उ हैवं विदꣳ स्वेषु प्रति पतिर्बुभूषति न हैवालं भार्येभ्यो भवत्यथ य एवैतमनुभवति यो वै तमनुभार्यान् बुभूर्षति स हैवालं भार्येभ्यो भवति ॥१८॥ सोऽयास्य आंगिरसोंऽगानाꣳ हि रसः प्राणो वा अंगानां रसः प्राणो हि वा अंगानां रसस्तस्माद्यस्मात्कस्माच्चांगात्प्राण उत्क्रामति तदेव तच्छुष्यत्येष हि वा अंगानां रसः ॥१९॥ एष उ एव बृहस्पतिर्वाग् वै बृहती तस्या

प्रमाणें हें जो जाणतो त्याला ही प्राणदेवता मृत्यूच्या पलीकडे नेते.१६. नंतर (वागादिकांप्रमाणेंच) प्राणानेंहि स्वतःकरितां आद्य जें अन्न त्याचें गायन केलें. जें जें ह्मणून प्राणी अन्न खातो तें तें त्याचा प्राणच खातो. (ह्मणून) त्या शरीरामध्यें प्राण स्थित आहे.१७. ते (वागादि) देव प्राणाला ह्मणाले, "हें जें सर्व अन्न आहे तें तूं सर्व स्वतःकरितां गायन केलेंस. आतां आह्मांला या अन्नाचे भागीदार कर." प्राण ह्मणाला, "(तर मग) तुह्मी माझ्या भोंवतीं बसा." 'होय' असें ह्मणून ते त्याच्या भोंवतीं बसले. ह्मणून जें प्राणाचे योगानें (प्राणी) अन्न खातो त्यानें हे वागादि तृप्त होतात. याप्रमाणें हे जो जाणतो त्याचे गणगोत याप्रमाणें त्याच्या भोंवतीं बसतात, त्यांचा तो स्वामी व श्रेष्ठ होतो, तो दीप्ताग्नि होतो, त्यांचा पुढारी व अधिपति होतो. हे जाणणाऱ्या प्राणविदाला त्याच्या जातीपैकीं जो प्रतिकूल होतो त्याची चाकरी करण्यास कोणी मिळत नाहीं. प्राणविदाच्या जातीपैकीं जो कोणी अथवा इतर जो कोणी त्याला अनुकूल असतो तो सेवकांनीं युक्त होतो.१८. वागादिकांचे ठिकाणीं सक्त झालेला तो आंगिरस प्राण अंगांचा

एष पातेस्तस्मादु बृहस्पतिः ॥२०॥ एष उ एव ब्रह्मणस्पतिर्वाग् वै ब्रह्म तस्या एष पतिस्तस्मादु ब्रह्मणस्पतिः ॥२१॥ एष उ एव साम वाग् वै सामैष सा चामश्चेति तत्साम्नः सामत्वम् । यद्वेव समः प्लुषिणा समो मशकेन समो नागेन सम एभिस्त्रिभिर्लोकैः समोऽनेन सर्वेण तस्माद्वेव सामाश्नुते साम्नः सायुज्यꣳ सलोकतां जयति य एवमेतत्साम वेद ॥२२॥ एष उ वा उद्गीथः प्राणो वा उत्प्राणेन हीदꣳ सर्वमुत्तब्धं वागेव गीथोच्चगीथा चेति स उद्गीथः ॥२३॥ तद्धापि ब्रह्मदत्तश्चैकितानेयो राजानं भक्षयन्नुवाचायं त्यस्य राजा मूर्धानं विपातयताद्यदितोऽयास्य आंगिरसोऽन्येनोदगायदिति वाचा च ह्येव

रस होय. ह्मणून ज्या अंगामधून प्राण निघून जातो तें अंग शुष्क होतें.१९. हाच आंगिरस बृहस्पति होय. वाणी ह्मणजे बृहती छंद होय. तिचा पति [पालनकर्ता] ह्मणून याला बृहस्पति ह्मणतात.२०. हाच ब्रह्मणस्पति होय. वाणी हेंच ब्रह्म, तिचा पति ह्मणून याला ब्रह्मणस्पति ह्मणतात.२१. हाच साम होय. वाणी ही सा [=सर्व स्त्रीवाचक शब्द] आणि हा प्राण अम [=सर्व पुरुषवाचक शब्द]. सा आणि अम मिळून सामाला सामत्व येतें. अथवा हा अत्यंत सूक्ष्म प्राण्याएवढा आहे, मशकाएवढा आहे, हत्तीएवढा आहे, या तीन लोकांएवढा आहे, अथवा या सर्व विश्वाएवढा आहे ह्मणून याला साम ह्मणतात. जो या प्रकारें सामरूपी प्राण जाणतो त्याला सामाचें सायुज्य व सालोक्य प्राप्त होतें.२२. अथवा हाच प्राण उद्गीथ [सामावयव भक्तिविशेष]. उत् ह्मणजे प्राण, त्यानें हें सर्व जगत् धारण केलें आहे आणि वाणी ही गीथा. उत्+गीथा=उद्गीथ:२३. या विषयीं अशी आख्यायिका आहे– चैकितानाचा पुत्र ब्रह्मदत्त यज्ञामध्यें सोम भक्षण करीत असतां राजाला ह्मणाला, "पूर्वकालीन सत्रामध्यें हा अयास्य आंगिरस उद्गाता या वाक्संयुक्त प्राणानेंच उद्गान करिता झाला. जर इतर देवतेनें त्यानें उद्गान केलें असेल (आणि ह्मणून मी खोटें बोलत असेन) तर मी

स प्राणेन चोद्गायदिति ॥२४॥ तस्य हैतस्य साम्नो यः स्वं वेद भवति हास्य स्वं तस्य वै स्वर एव स्वं तस्मादार्त्विज्यं करिष्यन्वाचि स्वरमिच्छेत तया वाचा स्वरसंपन्नयार्त्विज्यं कुर्यात्तस्माद्यज्ञे स्वरवन्तं दिदृक्षन्त एव । अथो यस्य स्वं भवति भवति हास्य स्वं य एवमेतत्साम्नः स्वं वेद ॥२५॥ तस्य हैतस्य साम्नो यः सुवर्णं वेद भवति हास्य सुवर्णं तस्य वै स्वर एव सुवर्णं भवति हास्य सुवर्णं य एवमेतत्साम्नः सुवर्णं वेद ॥२६॥ तस्य हैतस्य साम्नो यः प्रतिष्ठां वेद प्रति ह तिष्ठति तस्य वै वागेव प्रतिष्ठा वाचि हि खल्वेष एतत्प्राणः प्रतिष्ठितो गीयतेऽन्न इत्यु हैक आहुः ॥२७॥ अथातः पवमानानामेवाभ्यारोहः स वै खलु प्रस्तोता साम प्रस्तौति स यत्र प्रस्तुयात्त-

भक्षण करीत असलेला हा सोम माझें मस्तक तोडून टाको." वाणी आणि प्राण यांनींच तो अयास्य आंगिरस उद्गान करिता झाला.२४. त्या या सामरूपी प्राणाचें धन जो जाणतो त्याला तें धन प्राप्त होतें. स्वर [कंठगत माधुर्य] हेंच सामाचें धन होय. ह्मणून उद्गान ऋत्विक्कर्म करूं इच्छिणारानें वाणीचे ठिकाणीं स्वराची इच्छा करावी. त्या स्वरसंपन्न वाणीनें ऋत्विक्कर्म करावें. ह्मणून ज्याचा स्वर (चांगला) असेल अशा उद्गात्याला पहाण्याची सर्व इच्छा करतात. ज्यापाशीं धन असतें त्याला सर्व पहाण्याची इच्छा करतात तद्वत्. हें सामाचें धन जो जाणतो त्याला तें प्राप्त होतें.२५. त्या या सामरूपी प्राणाचें सुवर्ण [वर्णज्ञानपूर्वक वर्णोच्चार] जो जाणतो त्याला सुवर्ण प्राप्त होतें. स्वर हेंच सामाचें सुवर्ण होय. हें या सामाचें सुवर्ण जो जाणतो त्याला सुवर्ण प्राप्त होतें.२६. त्या या सामाची प्रतिष्ठा [=वाक्=जिह्वामूलीयादि स्थानें] जो जाणतो तो प्रतिष्ठा पावतो. त्या सामाची वाक् हीच प्रतिष्ठा होय. कारण वाणीचे ठिकाणीं स्थित अशा प्राणाचें गायन केलें जातें. "अन्नाचे ठिकाणीं स्थित अशा प्राणाचें गायन केलें जातें" असेंहि कोणी ह्मणतात.२७. यानंतर पवमानाचा जप करावा तें सांगतात. प्रस्तोता

देतानि जपेदसतो मा सद्गमय तमसो मा ज्योतिर्गमय मृत्योर्मामृतं गमयेति स यदाहासतो मा सद्गमयेति मृत्युर्वा असत्सदमृतं मृत्योर्मामृतं गमयामृतं मा कुर्वित्येवैतदाह तमसो मा ज्योतिर्गमयेति मृत्युर्वै तमो ज्योतिरमृतं मृत्योर्मामृतं गमयामृतं मा कुर्वित्येवैतदाह मृत्योर्मामृतं गमयेति नात्र तिरोहितमिवास्ति । अथ यानीतराणि स्तोत्राणि तेष्वात्मनेऽन्नाद्यमागायेत्तस्मादु तेषु वरं वृणीत यं कामं कामयेत तं यस्मात्स एष एवंविदुद्गातात्मने यजमानाय वा यं कामं कामयते तमागायति तद्धैतल्लोकजिदेव न हैवालोक्यताया आशास्ति य एवमेतत्साम वेद ॥२८॥ इति तृतीयं ब्राह्मणम् ॥३॥

आत्मैवेदमग्र आसीत् पुरुषविधः सोऽनुवीक्ष्य नान्यदात्मनोऽ-

जेव्हां सामाला आरंभ करतो तेव्हां या तीन यजूंचा जप करावा. 'असतो मा सद्गमय,' 'तमसो मा ज्योतिर्गमय,' आणि 'मृत्योर्मामृतं गमय' या त्या तीन यजू. 'असतो मा सद्गमय' या मंत्रामध्यें असत् ह्मणजे मृत्यु आणि सत् ह्मणजे अमृत. मला मृत्यूपासून अमृत्यूकडे [=अमृताकडे] ने, मला मृत्युरहित कर, असा अर्थ. 'तमसो मा ज्योतिर्गमय' यामध्यें तम ह्मणजे मृत्यु आणि ज्योति ह्मणजे अमृत. मला मृत्यूपासून अमृत्यूकडे ने, मला मृत्युरहित कर, असा अर्थ. 'मृत्योर्मामृतं गमय' यानेंहि तेंच सांगितलें. पहिल्या व दुसऱ्या मंत्रांप्रमाणें तिसऱ्यामध्यें अर्थ गूढ नाहीं. आतां जीं इतर स्तोत्रें आहेत त्यांमध्यें स्वतःकरितां अन्नाचें गान करावें. उद्गाता याप्रकारें हें जाणणारा [=प्राणवित्] असतो ह्मणून स्वतःला अथवा यजमानाला ज्या वराची इच्छा असेल त्या वराची प्रार्थना करावी ती या गानानें सिद्ध होते. हें प्राणदर्शन लोकप्राप्ति करून देणारें आहे. जो या प्रकारे हें साम जाणतो तो अलोकत्वाची कधींहि प्रार्थना करीत नाहीं.२८.

हें सर्व आरंभीं फक्त आत्मा [=प्रथमशरीरी प्रजापति] होतें. हा आत्मा (मस्तकहस्तादि लक्षणी) पुरुष होता. तो पाहूं लागला पण त्याला

पश्यत् सोऽहमस्मीत्यग्रे व्याहरत्ततोऽहंनामाभवत्तस्मादप्येतर्ह्यामंत्रितो-ऽहमयमित्येवाग्र उक्त्वाथान्यन्नाम प्रब्रूते यदस्य भवति स यत्पूर्वोऽ-स्मात्सर्वस्मात्सर्वान्पाप्मन औषत्तस्मात्पुरुष ओषति ह वै स तं योऽ-स्मात्पूर्वो बुभूषति य एवं वेद ॥१॥ सोऽबिभेत्तस्मादेकाकी बिभेति स हायमीक्षांचक्रे यन्मदन्यन्नास्ति कस्मान्नु बिभेमीति तत एवास्य भयं वियाय कस्माद्ध्यभेष्यत् द्वितीयाद्वै भयं भवति ॥२॥ स वै नैव रेमे तस्मादेकाकी न रमते स द्वितीयमैच्छत् स हैतावानास यथा स्त्रीपुमांसौ संपरिष्वक्तौ स इममेवात्मानं द्वेधा पातयत्ततः पतिश्च

आपल्यावांचून दुसरी कांहीं वस्तु आढळली नाहीं. तो पूर्वजन्मींचा सर्वात्मा प्रजापति मी आहें असें (ज्ञान होऊन तसें) तो बोलला. ह्मणून त्याचें 'अहं' असें नांव झालें. ह्मणून अद्याप देखील कोणाला 'कोण?' ह्मणून विचारलें असतां तो 'अहं=मी' असें अगोदर सांगून नंतर आपलें जें इतर नांव असेल तें सांगतो. ज्या अर्थीं हा या सर्वांच्या प्रारंभीं होता व यानें सर्व पापाचें दहन केलें त्या अर्थीं याला 'पुरुष' [पूर्वं ओषति] ह्मणतात. याच्याहून पूर्वींचा प्रजापति होण्याची इच्छा करणाराला देखील, हें पुरुषाचें ज्ञान झालेला विद्वान् भस्म करतो. १. त्या प्रजापतीला भय वाटलें. ह्मणून अद्याप मनुष्य एकटा असला ह्मणजे त्याला भय वाटतें. मग त्यानें पाहिलें कीं, ज्या अर्थीं माझ्याखेरीज इतर कोणीहि नाहीं त्या अर्थीं मला कोणाची भीति असणार? तेव्हां त्याची भीति गेली. त्याला भय कसलें होतें? (कसलेंच नव्हतें. अविद्येमुळें भय वाटलें). (आपणाहून) इतर वस्तूचें भय वाटतें (अथवा आत्म्याहून इतर कांहीं आहे अशी कल्पना असेल तर त्यापासून ह्मणजे अविद्येपासून भय वाटतें). २. त्या प्रजापतीला (दुसरी कांहीं वस्तु नसल्यामुळें) रममाण होतां आलें नाहीं. ह्मणून अद्याप एकाकी मनुष्याला रममाण होतां येत नाहीं. त्याला जोडी-दाराची इच्छा झाली. एकमेकांशीं आसक्त अशीं स्त्री व पुरुष दोघें

पत्नी चाभवतां तस्मादिदमर्धबृगलमिव स्व इति ह स्माह याज्ञवल्क्य-
स्तस्मादयमाकाशः स्त्रिया पूर्यत एव ताꣳ समभवत्ततो मनुष्या अजा-
यन्त ॥३॥ सो हेयमीक्षांचक्रे कथं नु मात्मन एवमजनयित्वा
संभवति हन्त तिरोऽसानीति सा गौरभवदृषभ इतरस्ताꣳ समेवाभ-
वत्ततो गावोऽजायन्त वडवेतराभवदश्ववृष इतरो गर्दभीतरा गर्दभ
इतरस्ताꣳ समेवाभवत्तत एकशफमजायताऽजेतराभवद्वस्त इतरोऽ-
विरितरा मेष इतरस्ताꣳ समेवाभवत्ततोऽजावयोऽजायन्तैवमेव यदिदं
किंच मिथुनमापिपीलिकाभ्यस्तत्सर्वमसृजत ॥४॥ सोऽवेदहं वाव
सृष्टिरस्म्यहꣳ हीदꣳ सर्वमसृक्षीति ततः सृष्टिरभवत्सृष्ट्याꣳ हास्यै-

मिळून ज्या परिमाणाचीं असतात त्या परिमाणाचें रूप प्रजापति पावला. असें दोन प्रकारचे रूप प्रजापति पावला. तेव्हां पति व पत्नी हीं झालीं. ह्मणून स्त्री हें पुरुषाचें अर्धे पान आहे असें याज्ञवल्क्यानें ह्मटलें आहे. ह्मणून हें पुरुषरूपी अर्धे आकाश स्त्रीनें पूर्ण केले आहे [=स्त्रीरूपी दुसरें अर्ध मिळून पूर्ण होतें]. या (मनु) प्रजापतीने त्या स्त्रीशीं संयोग केला. त्यापासून मनुष्य निर्माण झाले.३. त्या स्त्रीनें पाहिलें कीं, मला आप-ल्यापासूनच उत्पन्न करून माझ्याशींच हा संयोग कसा करतो? तर मग मी दुसऱ्या कशाच्या तरी रूपानें लपून रहातें. असा विचार करून ती गाय झाली. तेव्हां तो प्रजापति बैल झाला व तिच्याशीं संयुक्त झाला. तेव्हां बैल व गाई निर्माण झाल्या. ती स्त्री घोडी झाली तेव्हां तो प्रजा-पति घोडा झाला. ती गाढवी झाली व तो गाढव झाला. सर्वत्र तिच्याशींच संयुक्त झाला. त्यापासून हे एक खुराचे प्राणी उत्पन्न झाले. नंतर ती शेळी झाली व तो बोकड झाला. ती मेंढी झाली व तो मेंढा झाला. त्यांपासून शेळ्या व मेंढ्या उत्पन्न झाल्या. या प्रकारें मुंग्यांपासून तो अगदीं मोठ्या प्राण्यापर्यंत सर्व प्राणी स्त्रीपुरुषरूपानें त्यांनीं निर्माण केले.४. त्या प्रजापतीला वाटलें कीं, ही सर्व सृष्टि मीच आहें. कारण हें सर्व मींच

तस्यां भवति य एवं वेद ॥५॥ अथेत्यभ्यमन्थत्स मुखाच्च योनेर्हस्ताभ्यां चाग्निमसृजत तस्मादेतदुभयमलोमकमन्तरतोऽलोमका हि योनिरन्तरतः। तद्यदिदमाहुरमुं यजामुं यजेत्येकैकं देवमेतस्यैव सा विसृष्टिरेष उ ह्येव सर्वे देवाः। अथ यत्किंचेदमार्द्रं तद्रेतसोऽसृजत तदु सोम एतावद्वा इदं सर्वमन्नं चैवान्नादश्च सोम एवान्नमग्निरन्नादः सैषा ब्रह्मणोऽतिसृष्टिः। यच्छ्रेयसो देवानसृजताथ यन्मर्त्यः सन्नमृतानसृजत तस्मादतिसृष्टिरतिसृष्ट्या हास्यैतस्यां भवति य एवं वेद ॥६॥ तद्धेदं तर्ह्यव्याकृतमासीत्तन्नामरूपाभ्यामेव व्याक्रियतासौनामायमिदंरूप इति तदिदमप्येतर्हि नामरूपाभ्यामेव व्याक्रियतेऽ-

उत्पन्न केले, ह्मणून त्यापासून सृष्टि झाली. हें सर्व जाणतो तो या सृष्टीमध्यें (प्रजापतीप्रमाणें) होतो.५. नंतर त्यानें मुखाचें हातांनीं मंथन करून त्या मुखरूपी उत्पत्तिकारणापासून अग्नि उत्पन्न केला. यज्ञकर्मामध्यें अमुक (अग्नीचें) यजन करा, अमुक (इंद्राचें) यजन करा इत्यादि ह्मणतात तेव्हां तो प्रत्येक देव भिन्न आहे असें समजतात. परंतु ही सर्व सृष्टि याच प्रजापतीनें निर्माण केलेली आहे. हाच सर्व देव होय. नंतर जें ह्मणून आर्द्र आहे तें सर्व प्रजापतीनें आपल्या रेतापासून उत्पन्न केलें. तें सोम होय. हें सर्व अन्न आणि सोम हा हें अन्न भक्षण करणारा. जें ह्मणून भक्षण केले जातें तें सोम आणि अग्नि हा तें भक्षण करणारा. ही प्रजापतीची अतिसृष्टि [अति=स्वतःहून अधिक] होय. ज्या अर्थीं स्वतःहून अधिक प्रसंशनीय अशा देवांना त्यानें उत्पन्न केलें आणि स्वतः मर्त्य असून अमर देवाना उत्पन्न केलें त्या अर्थीं हिला अतिसृष्टि ह्मणतात. हें जो जाणतो तो या अतिसृष्टीमध्यें (प्रजापतीप्रमाणें) होतो.६. ते हें बीजरूप जगत् त्या काळीं अव्याकृत [अस्पष्ट] होतें. आत्मा स्वतःच "याचें अमुक नांव व याचें अमुक रूप" अशा प्रकारें नाम व रूप यांनीं व्याकृत [=स्पष्ट] असें तें (जगत्) झाला. ह्मणून अद्यापि देखील "याचें अमुक

सौनामायमिदंरूप इति स एष इह प्रविष्ट आनखाग्रेभ्यो यथा क्षुरः क्षुरधानेऽवहितः स्याद्विश्वंभरो वा विश्वंभरकुलाये तं न पश्यन्ति । अकृत्स्नो हि स प्राणन्नेव प्राणो नाम भवति वदन् वाक्पश्यंश्चक्षुः शृण्वꣳ श्रोत्रं मन्वानो मनस्तान्यस्यैतानि कर्मनामान्येव । स योऽत एकैकमुपास्ते न स वेदाकृत्स्नो ह्येषोऽत एकैकेन भवत्यात्मेत्येवोपासीतात्र ह्येते सर्व एकं भवन्ति । तदेतत्पदनीयमस्य सर्वस्य यदयमात्मानेन ह्येतत्सर्वं वेद । यथा ह वै पदेनानुविंदेदेवं कीर्तिꣳ श्लोकं विंदते

नांव व याचें अमुक रूप'' अशा प्रकारेंच कोणीहि व्याकृत होतो. तो ह आत्मा येथें सर्वत्र (ब्रह्मादिस्तंबपर्यंत) प्रविष्ट झालेला आहे. ज्याप्रमाणें धोपटीमध्यें वस्तरा (नेमका) ठेवलेला असतो अथवा ज्याप्रमाणें अग्नि काष्ठादिकांचे ठिकाणीं व्याप्त असतो त्याप्रमाणें नखांच्या अग्रांपासून सर्व शरीरभर (विशेषत: व सामान्यत:) आत्मा व्यापलेला आहे. तो हा शरीरस्थ आत्मा (अज्ञान्यांना) दिसत नाहीं [प्राणनक्रियाविशिष्ट दिसतो परंतु सर्वव्यापी दिसत नाहीं]. प्राणनक्रिया करणारा तोच प्राण हे नाम पावतो. ह्मणून हा अ—समस्त होय. बोलण्याची क्रिया करते ह्मणून वाक्, पहाण्याचें काम करतो ह्मणून चक्षु, श्रवणाचें काम करतें ह्मणून श्रोत्र आणि मननाचें काम करतें ह्मणून मन, हीं (प्राणादि) आत्म्याचीं क्रियेमुळें झालेलीं नांवें आहेत. यांपैकीं एकेकाला हाच आत्मा असें जो समजतो त्याला आत्म्याचें ज्ञान झालेलें नाहीं. कारण असा हा अ—समस्त आत्मा होय. असा तो एकेका (इंद्रियाच्या) गुणानें विशिष्ट होतो. (सर्व इंद्रियांनीं विशिष्ट) अशा आत्म्याच्या (पूर्ण) रूपानेंच तो जाणावा. कारण या आत्म्यामध्यें सर्व इंद्रियें एक होतात. या सर्वांमध्यें या आत्म्याकडेच गमन करावें. हेच आत्मतत्त्व होय. या आत्म्याचें ज्ञान झालें ह्मणजे सर्व (वस्तुमात्राचें) ज्ञान होतें. ज्याप्रमाणें हरवलेला पशु खुरांच्या खुणेनें सांपडतो त्याप्रमाणें हें आत्मज्ञान जो जाणतो तो (त्या ज्ञानानें) कीर्ति आणि इष्ट

य एवं वेद ॥७॥ तदेतत्प्रेयः पुत्रात्प्रेयो वित्तात्प्रेयोऽन्यस्मात्सर्व-स्मादंतरतरं यदयमात्मा । स योऽन्यमात्मनः प्रियं ब्रुवाणं ब्रूयात् प्रियं रोत्स्यतीतीश्वरो ह तथैव स्यादात्मानमेव प्रियमुपासीत स य आत्मा-नमेव प्रियमुपास्ते न हास्य प्रियं प्रमायुकं भवति ॥८॥ तदाहुर्य-द्ब्रह्मविद्यया सर्वं भविष्यन्तो मनुष्या मन्यन्ते । किमु तद्ब्रह्माऽवेद्यस्मा-त्तत्सर्वमभवदिति ॥९॥ ब्रह्म वा इदमग्र आसीत् तदात्मानमेवा-वेत् अहं ब्रह्मास्मीति । तस्मात्तत् सर्वमभवत् तद्यो यो देवानां प्रत्य-बुध्यत स एव तदभवत्तथर्षीणां तथा मनुष्याणां तद्धैतत्पश्यन्नृषिर्वा-मदेवः प्रतिपेदेऽहं मनुरभवꣳ सूर्यश्चेति । तदिदमप्येतर्हि य एवं

माणसांची प्राप्ति यांनीं युक्त होतो.७. हें आत्मतत्त्व पुत्राहून अधिक प्रिय आहे, वित्ताहून अधिक प्रिय आहे, इतर सर्वांहून अधिक प्रिय आहे. हा आत्मा (निकट जीं प्राणादि त्यांचेहून) अत्यंत निकट आहे. आत्म्याहून इतर (पुत्रवित्तादि) प्रिय आहेत असें जो कोणी ह्मणेल त्याला आत्मतत्त्व-ज्ञानें ह्मणावें कीं, तुझें (पुत्रवित्तादि) प्रिय नाश पावेल. कारण तो (आत्मतत्त्वज्ञ) असें ह्मणण्यास समर्थ आहे. तो बोलतो त्याप्रमाणेंच होई-लच. आत्माच (सर्वांहून अधिक) प्रिय आहे असें जाणावें. हें जाणणाऱ्या मनुष्याचीं प्रिय (पुत्रवित्तादि) नाश पावत नाहींत.८. याविषयीं ब्रह्मज्ञ ह्मणतात "ब्रह्मविद्येनें आह्मी सर्व [=ब्रह्म] होऊं" असें जें मनुष्य ह्मणतात, त्या ब्रह्मानें (स्वतः) काय ज्ञान करून घेतलें कीं जेणेंकरून तें सर्व [=ब्रह्म] झालें ? ९. (उत्तर–) आरंभीं हें सर्व ब्रह्मच होतें [ह्मणजे त्यानें जाणण्या-योग्य वस्तु दुसरी कोणती नव्हती]. त्या ब्रह्मानें "मीं ब्रह्म व्हावें" या प्रकारें स्वतःलाच जाणलें. ह्मणून तें हें सर्व (जगत्) झालें. तेव्हां देवां-पैकीं ज्यानें ज्यानें (आत्म्याला) जाणलें तो तो ब्रह्मरूप झाला. त्याचप्रमाणें ऋषि व मनुष्य (आत्मज्ञानानें) ब्रह्मरूप झाले. हें ब्रह्मज्ञान झालेल्या वाम-देव ऋषींना "अहं मनुरभवं सूर्यश्चेति०" इत्यादि मंत्रांचें दर्शन झालें [ह्म०

वेदाहं ब्रह्मास्मीति स इदꣳ सर्वं भवति तस्य ह न देवाश्च नाभूत्या ईशते । आत्मा ह्येषाꣳ स भवत्यथ योऽन्यां देवतामुपास्तेऽन्योऽसावन्योऽहमस्मीति न स वेद यथा पशुरेवꣳ स देवानाम् । यथा ह वै बहवः पशवो मनुष्यं भुंज्युरेवमेकैकः पुरुषो देवान् भुनक्त्येकस्मिन्नेव पशावादीयमानेऽप्रियं भवति किमु बहुषु तस्मादेषां तन्न प्रियं यदेतन्मनुष्या विद्युः ॥१०॥ ब्रह्म वा इदमग्र आसीदेकमेव तदेकꣳ सन्न व्यभवत् । तच्छ्रेयो रूपमत्यसृजत क्षत्रं यान्येतानि देवत्रा क्षत्राणींद्रो वरुणः सोमो रुद्रः पर्जन्यो यमो मृत्युरीशान इति । तस्मात् क्षत्रात्परं नास्ति तस्माद्ब्राह्मणः क्षत्रियमधस्तादुपास्ते राजसूये क्षत्र

ब्रह्मज्ञानी सर्वरूप होतो]. याप्रमाणेंच अद्याप देखील "मी ब्रह्म आहें" असें ब्रह्मज्ञान ज्याला होतें तो हें सर्व होतो. त्याला ब्रह्माचा सर्व भाव प्राप्त करूं न देण्याला देव देखील समर्थ होत नाहींत. कारण या देवांचें ध्येय जें ब्रह्म तें तो झालेला असतो. परंतु जो (अब्रह्मज्ञानी) ब्रह्माहून व्यतिरिक्त इतर देवतेची "ती देवता वेगळी व मी वेगळा" अशा प्रकारें उपासना करतो तो तत्त्व जाणत नाहीं. जसा पशु (वाहनदोहनादिकांनीं उपभोग्य असतो) तसाच तो देवांना (उपभोग्य) होय. ज्याप्रमाणें (गाई, बैल इत्यादि) अनेक पशु मनुष्याचें पालन करतात त्याप्रमाणें प्रत्येक (अज्ञानी) मनुष्य देवांचें पालन करतो. ज्याप्रमाणें (पुष्कळ पशु बाळगणाऱ्या) मनुष्याला (देखील) एक जरी पशु (व्याघ्रादिकानें) नेला तरी दुःख होतें, पुष्कळ नेल्यास तर होतेंच होतें, त्याप्रमाणें मनुष्यांना ब्रह्मज्ञान झालें असतां देवांना प्रिय वाटत नाहीं [कारण यांचीं यज्ञयागादि कर्में बंद होतात].

१० आरंभीं (फक्त) हें (ब्राह्मणाभिमानी) ब्रह्मच होतें. तें एकटेंच तें होतें. एकटें (कर्म करण्यास) पुरेसें होईना. म्हणून त्यानें (ब्राह्मणानंतर) प्रशस्तरूप अशा क्षत्रियांना निर्माण केलें. क्षत्रिय म्हणजे देवांमध्यें प्रसिद्ध जे हे इंद्र, वरुण, सोम, रुद्र, पर्जन्य, यम, मृत्यु आणि

एव तद्यशो दधाति सैषा क्षत्रस्य योनिर्यद्ब्रह्म । तस्माद्यद्यपि राजा परमतां गच्छति ब्रह्मैवान्तत उपनिश्रयति स्वां योनिं य उ एनꣳ हिनस्ति स्वाꣳ स योनिमृच्छति स पापीयान् भवति यथा श्रेयांसꣳ हिꣳसित्वा ॥११॥ स नैव व्यभवत् स विशमसृजत यान्येतानि देवजातानि गणश आख्यायन्ते वसवो रुद्रा आदित्या विश्वेदेवा मरुत इति ॥१२॥ स नैव व्यभवत् स शौद्रं वर्णमसृजत पूषणमियं वै पूषेयꣳ हीदꣳ सर्वं पुष्यति यदिदं किंच ॥१३॥ स नैव व्यभवत्तच्छ्रेयोरूपमत्यसृजत धर्मं तदेतत् क्षत्रस्य क्षत्रं यद्धर्मस्तस्माद्धर्मात्परं

ईशान ते होत. ह्मणून क्षत्रियाहून अधिक श्रेष्ठ कोणी नाहीं. ह्मणून ब्राह्मण देखील (क्षत्रियाच्या उत्पत्तीला कारण असूनहि) स्वतः खालीं बसून उच्चस्थानीं बसलेल्या क्षत्रियाचें राजसूय यज्ञामध्यें पूजन करतो. क्षत्रियच तें (ब्रह्माचें) यश स्थापित करतो. क्षत्रियाचें उत्पत्तिकारण हें ब्रह्म (ह्मणजे ब्राह्मण जाति) होय. ह्मणून जरी राजा (राजसूय यज्ञामध्यें) पूज्यस्थान पावला तरी (यज्ञाचे) अखेरीस ब्राह्मणजातीचाच आश्रय करतो. जो राजा या स्वोत्पत्तिकारण ब्राह्मणाचा अनादर करतो त्याच्या संततीचा तेणेंकरून नाश होतो. श्रेयस्कराचा विनाश केला असतां जसें पाप लागतें त्याप्रमाणें तोहि पापानें युक्त होतो.११. तरी तें ब्रह्म (सर्व) कर्म करण्यास समर्थ झालें नाहीं. ह्मणून त्यानें वैश्यांना निर्माण केलें. वैश्य ह्मणजे जे हे देवजातिभेद गणरूपानें सांगितले जातात ते वसु, रुद्र, आदित्य, विश्वेदेव आणि मरुत् हे होत.१२. तरी तें ब्रह्म (सर्व) कर्म करण्यास समर्थ झालें नाहीं. ह्मणून त्याने पूषण नामक शूद्र वर्ण निर्माण केला. तो पूषा ह्मणजे ही पृथिवी होय. कारण हीच हें जें ह्मणून कांहीं आहे त्याचें पोषण करते.१३. तरी ते सर्व कर्म करण्यास समर्थ झालें नाहीं. ह्मणून त्यानें श्रेयोरूप धर्म निर्माण केला. हा धर्म क्षत्रियाचा देखील नियन्ता आहे. ह्मणून धर्माहून अधिक (श्रेष्ठ) कांहीं नाहीं. या धर्माचे योगानें बलहीन बलवंताला

नास्त्यथो अबलीयान् बलीयांसमाशंसते धर्मेण यथा राज्ञैवं यो वै स धर्मः सत्यं वै तत्तस्मात् सत्यं वदन्तमाहुर्धर्मं वदतीति धर्मं वा वदन्तꣳ सत्यं वदतीत्येतद्ध्येवैतदुभयं भवति ॥१४॥ तदेतद्ब्रह्म क्षत्रं विट् शूद्रस्तदग्निनैव देवेषु ब्रह्माभवद्ब्राह्मणो मनुष्येषु क्षत्रियेण क्षत्रियो वैश्येन वैश्यः शूद्रेण शूद्रस्तस्मादग्नावेव देवेषु लोकमिच्छन्ते ब्राह्मणे मनुष्येष्वेताभ्याꣳ हि रूपाभ्यां ब्रह्माभवत् । अथ यो ह वा अस्माल्लोकात्स्वं लोकमदृष्ट्वा प्रैति स एनमविदितो न भुनक्ति यथा वेदो वाननूक्तोऽन्यद्वा कर्माकृतं यदिह वा अप्यनेवंविन्महत्पुण्यं कर्म करो-

देखील (जिंकण्याची) आशा करतो; ज्याप्रमाणे (बलहीन) मनुष्य राजाच्या जोरावर बलवंताशीं स्पर्धा करूं शकतो तद्वत्. असा जो (सर्वबलवत्तर) धर्म तो 'सत्य' [=यथाशास्त्रता] होय. ह्मणून कोणी सत्य [=यथाशास्त्र] बोलत असला ह्मणजे "धर्म बोलत आहे" असे ह्मणतात; तसेंच धर्म सांगत असला ह्मणजे 'सत्य' बोलत आहे असें ह्मणतात. ह्मणून (ज्ञान आणि अनुष्ठानरूपी) असा दोन्ही प्रकारचा हा एकच धर्म होय.१४. तें हें चातुर्वर्ण्य ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र होय. ते देवांमध्यें अग्निरूपानें ब्राह्मणजाति झालें; मनुष्यांमध्यें ब्राह्मणरूपानें ब्राह्मण झालें, क्षत्रियरूपानें क्षत्रिय झाले, वैश्यरूपाने वैश्य झालें, शूद्ररूपाने शूद्र झालें. ह्मणून देवांमध्यें अग्निसंबंधी कर्म करून कर्मफलाची इच्छा करतात; आणि मनुष्यांमध्यें (अग्निनिमित्त क्रिया न करतां) ब्राह्मणत्वानेंच (जपादिकांनीं) कर्मफलाची इच्छा करतात. कारण या (अग्नि व ब्राह्मण यांच्या) रूपानें ब्रह्म प्रकट झाले. जो मनुष्य इहलोकामध्यें ('मी ब्रह्म आहें') असें स्वतःचें (ज्ञानरूपी) फल प्राप्त न होतां मरण पावतो त्याला याचें [ब्रह्माचें] ज्ञान न झाल्यामुळें (शोकादिकांचें निवर्तन करून) स्वतःचे पालन करतां येत नाहीं. ज्याप्रमाणें अध्ययन न केलेला वेद अथवा इतर (कृषिकर्मादि) न केलेलें कर्म (कांहीं फल देत नाहीं व त्यामुळें मनुष्याचे) पालन करीत नाहीं तद्वत्. या जगा-

ति तद्धास्यांततः क्षीयत एवात्मानमेव लोकमुपासीत स य आत्मानमेव लोकमुपास्ते न हास्य कर्म क्षीयते । अस्माद्ध्येवात्मनो यद्यत्कामयते तत्तत्सृजते ॥१५॥ अथो अयं वा आत्मा सर्वेषां भूतानां लोकः स यज्जुहोति यद्यजते तेन देवानां लोकोऽथ यदनुब्रूते तेन ऋषीणामथ यत्पितृभ्यो निपृणाति यत्प्रजामिच्छते तेन पितृणामथ यन्मनुष्यान्वासयते यदेभ्योऽशनं ददाति तेन मनुष्याणामथ यत्पशुभ्यस्तृणोदकं विन्दति तेन पशूनां यदस्य गृहेषु श्वापदा वयांस्यापिपीलिकाभ्य उपजीवन्ति तेन तेषां लोको यथा ह वै स्वाय लोकायारिष्टिमिच्छेदेवꣳ हैवंविदे सर्वाणि भूतान्यरिष्टिमिच्छन्ति तद्वा एतद्विदितं मीमांसितम् ॥१६॥ आत्मैवेदमग्र आसीदेक एव सोऽका-

मध्यें आत्मज्ञान न जाणणाऱ्या कोणीं पुष्कळ पुण्यकर्म केलें, तरी अखेरीस (फलोपभोगानंतर) ते क्षय पावतें. ह्मणून, (सर्व कर्मांचें व ज्ञानाचें) फल आत्मा [=आत्मज्ञान] हेंच आहे असें जाणावें. जो हें आत्मज्ञान जाणतो त्याचें कर्म कधीं क्षय पावत नाहीं. त्याला जी जी इच्छा होते ती ती या आत्म्याचेच योगानें तो पूर्ण करतो. १५. हा शरीरेंद्रियविशिष्ट (गृहस्थाश्रमी कर्म करणारा) पिंड [आत्मा] (देवांपासून मुंग्यांपर्यंत) सर्व प्राण्यांचा भोग्य पदार्थ होय. तो जें हवन करतो व यजन करतो त्याचे योगानें देवांचा भोग होतो. तो जें स्वाध्यायाचें अध्ययन करतो त्यानें ऋषींचा भोग होतो. जे पितरांना पिंड देतो व प्रजोत्पत्ति करतो त्यानें पितरांचा भोग होतो. मनुष्यांना रहाण्यास आश्रय देतो अथवा त्यांना अन्न देतो त्यानें मनुष्यांचा भोग होतो. जें पशूंना तृण व उदक देतो त्यानें पशूंचा भोग होतो. त्याच्या घरामध्यें मुंगीपासून तों सर्व श्वापदें व पक्षी उपजीविका करतात त्यानें त्यांचा भोग होतो. ज्याप्रमाणें स्वतःच्या देहाच्या अ–विनाशाची मनुष्य इच्छा करतो त्याप्रमाणे हे जाणणाऱ्या मनुष्याच्या अ–विनाशाची सर्व भूतमात्र इच्छा करतात. या (पंचमहायज्ञप्रकरणांत) सांगितलेल्या

मयत जाया मे स्यादथ प्रजायेयाथ वित्तं मे स्यादथ कर्म कुर्वीयेत्येतावान् वै कामो नेच्छंश्चनातो भूयो विन्देत्तस्माद्प्येतर्ह्येकाकी कामयते जाया मे स्यादथ प्रजायेयाथ वित्तं मे स्यादथ कर्म कुर्वीयेति स यावदप्येतेषामेकैकं न प्राप्नोत्यकृत्स्न एव तावन्मन्यते तस्यो कृत्स्नता मन एवास्यात्मा वाग्जाया प्राणः प्रजा चक्षुर्मानुषं वित्तं चक्षुषा हि तद्विंदते श्रोत्रं दैवं श्रोत्रेण हि तच्छृणोत्यात्मैवास्य कर्मात्मना हि कर्म करोति स एष पांक्तो यज्ञः पांक्तः पशुः पांक्तः पुरुषः पांक्तमिदं सर्वं यदिदं किंच तदिदं सर्वमाप्नोति य एवं वेद ॥१७॥ इति चतुर्थं ब्राह्मणम्

कर्तव्यरूपी कर्माची मीमांसा (अवदानप्रकरणांत) केली आहे. १६. आरंभीं एकटा आत्माच [कोणत्या तरी वर्णाचा शरीरी मनुष्य] होता. आपणांला (कर्माधिकारप्राप्तीला कारण अशी) जाया असावी अशी त्याला इच्छा झाली; आपण प्रजा उत्पन्न करावी, आपणांला वित्त मिळावें, आपण कर्म करावें, अशी इच्छा झाली. एवढ्याच त्याला इच्छा होत्या. कारण इच्छा केली तरी याहून अधिक (कांहीं) प्राप्त होत नाहीं. ह्मणून अद्यापि देखील एकटा मनुष्य असला ह्मणजे त्याला आपणांला जाया असावी, आपणांला प्रजा व्हावी, वित्त मिळावें, कर्म करावें अशी इच्छा होते. यांपैकीं त्याला जरी एकच प्राप्त होण्याचें राहिलें तरी आपण अपूर्ण आहोंत असें त्याला वाटतें. त्याला पूर्णता पुढीलप्रमाणें येते—मन हाच याचा आत्मा, वाक ही जाया, प्राण ही प्रजा, चक्षु हें मानुष वित्त,—कारण चक्षूनें (गाय इत्यादि) मानुष वित्ताची उपलब्धि होते,— श्रोत्र हें दैवी वित्त, —कारण श्रोत्रानें तें दैवी वित्त (ह्मणजे ज्ञान) श्रवण करतां येतें,— शरीर हें कर्म, —कारण शरीरानें कर्म करतो,—असा हा पांक्त [पांच इंद्रियांनीं केलेला] यज्ञ होय. त्याचप्रमाणें पशु पांक्तच आहे, पुरुष पांक्तच आहे, हें सर्व जगत् ह्मणून जें कांहीं आहे तें सर्व पांक्तच आहे. हें (सर्व जगत् आत्मरूपानें) जो जाणतो त्याला हें सर्व प्राप्त होतें. १७.

यत्सप्तान्नानि मेधया तपसाजनयत्पिता । एकमस्य साधारणं द्वे देवानभाजयत् । त्रीण्यात्मनेऽकुरुत पशुभ्य एकं प्रायच्छत्तस्मिन्सर्वं प्रतिष्ठितं यच्च प्राणिति यच्च न । कस्मात्तानि न क्षीयन्तेऽद्यमानानि सर्वदा । यो वैतामक्षितिं वेद सोऽन्नमत्ति प्रतीकेन । स देवानपि गच्छति स ऊर्जमुपजीवतीति श्लोकाः ॥१॥ यत्सप्तान्नानि मेधया तपसाजनयत्पितेति मेधया हि तपसाऽजनयत्पिता । एकमस्य साधारणमितीदमेवास्य तत्साधारणमन्नं यदिदमद्यते स य एतदुपास्ते न स पाप्मनो व्यावर्तते मिश्रꣳ ह्येतत् । द्वे देवानभाजयदिति हुतं च प्रहुतं च तस्माद्देवेभ्यो जुह्वति च प्र च जुह्वत्यथो आहुर्दर्शपूर्णमासाविति । तस्मान्नेष्टियाजुकः स्यात्पशुभ्य एकं प्रायच्छदिति तत्पयः । पयो

प्रजापतीनें ज्ञानानें आणि कर्मानें (जगामध्यें) सात प्रकारचें अन्न उत्पन्न केलें. एक साधारण अन्न; देवांकरिता दोन प्रकारचें अन्न; तीन प्रकारचें स्वतःकरितां; एक पशूंना दिलें; यामध्यें सर्व प्राणन करणारे व न करणारे स्थित आहेत. हीं सर्वदा खाल्लीं जात असून अद्याप क्षय का पावत नाहींत ? (अन्न) क्षय न पावण्याचें कारण जो जाणतो तो (निरंतर) मुखानें अन्न खातो. तो देवरूप होतो आणि मृत्युरहित असा रहातो. १. प्रजापतीनें नाम व कर्म यांनीं अन्न उत्पन्न केलें हें प्रसिद्धच आहे. 'एक साधारण अन्न' ह्मणजे जें हें दररोज सर्व प्राणी भक्षण करतात तें. या अन्नाचे ठिकाणीं जो तत्पर होतो तो या पापापासून मुक्त होत नाहीं. कारण हें सर्वांचें साधारण असतें [ह्म० एकानें खाल्लें तरी त्यावर सर्वांची आशा असते]. 'देवांचें दोन प्रकारचें अन्न' ह्मणजे एक (अग्नीमध्यें) हवन आणि दुसरें प्रहुत [=बलिहरण]. ह्मणून गृहस्थ देवांकरितां हवन आणि बलिहरण करतात. किंवा 'दोन प्रकारचें अन्न' ह्मणजे दर्शमास आणि पूर्णमास असाहि कोणी अर्थ करतात. याकरितां दर्शपूर्णमासरूपी अन्न देवांकरितां असल्यामुळें (काम्य) इष्टि कधीं करूं नये. 'पशूंचें अन्न' ह्मणजे दूध. कारण मनुष्य

ह्येवाग्रे मनुष्याश्च पशवश्चोपजीवन्ति तस्मात् कुमारं जातं घृतं वैवाग्रे प्रतिलेहयन्ति स्तनं वानुधापयन्त्यथ वत्सं जातमाहुरतृणाद इति । तस्मिन् सर्वं प्रतिष्ठितं यच्च प्राणिति यच्च नेति पयसि हीद१ँ सर्वं प्रतिष्ठितं यच्च प्राणिति यच्च न । तद्यदिदमाहुः संवत्सरं पयसा जुह्वदप पुनर्मृत्युं जयतीति न तथा विद्याद्यदहरेव जुहोति तदहः पुनर्मृत्युमपजयत्येवं विद्वान्सर्व१ँ हि देवेभ्योऽन्नाद्यं प्रयच्छति । कस्मात्तानि न क्षीयन्तेऽद्यमानानि सर्वदेति पुरुषो वा अक्षितिः स हीदमन्नं पुनः पुनर्जनयते । यो वै तामक्षितिं वेदेति पुरुषो वा अक्षितिः स हीदमन्नं धिया धिया जनयते कर्मभिर्यद्धैतन्न कुर्यात्क्षीयेत ह सोऽन्नमत्ति प्रतीकेनेति मुखं प्रतीकं मुखेनेत्येतत्स देवानपि गच्छति स ऊर्जमुपजीवतीति प्रशंसा ॥२॥ त्रीण्यात्मनेऽकुरुतेति मनो वाचं

व पशु हे (जन्मल्याबरोबर) प्रारंभीं दूधच पितात. ह्मणून मूल जन्मल्याबरोबर त्याला अगोदर तूप तरी चाटवितात किंवा (मातेच्या स्तनाचें) दूध पाजतात. ह्मणून नुकत्याच जन्मलेल्या वत्सास अतृणाद असेंहि ह्मणतात. प्राणन करणारे (प्राणी) व न करणारे (पर्वतादि) ह्मणजे सर्व जग दुधावरच अवलंबून आहे. इतर ब्राह्मणांमध्यें जें सांगितलें आहे कीं, "एक संवत्सरपर्यंत दुधानें हवन करणारा मृत्यु जिंकतो" तर तसें नाहीं. जो हें जाणतो तो केवळ एक दिवस दुधानें हवन करणारा देखील मृत्यु जिंकतो. कारण तो सर्वांत मुख्य अन्नाचें देवांना हवन करतो. हीं सर्वदा खाल्लीं जात असून अद्याप क्षय कां पावत नाहींत ? तर क्षय न पावण्याचें कारण 'पुरुष' होय. तो हें खाल्लेलें अन्न पुन्हां पुन्हां उत्पन्न करतो. पुरुष हेंच अन्न क्षय न पावण्याचें कारण होय. तो हें अन्न वेळोवेळीं बुद्धीने आणि कर्माने उत्पन्न करीत असतो. जर तो असें करणार नाहीं तर अन्नाचा क्षय होईल. "अन्नमत्ति प्रतीकेन" यांत प्रतीक ह्मणजे मुख. "तो देवरूप होतो आणि मृत्युरहित असा रहातो" ही प्रशंसा सांगितली.२. "स्वतःकरितां तीन

प्राणं तान्यात्मनेऽकुरुतान्यत्रमना अभूवं नादर्शमन्यत्रमना अभूवं नाश्रौषमिति मनसा ह्येव पश्यति मनसा शृणोति । कामः संकल्पो विचिकित्सा श्रद्धाऽश्रद्धा धृतिरधृतिर्ह्रीर्धीर्भीरित्येतत्सर्वं मन एव तस्मादपि पृष्ठत उपस्पृष्टो मनसा विजानाति यः कश्च शब्दो वागेव सा । एषा ह्यन्तमायत्तैषा हि न प्राणोऽपानो व्यान उदानः समानोऽन इत्येतत्सर्वं प्राण एवैतन्मयो वा अयमात्मा वाङ्मयो मनोमयः प्राणमयः ॥३॥ त्रयो लोका एत एव वागेवायं लोको मनोऽन्तरिक्षलोकः प्राणोऽसौ लोकः ॥४॥ त्रयो वेदा एत एव वागेवर्ग्वेदो मनो यजुर्वेदः प्राणः सामवेदः ॥५॥ देवाः पितरो मनुष्या एत एव वागेव देवा मनः पितरः प्राणो मनुष्याः ॥६॥ पिता माता प्रजैत एव मन एव

प्रकारचें अन्न'' ह्मणजे मन, वाणी व प्राण हीं होत. हीं त्यानें स्वतःकरितां केलीं. ''माझें मन दुसरीकडे होतें ह्मणून मीं (अमुक) पाहिलें नाहीं'' अथवा ''माझें मन दुसरीकडे होतें ह्मणून मीं ऐकलें नाहीं'' असें मनुष्य ह्मणतो. यावरून मनानेंच पहाण्याची व ऐकण्याची क्रिया करीत असतो. काम, संकल्प, विचिकित्सा [संशयज्ञान], श्रद्धा, अश्रद्धा, धैर्य, अधैर्य, लज्जा, बुद्धि, भीति हीं सर्व मनाचींच रूपें आहेत. ह्मणूनच प्राण्याला कोणीं पाठीमागून स्पर्श केला तरी मनाच्या योगानें तो जाणतो. जो ह्मणून ध्वनि त्याचें नांव वाणी. ही इतर सर्व वस्तूंना प्रकाशित करते ह्मणून हिला कोणी प्रकाशित करूं शकत नाहीं. जो ह्मणून श्वासोच्छ्वास करतो तो प्राण. प्राण, अपान, व्यान, उदान, समान हे सर्व प्राण होत. या प्रकारें हा आत्मा मनोमय, वाङ्मय आणि प्राणमय आहे.३. (वाणी, मन व प्राण) हेच तीन लोक होत. वाणी हा भूलोक, मन हा अन्तरिक्षलोक आणि प्राण हा स्वर्लोक.४. हेच तीन वेद होत. वाणी हा ऋग्वेद, मन हा यजुर्वेद आणि प्राण हा सामवेद.५. हेच देव, पितर व मनुष्य होत. वाणी हे देव, मन हे पितर आणि प्राण हे मनुष्य.६. हेच पिता, माता व प्रजा

पिता वाङ्माता प्राणः प्रजा ॥७॥ विज्ञातं विजिज्ञास्यमविज्ञातमेव एव यत् किंच विज्ञातं वाचस्तद्रूपं वाग्घि विज्ञाता वागेनं तद्भूत्वाऽवति ॥८॥ यत्किंच विजिज्ञास्यं मनसस्तद्रूपं मनो हि विजिज्ञास्यं मन एनं तद्भूत्वाऽवति ॥९॥ यत्किंचाविज्ञातं प्राणस्य तद्रूपं प्राणो ह्यविज्ञातः प्राण एनं तद्भूत्वाऽवति ॥१०॥ तस्यै वाचः पृथिवी शरीरं ज्योतीरूपमयमग्निस्तद्यावत्येव वाक्तावती पृथिवी तावानयमग्निः ॥११॥ अथैतस्य मनसो द्यौः शरीरं ज्योतीरूपमसावादित्यस्तद्यावदेव मनस्तावती द्यौस्तावानसावादित्यस्तौ मिथुनꣳ समैतां ततः प्राणोऽजायत स इंद्रः स एषोऽसपत्नो द्वितीयो वै सपत्नो नास्य

होत. मन हाच पिता, वाक् हीच माता आणि प्राण ही प्रजा.७. हेंच विज्ञात, विजिज्ञास्य आणि अविज्ञात होत. जें ह्मणून विज्ञात झालेलें आहे तें वाचेचें रूप, कारण वाक् हाच सर्व जाणणारा (विज्ञाता) आहे. हे जो जाणतो त्याचें, विज्ञातवस्तुरूप होत्साती वाक्, पालन करते.८. जें ह्मणून जाणण्याचा विषय [विजिज्ञास्य] असतें तें मनाचें रूप होय. कारण मन हेंच जाणण्याचा विषय आहे. हें जो जाणतो त्याचें, विजिज्ञास्यवस्तुरूप होत्सातें मन पालन करतें.९. जें ह्मणून अविज्ञात असतें तें प्राणाचें रूप होय. कारण प्राण हा अविज्ञात आहे. हें जो जाणतो त्याचें, अविज्ञातवस्तुरूप होत्साता प्राण रक्षण करतो.१०. या वाचेचें आधारभूत शरीर पृथिवी हें होय आणि हा (पार्थिव) प्रकाशरूप अग्नि हें आधेयभूत करण. वाचेचें परिमाण जितकें आहे तितकेंच या पृथ्वीचें व या अग्नीचें परिमाण आहे.११. या मनाचें आधारभूत शरीर द्युलोक हें होय आणि हा प्रकाशरूप आदित्य हें आधेयभूत करण. मनाचें परिमाण जितकें आहे तितकेंच या द्युलोकाचे व या आदित्याचें परिमाण आहे. ते अग्नि व आदित्य (ह्मणजे वाक् आणि मन) संयोग पावते झाले व त्यांचेपासून वायु (ह्मणजे प्राण) उत्पन्न झाला. तोच इंद्र होय. त्याला कोणीहि प्रतिस्पर्धी नव्हता.

सपत्नो भवति य एवं वेद ॥१२॥ अथैतस्य प्राणस्यापः शरीरं ज्योतीरूपमसौ चंद्रस्तद्यावानेव प्राणस्तावत्य आपस्तावानसौ चंद्रस्त एते सर्व एव समाः सर्वेऽनंताः स यो हैतानन्तवत उपास्तेऽतवन्तꣳ स लोकं जयत्यथ यो हैताननंतानुपास्तेऽनन्तꣳस लोकं जयति ॥१३॥ स एष संवत्सरः प्रजापतिः षोडशकलस्तस्य रात्रय एव पंचदश कला ध्रुवैवास्य षोडशी कला स रात्रिभिरेवा च पूर्यतेऽप च क्षीयते सोऽमावास्यां रात्रिमेतया षोडश्या कलया सर्वमिदं प्राणभृदनुप्रविश्य ततः प्रातर्जायते तस्मादेतां रात्रिं प्राणभृतः प्राणं न विच्छिंद्यादपि कृकलासस्यैतस्या एव देवताया अपचित्यै ॥१४॥ यो वै स संवत्सरः प्रजापतिः षोडशकलोऽयमेव स योऽयमेवंवित्पुरुषस्तस्य वित्त-

कारण दुसरा कोणी प्रतिपक्षी असेल तर सपत्न ह्मणतात. याप्रमाणें (प्राणाला) जो जाणतो त्याला कोणी प्रतिस्पर्धी होत नाहीं.१२. या प्राणाचें आधारभूत शरीर उदक हें होय आणि हा प्रकाशरूप चंद्र हें आधेयभूत करण. प्राणाचें परिमाण जितकें आहे तितकेंच या उदकाचें व या चंद्राचें परिमाण आहे. हे (वाक् , मन व प्राण) सर्व समान [=सर्वव्यापी] आणि अन्तरहित आहेत. हे अन्तयुक्त आहेत असें जो जाणतो त्याला अन्तयुक्त लोक प्राप्त होतो. जो हे अन्तरहित आहेत असें जाणतो त्याला अन्तरहित लोक प्राप्त होतो.१३. हाच प्रजापति संवत्सर होय. या संवत्सररूप प्रजापतीच्या सोळा कला [अवयव] आहेत. पंधरा अहोरात्र [तिथि] या त्याच्या पंधरा कला आणि सोळावी कला नित्य असते. हा या तिथींनीं वृद्धि व क्षय पावतो. हा अमावास्येच्या रात्रीं या सोळाव्या नित्य कलेनें या सर्व प्राणिमात्रामध्यें प्रवेश करतो व नंतर दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं उत्पन्न होतो. ह्मणून या रात्रीं याच सोमदेवतेच्या मानार्थ कोणत्याहि प्राण्याचा प्राण –सरड्याचा देखील प्राण– हरण करूं नये.१४. जो हा सोळा कलांचा संवत्सर प्रजापति तो हें (त्र्यन्नात्मक प्रजापतिरूप) जाण-

नेव पंचदशकला आत्मैवास्य षोडशी कला स वित्तेनैवा च पूर्यतेऽप च क्षीयते तदेतन्नभ्यं यदयमात्मा प्रधिर्वित्तं तस्माद्यद्यपि सर्वज्यानिं जीयत आत्मना चेज्जीवति प्रधिनागादित्येवाहुः ॥१५॥ अथ त्रयो वाव लोका मनुष्यलोकः पितृलोको देवलोक इति सोऽयं मनुष्यलोकः पुत्रेणैव जय्यो नान्येन कर्मणा कर्मणा पितृलोको विद्यया देवलोको देवलोको वै लोकानाꣳ श्रेष्ठस्तस्माद्विद्यां प्रशंसन्ति ॥१६॥ अथातः संप्रतिर्यदा प्रैष्यन्मन्यतेऽथ पुत्रमाह त्वं ब्रह्म त्वं यज्ञस्त्वं लोक इति स पुत्रः प्रत्याहाहं ब्रह्माहं यज्ञोऽहं लोक इति यद्वै किंचानूक्तं तस्य सर्वस्य ब्रह्मेत्येकता । ये वै के च यज्ञास्तेषाꣳ सर्वेषां यज्ञ इत्येकता

णारा पुरुषच प्रत्यक्ष होय. हे जाणणारा जो पुरुष असतो त्याच्या वित्त या पंधरा कला होत. तो स्वतः [आत्मा] ही त्याची सोळावी कला. तो वित्तानें वृद्धि व क्षय पावतो. तो स्वतः ही (चक्राची) नाभि होय हे प्रसिद्धच आहे. बाह्य परिवार हें वित्त. ह्मणून जर त्याचे सर्वस्व अपहरण होऊन नाभिस्थानीय तो स्वतः नाश पावला आणि जर (चक्राच्या अरांप्रमाणें) बाह्य परिवाररूपाने जिवंत राहिला तरी तो नष्ट झाला असेंच ह्मणतात.१५. लोक तीन आहेत— मनुष्यलोक, पितृलोक आणि देवलोक. हा मनुष्यलोक पुत्रानेच [पुत्ररूपी साधनानेच] साध्य आहे, इतर कर्मानें नाही. (अग्निहोत्रादि) कर्माने पितृलोक साध्य आहे. देवलोक ज्ञानाने साध्य आहे. देवलोक ह्या तिन्ही लोकांमध्यें श्रेष्ठ आहे. याकरितां ज्ञानाची प्रशंसा करतात.१६. आतां (कर्माचें) वर्णन —जेव्हां पित्याला आपण मरणार असें वाटतें तेव्हां तो पुत्राला ह्मणतो, तूं ब्रह्म आहेस, तूं यज्ञ आहेस, तूं लोक आहेस. पुत्र ह्मणतो, मी ब्रह्म आहें, मी यज्ञ आहें, मी लोक आहें. (याचा स्पष्ट अर्थ सांगतात—) जें कांहीं अध्ययन केलेलें अथवा न केलेलें अवशिष्ट राहिलें असेल त्या सर्वांचें 'ब्रह्म' हेंच एक नांव आहे. जे कांहीं यज्ञ केलेले अथवा करावयाचे राहिले असतील त्या सर्वांचें 'यज्ञ' हेंच एक नांव आहे. जे कांहीं

ये वै के च लोकास्तेषाँ सर्वेषां लोक इत्येकतैतावद्वा इदँ सर्वमेतन्मा सर्वँ सन्नयमितोऽभुनजदिति तस्मात् पुत्रमनुशिष्टं लोक्यमाहुस्तस्मादेनमनुशासति स यदैवंविदस्माल्लोकात्प्रैत्यथैभिरेव प्राणैः सह पुत्रमाविशति । स यद्यनेन किंचिदक्ष्णयाकृतं भवति तस्मादेनँ सर्वस्मात्पुत्रो मुंचति तस्मात्पुत्रो नाम स पुत्रेणैवास्मिँल्लोके प्रतितिष्ठत्यथैनमेते देवाः प्राणा अमृता आविशन्ति ॥१७॥ पृथिव्यै चैनमग्नेश्च दैवी वागाविशति सा वै दैवी वाग्यया यद्यदेव वदति तत्तद्भवति ॥१८॥ दिवश्चैनमादित्याच्च दैवं मन आविशति तद्वै दैवं मनो येनानंद्येव भवत्यथो न शोचति ॥१९॥ अद्भ्यश्चैनं चंद्रमसश्च

लोक प्राप्त करून घेतलेले अथवा घ्यावयाचे राहिले असतील त्या सर्वांचें 'लोक' हेंच एक नांव आहे. याप्रमाणे इतकें हें सर्व गृहस्थाचें कर्तव्य आहे. हें सर्व माझ्यापासून आपल्या शिरावर घेऊन या लोकापासून हा अध्ययन केलेला पुत्र माझें पालन करील (ह्मणजे मुक्तता करील) ह्मणून पुत्राला लोक्य [=लोकहित] असें ह्मणतात. ह्मणून (पितर) पुत्राकडून अध्ययन करवितात. तो हें ज्ञान असलेला पिता जेव्हां या लोकामधून जातो [=मृत्यु पावतो], तेव्हां तो याच (वाणी, मन व प्राणरूपी) प्राणांनीं पुत्राचे ठिकाणीं प्रवेश करतो. पित्याचें जे जें कांहीं किंचित् देखील कर्म करण्याचें राहिलें असेल (तें सर्व स्वतः करून) त्या सर्वांपासून त्याला पुत्र मुक्त करतो ह्मणून याला पुत्र [=पूरणेन त्रायते] असे नांव आहे. पुत्राचे योगानेच पिता हा मनुष्यलोक साध्य करून घेतो. यानंतर पित्याचे ठिकाणीं हे (वाक्, मन व प्राण) प्राण दैवी व अमरणधर्मयुक्त होत्साते प्रवेश करतात.१७. पृथिवी व अग्नि यांमधून दैवी वाक् याच्यामध्यें प्रवेश करते. जिच्या योगानें जे ह्मणून बोलावे त्याप्रमाणें होतें अशी जी वाक् ती दैवी वाक् होय.१८. द्युलोक व आदित्य यामधून दैवी मन प्रवेश करतें. ज्याच्या योगानें हा आनंदी व शोकरहित होतो तें दैवी मन होय.१९.

दैवः प्राण आविशति स वै दैवः प्राणो यः संचरंश्चासंचरंश्च न व्यथतेऽथो न रिष्यति स एवंवित्सर्वेषां भूतानामात्मा भवति यथैषा देवतैवꣳ स यथैतां देवताꣳ सर्वाणि भूतान्यवन्त्यैवꣳहैवंविदꣳ सर्वाणि भूतान्यवन्ति । यदु किंचेमाः प्रजाः शोचन्त्यमैवासां तद्भवति पुण्यमेवामुं गच्छति न ह वै देवान् पापं गच्छति ॥२०॥ अथातो व्रतमीमांसा प्रजापतिर्ह कर्माणि ससृजे तानि सृष्टान्यन्योन्येनास्पर्धन्त वदिष्याम्येवाहमिति वाग्दध्रे द्रक्ष्याम्यहमिति चक्षुः श्रोष्याम्यहमिति श्रोत्रमेवमन्यानि कर्माणि यथाकर्म तानि मृत्युः श्रमो भूत्वोपयेमे तान्याप्नोत्तान्याप्त्वा मृत्युरवारुन्ध तस्माच्छ्राम्यत्येव वाक् श्राम्यति चक्षुः श्राम्यति श्रोत्रम-

उदक व चंद्र यांमधून दैवी प्राण प्रवेश करतो. जो (जंगम वस्तूंमध्यें) संचार करीत असतां अथवा (स्थावर वस्तूंमध्ये) संचाररहित असतां व्यथा पावत नाहीं आणि नाश पावत नाहीं तो दैवी प्राण होय. हें जो जाणतो तो सर्वांचा आत्मा [वाणी, मन व प्राण] होतो. जशी (पूर्वी सांगितलेली हिरण्यगर्भरूपी) देवता तसाच तो जाणावा. या देवतेचें (इज्या इत्यादिकांनीं) ज्याप्रमाणें सर्व प्राणी पूजन करतात त्याप्रमाणें याचेहि सर्व प्राणी पूजन करतात. या मनुष्यांना जें ह्मणून दुःख होतें तें त्यांच्या सह संयुक्त होतें परंतु (देवरूप पावलेल्या याला दुःख न होतां) याचें शुभच होतें. कारण देवांकडे कधीं पाप (अथवा पापाचे फल दुःख) जात नाहीं.२०. आतां यानंतर उपासनकर्मांची मीमांसा —प्रजापतीनें (कर्मार्थ वागादि) इंद्रियें उत्पन्न केलीं. उत्पन्न झाल्यावर तीं परस्परांशीं स्पर्धा करूं लागलीं. मी बोलेन असें व्रत वाणीनें धारण केलें. मी पाहीन असे व्रत चक्षूनें धारण केलें. मी ऐकेन असे व्रत श्रोत्रानें धारण केलें. याप्रमाणें इतर इंद्रियांनीं यथाकर्म व्रते धारण केलीं. त्या सर्वांना मृत्यूनें श्रमरूपानें धरलें. त्यांजपुढें श्रमरूपानें प्रगट झाला आणि त्यांना (आपापलें कर्म करण्यास) त्यानें प्रतिबंध केला. ह्मणून (अद्याप देखील श्रमरूपी मृत्यूनें युक्त झाली ह्मणजे=

थेममेव नाप्नोद्योऽयं मध्यमः प्राणस्तानि ज्ञातुं दध्रिरे। अयं वै नः श्रेष्ठो यः संचरंश्चासंचरंश्च न व्यथतेऽथो न रिष्यति हन्तास्यैव सर्वे रूपमसामेति त एतस्यैव सर्वे रूपमभवंस्तस्मादेत एतेनाख्यायन्ते प्राणा इति तेन ह वाव तत्कुलमाचक्षते यस्मिन्कुले भवति य एवं वेद य उ हैवंविदा स्पर्धतेऽनुशुष्यत्यनुशुष्य हैवान्ततो म्रियत इत्यध्यात्मम् ॥२१॥ अथाधिदैवतं ज्वलिष्याम्येवाहमित्यग्निर्दध्रे तप्स्याम्यहमित्यादित्यो भास्याम्यहमिति चंद्रमा एवमन्या देवता यथादैवतं᳕ स यथैषां प्राणानां मध्यमः प्राण एवमेतासां देवतानां वायुर्म्लोचन्ति ह्यन्या देवता न वायुः सैषानस्तमिता देवता यद्वायुः ॥२२॥ अथैष

अतिशय श्रम झाले ह्मणजे) वाणी (आपल्या कर्मापासून) थांबते, चक्षु थांबतो, श्रोत्र थांबतें. मात्र जो हा मध्यमस्थ प्राण त्याजकडे (श्रमरूपी) मृत्यु आला नाहीं. तेव्हां त्याला [प्राणाला] जाणण्याचा इंद्रियांनीं विचार केला. "हा जो प्राण संचार करीत असतां व नसतां देखील व्यथा अथवा नाश पावत नाहीं तोच आमच्यामध्यें श्रेष्ठ आहे. त्याचेंच रूप आपण धारण करूं (कारण आपलीं रूपें मृत्युपुढें टिकत नाहींत)" असा विचार करून त्या सर्व इंद्रियांनीं प्राणाचें रूप धारण केलें. याकरितां या इंद्रियांना याचें 'प्राण' हेंच नांव देतात. जो हें जाणतो त्याच्या नांवानें त्याचें कुल प्रसिद्ध होते [ह्म० तो आपल्या कुलांत प्रसिद्ध होतो]. हें जाणणाराशीं जो स्पर्धा करतो तो शुष्क होतो व (शुष्क होत) अखेरीस मरतो. याप्रमाणें प्राणाचें अध्यात्मदर्शन सांगितलें.२१. आतां अधिदैवतदर्शन सांगतात—मी ज्वलन पावेन असें व्रत अग्नीनें धारण केलें, मी तपन पावेन असें व्रत सूर्यानें धारण केलें, मी प्रकाश पावेन असें व्रत चंद्रानें धारण केलें. याप्रमाणें इतर देवतांनीं देवतेनुरूप व्रतें धारण केलीं. (वागादि) प्राणांमध्यें ज्याप्रमाणें मुख्य प्राण आपल्या कर्मापासून च्युत झाला नाहीं, (बाकीचीं इंद्रियें झालीं,) त्याप्रमाणें या देवतांमध्यें वायु (आपल्या कर्मापासून च्युत झाला नाहीं) इतर सर्व

श्लोको भवति यतश्चोदेति सूर्योऽस्तं यत्र च गच्छतीति प्राणाद्वा एष उदेति प्राणेऽस्तमेति तं देवाश्चक्रिरे धर्मꣳ स एवाद्य स उ श्व इति यद्वा एतेऽमुर्ह्यध्रियन्त तदेवाप्यद्य कुर्वन्ति । तस्मादेकमेव व्रतं चरेत्प्राण्याच्चैवापान्याच्च नेन्मा पाप्मा मृत्युराप्नुवदिति यद्यु चरेत्समापिपयिषेत्तेनो एतस्यै देवतायै सायुज्यꣳ सलोकतां जयति ॥२३॥ इति पंचमं ब्राह्मणम् ॥५॥

त्रयं वा इदं नाम रूपं कर्म तेषां नाम्नां वागित्येतदेषामुक्थमतो हि सर्वाणि नामान्युत्तिष्ठन्त्येतदेषाꣳ सामैतद्धि सर्वैर्नामभिः सममेतदेषां ब्रह्मैतद्धि सर्वाणि नामानि बिभर्ति ॥१॥ अथ रूपाणां

देवता आपल्या कर्मामध्यें अस्त पावतात, वायु अस्त पावत नाहीं. अस्तरहित अशी ही वायु देवता आहे.२२. या अर्थाचा प्रकाशक "यतश्च०" इत्यादि असा पुढील मंत्र आहे– "ज्या वायूपासून [प्राणापासून] सूर्य उदय पावतो व ज्या वायूमध्यें [प्राणामध्ये] अस्त पावतो त्या वायूचें व्रत [धर्म] देवांनीं धारण केलें. हें व्रत आज देवांनीं धारण केलेलें आहे व पुढेंहि असणारच." त्या काळीं देवांनीं धारण केलेलें हें व्रत अद्याप देखील ते चालवीत आहेत. ह्मणून आपणाला पापरूपी मृत्यु प्राप्त होऊं नये याकरितां "प्राणव्यापार आणि अपानव्यापार करावा" हें एकच व्रत आचरण करावें. जर प्राणव्रताला प्रारंभ केला तर तें समाप्त करावें. या व्रतानें या प्राणदेवतेचें सायुज्य व सलोकता यांची प्राप्ति होते.२३.

हें (अव्याकृत) जग देखील नाम, रूप कर्म असें तीन स्वरूपांनीं युक्त आहे. त्या नामांचें 'वाक्' हें शब्दसामान्य आहे. त्या नामांचें उपादानकारण [उक्थ:] वाक् हें होय; कारण या वाचेपासून [नामसामान्यापासून] सर्व नामें प्रादुर्भूत होतात. (वाक्) हें शब्दसामान्य या नामांचें सामान्य [समं] होय; कारण हें सर्व नामांना समान असतें. हाच यांचा आत्मा; कारण हें सर्व नामांना धारण करतें.१. रूपांचें 'चक्षु' हें

जातशत्रुर्मा मैतस्मिन्संवदिष्ठास्तेजस्वीति वा अहमेतमुपास इति स य एतमेवमुपास्ते तेजस्वी ह भवति तेजस्विनी हास्य प्रजा भवति ॥४॥ स होवाच गार्ग्यो य एवायमाकाशे पुरुष एतमेवाहं ब्रह्मोपास इति स होवाचाजातशत्रुर्मा मैतस्मिन्संवदिष्ठाः पूर्णमप्रवर्तीति वा अहमेतमुपास इति स य एतमेवमुपास्ते पूर्यते प्रजया पशुभिर्नास्यास्माल्लोकात्प्रजोद्वर्तते ॥५॥ स होवाच गार्ग्यो य एवायं वायौ पुरुष एतमेवाहं ब्रह्मोपास इति स होवाचाजातशत्रुर्मा मैतस्मिन्संवदिष्ठा इंद्रो वैकुंठोऽपराजिता सेनेति वा अहमेतमुपास इति स य एतमेवमुपास्ते जिष्णुर्हापराजिष्णुर्भवत्यन्यतस्त्यजायी ॥६॥ स होवाच

अन्नाचा क्षय पडत नाहीं.३. तो गार्ग्य ह्मणाला, या त्वचेचे ठिकाणीं जो पुरुष आहे तोच ब्रह्म असें मी समजतो. तो अजातशत्रु राजा ह्मणाला, या ब्रह्माविषयीं तूं मुळींच बोलूं नकोस. 'तेजस्वी' या स्वरूपामध्यें मी याची उपासना करतों. जो याची या प्रकारें उपासना करतो तो तेजस्वी होतो, त्याची प्रजा तेजस्विनी होते.४. तो गार्ग्य ह्मणाला, या हृदयाकाशामध्यें जो पुरुष आहे तोच ब्रह्म असें मी समजतों. तो अजातशत्रु राजा ह्मणाला, या ब्रह्माविषयीं तूं मुळींच बोलूं नकोस. 'पूर्ण' आणि 'अप्रवर्ति' [=स्वतः प्रवृत्त न होतां इतरांस प्रवृत्त करणारें] या स्वरूपामध्यें मी याची उपासना करतों. जो याची याप्रकारें उपासना करतो तो प्रजा व पशु यांनीं पूर्ण होतो व त्याचा वंश या लोकीं क्षय पावत नाहीं.५. तो गार्ग्य ह्मणाला, या प्राणाचे ठिकाणीं जो पुरुष आहे तोच ब्रह्म असें मी समजतो. तो अजातशत्रु राजा ह्मणाला, या ब्रह्माविषयीं तूं मुळींच बोलूं नकोस. 'परमेश्वर' [इंद्रः], 'शत्रु ज्याच्यापुढें टिकाव धरीत नाहींत असा' आणि 'पराभूत न झालेली (मरुतांची) सेना' या स्वरूपामध्यें मी याची उपासना करतों. जो याची याप्रकारें उपासना करतो तो जयशाली व शत्रूंकडून न जिंकला जाणारा आणि शत्रूंवर जय मिळविणारा होतो.६. तो गार्ग्य ह्मणाला, या वाचेचे ठिकाणीं जो पुरुष

गार्ग्यो य एवायमग्नौ पुरुष एतमेवाहं ब्रह्मोपास इति स होवाचाजातशत्रुर्मा मैतस्मिन्संवदिष्ठा विपासहिरिति वा अहमेतमुपास इति स य एतमेवमुपास्ते विपासहिर्ह भवति विषासहिर्हास्य प्रजा भवति ॥७॥ स होवाच गार्ग्यो य एवायमप्सु पुरुष एतमेवाहं ब्रह्मोपास इति स होवाचाजातशत्रुर्मा मैतस्मिन्संवदिष्ठाः प्रतिरूप इति वा अहमेतमुपास इति स य एतमेवमुपास्ते प्रतिरूपꣳ हैवैनमुपगच्छति नाप्रतिरूपमथो प्रतिरूपोऽस्माज्जायते ॥८॥ स होवाच गार्ग्यो य एवायमादर्शे पुरुष एतमेवाहं ब्रह्मोपास इति स होवाचाजातशत्रुर्मा मैतस्मिन्संवदिष्ठा रोचिष्णुरिति वा अहमेतमुपास इति स य एतमेवमुपास्ते रोचिष्णुर्ह भवति रोचिष्णुर्हास्य प्रजा भवत्यथो यैः सन्निगच्छति सर्वांस्तानतिरोचते ॥९॥ स होवाच गार्ग्यो य एवायं यन्तं

आहे तोच ब्रह्म असें मी समजतों. तो अजातशत्रु राजा ह्मणाला, या ब्रह्माविषयीं तूं मुळींच बोलूं नकोस. 'शत्रूंचें मर्दन करणारा' या स्वरूपामध्यें मी याची उपासना करतों. जो याची याप्रकारें उपासना करतो तो शत्रूंचें मर्दन करणारा होतो, त्याची संतति शत्रूंचे मर्दन करणारी होते.७. तो गार्ग्य ह्मणाला, या रेताचे ठिकाणीं जो पुरुष आहे तोच ब्रह्म असें मी समजतों. तो अजातशत्रु ह्मणाला, या ब्रह्माविषयीं तूं मुळींच बोलूं नकोस. 'श्रुतिस्मृतींना अनुकूल' या स्वरूपामध्यें मी याची उपासना करतों. जो याची याप्रकारें उपासना करतो त्याला श्रुतिस्मृतींना अनुरूप असें फल मिळतें. त्याची संतति देखील श्रुतिस्मृतींना विरोधी नव्हे तर अनुरूप अशीच होते.८. तो गार्ग्य ह्मणाला, (हृदयाचे) प्रसन्नतेचे ठिकाणीं जो पुरुष आहे तोच ब्रह्म असें मी समजतों. तो अजातशत्रु ह्मणाला, या ब्रह्माविषयीं तूं मुळींच बोलूं नकोस. 'दीप्तियुक्त' या स्वरूपामध्यें मी याची उपासना करतों. जो याची याप्रकारें उपासना करतो तो तेजस्वी होतो, त्याची संतति तेजस्वी होते, ज्यांच्याशीं त्याचा संबंध येतो त्यांच्यामध्यें याचें तेज प्रकट होते.९. गार्ग्य ह्मणाला,

पश्चाच्छब्दोऽनूदेत्येतमेवाहं ब्रह्मोपास इति स होवाचाजातशत्रुर्मा मैतस्मिन्संवदिष्ठा असुरिति वा अहमेतमुपास इति स त एतमेवमुपास्ते सर्वꣳ हैवास्मिँल्लोक आयुरेति नैनं पुरा कालात् प्राणो जहाति ॥१०॥ स होवाच गार्ग्यो य एवायं दिक्षु पुरुष एतमेवाहं ब्रह्मोपास इति स होवाचाजातशत्रुर्मा मैतस्मिन्संवदिष्ठा द्वितीयोऽनपग इति वा अहमेतमुपास इति स य एतमेवमुपास्ते द्वितीयवान् भवति नास्माद्गणश्छिद्यते ॥११॥ स होवाच गार्ग्यो य एवायं छायामयः पुरुष एतमेवाहं ब्रह्मोपास इति स होवाचाजातशत्रुर्मा मैतस्मिन्संवदिष्ठा मृत्युरिति वा अहमेतमुपास इति स य एतमेवमुपास्ते सर्वꣳ हैवास्मिँल्लोक आयुरेति नैनं पुरा कालान्मृत्युरागच्छति ॥१२॥ स होवाच गार्ग्यो य एवायमात्मनि पुरुष एतमेवाहं ब्रह्मोपास इति स होवाचा-

कोणी प्राणी चालत असतां त्याच्या मागें जो (चालण्याचा) शब्द होतो तोच ब्रह्म आहे असें मी समजतों. तो अजातशत्रु ह्मणाला, या ब्रह्माविषयीं तूं मुळींच बोलूं नकोस. प्राण [=जीवनहेतु] या स्वरूपामध्यें मी याची उपासना करतों. जो याची याप्रकारें उपासना करतो त्याला या लोकीं पूर्ण आयुष्य प्राप्त होतें, तो योग्य कालाचे अगोदर मरण पावत नाहीं.१०. तो गार्ग्य ह्मणाला, या श्रोत्राचे ठिकाणीं जो पुरुष आहे तोच ब्रह्म असें मी समजतों. तो अजातशत्रु ह्मणाला, या ब्रह्माविषयीं तूं मुळींच बोलूं नकोस. 'द्वितीययुक्त व अवियुक्त' (अश्विनीकुमार) या स्वरूपामध्यें मी याची उपासना करतों. जो याची याप्रकारें उपासना करतो तो द्वितीययुक्त व (मित्रादिकांनीं) अवियुक्त होतो. त्याला त्याचे गण सोडून जात नाहींत.११. तो गार्ग्य ह्मणाला, जो हा छायामय पुरुष आहे तोच ब्रह्म असें मी समजतों. तो अजातशत्रु ह्मणाला, या ब्रह्माविषयीं तूं मुळींच बोलूं नकोस. 'मृत्यु' या स्वरूपामध्यें मी याची उपासना करतों. जो याची याप्रकारें उपासना करतो त्याला या लोकीं पूर्ण आयुष्य प्राप्त होतें. त्याला योग्य कालाच्या पूर्वी मृत्यु येत नाहीं.१२.

जातशत्रुर्मा मैतस्मिन्संवदिष्ठा आत्मन्वीति वा अहमेतमुपास इति स य एतमेवमुपास्त आत्मन्वी ह भवत्यात्मन्विनी हास्य प्रजा भवति स ह तूष्णीमास गार्ग्यः ॥१३॥ स होवाचाजातशत्रुरेतावन्नू ३ इत्येतावद्धीति नैतावता विदितं भवतीति स होवाच गार्ग्य उप त्वा यानीति ॥१४॥ स होवाचाजातशत्रुः प्रतिलोमं चैतद्यद्ब्राह्मणः क्षत्रियमुपेयाद्ब्रह्म मे वक्ष्यतीति व्येव त्वा ज्ञपयिष्यामीति तं पाणावादायोत्तस्थौ तौ ह पुरुषꣳ सुप्तमाजग्मतुस्तमेतैर्नामभिरामंत्रयांचक्रे बृहन् पांडरवासः सोम राजन्निति स नोत्तस्थौ तं पाणिनापेषं बोधयांचकार स होत्तस्थौ ॥१५॥ स होवाचाजातशत्रुर्यत्रैष एतत्सुप्तोऽभूद्य एष

तो गार्ग्य ह्मणाला, जो हा बुद्धीच्या ठिकाणीं पुरुष आहे तोच ब्रह्म असें मी समजतों. तो अजातशत्रु ह्मणाला, या ब्रह्माविषयीं तूं मुळींच बोलूं नकोस. "आत्मवान्" या स्वरूपामध्यें मी याची उपासना करतो. जो याची याप्रकारें उपासना करतो तो आत्मवान् होतो, त्याची संतति आत्मवान् होते. (याप्रमाणें गार्ग्याचें ज्ञान संपल्यामुळें) नंतर तो गार्ग्य स्तब्ध राहिला. १३. तो अजातशत्रु ह्मणाला, इतकेंच का तुझें ब्रह्माचें ज्ञान? गार्ग्य ह्मणाला, होय, मला इतकेंच माहीत आहे. अजातशत्रु ह्मणाला, एवढ्या ज्ञानानें कांहीं ब्रह्माचें ज्ञान होत नाहीं. गार्ग्य ह्मणाला, मी आपणांकडे (ज्ञान प्राप्त करून घेण्याकरितां शिष्यरूपानें) आलों आहें. १४. तो अजातशत्रु ह्मणाला, "हा मला ब्रह्म सांगेल अशा विचारानें ब्राह्मणानें क्षत्रियाकडे जाणें हें विचित्र आहे. तुला मी ब्रह्माचें ज्ञान करून देतों." असें ह्मणून त्याला हातानें धरून तो अजातशत्रु उठला व ते दोघे एका निद्रिस्त मनुष्याजवळ आले. राजानें त्या निजलेल्या मनुष्याला "बृहन्, पांडरवासस्, सोम, राजन्" इत्यादि नांवांनीं हांका मारल्या पण तो जागा झाला नाहीं. नंतर त्याला हातानें ढकलून जागें केलें. तेव्हां तो जागा झाला [=गार्ग्यानें सांगितलेला कर्ता भोक्ता हा कांहीं ब्रह्म नव्हे]. १५. अजातशत्रूनें गार्ग्याला विचारलें, "हा विज्ञानमय पुरुष

विज्ञानमयः पुरुषः क्वैष तदाभूत्कुत एतदागादिति तदु ह न मेने गार्ग्यः ॥१६॥ स होवाचाजातशत्रुर्यत्रैष एतत्सुप्तोऽभूद्य एष विज्ञानमयः पुरुषस्तदेषां प्राणानां विज्ञानेन विज्ञानमादाय य एषोऽन्तर्हृदय आकाशस्तस्मिञ्छेते तानि यदा गृह्णात्यथ हैतत्पुरुषः स्वपिति नाम तद्गृहीत एव प्राणो भवति गृहीता वाग् गृहीतं चक्षुर्गृहीतꣳ श्रोत्रं गृहीतं मनः ॥१७॥ स यत्रैतत्स्वप्न्यया चरति ते हास्य लोकास्तदुतेव महाराजो भवत्युतेव महाब्राह्मण उतेवोच्चावचं निगच्छति स यथा महाराजो जानपदान् गृहीत्वा स्वे जनपदे यथाकामं परिवर्तेतैवमेवैष एतत्प्राणान् गृहीत्वा स्वे शरीरे यथाकामं परिवर्तते ॥१८॥ अथ यदा सुषुप्तो भवति यदा न कस्यचन वेद हिता नाम नाड्यो द्वासप्ततिसहस्राणि हृदयात्पुरीततमभिप्रतिष्ठन्ते ताभिः प्रत्यवसृप्य पुरी-

ज्या वेळीं झोंपीं गेला होता त्या वेळीं तो कोठें होता ? तो आतां कोठून आला ?" गार्ग्याला हें सांगतां आलें नाहीं. १६ तेव्हां अजातशत्रु ह्मणाला, हा विज्ञानमय पुरुष जेव्हां झोंपीं जातो तेव्हां तो या वागादि इंद्रियांच्या विज्ञानानें त्यांचेंच विज्ञानसामर्थ्य घेऊन हृदयामधील आकाशामध्यें [=आत्म्यामध्यें] शयन करतो. जेव्हां तो हीं विज्ञानें घेतो तेव्हां हा पुरुष झोंपीं जातो. तेव्हां हा प्राण (त्यानें आंत) घेतलेला असतो, वाणी घेतलेली असते, चक्षु घेतलेला असतो, श्रोत्र घेतलेलें असतें, मन घेतलेलें असतें. १७. तो (आत्मा) जेव्हां स्वप्नवृत्तीनें असतो तेव्हां तीं त्याचीं कर्मफलें [लोकाः] होत. तो जणूं काय मोठा राजा होतो, मोठा ब्राह्मण होतो, (देवादि) उच्च व (पश्वादि) नीच अवस्थांप्रत जातो. तो ज्याप्रमाणें (स्वतःच) राजा होऊन (स्वतःच) प्रजा घेऊन स्वतःच्या नगरामध्यें (स्वप्नांत) इच्छेनुसार वावरतो, त्याचप्रमाणें या इंद्रियांना घेऊन तो स्वतःच्या शरीरामध्यें इच्छेनुसार वावरतो. १८. जेव्हां त्याला कोणतेंहि ज्ञान असत नाहीं तेव्हां तो सुषुप्तीप्रत जातो. सुषुप्तीमध्यें हिता नामक बहात्तर हजार नाड्या हृदयापासून हृदयवेष्टन जें पुरीतत्

तति शेते स यथा कुमारो वा महाराजो वा महाब्राह्मणो वातिघ्नीमानंदस्य गत्वा शयीतैवमेवैष एतच्छेते॥१९॥ स यथोर्णनाभिस्तंतुनोच्चरेद्यथाग्नेः क्षुद्रा विस्फुलिंगा व्युच्चरन्त्येवमेवास्मादात्मनः सर्वे प्राणाः सर्वे लोकाः सर्वे देवाः सर्वाणि भूतानि व्युच्चरन्ति तस्योपनिषत्सत्यस्य सत्यमिति प्राणा वै सत्यं तेषामेष सत्यम् ॥२०॥ इति प्रथमं ब्राह्मणम् ॥१॥

यो ह वै शिशुꣳ साधनꣳ सप्रत्याधानꣳ सस्थूणꣳ सदामं वेद सप्त ह द्विषतो भ्रातृव्यानवरुणाद्धि । अयं वाव शिशुर्योऽयं मध्यमः प्राणस्तस्येदमेवाधानमिदं प्रत्याधानं प्राणः स्थूणान्नं दाम ॥१॥ तमेताः सप्ताक्षितय उपतिष्ठन्ते तद्या इमा अक्षन् लोहिन्यो राजयस्ताभिरेनं रुद्रोऽन्वायत्तोऽथ या अक्षन्नापस्ताभिः पर्जन्यो या कनीनका

त्यामध्यें (ह्मणजे सर्व शरीरामध्ये) पसरतात. त्या सर्व व्यापून तो (सर्व) शरीरामध्यें शयन करतो. ज्याप्रमाणे कुमार, अथवा राजा अथवा ब्राह्मण दुःखाचा अत्यंत नाश करणाऱ्या आनंदावस्थेप्रत जाऊन शयन करतो त्याप्रमाणें तो शयन करतो.१९. ज्याप्रमाणें कोळी स्वतःच्या तंतूंनींच वर चढतो, ज्याप्रमाणें अग्नीपासून बारीक ठिणग्या वर येतात, त्याप्रमाणेंच या आत्म्यापासून सर्व इंद्रियें, सर्व (भू आदि) लोक, सर्व देव व सर्व भूतें उत्पन्न होतात. त्या आत्म्याच्या समीप नेणारें [उपनिषत्] वाक्य "सत्यस्य सत्यं" [ह्म० तो आत्मा सत्याचें सत्य होय] हें होय. इंद्रियें हें सत्य आणि त्याचें हा (आत्मा) सत्य.२१.

वत्साचें अधिष्ठान, प्रत्यधिष्ठान (?), (बांधण्याचा) खांब आणि (बांधण्याची) दोरी हीं जो जाणतो तो द्वेष करणाऱ्या आपल्या सात भाऊबंदांचा नाश करतो. (ह्मणजे—) शरीरस्थ प्राण हा वत्स, हें शरीर त्याचें अधिष्ठान, हें शिर प्रत्यधिष्ठान, प्राण [अन्नपानादिकांपासून उत्पन्न झालेली शक्ति] हा खांब आणि अन्न ही दोरी.१. याचा क्षय होऊं नये ह्मणून सातजण याची सेवा करतात. नेत्राचे ठिकाणीं ज्या तांबड्या रेघा असतात

तयादित्यो यत्कृष्णं तेनाग्निर्यच्छुक्लं तेनेंद्रोऽधरयैनं वर्तन्या पृथिव्यन्वायत्ता द्यौरुत्तरया नास्यान्नं क्षीयते य एवं वेद ॥२॥ तदेष श्लोको भवति । अर्वाग्बिलश्चमस ऊर्ध्वबुध्नस्तस्मिन्यशो निहितं विश्वरूपम् । तस्यासत ऋषयः सप्त तीरे वागष्टमी ब्रह्मणा संविदानेति अर्वाग्बिलश्चमस ऊर्ध्वबुध्न इतीदं तच्छिर एष ह्यर्वाग्बिलश्चमस ऊर्ध्वबुध्नस्तस्मिन्यशो निहितं विश्वरूपमिति प्राणा वै यशो विश्वरूपं प्राणानेतदाह तस्यासत ऋषयः सप्त तीर इति प्राणा वा ऋषयः प्राणानेतदाह वागष्टमी ब्रह्मणा संविदानेति वाग्घ्यष्टमी ब्रह्मणा संवित्ते ॥३॥ इमावेव गोतमभरद्वाजावयमेव गोतमोऽयं भरद्वाज इमावेव विश्वामित्रजमदग्नी अयमेव विश्वामित्रोऽयं जमदग्निरिमावेव वसिष्ठकश्यपावयमेव वसिष्ठोऽयं कश्यपो वागेवात्रिर्वाचा ह्यन्नमद्यतेऽत्तिर्ह वै नामैतद्यदत्रिरिति सर्वस्यात्ता भवति सर्वमस्यान्नं भवति य एवं वेद ॥४॥ इति द्वितीयं ब्राह्मणम् ॥२॥

त्यांचे द्वारा या प्राणाची रुद्र सेवा करतो. नेत्राचे ठिकाणीं जें उदक असतें त्याचे द्वारा पर्जन्य, जी दर्शनशक्ति असते तिचे द्वारा आदित्य, जो काळेपणा त्यानें अग्नि, जो शुक्लवर्ण त्यानें इंद्र, खालच्या पापणीनें पृथिवी आणि वरच्या पापणीनें द्युलोक प्राणाची सेवा करतात. हे जो जाणतो त्याला अन्नाचा कधीं तोटा पडत नाहीं.२. याविषयीं पुढील मंत्र आहे– "अर्वाग्बिल:० इत्यादि" अर्थ–हें शिर हा चमस [सोम प्राशन करण्याचें पात्र] होय. कारण याचें तोंड खालीं असून बुंधा वर आहे. त्यामध्यें विश्वरूप यश ठवलेलें आहे; यांत प्राण हें यश. त्याच्या तीरावर सात ऋषि बसले आहेत; यांत इंद्रियें हेच ऋषि होत. ब्रह्माबरोबर संवाद करणारी वाणी ही (सात इंद्रियांहून अधिक) आठवी आहे.३. हे दोन कर्ण ह्मणजे गोतम आणि भरद्वाज. एक गोतम व दुसरा भरद्वाज. हे दोन डोळे ह्मणजे विश्वामित्र आणि जमदग्नि. एक विश्वामित्र व दुसरा जमदग्नि. या दोन नाकपुड्या हे वसिष्ठ व कश्यप.

द्वे वाव ब्रह्मणो रूपे मूर्तं चैवामूर्तं च मर्त्यं चामृतं च स्थितं च यच्च सच्च त्यच्च ॥१॥ तदेतन्मूर्तं यदन्यद्वायोश्चांतरिक्षाच्चैतन्मर्त्यमेतत्स्थितमेतत्सत्तस्यैतस्य मूर्तस्यैतस्य मर्त्यस्यैतस्य स्थितस्यैतस्य सत एष रसो य एष तपति सतो ह्येष रसः ॥२॥ अथामूर्तं वायुश्चांतरिक्षं चैतदमृतमेतद्यदेतत्त्यं तस्यैतस्यामूर्तस्यैतस्यामृतस्यैतस्य यत एतस्य त्यस्यैष रसो य एष एतस्मिन्मंडले पुरुषस्त्यस्य ह्येष रस इत्यधिदैवतम् ॥३॥ अथाध्यात्ममिदमेव मूर्तं यदन्यत्प्राणाच्च यश्चायमंतरात्मन्नाकाश एतन्मर्त्यमेतत्स्थितमेतत्सत्तस्यैतस्य मूर्तस्यैतस्य मर्त्यस्यैतस्य स्थितस्यैतस्य सत एष रसो यच्चक्षुः सतो ह्येष रसः ॥४॥ अथामूर्तं प्राणश्च यश्चायमंतरात्मन्नाकाश एतदमृतमेतद्यदेतत्त्यं तस्यैतस्यामूर्तस्यैतस्यामृतस्यैतस्य यत एतस्य त्यस्यैष रसो योऽयं द-

एक वसिष्ठ व दुसरी कश्यप. वाणी ही अत्रि. कारण वाचेनें अन्न भक्षण केलें जातें [अत्ति]. हें जो जाणतो तो सर्व भक्षण करणारा होतो, सर्व त्याचें अन्न होतें.४.

मूर्त व अमूर्त, मर्त्य व मृत्युरहित, स्थिर व चलनात्मक, प्रत्यक्ष व परोक्ष अशीं ब्रह्माचीं दोन रूपें आहेत.१. वायु व आकाश यांहून इतर तें मूर्त रूप होय; हेंच मर्त्य, हेंच स्थिर, हेंच प्रत्यक्ष. या सर्वांचें सार हा तपन पावणारा आदित्य होय.२. वायु आणि आकाश हें अमूर्त रूप होय; हेंच मृत्युरहित, चलनात्मक व परोक्ष. या (आदित्याचे) मंडलाचे ठिकाणीं जो हिरण्यगर्भ प्राण आहे तो या सर्वांचें सार होय. परोक्षाचेंहि हेंच सार होय. याप्रमाणें देवतात्मक विभाग [अधिदैवतं] सांगितला.३. आतां अध्यात्मविभाग सांगतात— शरीरस्थ प्राण आणि हृदयाकाश यांखेरीज जें (शरीर) आहे तें मूर्त रूप होय. हेंच मर्त्य, स्थिर व प्रत्यक्ष आहे. चक्षु हा या सर्वांचें सार आहे. प्रत्यक्षाचें देखील हाच सार आहे.४. प्राण आणि हृदयाकाश हें अमूर्त रूप होय. हेंच मृत्युरहित, चलनात्मक व

क्षिणेऽक्षन्पुरुषस्त्यस्य ह्येष रसः ॥५॥ तस्य हैतस्य पुरुषस्य रूपं यथा माहारजनं वासो यथा पाण्ड्वाविकं यथेंद्रगोपो यथाग्न्यर्चिर्यथा पुंडरीकं यथा सकृद्विद्युत्तꣳ सकृद्विद्युत्तेव ह वा अस्य श्रीर्भवति य एवं वेदाथात आदेशो नेति नेति न ह्येतस्मादिति नेत्यन्यत्परमस्त्यथ नामधेयं सत्यस्य सत्यमिति प्राणा वै सत्यं तेषामेष सत्यम् ॥६॥ इति तृतीयं ब्राह्मणम्

मैत्रेयीति होवाच याज्ञवल्क्य उद्यास्यन्वा अरेऽहमस्मात्स्थानादस्मि हन्त तेऽनया कात्यायन्यान्तं करवाणीति ॥१॥ सा होवाच मैत्रेयी। यन्नु म इयं भगोः सर्वा पृथिवी वित्तेन पूर्णा स्यात्कथं तेनामृता स्यामिति नेति होवाच याज्ञवल्क्यो यथैवोपकरणवतां जीवितं तथैव

परोक्ष आहे. उजव्या डोळ्याचे ठिकाणीं जो पुरुष आहे तो या सर्वांचें सार होय. परोक्षाचेंहि हेंच सार होय.५. त्या या पुरुषाचें रूप येणेप्रमाणें– ज्याप्रमाणें हळदीनें युक्त वस्त्र, अथवा पांढरें लोंकरीचें वस्त्र, अथवा इंद्रगोप किडा, अथवा अग्नीची ज्वाळा, अथवा पांढरें कमळ अथवा एकदम वीज प्रकाशणें, अशा प्रकारचीं रूपें असतात. जो याप्रमाणें (हिरण्यगर्भाचें वासनारूप) जाणतो त्याची एकदम वीज चमकल्याप्रमाणें ख्याति होते. ह्मणून "(कोणत्याहि विशेष धर्मानें युक्त) नाहीं, नाहीं" [नेति नेति] असा ब्रह्माचा निर्देश करतात. याहून ब्रह्माचा दुसरा निर्देश करतां येत नाहीं. "सत्याचें सत्य" याहून दुसरें ब्रह्माचें नांव नाहीं. इंद्रियें हें सत्य आणि त्यांचें हा (आत्मा) सत्य.६.

याज्ञवल्क्य ह्मणाला, मैत्रेयि, या (गृहस्थाश्रमरूपी) स्थानापासून निघून जाण्याची मला इच्छा झाली आहे. ह्मणून तूं आणि कात्यायनी यांच्यामध्यें द्रव्याचा विभाग करून तुह्मांला वेगळ्या करतों.१. ती मैत्रेयी ह्मणाली, हे भगवन्, ही सर्व पृथिवी वित्तानें पूर्ण अशी होऊन जरी मला प्राप्त झाली, तरी त्या योगानें मी मृत्युरहित होईन काय? याज्ञवल्क्य ह्मणाला, नाहीं. (सुखाच्या) साधनांनीं युक्त असलेल्या मनुष्यांचें जसें जीवित असतें

ते जीवितꣳ स्यादमृतत्वस्य तु नाशास्ति वित्तेनेति ॥२॥ सा होवाच मैत्रेयी येनाहं नामृता स्यां किमहं तेन कुर्यां यदेव भगवान्वेद तदेव मे ब्रूहीति॥३॥ स होवाच याज्ञवल्क्यः प्रिया वतारे नः सती प्रियं भाषस एह्यास्स्व व्याख्यास्यामि ते व्याचक्षाणस्य तु मे निदिध्यासस्वेति ॥४॥ स होवाच न वा अरे पत्युः कामाय पतिः प्रियो भवत्यात्मनस्तु कामाय पतिः प्रियो भवति । न वा अरे जायायै कामाय जाया प्रिया भवत्यात्मनस्तु कामाय जाया प्रिया भवति । न वा अरे पुत्राणां कामाय पुत्राः प्रिया भवन्त्यात्मनस्तु कामाय पुत्राः प्रिया भवन्ति। न वा अरे वित्तस्य कामाय वित्तं प्रियं भवत्यात्मनस्तु कामाय वित्तं प्रियं भवति। न वा अरे ब्रह्मणः कामाय ब्रह्म प्रियं भवत्यात्मनस्तु कामाय ब्रह्म प्रियं भवति। न वा अरे क्षत्रस्य कामाय क्षत्रं प्रियं भवत्यात्मनस्तु कामाय

तसेंच तुझें जीवित होईल. वित्ताचे योगानें कांहीं मृत्युरहितत्व प्राप्त होण्याची आशा नाहीं.२. मैत्रेयी ह्मणाली, जी गोष्ट मी मृत्युरहित होण्याचे साधन नाहीं तिच्याशीं मला काय करावयाचे आहे? भगवन्, आपणाला (मृत्युरहित होण्याच्या ज्या साधनाचें) ज्ञान आहे ते मला सांगा.३. याज्ञवल्क्य ह्मणाला, तूं मला पूर्वीहून देखील अधिक प्रिय वाटतेस; तूं मला प्रिय असेंच बोलत आहेस. इकडे ये, बस. मी तुला (अमरत्वाला साधन असें आत्मज्ञान) सांगतों. त्याचा अर्थ नीट ध्यानांत आण.४. पतीच्या कार्याकरितां (भार्येला) पति प्रिय होत नसतो, आपल्याच कार्याकरितां पति प्रिय होतो. भार्येच्या कार्याकरितां (पतीला) भार्या प्रिय होत नसते, आपल्याच कार्याकरितां भार्या प्रिय होते. पुत्रांच्या कार्याकरितां पुत्र प्रिय होत नसतात, आपल्याच कार्याकरितां पुत्र प्रिय होतात. वित्ताच्या कार्याकरितां वित्त प्रिय होत नसतें, आपल्याच कार्याकरितां वित्त प्रिय होतें. ब्राह्मणाच्या कार्याकरितां ब्राह्मण प्रिय होत नसतो, आपल्याच कार्याकरितां ब्राह्मण प्रिय होतो. क्षत्रियाच्या कार्याकरितां क्षत्रिय प्रिय होत नसतो, आपल्याच कार्या-

क्षत्रं प्रियं भवति। न वा अरे लोकानां कामाय लोकाः प्रिया भवन्त्यात्मनस्तु कामाय लोकाः प्रिया भवन्ति। न वा अरे देवानां कामाय देवाः प्रिया भवन्त्यात्मनस्तु कामाय देवाः प्रिया भवन्ति। न वा अरे भूतानां कामाय भूतानि प्रियाणि भवन्त्यात्मनस्तु कामाय भूतानि प्रियाणि भवन्ति। न वा अरे सर्वस्य कामाय सर्वं प्रियं भवत्यात्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति। आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यो मैत्रेय्यात्मनो वा अरे दर्शनेन श्रवणेन मत्या विज्ञानेनेदꣳ सर्वं विदितम् ॥५॥ ब्रह्म तं परादाद्योऽन्यत्रात्मनो ब्रह्म वेद क्षत्रं तं परादाद्योऽन्यत्रात्मनः क्षत्रं वेद लोकास्तं परादुर्योऽन्यत्रात्मनो लोकान्वेद देवास्तं परादुर्योऽन्यत्रात्मनो देवान्वेद भूतानि तं परादुर्योऽन्यत्रात्मनो भूतानि वेद सर्वं तं परादाद्योऽन्यत्रात्मनः

करितां क्षत्रिय प्रिय होतो. (स्वर्गादि) लोकांच्या कार्याकरितां लोक प्रिय होत नसतात, आपल्याच कार्याकरितां लोक प्रिय होतात. देवांच्या कार्याकरितां देव प्रिय होत नसतात, आपल्याच कार्याकरितां देव प्रिय होतात. भूतांच्या [प्राण्यांच्या] कार्याकरितां भूतें प्रिय होत नसतात, आपल्याच कार्याकरितां भूतें प्रिय होतात. (सारांश) कोणतीहि वस्तु त्या वस्तूच्या कार्याकरितां प्रिय होत नसते, आपल्याच कार्याकरितां प्रिय होते. ह्मणून आपण ह्मणजे जो आत्मा तो पाहिला पाहिजे, त्याचें श्रवण केलें पाहिजे, त्याचें मनन व निदिध्यासन केलें पाहिजे. हे मैत्रेयि, आत्म्याचें दर्शन, श्रवण, मनन आणि ज्ञान हीं झालीं असतां या सर्वांचें ज्ञान होतें.५. आपल्याहून ब्राह्मण निराळे आहेत असें ज्याला वाटतें त्याला ब्राह्मण दूर करतात. आपल्याहून क्षत्रिय वेगळे आहेत असें ज्याला वाटतें त्याला क्षत्रिय दूर करतात. आपल्याहून (भू आदि) लोक निराळे आहेत असें ज्याला वाटतें त्याला लोक दूर करतात. आपल्याहून देव निराळे आहेत असें ज्याला वाटते त्याला देव दूर करतात. आपल्याहून भूतमात्र निराळें

सर्वं वेदेदं ब्रह्मेदं क्षत्रमिमे लोका इमे देवा इमानि भूतानीदꣳ सर्वं यदयमात्मा ॥६॥ स यथा दुंदुभेर्हन्यमानस्य न बाह्याञ्छब्दाञ्छक्नुयाद्ग्रहणाय दुंदुभेस्तु ग्रहणेन दुंदुभ्याघातस्य वा शब्दो गृहीतः ॥७॥ स यथा शंखस्य ध्मायमानस्य न बाह्यान् शब्दाञ्शक्नुयाद्ग्रहणाय शंखस्य तु ग्रहणेन शंखध्मस्य वा शब्दो गृहीतः ॥८॥ स यथा वीणायै वाद्यमानायै न बाह्याञ्शब्दाञ्छक्नुयाद्ग्रहणाय वीणायै तु ग्रहणेन वीणावादस्य वा शब्दो गृहीतः ॥९॥ स यथार्द्रैधाग्नेरभ्याहितात्पृथग्धूमा विनिश्चरन्त्येवं वा अरेऽस्य महतो भूतस्य निश्वसितमेतद्यदृग्वेदो यजुर्वेदः सामवेदोऽथर्वांगिरस इतिहासः पुराणं विद्या उपनिषदः श्लोकाः सूत्राण्यनुव्याख्यानानि व्याख्यानान्यस्यै-

आहे असें ज्याला वाटतें त्याला भूतमात्र दूर करतें. आपल्याहून सर्व कांहीं निराळें आहे असें ज्याला वाटतें त्याला सर्व दूर करतें. हे ब्राह्मण, हे क्षत्रिय, हे लोक, हे देव, हीं भूतें आणि हें सर्व आत्मा होय.६. ज्याप्रमाणें दुंदुभि वाजविली जात असतां तिच्यांतून बाहेर निघणारे आवाज पकडतां येत नाहींत, (पण) दुंदुभि अथवा ती वाजविणारा यांनाच पकडलें ह्मणजे आवाज पकडल्यासारखें होतें; ज्याप्रमाणें शंख वाजविला जात असतां त्यांतून बाहेर निघणारे आवाज पकडतां येत नाहींत, (पण) शंख अथवा तो वाजविणारा यांनाच पकडलें ह्मणजे आवाज पकडल्यासारखें होतें; ज्याप्रमाणें वीणा वाजविली जात असतां तिच्यांतून बाहेर निघणारे आवाज पकडतां येत नाहींत, (पण) वीणा अथवा ती वाजविणारा यांनाच पकडलें ह्मणजे आवाज पकडल्यासारखें होतें तद्वत् (आत्मा जवळ केला कीं सर्व जवळ आलें ह्मणून समजावें).७–९. ओल्या इंधनांनीं पेटविलेल्या अग्नीपासून सर्वत्र धूर पसरतो त्याप्रमाणें हें महान् भूत जो परमात्मा त्याचा हा ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्वांगिरस, इतिहास, पुराण, विद्या, उपनिषदें, (ब्राह्मणांतील) मंत्र, सूत्रें, मंत्रविवरणें, व्याख्यानें [=अर्थ] इत्यादि सर्व

वैतानि सर्वाणि निश्वसितानि ॥१०॥ स यथा सर्वासामपाꣳ समुद्र एकायनमेवꣳ सर्वेषाꣳ स्पर्शानां त्वगेकायनमेवꣳ सर्वेषां गंधानां नासिके एकायनमेवꣳ सर्वेषां रसानां जिह्वैकायनमेवꣳ सर्वेषां रूपाणां चक्षुरेकायनमेवꣳ सर्वेषाꣳ शब्दानाꣳ श्रोत्रमेकायनमेवꣳ सर्वेषाꣳ संकल्पानां मन एकायनमेवꣳ सर्वासां विद्यानाꣳ हृदयमेकायनमेवꣳ सर्वेषां कर्मणाꣳ हस्तावेकायनमेवꣳ सर्वेषामानंदानामुपस्थ एकायनमेवꣳ सर्वेषां विसर्गाणां पायुरेकायनमेवꣳ सर्वेषामध्वनां पादावेकायनमेवꣳ सर्वेषां वेदानां वागेकायनम् ॥११॥ स यथा सैंधवखिल्य उदके प्रास्त उदकमेवानुविलीयेत न हास्योद्ग्रहणायेव स्याद्यतो यतस्त्वाददीत लवणमेवैवं वा अर इदं महद्भूतमनंतमपारं विज्ञानघन एवैतेभ्यो भूतेभ्यः समुत्थाय तान्येवानु विनश्यति न प्रेत्य संज्ञास्तीत्यरे ब्रवीमीति होवाच याज्ञवल्क्यः ॥१२॥ सा होवाच मैत्रे-

निश्वास होय. १०. सर्व उदकांचें एकायन [=प्राप्तव्य] ज्याप्रमाणें समुद्र; त्याप्रमाणे सर्व स्पर्शांचें त्वक् हें एकायन, सर्व गंधांचें दोन नासिका हें एकायन, सर्व रसांचें जिह्वा, सर्व रूपांचें चक्षु, सर्व शब्दांचें श्रोत्र, सर्व संकल्पांचें मन, सर्व विद्यांचें हृदय, सर्व कर्मांचे दोन हात, सर्व विसर्जनांचें पायु, सर्व मार्गांचें दोन पाय आणि सर्व वेदांचें वाक् याप्रमाणे एकायनें होत [ह्म० एकायनामध्ये प्रवेश केल्यावर सर्व भेदांचा लय होतो; आणि वरील सर्वांचें प्राण=आत्मा हेंच एकायन आहे]. ११. तें असें— ज्याप्रमाणें मिठाचा खडा पाण्यांत पडला असतां पाण्यामध्येंच लय पावतो व तो वर घेतां येत नाहीं तद्वत्. जेथून जेथून उदक घेतो तेथें तेथें तें खारट (मात्र) लागतें. त्याप्रमाणें हे मैत्रेयि, हें परमात्मरूपी महाभूत अनन्त, अपार आणि विज्ञानानें परिपूर्ण आहे. या भूतांपासून उत्पन्न होणारीं नामरूपादि त्यांच्याच मागोमाग नाश पावतात. प्राणी मरण पावल्यावर त्याला (हें माझें घर, हा माझा पुत्र इत्यादि) कांहीं विशेष संज्ञा रहात नाहीं. असें

ष्यत्रैव मा भगवानमूमुहन्न प्रेत्य संज्ञास्तीति स होवाच याज्ञवल्क्यो न वा अरेऽहं मोहं ब्रवीम्यलं वा अर इदं विज्ञानाय ॥१३॥ यत्र हि द्वैतमिव भवति तदितर इतरं जिघ्रति तदितर इतरं पश्यति तदितर इतरꣳ शृणोति तदितर इतरमभिवदति तदितर इतरं मनुते तदितर इतरं विजानाति यत्र वा अस्य सर्वमात्मैवाभूत्तत्केन कं जिघ्रेत्तत्केन कं पश्येत्तत्केन कꣳ शृणुयात्तत्केन कमभिवदेत्तत् केन कं मन्वीत तत् केन कं विजानीयात् । येनेदꣳ सर्वं विजानाति तं केन विजानीयाद्विज्ञातारमरे केन विजानीयादिति ॥१४॥ इति चतुर्थं ब्राह्मणम्

इयं पृथिवी सर्वेषां भूतानां मध्वस्यै पृथिव्यै सर्वाणि भूतानि मधु यश्चायमस्यां पृथिव्यां तेजोमयोऽमृतमयः पुरुषो यश्चायमध्या-

याज्ञवल्क्यानें सांगितलें.१२. मैत्रेयी ह्मणाली, या ब्रह्मासंबंधानें आपण मला मोह पाडूं नका. (कारण, हें विज्ञानघन आहे व) मेल्यावर याला विशेष संज्ञा नाहीं असें आपणच सांगतां (तें मला समजत नाहीं). याज्ञवल्क्य ह्मणाला, मैत्रेयि, मोह पडण्यासारखें मी बोलत नाहीं. तुला (परमात्मा अनन्त, अपार आहे इत्यादि) ज्ञान झालें इतकें पुरे आहे.१३. जर भिन्नभाव असेल तर एक दुसऱ्याचा वास घेईल, एक दुसऱ्याला पाहील, एक दुसऱ्याला श्रवण करील, एक दुसऱ्याला बोलेल, एक दुसऱ्याचें मनन करील, एक दुसऱ्याला जाणील; परंतु जेव्हां या मनुष्याला सर्व आत्माच आहे असें होतें तेव्हां कशानें कशाचा वास घेणार? कशानें कोणाला पहाणार? कशानें कोणाला श्रवण करणार? कशानें कोणाला बोलणार? कशानें कोणाचें मनन करणार? कशानें कोणाला जाणणार? ज्याच्या योगानें हें सर्व (मनुष्य) जाणतो त्याला कशानें जाणणार? आणि त्या जाणणाऱ्याला कोणत्या (इंद्रियरूपी) साधनानें जाणणार? १४.

ही पृथिवी सर्व भूतांचा मध होय; त्याप्रमाणें सर्व भूतें हीं या पृथिवीचा मध होत; या पृथिवीमध्यें जो तेजोमय व अमृतमय (पार्थिव) पुरुष

त्मꣳ शारीरस्तेजोमयोऽमृतमयः पुरुषोऽयमेव स योऽयमात्मेदममृतमिदं ब्रह्मेदꣳ सर्वम् ॥१॥ इमा आपः सर्वेषां भूतानां मध्वासामपाꣳ सर्वाणि भूतानि मधु यश्चायमास्वप्सु तेजोमयोऽमृतमयः पुरुषो यश्चायमध्यात्मं रैतसस्तेजोमयोऽमृतमयः पुरुषोऽयमेव स योऽयमात्मेदममृतमिदं ब्रह्मेदं सर्वम् ॥२॥ अयमग्निः सर्वेषां भूतानां मध्वस्याग्नेः सर्वाणि भूतानि मधु यश्चायमस्मिन्नग्नौ तेजोमयोऽमृतमयः पुरुषो यश्चायमध्यात्मं वाङ्मयस्तेजोमयोऽमृतमयः पुरुषोऽयमेव स योऽयमात्मेदममृतमिदं ब्रह्मेदꣳ सर्वम् ॥३॥ अयं वायुः सर्वेषां भूतानां मध्वस्य वायोः सर्वाणि भूतानि मधु यश्चायमस्मिन्वायौ तेजोमयोऽमृतमयः पुरुषो यश्चायमध्यात्मं प्राणस्तेजोमयोऽमृतमयः पुरुषोऽयमेव स योऽयमात्मेदममृतमिदं ब्रह्मेदꣳ सर्वम् ॥४॥ अयमादित्यः सर्वेषां भूतानां मध्वस्यादित्यस्य सर्वाणि भूतानि मधु यश्चायमस्मिन्नादित्ये

आहे तो आणि या शरीरामध्यें जो तेजोमय व अमृतमय शारीर पुरुष आहे तो हे सर्व (चार प्रकारचे) मध आत्मा होत. हाच अमृत, हाच ब्रह्म व हाच हें सर्व होय.१. हें उदक सर्व भूतांचा मध; सर्व भूतें या उदकाचा मध; या उदकामध्यें जो तेजोमय व अमृतमय पुरुष आहे तो आणि या शरीरामध्यें जो तेजोमय व अमृतमय रैतस पुरुष आहे तो हे सर्व मध आत्मा होत. हाच अमृत, हाच ब्रह्म व हाच हें सर्व होय.२. हा अग्नि सर्व भूतांचा मध, सर्व भूतें या अग्नीचा मध; या अग्नीमध्यें जो तेजोमय व अमृतमय पुरुष आहे तो आणि या शरीरामध्यें जो तेजोमय व अमृतमय वाग्रूपी पुरुष आहे तो हे सर्व मध आत्मा होत. हाच अमृत, हाच ब्रह्म व हाच हें सर्व होय.३. हा वायु सर्व भूतांचा मध, सर्व भूतें या वायूचा मध; या वायूमध्ये जो तेजोमय व अमृतमय पुरुष आहे तो आणि या शरीरामध्यें जो तेजोमय व अमृतमय प्राणरूपी पुरुष आहे तो हे सर्व मध आत्मा होत. हाच अमृत, हाच ब्रह्म व हाच हें सर्व होय.४. हा आदित्य सर्व भूतांचा मध,

तेजोमयोऽमृतमयः पुरुषो यश्चायमध्यात्मं चाक्षुषस्तेजोमयोऽमृतमयः पुरुषोऽयमेव स योऽयमात्मेदममृतमिदं ब्रह्मेदꣳ सर्वम् ॥५॥ इमा दिशः सर्वेषां भूतानां मध्वासां दिशाꣳ सर्वाणि भूतानि मधु यश्चायमासु दिक्षु तेजोमयोऽमृतमयः पुरुषो यश्चायमध्यात्मꣳ श्रौत्रः प्रातिश्रुत्कस्तेजोमयोऽमृतमयः पुरुषोऽयमेव स योऽयमात्मेदममृतमिदं ब्रह्मेदꣳ सर्वम् ॥६॥ अयं चंद्रः सर्वेषां भूतानां मध्वस्य चंद्रस्य सर्वाणि भूतानि मधु यश्चायमस्मिंश्चंद्रे तेजोमयोऽमृतमयः पुरुषो यश्चायमध्यात्मं मानसस्तेजोमयोऽमृतमयः पुरुषोऽयमेव स योऽयमात्मेदममृतमिदं ब्रह्मेदꣳ सर्वम् ॥७॥ इयं विद्युत्सर्वेषां भूतानां मध्वस्यै विद्युतः सर्वाणि भूतानि मधु यश्चायमस्यां विद्युति तेजोमयोऽमृतमयः पुरुषो यश्चायमध्यात्मं तैजसस्तेजोमयोऽमृतमयः पुरुषोऽयमेव स योऽयमात्मेदममृतमिदं ब्रह्मेदꣳ सर्वम् ॥८॥ अयꣳ

सर्व भूतें या आदित्याचा मध; या आदित्यामध्यें जो तेजोमय व अमृतमय पुरुष आहे तो आणि या शरीरामध्यें जो तेजोमय व अमृतमय चाक्षुष पुरुष आहे तो हे सर्व मध आत्मा होत. हाच अमृत, हाच ब्रह्म व हाच हें सर्व होय.५. या दिशा सर्व भूतांचा मध, सर्व भूतें यांचा मध; या दिशांमध्यें जो तेजोमय व अमृतमय पुरुष आहे तो आणि या शरीरामध्यें जो तेजोमय व अमृतमय श्रवणरूपी व प्रतिश्रवणरूपी पुरुष आहे तो हे सर्व मध आत्मा होत. हाच अमृत, हाच ब्रह्म व हाच हें सर्व होय.६. हा चंद्र सर्व भूतांचा मध, सर्व भूतें याचा मध; या चंद्रामध्यें जो तेजोमय व अमृतमय पुरुष आहे तो आणि या शरीरामध्यें जो तेजोमय व अमृतमय मानस पुरुष आहे तो हे सर्व मध आत्मा होत. हाच अमृत, हाच ब्रह्म व हाच हें सर्व होय.७. ही वीज सर्व भूतांचा मध, सर्व भूतें याचा मध; या विजेमध्यें जो तेजोमय व अमृतमय पुरुष आहे तो आणि या शरीरामध्यें जो तेजोमय व अमृतमय तैजस पुरुष आहे तो हे सर्व मध आत्मा होत. हाच अमृत,

स्तनयित्नुः सर्वेषां भूतानां मध्वस्य स्तनयित्नोः सर्वाणि भूतानि मधु यश्चायमस्मिंस्तनयित्नौ तेजोमयोऽमृतमयः पुरुषो यश्चायमध्यात्मꣳ शाब्दः सौवरस्तेजोमयोऽमृतमयः पुरुषोऽयमेव स योऽयमात्मेदममृतमिदं ब्रह्मेदꣳ सर्वम् ॥९॥ अयमाकाशः सर्वेषां भूतानां मध्वस्याकाशस्य सर्वाणि भूतानि मधु यश्चायमस्मिन्नाकाशे तेजोमयोऽमृतमयः पुरुषो यश्चायमध्यात्मꣳ हृद्याकाशस्तेजोमयोऽमृतमयः पुरुषोऽयमेव स योऽयमात्मेदममृतमिदं ब्रह्मेदꣳ सर्वम् ॥१०॥ अयं धर्मः सर्वेषां भूतानां मध्वस्य धर्मस्य सर्वाणि भूतानि मधु यश्चायमस्मिन्धर्मे तेजोमयोऽमृतमयः पुरुषो यश्चायमध्यात्मं धार्मस्तेजोमयोऽमृतमयः पुरुषोऽयमेव स योऽयमात्मेदममृतमिदं ब्रह्मेदꣳ सर्वम् ॥११॥ इदꣳ सत्यꣳ सर्वेषां भूतानां मध्वस्य सत्यस्य सर्वाणि भूतानि मधु यश्चायमस्मिन्सत्ये तेजोमयोऽमृतमयः पुरुषो यश्चायमध्यात्मꣳ सात्यस्तेजोमयोऽमृतमयः

हाच ब्रह्म व हाच हे सर्व होय.८. हा मेघ सर्व भूतांचा मध, सर्व भूतें याचा मध; या मेघामध्यें जो तेजोमय व अमृतमय पुरुष आहे तो आणि या शरीरामध्ये जो तेजोमय व अमृतमय शाब्द व स्वरयुक्त पुरुष आहे तो हे सर्व मध आत्मा होत. हाच अमृत, हाच ब्रह्म व हाच हें सर्व होय.९. हें आकाश सर्व भूतांचा मध, सर्व भूतें याचा मध; या आकाशामध्यें जो तेजोमय व अमृतमय पुरुष आहे तो आणि या शरीरामध्यें जो तेजोमय व अमृतमय हृदयाकाशरूपी पुरुष आहे तो हे सर्व मध आत्मा होत. हाच अमृत, हाच ब्रह्म व हाच हें सर्व होय.१०. हा धर्म सर्व भूतांचा मध, सर्व भूतें याचा मध; या धर्मामध्यें जो तेजोमय व अमृतमय पुरुष आहे तो आणि या शरीरामध्यें जो तेजोमय व अमृतमय धर्मरूपी पुरुष आहे तो हे सर्व मध आत्मा होत. हाच अमृत, हाच ब्रह्म व हाच हे सर्व होय.११. हें सत्य सर्व भूतांचा मध, सर्व भूतें याचा मध; या सत्यामध्यें जो तेजोमय व अमृतमय पुरुष आहे तो आणि या शरीरामध्यें जो तेजोमय व अमृतमय सत्य पुरुष

पुरुषोऽयमेव स योऽयमात्मेदममृतमिदं ब्रह्मेदꣳ सर्वम् ॥१२॥ इदं मानुषꣳसर्वेषां भूतानां मध्वस्य मानुषस्य सर्वाणि भूतानि मधु यश्चायमस्मिन्मानुषे तेजोमयोऽमृतमयः पुरुषोऽयमेव स योऽयमात्मेदममृतमिदं ब्रह्मेदꣳ सर्वम् ॥१३॥ अयमात्मा सर्वेषां भूतानां मध्वस्यात्मनः सर्वाणि भतानि मधु यश्चायमस्मिन्नात्मनि तेजोमयोऽमृतमयः पुरुषो यश्चायमात्मा तेजोमयोऽमृतमयः पुरुषोऽयमेव स योऽयमात्मेदममृतमिदं ब्रह्मेदꣳ सर्वम् ॥१४॥ स वा अयमात्मा सर्वेषां भूतानामधिपतिः सर्वेषां भूतानां राजा तद्यथा रथनाभौ च रथनेमौ चाराः सर्वे समर्पिता एवमेवास्मिन्नात्मनि सर्वाणि भूतानि सर्वे देवाः सर्वे लोकाः सर्वे प्राणाः सर्व एत आत्मानः समर्पिताः ॥१५॥ इदं वै तन्मधु दध्यङ्ङाथर्वणोऽश्विभ्यामुवाच । तदेतदृषिः पश्यन्नवोचत्

आहे तो हे सर्व मध आत्मा होत. हाच अमृत, हाच ब्रह्म व हाच हें सर्व होय.१२. हा मनुष्य सर्व भूतांचा मध, सर्व भूते याचा मध; या मनुष्यामध्यें जो तेजोमय व अमृतमय पुरुष आहे तो हे सर्व मध आत्मा होत. हाच अमृत, हाच ब्रह्म व हाच हें सर्व होय.१३. हा (कार्यकरणसंघातरूपी मानुषादि सामान्य) आत्मा सर्व भूतांचा मध, सर्व भूतें याचा मध; या आत्म्यामध्यें जो तेजोमय व अमृतमय पुरुष आहे तो आणि जो हा (विज्ञानमय) आत्मरूपी तेजोमय व अमृतमय पुरुष आहे तो हे सर्व मध आत्मा होत. हाच अमृत, हाच ब्रह्म व हाच हे सर्व होय.१४. तो हा आत्मा सर्व भूतांचा अधिपति, सर्व भूतांचा राजा आहे. ज्याप्रमाणें रथाच्या नाभीचे आणि नेमीचे ठिकाणीं सर्व अरा बसविलेल्या असतात त्याप्रमाणें या आत्म्याचे ठिकाणीं सर्व भूतें, सर्व देव, सर्व लोक, सर्व प्राण आणि हे सर्व (प्रतिशरीरामध्यें प्रतिबिंबित असे) आत्मे स्थित आहेत.१५. हें मधु ब्राह्मण दध्यङ् आथर्वण ऋषीनें अश्विनीकुमारांना सांगितलें. (शिर तुटलेल्या जागीं दुसरें शिर लावण्याचें अश्विनीकुमारांचें) कर्म पाहून तो मंत्रद्रष्टा ऋषि ह्मणाला, हे

तद्वां नरा सनये दंस उग्रमाविष्कृणोमि तन्यतुर्न वृष्टिं दध्यङ् ह यन्मध्वाथर्वणो वामश्वस्य शीर्ष्णा प्र यदीमुवाचेति ॥१६॥ इदं वै तन्मधु दध्यङ्ङाथर्वणोऽश्विभ्यामुवाच । तदेतदृषिः पश्यन्नवोचदाथर्वणायाश्विना दधीचेऽश्व्यꣳ शिरः प्रत्यैरयतं स वां मधु प्रवोचदृतायन्त्वाष्ट्रं यद्दस्रावपि कक्ष्यं वामिति ॥१७॥ इदं वै तन्मधु दध्यङ्ङाथर्वणोऽश्विभ्यामुवाच । तदेतदृषिः पश्यन्नवोचत् । पुरश्चक्रे द्विपदः पुरश्चक्रे चतुष्पदः । पुरः स पक्षी भूत्वा पुरः पुरुष आविशदिति । स वा अयं पुरुषः सर्वासु पूर्षु पुरिशयो नैनेन किंचनानावृतं नैनेन किंचनासंवृतम् ॥१८॥ इदं वै तन्मधु दध्यङ्ङाथर्वणोऽश्विभ्यामुवाच । तदेतदृषिः पश्यन्नवोचद्रूपं रूपं प्रतिरूपो बभूव तदस्य रूपं प्रतिचक्ष-

अश्विनौ, मेघ ज्याप्रमाणें वृष्टि प्रकाशित करतो त्याप्रमाणें तुमच्या लाभाकरितां तुमचें उग्र कर्म मी प्रकाशित करतों. असें ह्मणून अश्वाच्या शिरानें युक्त झालेल्या दध्यङ् आथर्वणानें अश्विनीकुमारांना मधु ब्राह्मण सांगितलें. १६. दध्यङ् आथर्वणानें अश्विनीकुमारांना सांगितलेलें मधु ब्राह्मण तें हें. तो ऋषि ह्मणाला, हे अश्विनौ, दध्यङ् आथर्वणाला तुह्मी घोड्याचें शिर लावलेंत. हे शत्रुमर्दन करणारे अश्विनीकुमारहो, सत्य पालन करणाऱ्या त्या ऋषीनें केवळ आदित्यसंबंधीच नव्हे तर परमात्मसंबंधी गूढ मधु ब्राह्मण देखील सांगितलें. १७. दध्यङ् आथर्वणानें अश्विनीकुमारांना सांगितलेलें मधु ब्राह्मण तें हें. तो ऋषि ह्मणाला, ईश्वरानें द्विपाद प्राण्यांचीं शरीरें केलीं, चतुष्पाद प्राण्यांचीं शरीरें केलीं. नंतर तो स्वतः लिंगशरीर धारण करून पुरुषाच्या शरीरामध्यें प्रवेश करता झाला. तो हा पुरुष सर्व शरीरांमध्यें असतो ह्मणून त्याला पुरिशय ह्मणतात. यानें जें आच्छादिलेलें नाहीं अथवा ज्याच्यामध्यें प्रवेश केलेला नाहीं असें कांहीं नाहीं. १८. दध्यङ् आथर्वणानें अश्विनीकुमारांना सांगितलेलें मधु ब्राह्मण तें हें. तो ऋषि ह्मणाला, तो परमात्मा प्रतिठिकाणीं आपलें (एकच असलेलें) रूप पहाण्याकरितां प्रत्येक रूपाचे ठिकाणीं ते तें

णाय । इंद्रो मायाभिः पुरुरूप ईयते युक्ता ह्यस्य हरय: शता दशेति अयं वै हरयोऽयं वै दश च सहस्राणि बहूनि चानंतानि च तदेत-ब्रह्मापूर्वमनपरमनंतरमबाह्यमयमात्मा ब्रह्म सर्वानुभूरित्यनुशासनम् ॥१९॥ इति पंचमं ब्राह्मणम् ॥५॥

अथ वंशः पौतिमाष्यो गौपवनाद्गौपवन. पौतिमाष्यात्पौति-माष्यो गौपवनाद्गौपवनः कौशिकात्कौशिकः कौंडिन्यात्कौंडिन्यः शांडिल्याच्छांडिल्यः कौशिकाच्च गौतमाच्च गौतम: ॥१॥ आग्नि-वेश्यादाग्निवेश्यः शांडिल्याच्चानभिम्लाताच्चानभिम्लात आनभिम्लातादानभिम्लात आनभिम्लातादानभिम्लातो गौतमाद्गौतमः सैतवप्राचीनयोगाभ्या९ सैतवप्राचीनयोग्यौ पाराशर्यात्पाराशर्यो भारद्वाजाद्भारद्वाजो भारद्वाजाच्च गौतमाच्च गौतमो भारद्वाजाद्भारद्वाजः पाराशर्यात् पाराशर्यो बैजवापायनाद्बैजवापायनः कौशिकायनेः कौशिकायनिः ॥२॥ घृतकौशिकाद्घृतकौशिकः पाराशर्यायणात् पाराशर्यायणः पाराशर्यात् पाराशर्यो जातूकर्ण्याज्जातूकर्ण्य आसुरायणाच्च यास्काच्चासुरायणस्त्रैवणेस्त्रैवणिरौपजधनेरौपजंधनिरासुरेरासुरिर्भारद्वाजाद्भारद्वाज आत्रेयादात्रेयो मांटेर्मांटिर्गौतमाद्गौतमो गौतमाद्गौतमो वात्स्याद्वात्स्यः शांडिल्याच्छांडिल्यः कैशोर्यात्काप्यात्कैशोर्यः काप्यः कुमारहारितात्कु-

रूप धारण करता झाला. (वस्तुत: एकरूप असून) परमात्मा मायेने नाना रूपे धारण करतो. याचीं एकशे दहा इंद्रियें तयार असतात. हाच हीं इंद्रियें होय. दहा अथवा हजार अथवा बहुत अथवा अनन्त अशीं इंद्रियें हाच होय. तें हे ब्रह्म अपूर्व, अनपर, अनन्तर व अबाह्य होय. हाच आत्मा सर्वांचा अनुभव घेणारा आहे, हाच सर्व वेदान्तवाक्याचा निष्कर्ष होय.१९.

आतां या ज्ञानप्राप्तीची परपरा सागतात. गौपवनापासून पौतिमाष्याला ही विद्या प्राप्त झाली, पौतिमाष्यापासून गौपवनाला, गौपवनापासून पौतिमाष्याला, कौशिकापासून गौपवनाला, इत्यादि...

मारहारितो गालवाद्गालवो विदर्भीकौंडिन्याद्विदर्भीकौंडिन्यो वत्सनपातो बाभ्रवाद्वत्सनपाद्बाभ्रवः पथः सौभरात्पन्थाः सौभरोऽयास्यादांगिरसादयास्य आंगिरस आभूतेस्त्वाष्ट्रादाभूतिस्त्वाष्ट्रो विश्वरूपात्त्वाष्ट्राद्विश्वरूपस्त्वाष्ट्रोऽश्विभ्यामश्विनौ दधीच आथर्वणाद्दध्यङ्ङाथर्वणोऽथर्वणो दैवादथर्वा दैवो मृत्योः प्राध्वंसनान्मृत्युः प्राध्वंसनः प्रध्वंसनात्प्रध्वंसन एकर्षेरेकर्षिर्विप्रचित्तेर्विप्रचित्तिर्व्यष्टेर्व्यष्टिः सनारोः सनारुः सनातनात्सनातनः सनगात्सनगः परमेष्ठिनः परमेष्ठी ब्रह्मणो ब्रह्म स्वयंभु ब्रह्मणे नमः ॥३॥ इति षष्ठं ब्राह्मणम् ॥६॥ इति द्वितीयोऽध्यायः ॥२॥

अथ तृतीयोऽध्यायः ॥

ॐ जनको ह वैदेहो बहुदक्षिणेन यज्ञेनेजे तत्र ह कुरुपंचालानां ब्राह्मणा अभिसमेता बभूवुस्तस्य ह जनकस्य वैदेहस्य विजिज्ञासा बभूव कःस्विदेषां ब्राह्मणानामनूचानतम इति स ह गवां सहस्रमवरुरोध दश दश पादा एकैकस्याः शृंगयोराबद्धा बभुवुः ॥१॥ तान्होवाच ब्राह्मणा भगवन्तो यो वो ब्रह्मिष्ठः स एता गा उदजतामिति । ते ह ब्राह्मणा न दधृषुरथ ह याज्ञवल्क्यः स्वमेव ब्रह्मचारिण-

## अध्याय तिसरा.

विदेह देशाच्या जनक राजानें बहुत दक्षिणेनें युक्त अशा यज्ञानें यजन केलें. त्या ठिकाणी कुरु व पंचाल या देशांतले ब्राह्मण जमले होते. या ब्राह्मणांपैकीं प्रश्नांचीं उत्तरें देण्याला अत्यंत समर्थ कोण असावा हें जाणण्याची जनकाला इच्छा झाली. त्यानें प्रत्येक गाईच्या प्रत्येक शिंगाला दहा पाद [सोन्याचें नाणें] बांधलेलें अशा एक हजार गाई गोशाळेत वेगळ्या बांधून ठेवल्या. १. जनक त्या ब्राह्मणांना ह्मणाला, हे भगवान् ब्राह्मणहो, तुमच्यामध्ये जो ब्राह्मणश्रेष्ठ असेल त्यानें या गाई घेऊन जाव्या. कोणा ब्राह्मणाचें धैर्य होईना. तेव्हां याज्ञवल्क्यानें आपल्या शिष्याला सांगितलें

मुवाचैताः सोम्योदज सामश्रवा३ इति ता होदाचकार ते ह ब्राह्मणाश्चुक्रुधुः कथं नो ब्रह्मिष्ठो ब्रुवीतेत्यथ ह जनकस्य वैदेहस्य होताश्वलो बभूव स हैनं पप्रच्छ त्वं नु खलु नो याज्ञवल्क्य ब्रह्मिष्ठोऽसी३ इति स होवाच नमो वयं ब्रह्मिष्ठाय कुर्मो गोकामा एव वयꣳ स्म इति तꣳ ह तत एव प्रष्टुं दध्रे होताश्वलः ॥२॥ याज्ञवल्क्येति होवाच यदिदꣳ सर्वं मृत्युनाप्तꣳ सर्वं मृत्युनाभिपन्नं केन यजमानो मृत्योराप्तिमतिमुच्यत इति होत्रर्त्विजाग्निना वाचा वाग्वै यज्ञस्य होता तद्येयं वाक् सोऽयमग्निः स होता स मुक्तिः सातिमुक्तिः ॥३॥ याज्ञवल्क्येति होवाच यदिदꣳ सर्वमहोरात्राभ्यामाप्तꣳ सर्वमहोरात्राभ्यामभिपन्नं केन यजमानोऽहोरात्रयोराप्तिमतिमुच्यत इत्यध्वर्युणर्त्विजा चक्षुषाऽऽदित्येन चक्षुर्वै यज्ञस्याध्वर्युस्तद्यदिदं चक्षुः सोऽसावादित्यः सोऽध्वर्युः

कीं, बाळा सामश्रवा, गाई घेऊन चल. तो त्याप्रमाणे घेऊन चालला. त्या (इतर) ब्राह्मणांना क्रोध आला. हा स्वतःला ब्रह्मिष्ठ कसा ह्मणवतो? जनकाचा होता अश्वल नामक होता त्याने याज्ञवल्क्याला विचारलें, याज्ञवल्क्या, तूं ब्रह्मिष्ठ आहेस काय? याज्ञवल्क्य ह्मणाला, जो कोणी ब्रह्मिष्ठ असेल त्याला आपण आपले वंदन करतो. आह्माला आपली गाई घेण्याचीच इच्छा. तेव्हां अश्वल होत्याला याज्ञवल्क्याला प्रश्न करण्याचे धैर्य झालें.२. तो ह्मणाला, याज्ञवल्क्या, हे सर्व (कर्म) मृत्यूने व्याप्त व वशीकृत आहे. या मृत्यूच्या व्याप्तीपासून यजमान कशाने मुक्त होईल? याज्ञवल्क्य ह्मणाला, होता ऋत्विक, अग्नि आणि वाक् यांनीं मुक्त होईल. वाक् हाच यज्ञाचा होता. ही जी वाक् तीच अग्नि, तीच होता, तीच मुक्ति आणि तीच अतिमुक्ति होय.३. अश्वल ह्मणाला, याज्ञवल्क्या, हे सर्व दिवस व रात्र यांनीं व्याप्त व वशीकृत आहे. या दिवसरात्रीच्या व्याप्तीपासून यजमान कशाने मुक्त होईल? याज्ञवल्क्य ह्मणाला, अध्वर्यु ऋत्विक्, चक्षु आणि आदित्य यांनीं मुक्त होईल. चक्षु

स मुक्तिः सातिमुक्तिः ॥४॥ याज्ञवल्क्येति होवाच यदिदꣳ सर्वं पूर्वपक्षापरपक्षाभ्यामाप्तꣳ सर्वं पूर्वपक्षापरपक्षाभ्यामभिपन्नं केन यजमानः पूर्वपक्षापरपक्षयोराप्तिमतिमुच्यत इत्युद्गात्रर्त्विजा वायुना प्राणेन प्राणो वै यज्ञस्योद्गाता तद्योऽयं प्राणः स वायुः स उद्गाता स मुक्तिः सातिमुक्तिः ॥५॥ याज्ञवल्क्येति होवाच यदिदमंतरिक्षमनारंबणमिव केनाक्रमेण यजमानः स्वर्गं लोकमाक्रमत इति ब्रह्मणर्त्विजा मनसा चंद्रेण मनो वै यज्ञस्य ब्रह्मा तद्यदिदं मनः सोऽसौ चंद्रः स ब्रह्मा स मुक्तिः सातिमुक्तिरित्यतिमोक्षा अथ संपदः ॥६॥ याज्ञवल्क्येति होवाच कतिभिरयमद्यर्ग्भिर्होतास्मिन्यज्ञे करिष्यतीति तिसृभिरिति कतमास्तास्तिस्र इति पुरोऽनुवाक्या च याज्या च शस्यैव तृतीया किं ताभिर्जयतीति यत्किंचेदं प्राणभृदिति ॥७॥ याज्ञवल्क्येति होवाच

हाच यज्ञाचा अध्वर्यु. हा जो चक्षु तोच आदित्य, तोच अध्वर्यु, तोच मुक्ति आणि तोच अतिमुक्ति होय.४. अश्वल ह्मणाला, याज्ञवल्क्या, हे सर्व शुक्लपक्ष व कृष्णपक्ष यांनीं व्याप्त व वशीकृत आहे. या दोन्ही पक्षांच्या व्याप्तीपासून यजमान कशाने मुक्त होईल? याज्ञवल्क्य ह्मणाला, उद्गाता ऋत्विक्, वायु आणि प्राण यांनीं मुक्त होईल. प्राण हा यज्ञाचा उद्गाता. हा जो प्राण तोच वायु, तोच उद्गाता, तोच मुक्ति आणि तोच अतिमुक्ति होय.५. अश्वल ह्मणाला, याज्ञवल्क्या, हें अंतरिक्ष आधाररहित आहे. कोणत्या कोणत्या पायरीने यजमान स्वर्गलोकाचे आक्रमण करूं शकेल? याज्ञवल्क्य ह्मणाला, ब्रह्मा ऋत्विक्, मन आणि चंद्र यांनीं करील. मन हा यज्ञाचा ब्रह्मा. हे जे मन तोच चद्र, तोच ब्रह्मा, तोच मुक्ति आणि तोच अतिमुक्ति होय. याप्रमाणे मृत्यूपासून मुक्त होण्याचीं साधनें सांगितलीं. आता फलाचें संपादन सांगतात.६. अश्वल ह्मणाला, "या यज्ञामध्ये होता किती ऋचांनीं (हवन) करतो?" याज्ञवल्क्य ह्मणाला, "तीन ऋचांनीं." "त्या तीन ऋचा कोणत्या?" "पुरोनुवाक्या, याज्या आणि शस्या." "या तीन ऋचांनीं

कत्ययमद्याध्वर्युरस्मिन्यज्ञ आहुतीर्होष्यतीति तिस्र इति कतमास्तास्तिस्र इति या हुता उज्ज्वलन्ति या हुता अतिनेदन्ते या हुता अधिशेरते किं ताभिर्जयतीति या हुता उज्ज्वलन्ति देवलोकमेव ताभिर्जयति दीप्यत इव हि देवलोको या हुता अतिनेदन्ते पितृलोकमेव ताभिर्जयत्यतीव हि पितृलोको या हुता अधिशेरते मनुष्यलोकमेव ताभिर्जयत्यध इव हि मनुष्यलोकः ॥८॥ याज्ञवल्क्येति होवाच कतिभिरयमद्य ब्रह्मा यज्ञं दक्षिणतो देवताभिर्गोपायतीत्येकयेति कतमा सैकेति मन एवेत्यनंतं वै मनोऽनंता विश्वे देवा अनंतमेव स तेन लोकं जयति ॥९॥ याज्ञवल्क्येति होवाच कत्ययमद्योद्गाताऽस्मिन्यज्ञे स्तोत्रियाः स्तोष्यतीति तिस्र इति कतमास्तास्तिस्र इति पुरोनुवाक्या च याज्या च शस्यैव

तो काय संपादन करतो?" "जें जें प्राणयुक्त आहे तें सर्व."७. "याज्ञवल्क्या, या यज्ञामध्यें अध्वर्यु किती आहुति हवन करतो?" "तीन." "त्या तीन कोणत्या?" "ज्या हवन केल्या असतां ज्वलन पावतात त्या [आज्यादि], ज्या हवन केल्या असतां मोठा शब्द करतात त्या [मांसादि], आणि ज्या हवन केल्या असतां खालीं जातात त्या [उदक, सोम इत्यादि]." "या तीन आहुतींनीं तो काय संपादन करतो?" "ज्या ज्वलन पावतात त्यांनीं देवलोक संपादन करतो. कारण देवलोक दीप्तियुक्त आहे. ज्या शब्द करतात त्यांनीं पितृलोक संपादन करतो. कारण पितृलोकीं जातांना 'मेलों मेलों, सोडवा' असा मोठा शब्द होतो. ज्या खालीं जातात त्यांनीं मनुष्यलोक संपादन करतो. कारण मनुष्यलोक खालीं आहे."८. "ब्रह्मा दक्षिणेकडे (ब्रह्मासनीं) बसून किती देवतांनीं यज्ञाचें रक्षण करतो?" "एका देवतेनें." "ती एक कोणती?" "मन. कारण मन अनन्त आहे. सर्व देव अनन्त आहेत. त्यानें अन्तरहित असाच लोक तो संपादन करतो."९. "याज्ञवल्क्या, या यज्ञामध्यें उद्गाता किती स्तोत्रिय ऋचांनी स्तवन करतो?" "तीन." "त्या तीन कोणत्या?" "पुरोनुवाक्या, याज्या आणि शस्या." "सर्व प्राणभृत्

तृतीया कतमास्ता या अध्यात्ममिति प्राण एव पुरोनुवाक्याऽपानो याज्या व्यानः शस्या किं ताभिर्जयतीति पृथिवीलोकमेव पुरोनुवाक्यया जयत्यंतरिक्षलोकं याज्यया द्युलोकꣳ शस्यया ततो ह होताश्वल उपरराम ॥१०॥ इति प्रथमं ब्राह्मणम् ॥१॥

अथ हैनं जारत्कारव आर्तभागः पप्रच्छ याज्ञवल्क्येति होवाच कति ग्रहाः कत्यतिग्रहा इति । अष्टौ ग्रहा अष्टावतिग्रहा इति ये तेऽष्टौ ग्रहा अष्टावतिग्रहाः कतमे त इति ॥१॥ प्राणो वै ग्रहः सोऽपानेनातिग्राहेण गृहीतोऽपानेन हि गंधाञ्जिघ्रति ॥२॥ वाग्वै ग्रहः स नाम्नातिग्राहेण गृहीतो वाचा हि नामान्यभिवदति ॥३॥ जिह्वा वै ग्रहः स रसेनातिग्राहेण गृहीतो जिह्वया हि रसान्विजानाति ॥४॥ चक्षुर्वै ग्रहः स रूपेणातिग्राहेण गृहीतश्चक्षुषा हि रूपाणि पश्यति ॥५॥ श्रोत्रं वै ग्रहः स शब्देनातिग्राहेण गृहीतः श्रोत्रेण हि शब्दा-

संपादन करणाऱ्या या तीन कोणत्या ?" "प्राण ही पुरोनुवाक्या, अपान ही याज्या आणि व्यान ही शस्या." "यांनीं काय संपादन करतो ?" "पुरोनुवाक्येनें पृथिवीलोक, याज्येनें अंतरिक्षलोक आणि शस्येनें द्युलोक संपादन करतो." यानंतर अश्वल होता प्रश्न करण्याचा थांबला. १०.

नंतर जरत्कारुगोत्रोत्पन्न आर्तभाग ह्मणाला, "याज्ञवल्क्या, ग्रह [=घेणारे ?] किती आहेत ? अतिग्रह किती आहेत ?" "आठ ग्रह आहेत आणि आठ अतिग्रह आहेत." "ते आठ ग्रह आणि आठ अतिग्रह कोणते ?" १. प्राण [=घ्राण] हा ग्रह; हा गंध [अपान] या अतिग्रहानें गृहीत आहे. कारण घ्राणानें गंधाचा वास घेतात. २. वाक् हा ग्रह; हा नाम या अतिग्रहानें गृहीत आहे. कारण वाचेनें नामें उच्चारतात. ३. जिह्वा हा ग्रह; हा रस या अतिग्रहानें गृहीत आहे. कारण जिह्वेनें रस जाणतात. ४. चक्षु हा ग्रह; हा रूप या अतिग्रहानें गृहीत आहे. कारण चक्षूनें रूपें पहातात. ५. श्रोत्र हा ग्रह; हा शब्द या अतिग्रहानें गृहीत आहे. कारण

च्छृणोति ॥६॥ मनो वै ग्रहः स कामेनातिग्राहेण गृहीतो मनसा हि कामान्कामयते ॥७॥ हस्तौ वै ग्रहः स कर्मणातिग्राहेण गृहीतो हस्ताभ्याꣳ हि कर्म करोति ॥८॥ त्वग्वै ग्रहः स स्पर्शेनातिग्राहेण गृहीतस्त्वचा हि स्पर्शान्वेदयत इत्येतेऽष्टौ ग्रहा अष्टावतिग्रहाः ॥९॥ याज्ञवल्क्येति होवाच यदिदꣳ सर्वं मृत्योरन्नं कास्वित्सा देवता यस्या मृत्युरन्नमित्यग्निर्वै मृत्युः सोऽपामन्नमप पुनर्मृत्युं जयति ॥१०॥ याज्ञवल्क्येति होवाच यत्रायं पुरुषो म्रियत उदस्मात्प्राणाः क्रामन्त्याहो३ नेति नेति होवाच याज्ञवल्क्योऽत्रैव समवनीयन्ते स उच्छ्वयत्याध्मायत्याध्मातो मृतः शेते ॥११॥ याज्ञवल्क्येति होवाच यत्रायं पुरुषो म्रियते किमेनं न जहातीति नामेत्यनंतं वै नामानंता विश्वे देवा अनंतमेव स तेन लोकं जयति ॥१२॥ याज्ञवल्क्येति होवाच यत्रास्य पुरु-

श्रोत्रानें शब्द श्रवण करतात.६. मन हा ग्रह; हा काम [इच्छा] या अतिग्रहानें गृहीत आहे. कारण मनानें इच्छांची इच्छा होते.७. हस्त हा ग्रह; हा कर्म या अतिग्रहानें गृहीत आहे. कारण हातांनीं कर्म करतात.८. त्वचा हा ग्रह; हा स्पर्श या अतिग्रहानें गृहीत आहे. कारण त्वचेनें स्पर्श जाणतात. असे आठ ग्रह आणि आठ अतिग्रह आहेत.''९. ''याज्ञवल्क्या, हें जें सर्व आहे हें मृत्यूचें अन्न आहे. मृत्यु जिचें अन्न आहे अशी देवता कोणती?'' ''अग्नि हा (सर्वांचा) मृत्यु [नाश करणारा] आहे. तो उदकाचें अन्न आहे. (याप्रमाणें सर्व बंधनाचा नाश झाला ह्मणजे मनुष्य) मृत्यूवर जय मिळवितो [=जन्ममृत्युरहित होतो].''१०. ''याज्ञवल्क्या, जेव्हां हा (मुक्त ज्ञानी) पुरुष मरण पावतो तेव्हां त्याचीं इंद्रियें त्याच्यामधून निघून वर जातात की जात नाहींत?'' याज्ञवल्क्य ह्मणाला, ''नाहीं. तीं येथें नष्ट होतात. तो [=शरीर] फुगतो, बाह्य वायूनें भरतो व मृत होऊन ताठा पडून रहातो.''११. ''याज्ञवल्क्या, जेव्हां हा पुरुष मरण पावतो तेव्हां याला सोडीत नाहीं असें काय असतें?'' ''नांव. नाम अनन्त [अन्तरहित] आहे, सर्व

षस्य मृतस्याग्निं वागप्येति वातं प्राणश्चक्षुरादित्यं मनश्चंद्रं दिशः श्रोत्रं पृथिवीꣳ शरीरमाकाशमात्मौषधीर्लोमानि वनस्पतीन्केशा अप्सु लोहितं च रेतश्च निधीयते क्वायं तदा पुरुषो भवतीत्याहर सोम्य हस्तमार्तभागावामेवैतस्य वेदिष्यावो न नावेतत् सजन इति । तौ होत्क्रम्य मंत्रयांचक्राते तौ ह यदूचतुः कर्म हैव तदूचतुरथ यत्प्रशशंसतुः कर्म हैव तत्प्रशशंसतुः पुण्यो वै पुण्येन कर्मणा भवति पापः पापेनेति ततो ह जारत्कारव आर्तभाग उपरराम ॥१३॥ इति द्वितीयं ब्राह्मणम्

अथ हैनं भुज्युर्लाह्यायनिः पप्रच्छ याज्ञवल्क्येति होवाच । मद्रेषु चरकाः पर्यव्रजाम ते पतंचलस्य काप्यस्य गृहानैम तस्यासीद्दुहिता गंधर्वगृहीता तमपृच्छाम कोऽसीति सोऽब्रवीत्सुधन्वांगिरस

देव अनन्त आहेत, त्यानें त्याला अनन्त अशा लोकाची प्राप्ति होते.''१२. ''याज्ञवल्क्या, जेव्हां हा पुरुष मरण पावल्यावर याची वाणी अग्नीप्रत जाते, प्राण वायूप्रत, चक्षु आदित्याप्रत, मन चंद्राप्रत, श्रोत्र दिशांप्रत, शरीर पृथिवीप्रत, हृदय आकाशाप्रत, लोम ओषधींप्रत, केश वनस्पतीप्रत आणि रक्त व रेत उदकाप्रत जातात तेव्हां हा पुरुष कोठ असतो ?'' ''बाळा आर्तभागा, तुझा हात दे. ही गोष्ट फक्त तुला व मलाच माहीत झाली पाहिजे. ही आपली गोष्ट या जनसमुदायामध्यें (सांगणें) बरोबर नाहीं.'' नंतर ते दोघे निघून गेले व एकत्र विचार करते झाले. अखेरीस त्यांनीं (निर्णय ह्मणून) जो सांगितला तो 'कर्म' हाच सांगितला. त्यांनीं प्रशंसा केली ती कर्मांचीच केली. पुण्यकर्मांचे योगानें मनुष्य पुण्ययुक्त होतो आणि पापकर्मांचे योगानें पापी होतो. यानंतर जरत्कारुगोत्रोत्पन्न आर्तभाग स्तब्ध बसला.१३.

नंतर लह्याचा पुत्र भुज्यु ह्मणाला, ''याज्ञवल्क्या, आह्मी (अध्ययन-व्रत) आचरण करीत असतांना मद्रदेशामध्यें प्रवास करीत होतों. ते आह्मी कपिगोत्री पतंचलाच्या घरीं गेलों. त्याच्या मुलीच्या अंगामध्यें एक गंधर्व येत असे. आह्मी त्या गंधर्वाला [=गंधर्वाचा संचार झालेल्या मुलीला]

इति तं यदा लोकानामन्तानपृच्छामाथैनमब्रूम क पारिक्षिता अभवन्निति क पारिक्षिता अभवन् स त्वा पृच्छामि याज्ञवल्क्य क पारिक्षिता अभवन्निति ॥१॥ स होवाचोवाच वै सोऽगच्छन्वै ते तद्यत्राश्वमेधयाजिनो गच्छन्तीति क न्वश्वमेधयाजिनो गच्छन्तीति द्वात्रिंशतं वै देवरथाह्न्यान्ययं लोकस्तꣳ समन्तं पृथिवी द्विस्तावत्पर्येति ताꣳ समन्तं पृथिवीं द्विस्तावत्समुद्रः पर्येति तद्यावती क्षुरस्य धारा यावद्वा मक्षिकायाः पत्रं तावानन्तरेणाकाशस्तानिंद्रः सुपर्णो भूत्वा वायवे प्रायच्छत्तान्वायुरात्मनि धित्वा तत्रागमयद्यत्राश्वमेधयाजिनोऽभवन्नित्येवमिव वै स वायुमेव प्रशशंस तस्माद्वायुरेव व्यष्टिर्वायुः समष्टिरप

विचारलें कीं, तूं कोण आहेस ? तो ह्मणाला, अंगिरसगोत्री सुधन्वा आहे. पुढें त्याला आह्मीं लोकांचा शेवट काय होतो वगैरे अनुरोधानें विचारलें कीं, पारिक्षित कोठें गेले ? (त्याचें त्यानें दिलेलें उत्तर मी जाणतों व) 'पारिक्षित कोठें गेले ?' असा तुला मी प्रश्न करतों. तर सांग, पारिक्षित कोठें गेले ?१. याज्ञवल्क्य ह्मणाला, "त्या गंधर्वानें सांगितलें कीं, अश्वमेधयज्ञ करणारे जेथें जातात तेथें ते गेले." "अश्वमेधयज्ञ करणारे कोठें जातात ?" "आदित्य एका दिवसामध्यें जेवढा प्रदेश आक्रमण करतो त्याच्या बत्तीसपट प्रदेश ह्मणजे हा लोक होय. या लोकाभोंवतीं याच्या दुप्पट विस्तारानें पृथिवी पसरलेली आहे. पृथिवीभोंवतीं पृथिवीच्या दुप्पट विस्तारानें समुद्र वेष्टिलेला आहे. त्याच्या सभोंवतीं वस्तऱ्याच्या धारेइतकी अथवा माशीच्या पंखाइतकी पोकळी आहे. त्या पोकळीमधून परमेश्वरानें गरुडाचें रूप धारण करून त्या (अश्वमेधयाजी) पारिक्षितांना (पुढे मूर्त स्वरूपाला जातां येत नाहीं, आत्म्यालाच जातां येतें ह्मणून) वायूच्या स्वाधीन केलें. वायूनें त्यांना आपलें रूप देऊन, अश्वमेधयाजी जेथें होते त्या ठिकाणीं नेलें. ह्मणून त्या गंधर्वानें वायूचीच प्रशंसा केली. वायुच व्यष्टि [विविध वस्तुरूपानें व्याप्ति] आणि वायुच समष्टि [केवल सूत्ररूपानें व्याप्ति] होय. हें

पुनर्मृत्युं जयति य एवं वेद ततो ह भुज्युर्लाह्यायनिरुपरराम ॥२॥
इति तृतीयं ब्राह्मणम् ॥३॥

अथ हैनमुषस्तश्चाक्रायणः पप्रच्छ याज्ञवल्क्येति होवाच यत्साक्षादपरोक्षाद्ब्रह्म य आत्मा सर्वांतरस्तं मे व्याचक्ष्व इत्येष त न आत्मा सर्वांतरः कतमो याज्ञवल्क्य सर्वांतरो यः प्राणेन प्राणिति स त आत्मा सर्वांतरो योऽपानेनापानेति स त आत्मा सर्वांतरो यो व्यानेन व्यानिति स त आत्मा सर्वांतरो य उदानेनोदानिति स त आत्मा सर्वांतर एष त आत्मा सर्वांतरः ॥१॥ स होवाचोषस्तश्चाक्रायणो यथा विब्रूयादसौ गौरसावश्व इत्येवमेवैतद्व्यपदिष्टं भवति यदेव साक्षादपरोक्षाद्ब्रह्म य आत्मा सर्वांतरस्तं मे व्याचक्ष्वेत्येष त आत्मा सर्वांतरः कतमो याज्ञवल्क्य सर्वांतरो न दृष्टेर्द्रष्टारं पश्येर्न श्रुतेः श्रोतारं

जो जाणतो त्याला पुन्हां मरण येत नाहीं.'' तेव्हां लह्याचा पुत्र भुज्यु स्तब्ध राहिला.२.

नंतर चक्राचा पुत्र उषस्त ह्मणाला, ''याज्ञवल्क्या, साक्षात् व प्रत्यक्ष ब्रह्म असा जो सर्वव्यापी आत्मा तो मला सांग.'' ''हा पहा तुझाच आत्मा सर्वव्यापी आहे.'' ''याज्ञवल्क्या, सर्वव्यापी कोणता?'' ''जो प्राणाने प्राणन करतो तो तुझा सर्वव्यापी आत्मा. जो अपानाने अपानकर्म करतो तो तुझा सर्वव्यापी आत्मा. जो व्यानाने व्यानकर्म करतो तो तुझा सर्वव्यापी आत्मा. जो उदानाने उदानकर्म करतो तो तुझा सर्वव्यापी आत्मा. हाच तुझा आत्मा सर्वव्यापी होय.''१. ''जसे सांगावें कीं, हा (असा चालतो तो वगैरे) बैल, हा अश्व, अशाच प्रकारचे (प्राणादिकांच्या खुणेने हा आत्मा असे) तूं सांगितलेंस. साक्षात् प्रत्यक्ष ब्रह्म असा सर्वव्यापी आत्मा तो मला सांग.'' ''हा तुझाच आत्मा सर्वव्यापी आहे.'' ''याज्ञवल्क्या, सर्वव्यापी कोणता?'' ''(तुझ्या लौकिक) दृष्टीच्या द्रष्ट्याला [आत्म्याला] तूं तुझ्या दृष्टीने पाहूं नकोस. श्रुतीच्या श्रोत्याला तुझ्या श्रवणांनीं तूं श्रवण

शृणुया न मतेर्मन्तारं मन्वीथा न विज्ञातेर्विज्ञातारं विजानीयाः। एष त आत्मा सर्वांतरोऽतोऽन्यदार्तं ततो होषस्तश्चाक्रायण उपरराम ॥२॥ इति चतुर्थं ब्राह्मणम् ॥४॥

अथ हैनं कहोलः कौषीतकेयः पप्रच्छ याज्ञवल्क्येति होवाच यदेव साक्षादपरोक्षाद्ब्रह्म य आत्मा सर्वांतरस्तं मे व्याचक्ष्वेत्येष त आत्मा सर्वांतरः। कतमो याज्ञवल्क्य सर्वांतरो योऽशनायापिपासे शोकं मोहं जरां मृत्युमत्येति। एतं वै तमात्मानं विदित्वा ब्राह्मणाः पुत्रैषणायाश्च वित्तैषणायाश्च लोकैषणायाश्च व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरन्ति या ह्येव पुत्रैषणा सा वित्तैषणा या वित्तैषणा सा लोकैषणोभे ह्येते एषणे एव भवतः। तस्माद् ब्राह्मणः पांडित्यं निर्विद्य बाल्येन तिष्ठासेद्बाल्यं च पांडित्यं च निर्विद्याथ मुनिरमौनं च मौनं च निर्वि-

करूं नकोस. मनोवृत्तिचें मनन करणाराचें तुझ्या मनोवृत्तीनें तूं मनन करूं नकोस. बुद्धीच्या ज्ञात्याला तूं तुझ्या बुद्धीनें जाणूं नकोस. तुझा हा आत्मा सर्वव्यापी [दृष्टिचा द्रष्टा इत्यादि] आहे. या आत्म्याहून इतर [शरीर] आर्त [=विनाशी] आहे.'' तेव्हां चक्रपुत्र उषस्त स्तब्ध राहिला.२.

नंतर कुषीतकाचा पुत्र कहोल ह्मणाला, ''याज्ञवल्क्या, साक्षात् प्रत्यक्ष ब्रह्म असा जो सर्वव्यापी आत्मा तो मला सांग.'' ''हा पहा तुझाच आत्मा सर्वव्यापी आहे.'' ''याज्ञवल्क्या, सर्वव्यापी कोणता?'' ''जो अशनाया, पिपासा, शोक, मोह, जरा व मृत्यु यांच्या पलीकडे आहे तो. या त्या आत्म्याचें (मीच परब्रह्म आत्मा आहें असें) ज्ञान झालें ह्मणजे पुत्रैषणा, वित्तैषणा, लोकैषणा यांपासून निघून ब्राह्मण [ब्रह्मज्ञ] भिक्षाचर्य आचरण करतात. जी पुत्रैषणा तीच वित्तैषणा आणि वित्तैषणा तीच लोकैषणा [लोकप्रातीची इच्छा]. दोन्ही इच्छाच. ह्मणून ब्रह्मज्ञानें आत्मज्ञान [पांडित्यं =आचार्यसेवापूर्वक वेदान्ताचें तात्पर्य जाणणें] निःशेष प्रकारें जाणून ज्ञानरूपी बलानें [बाल्यं=युक्तिपूर्वक आत्मदृष्टि] युक्त होण्याची (अथवा उभें

द्याथ ब्राह्मणः स ब्राह्मणः केन स्याद्येन स्यात्तेनेदृश एवातोऽन्यदार्तं ततो ह कहोलः कौषीतकेय उपरराम ॥१॥ इति पंचमं ब्राह्मणम् ॥५॥

अथ हैनं गार्गी वाचक्नवी पप्रच्छ याज्ञवल्क्येति होवाच यदिदꣳ सर्वमप्स्वोतं च प्रोतं च कस्मिन्नु खल्वाप ओताश्च प्रोताश्चेति वायौ गार्गीति कस्मिन्नु खलु वायुरोतश्च प्रोतश्चेत्यंतरिक्षलोकेषु गार्गीति कस्मिन्नु खल्वंतरिक्षलोका ओताश्च प्रोताश्चेति गंधर्वलोकेषु गार्गीति कस्मिन्नु खलु गंधर्वलोका ओताश्च प्रोताश्चेत्यादित्यलोकेषु गार्गीति कस्मिन्नु खल्वादित्यलोका ओताश्च प्रोताश्चेति चंद्रलोकेषु गार्गीति कस्मिन्नु खलु चंद्रलोका ओताश्च प्रोताश्चेति नक्षत्रलोकेषु गार्गीति कस्मिन्नु खलु नक्षत्रलोका ओताश्च प्रोताश्चेति देवलोकेषु गार्गीति कस्मिन्नु खलु देवलोका ओताश्च प्रोताश्चेतींद्रलोकेषु गार्गीति कस्मिन्नु

रहाण्याची) इच्छा करावी. ज्ञानबलवत्त्व आणि पांडित्य हीं निःशेष केल्यावर तो (मननयुक्त) मुनि [योगी] होतो. युक्तिपूर्वक आत्मदृष्टि [अमौन=बाल्य] आणि मौन [मी ब्रह्म, माझ्याखेरीज कांहीं नाहीं असें मनानें अनुसंधान] हीं निःशेष केलीं म्हणजे तो ब्रह्मज्ञ होतो." "तो कोणत्या आचरणानें ब्रह्मज्ञ होतो?" "ज्यानें होतो त्यानें अशा प्रकारचाच होतो. याहून इतर (एषणारूप) सर्व विनाशी होय." तेव्हां कुषीतकपुत्र कहोल स्तब्ध राहिला. १.

नंतर वचक्नूची कन्या गार्गी म्हणाली, "याज्ञवल्क्या, हे सर्व (पार्थिव जग) उदकानें ओत [आडवें विणलेलें] व प्रोत [उभें विणलेलें] आहे; पण उदक कशानें ओत व प्रोत आहे?" "वायूनें." "वायु कशानें ओत व प्रोत आहे?" "अंतरिक्षलोकांनीं." "अंतरिक्षलोक कशानें?" "गंधर्वलोकांनीं." "गंधर्वलोक कशानें?" "आदित्यलोकांनीं." "आदित्यलोक कशानें?" "चंद्रलोकांनीं." "चंद्रलोक कशाने?" "नक्षत्रलोकांनीं." "नक्षत्रलोक कशानें?" "देवलोकांनीं." "देवलोक कशानें?"

खल्विंद्रलोका ओताश्च प्रोताश्चेति प्रजापतिलोकेषु गार्गीति कस्मिन्नु खलु प्रजापतिलोका ओताश्च प्रोताश्चेति ब्रह्मलोकेषु गार्गीति कस्मिन्नु खलु ब्रह्मलोका ओताश्च प्रोताश्चेति स होवाच गार्गि मातिप्राक्षीर्मा ते मूर्धा व्यपप्तदनतिप्रश्न्यां वै देवतामतिपृच्छसि गार्गि मातिप्राक्षीरिति ततो ह गार्गी वाचक्नव्युपरराम ॥१॥ इति षष्ठं ब्राह्मणम् ॥६॥

अथ हैनमुद्दालक आरुणिः पप्रच्छ याज्ञवल्क्येति होवाच मद्रेष्ववसाम पतंचलस्य काप्यस्य गृहेषु यज्ञमधीयानास्तस्यासीद्भार्या गंधर्वगृहीता तमपृच्छाम कोऽसीति सोऽब्रवीत् कबंध आथर्वण इति सोऽब्रवीत्पतंचलं काप्यं याज्ञिकांश्च वेत्थ नु त्वं काप्य तत्सूत्रं येनायं च लोकः परश्च लोकः सर्वाणि च भूतानि संदृब्धानि भवन्तीति सोऽब्रवीत्पतंचलः काप्यो नाहं तद्भगवन्वेदेति सोऽब्रवीत्पतंचलं काप्यं याज्ञिकांश्च वेत्थ नु त्वं काप्य तमंतर्यामिणं य इमं च लोकं परं च

"इंद्रलोकांनीं." "इंद्रलोक कशानें?" "प्रजापतिलोकांनीं." "प्रजापतिलोक कशानें?" "ब्रह्मलोकांनी." "ब्रह्मलोक कशानें?" "गार्गि, मर्यादा उल्लंघून प्रश्न करूं नकोस. (ही देवता आगमाने जाणावयाची आहे, अनुमानानें नव्हे). तुझें मस्तक तुटून पडण्याची इच्छा करू नकोस. (आनुमानिक) प्रश्नाचा विषय नसलेल्या देवतेसंबंधानें तूं प्रश्न करीत आहेस. असा प्रश्न करूं नकोस." तेव्हां वचक्नुकन्या गार्गी स्तब्ध राहिली. १.

नंतर अरुणपुत्र उद्दालक ह्मणाला, "याज्ञवल्क्या, आह्मी मद्र देशामध्यें कपिगोत्री पतंचलाच्या घरीं यज्ञशास्त्राचें अध्ययन करीत राहिलों होतों. त्या पतंचलाच्या भार्येच्या अंगामध्यें गंधर्व येत असे. त्या गंधर्वाला आह्मीं विचारलें, तूं कोण आहेस? तो ह्मणाला, मी अथर्वाचा पुत्र कबंध आहें. तो पतंचलाला आणि याज्ञिकांना ह्मणाला, पतंचला, हा लोक, पुढील लोक आणि सर्व प्राणिमात्र ज्याच्यामध्यें ओंवलेले आहेत तें सूत्र तुह्मी जाणतां काय? कपिपुत्र पतंचल ह्मणाला, भगवन्, हें मी जाणीत नाहीं. तो गंधर्व

लोकꣳ सर्वाणि च भूतानि योऽन्तरो यमयतीति सोऽब्रवीत्पतंचलः काप्यो नाहं तं भगवन्वेदेति सोऽब्रवीत्पतंचलः काप्यं याज्ञिकांश्च यो वै तत्काप्य सूत्रं विद्यात्तं चांतर्यामिणमिति स ब्रह्मवित्स लोकवित्स देववित्स वेदवित्स भूतवित्स आत्मवित्स सर्वविदिति तेभ्योऽब्रवीत्तदहं वेद तच्चेत्त्वं याज्ञवल्क्य सूत्रमविद्वांस्तं चांतर्यामिणं ब्रह्मगवीरुदजसे मूर्धा ते विपतिष्यतीति वेद वा अहं गौतम तत्सूत्रं तं चांतर्यामिणमिति यो वा इदं कश्चिद्ब्रूयाद्वेद वेदेति यथा वेत्थ तथा ब्रूहीति ॥१॥ स होवाच वायुर्वै गौतम तत्सूत्रं वायुना वै गौतम सूत्रेणायं च लोकः परश्च लोकः सर्वाणि च भूतानि संदृब्धानि भवन्ति तस्माद्वै गौतम पुरुषं प्रेतमाहुर्व्यस्रंसिषतास्यांगानीति वायुना हि गौतम सूत्रेण संदृब्धानि भवन्तीत्येवमेवैतद्याज्ञवल्क्यांतर्यामिणं ब्रूहीति ॥२॥ यः

पतंचलाला आणि याज्ञिकांना ह्मणाला, हा लोक, परलोक आणि सर्व प्राणिमात्र यांच्यामध्यें राहून या सर्वांचें जो नियमन करतो तो अंतर्यामी तुह्मी जाणतां काय ? तो पतंचल ह्मणाला, भगवन्, मी तो जाणीत नाहीं. तो पतंचलाला व याज्ञिकांना ह्मणाला, तें सूत्र आणि तो अंतर्यामी यांना जो जाणतो तो ब्रह्मवेत्ता, तो लोकवेत्ता, तो देववेत्ता, तो वेदवेत्ता, तो भूतवेत्ता, तो आत्मवेत्ता, तो सर्ववेत्ता होय. याप्रमाणें तो गंधर्व त्यांना ह्मणाला. तर हें ज्ञान मी जाणतों. याज्ञवल्क्या, तें सूत्र आणि तो अंतर्यामी यांना न जाणतां जर तूं ब्रह्मज्ञान्यांच्या गाई नेशील तर तुझें मस्तक तुटून पडेल." याज्ञवल्क्य ह्मणाला, हे गौतमगोत्रोत्पन्ना, तें सूत्र आणि तो अंतर्यामी मी जाणतों." "मी जाणतों, मी जाणतों असें कोणीहि ह्मणूं शकेल. काय जाणतोस तें सांग."१. "गौतमा, ते सूत्र वायु होय. हा लोक, परलोक आणि सर्व भूतें वायुरूपी सूत्रामध्यें ओंवलेलीं आहेत. ह्मणून मनुष्य मरण पावल्यावर ह्मणतात कीं, याचीं इंद्रियें तुटलीं आहेत. कारण वायुरूपी सूत्रानें तीं ओंवलेलीं असतात." "याज्ञवल्क्या, बरोबर

पृथिव्यां तिष्ठन् पृथिव्या अंतरो यं पृथिवी न वेद यस्य पृथिवी शरीरं यः पृथिवीमंतरो यमयत्येष त आत्मान्तर्याम्यमृतः ॥३॥ योऽप्सु तिष्ठन्नद्भ्योंऽतरो यमापो न विदुर्यस्यापः शरीरं योऽपोंऽतरो यमयत्येष त आत्मांतर्याम्यमृतः ॥४॥ योऽग्नौ तिष्ठन्नग्नेरंतरो यमग्निर्न वेद यस्याग्निः शरीरं योऽग्निमंतरो यमयत्येष त आत्मांतर्याम्यमृतः ॥५॥ योंऽतरिक्षे तिष्ठन्नंतरिक्षादंतरो यमंतरिक्षं न वेद यस्यांतरिक्षꣳ शरीरं योंऽतरिक्षमंतरो यमयत्येष त आत्मांतर्याम्यमृतः ॥६॥ यो वायौ तिष्ठन्वायोरंतरो यं वायुर्न वेद यस्य वायुः शरीरं यो वायुमंतरो यमयत्येष त आत्मांतर्याम्यमृतः ॥७॥ यो दिवि तिष्ठन्दिवोंऽतरो यं द्यौर्न

बोललास. आतां अंतर्यामी कोण तो सांग.'' २. पृथिवीमध्ये स्थित असलेला, पृथिवीच्या आंत असलेला, ज्याला (आपल्यामध्यें आपल्याहून भिन्न असा) हा आहे असें पृथिवी जाणीत नाहीं, ज्याचें शरीर पृथिवी आहे आणि जो आंत राहून पृथिवीचें नियमन [=प्रवृत्तिनिवृत्ति] करतो असा हा तुझा मृत्युरहित [सर्व संसारधर्मरहित] आत्मा अंतर्यामी आहे. ३. उदकामध्यें स्थित असलेला, उदकाच्या आंत असलेला, ज्याला उदक जाणीत नाहीं, ज्याचें शरीर उदक आहे आणि जो आंत राहून उदकाचें नियमन करतो असा हा तुझा मृत्युरहित आत्मा अंतर्यामी आहे. ४. अग्निमध्यें स्थित असलेला, अग्नीच्या आंत असलेला, ज्याला अग्नि जाणीत नाहीं, ज्याचें शरीर अग्नि आहे आणि जो आंत राहून अग्नीचें नियमन करतो असा हा तुझा मृत्युरहित आत्मा अंतर्यामी आहे ५ अंतरिक्षामध्यें स्थित असलेला, अंतरिक्षाच्या आंत असलेला, ज्याला अंतरिक्ष जाणीत नाहीं, ज्याचें शरीर अंतरिक्ष आहे आणि जो आंत राहून अंतरिक्षाचें नियमन करतो असा हा तुझा मृत्युरहित आत्मा अंतर्यामी आहे. ६. वायूमध्यें स्थित असलेला, वायूच्या आंत असलेला, ज्याला वायु जाणीत नाहीं, ज्याचें शरीर वायु आहे आणि जो आंत राहून वायूचें नियमन करतो

वेद यस्य द्यौः शरीरं यो दिवमंतरो यमयत्येष त आत्मांतर्याम्यमृतः ॥८॥ य आदित्ये तिष्ठन्नादित्यादंतरो यमादित्यो न वेद यस्यादित्यः शरीरं य आदित्यमंतरो यमयत्येष त आत्मांतर्याम्यमृतः ॥९॥ यो दिक्षु तिष्ठन्दिग्भ्योऽतरो यं दिशो न विदुर्यस्य दिशः शरीरं यो दिशोंऽतरो यमयत्येष त आत्मांतर्याम्यमृतः ॥१०॥ यश्चंद्रतारके तिष्ठंश्चंद्रतारकादंतरो यं चंद्रतारकं न वेद यस्य चंद्रतारकं शरीरं यश्चंद्रतारकमंतरो यमयत्येष त आत्मांतर्याम्यमृतः ॥११॥ य आकाशे तिष्ठन्नाकाशादंतरो यमाकाशो न वेद यस्याकाशः शरीरं य आकाशमंतरो यमयत्येष त आत्मांतर्याम्यमृतः ॥१२॥ यस्तमसि तिष्ठंस्तम-

असा हा तुझा मृत्युरहित आत्मा अंतर्यामी आहे.७. द्युलोकामध्यें स्थित असलेला, द्युलोकाच्या आंत असलेला, ज्याला द्युलोक जाणीत नाहीं, ज्याचें शरीर द्युलोक आहे आणि जो आंत राहून द्युलोकाचें नियमन करतो असा हा तुझा मृत्युरहित आत्मा अंतर्यामी आहे.८. आदित्यामध्यें स्थित असलेला, आदित्याच्या आंत असलेला, ज्याला आदित्य जाणीत नाहीं, ज्याचें शरीर आदित्य आहे आणि जो आंत राहून आदित्याचें नियमन करतो असा हा तुझा मृत्युरहित आत्मा अंतर्यामी आहे.९. दिशांमध्यें स्थित असलेला, दिशांच्या आंत असलेला, ज्याला दिशा जाणीत नाहींत, ज्याचें शरीर दिशा आहेत आणि जो आंत राहून दिशांचें नियमन करतो असा हा तुझा मृत्युरहित आत्मा अंतर्यामी आहे.१०. चंद्रतारकांमध्यें स्थित असलेला, चंद्रतारकांच्या आंत असलेला, ज्याला चंद्रतारका जाणीत नाहींत, ज्याचें शरीर चंद्रतारका आहेत आणि जो आंत राहून चंद्रतारकांचें नियमन करतो असा हा तुझा मृत्युरहित आत्मा अंतर्यामी आहे.११. आकाशामध्यें स्थित असलेला, आकाशाच्या आंत असलेला, ज्याला आकाश जाणीत नाहीं, ज्याचें शरीर आकाश आहे आणि जो आंत राहून आकाशाचें नियमन करतो असा हा तुझा मृत्युरहित आत्मा अंतर्यामी आहे.१२.

सोंऽतरो यं तमो न वेद यस्य तमः शरीरं यस्तमोंऽतरो यमयत्येष त आत्मांतर्याम्यमृतः ॥१३॥ यस्तेजसि तिष्ठंस्तेजसोंऽतरो यं तेजो न वेद यस्य तेजः शरीरं यस्तेजोंऽतरो यमयत्येष त आत्मान्तर्याम्यमृत इत्यधिदैवतमथाधिभूतम् ॥१४॥ यः सर्वेषु भूतेषु तिष्ठन् सर्वेभ्यो भूतेभ्योंऽतरो यं सर्वाणि भूतानि न विदुर्यस्य सर्वाणि भूतानि शरीरं यः सर्वाणि भूतान्यंतरो यमयत्येष त आत्मान्तर्याम्यमृत इत्यधिभूतमथाध्यात्मम् ॥१५॥ यः प्राणे तिष्ठन् प्राणादन्तरो यं प्राणो न वेद यस्य प्राणः शरीरं यः प्राणमन्तरो यमयत्येष त आत्मान्तर्याम्यमृतः ॥१६॥ यो वाचि तिष्ठन्वाचोऽन्तरो यं वाङ् न वेद यस्य वाक्

अंधकारामध्यें स्थित असलेला, अंधकाराच्या आंत असलेला, ज्याला अंधकार जाणीत नाहीं, ज्याचें शरीर अंधकार आहे आणि जो आंत राहून अंधकाराचें नियमन करतो असा हा तुझा मृत्युरहित आत्मा अंतर्यामी आहे. १३. तेजामध्यें स्थित असलेला, तेजाच्या आंत असलेला, ज्याला तेज जाणीत नाहीं, ज्याचें शरीर तेज आहे आणि जो आंत राहून तेजाचें नियमन करतो असा हा तुझा मृत्युरहित आत्मा अंतर्यामी आहे. याप्रमाणें देवताविषयक अंतर्यामिदर्शन झालें. आतां भूतविषयक. १४. सर्व भूतांमध्ये स्थित असलेला, सर्व भूतांच्या आंत असलेला, ज्याला कोणतेंहि भूत जाणीत नाहीं, ज्याचें शरीर सर्व भूतें आहेत आणि जो आंत राहून सर्व भूतांचें नियमन करतो असा हा तुझा मृत्युरहित आत्मा अंतर्यामी आहे. याप्रमाणें भूतविषयक अंतर्यामिदर्शन झालें. आतां आत्मविषयक. १५. प्राणामध्यें स्थित असलेला, प्राणाच्या आंत असलेला, ज्याला प्राण जाणीत नाहीं, ज्याचें शरीर प्राण आहे आणि जो आंत राहून प्राणाचें नियमन करतो असा हा तुझा मृत्युरहित आत्मा अंतर्यामी आहे. १६. वाचेमध्यें स्थित असलेला, वाचेच्या आंत असलेला, ज्याला वाक् जाणीत नाहीं, ज्याचें शरीर वाक् आहे आणि जो आंत राहून वाचेचें नियमन करतो

शरीरं यो वाचमन्तरो यमयत्येष त आत्मान्तर्याम्यमृतः ॥१७॥ यश्च-
ऽन्तरो यं चक्षुर्न वेद यस्य चक्षुः शरीरं यश्च
न्तरो यमयत्येष त आत्मान्तर्याम्यमृतः ॥१८॥ यः श्रोत्रे तिष्ठञ्छ्रो-
त्रादन्तरो यꣳ श्रोत्रं न वेद यस्य श्रोत्रꣳ शरीरं यः श्रोत्रमन्तरो यम-
यत्येष त आत्मान्तर्याम्यमृतः ॥१९॥ यो मनसि तिष्ठन्मनसोऽन्तरो
यं मनो न वेद यस्य मनः शरीरं यो मनोऽन्तरो यमयत्येष त आत्मा-
न्तर्याम्यमृतः ॥२०॥ यस्त्वचि तिष्ठंस्त्वचोऽन्तरो यं त्वङ् न वेद
यस्य त्वक् शरीरं यस्त्वचमन्तरो यमयत्येष त आत्मान्तर्याम्यमृतः
॥२१॥ यो विज्ञाने तिष्ठन्विज्ञानादन्तरो यं विज्ञानं न वेद यस्य
विज्ञानꣳ शरीरं यो विज्ञानमन्तरो यमयत्येष त आत्मान्तर्याम्यमृतः

असा हा तुझा मृत्युरहित आत्मा अंतर्यामी आहे.१७. चक्षूमध्यें स्थित असलेला, चक्षूच्या आंत असलेला, ज्याला चक्षु जाणीत नाहीं, ज्याचें शरीर चक्षु आहे आणि जो आंत राहून चक्षूचें नियमन करतो असा हा तुझा मृत्युरहित आत्मा अंतर्यामी आहे.१८. श्रोत्रामध्यें स्थित असलेला, श्रोत्राच्या आत असलेला, ज्याला श्रोत्र जाणीत नाहीं, ज्याचें शरीर श्रोत्र आहे आणि जो आत राहून श्रोत्राचें नियमन करतो असा हा तुझा मृत्युरहित आत्मा अंतर्यामी आहे.१९. मनामध्यें स्थित असलेला, मनाच्या आंत असलेला, ज्याला मन जाणीत नाहीं, ज्याचे शरीर मन आहे आणि जो आंत राहून मनाचें नियमन करतो असा हा तुझा मृत्युरहित आत्मा अंतर्यामी आहे.२०. त्वचेमध्यें स्थित असलेला, त्वचेच्या आंत असलेला, ज्याला त्वचा जाणीत नाहीं, ज्याचें शरीर त्वचा आहे आणि जो आंत राहून त्वचेचे नियमन करतो असा हा तुझा मृत्युरहित आत्मा अंतर्यामी आहे. २१. बुद्धीमध्यें स्थित असलेला, बुद्धीच्या आंत असलेला; ज्याला बुद्धि जाणीत नाहीं, ज्याचें शरीर बुद्धि आहे आणि जो आंत राहून बुद्धीचें नियमन करतो असा हा तुझा मृत्युरहित आत्मा अंतर्यामी आहे.२२. हा

॥२२॥ यो रेतसि तिष्ठन् रेतसोऽन्तरो यं रेतो न वेद यस्य रेतः शरीरं यो रेतोऽन्तरो यमयत्येष त आत्मान्तर्याम्यमृतोऽदृष्टो द्रष्टाऽश्रुतः श्रोत्राऽमतो मन्ताऽविज्ञातो विज्ञाता नान्योऽतोऽस्ति द्रष्टा नान्योऽतोऽस्ति श्रोता नान्योऽतोऽस्ति मन्ता नान्योऽतोऽस्ति विज्ञातैष त आत्मान्तर्याम्यमृतोऽतोऽन्यदार्तं ततो होद्दालक आरुणिरुपरराम ॥२३॥ इति सप्तमं ब्राह्मणम् ॥७॥

अथ ह वाचक्नव्युवाच ब्राह्मणा भगवन्तो हन्ताहमिमं द्वौ प्रश्नौ प्रक्ष्यामि तौ चेन्मे वक्ष्यति न जातु युष्माकमिमं कश्चिद्ब्रह्मोद्यं जेतेति पृच्छ गार्गीति ॥१॥ सा होवाचाहं वै त्वा याज्ञवल्क्य यथा काश्यो वा वैदेहो वोग्रपुत्र उज्ज्यं धनुरधिज्यं कृत्वा द्वौ बाणवन्तौ सपत्नातिव्याधिनौ हस्ते कृत्वोपोत्तिष्ठेदेवमेवाहं त्वा द्वाभ्यां प्रश्नाभ्यामुपोदस्थां तौ मे ब्रूहीति पृच्छ गार्गीति ॥२॥ सा होवाच यदूर्ध्वं याज्ञवल्क्य दिवो यदवाक् पृथिव्या यदन्तरा द्यावापृथिवी इमे यद्भूतं च भवच्च

अदृष्ट असून द्रष्टा, अश्रुत असून श्रोता, अमत असून मन्ता, अज्ञात असून ज्ञाता आहे. याहून दुसरा कोणी द्रष्टा नाहीं. श्रोता नाहीं, मन्ता नाहीं, विज्ञाता नाहीं. असा हा तुझा मृत्युरहित आत्मा अंतर्यामी आहे. याहून इतर सर्व विनाशी होय." तेव्हां अरुणपुत्र उद्दालक स्तब्ध राहिला. २३.

नंतर वचक्नुकन्या गार्गी ह्मणाली, "हे ब्राह्मणहो, मी आतां याला दोन प्रश्न विचारतें. त्याचें उत्तर जर हा मला देईल तर मग तुमच्यापैकीं कोणीहि ब्रह्मज्ञान सांगण्यामध्यें याला जिंकणारा नाहीं (असे होईल)." ते ब्राह्मण ह्मणाले, गार्गि विचार. १. ती ह्मणाली, "याज्ञवल्क्या, ज्याप्रमाणें काशी येथील अथवा विदेह देशांतील शूर कुळांतील एखादा धनुर्धारी दोरी उतरलेल्या धनुष्याला दोरी चढवून टोंकांनीं युक्त व अति पीडाकर असे दोन शर हातांत घेऊन उभा रहावा त्याप्रमाणे मी दोन प्रश्न घेऊन तुझ्यापुढें आल्यें आहें. त्या प्रश्नांचीं उत्तरें सांग." "गार्गि, विचार."

भविष्यच्चेत्याचक्षते कस्मिंस्तदोतं च प्रोतं चेति ॥३॥ स होवाच यदूर्ध्वं गार्गि दिवो यदवाक् पृथिव्या यदन्तरा द्यावापृथिवी इमे यद्भूतं च भवच्च भविष्यच्चेत्याचक्षत आकाशे तदोतं च प्रोतं चेति ॥४॥ सा होवाच नमस्तेऽस्तु याज्ञवल्क्य यो म एतं व्यवोचोऽपरस्मै धारयस्वेति पृच्छ गार्गीति ॥५॥ सा होवाच यदूर्ध्वं याज्ञवल्क्य दिवो यदवाक् पृथिव्या यदन्तरा द्यावापृथिवी इमे यद्भूतं च भवच्च भविष्यच्चेत्याचक्षते कस्मिँस्तदोतं च प्रोतं चेति ॥६॥ स होवाच यदूर्ध्वं गार्गि दिवो यदवाक् पृथिव्या यदन्तरा द्यावापृथिवी इमे यद्भूतं च भवच्च भविष्यच्चेत्याचक्षत आकाश एव तदोतं च प्रोतं चेति कस्मिन्नु खल्वाकाश ओतश्च प्रोतश्चेति ॥७॥ स होवाचैतद्वै तदक्षरं गार्गि ब्राह्मणा अभिवदन्त्यस्थूलमनण्वह्रस्वमदीर्घमलोहितमस्नेहमच्छा-

२. "याज्ञवल्क्या, जें द्युलोकाच्या वर आहे, जें पृथिवीच्या खालीं आहे, जें या द्यावापृथिवीच्या मध्यें आहे, ज्याला भूत, वर्तमान व भविष्य ह्मणतात तें कशामध्यें ओत व प्रोत आहे ?" ३. "गार्गि, जें द्युलोकाच्या वर आहे, जें पृथिवीच्या खालीं आहे, जें या द्यावापृथिवीच्या मध्यें आहे, ज्याला भूत, वर्तमान व भविष्य ह्मणतात तें आकाशामध्यें ओत व प्रोत आहे." ४. याज्ञवल्क्या, तूं हें उत्तर दिलेंस ह्मणून मी तुला वंदन करतें. आतां दुसरा प्रश्न घे." "गार्गि, विचार." ५. "याज्ञवल्क्या, जें द्युलोकाच्या वर आहे, पृथिवीच्या खालीं आहे, जें या द्यावापृथिवीच्या मध्यें आहे, ज्याला भूत, वर्तमान व भविष्य ह्मणतात तें कशामध्यें ओत व प्रोत आहे ?" ६. जें द्युलोकाच्या वर आहे, पृथिवीच्या खालीं आहे, जें या द्यावापृथिवीच्या मध्यें आहे, ज्याला भूत, वर्तमान व भविष्य ह्मणतात तें आकाशामध्यें ओत व प्रोत आहे." "आकाश कशामध्यें ओत व प्रोत आहे ?" ७. "गार्गि, याचें उत्तर ब्राह्मण सांगतात कीं, तें क्षयरहित (ब्रह्म) आहे. तें अस्थूल, अनणु, अह्रस्व, अदीर्घ, अप्रकाश, अस्नेह, छायारहित, तमो-

यमतमोऽवाय्वनाकाशमसंगमरसमगन्धमचक्षुष्कमश्रोत्रमवागमनोऽते-जस्कमप्राणममुखममात्रमनन्तरमबाह्यं न तदश्नाति किंचन न तदश्नाति कश्चन ॥८॥ एतस्य वा अक्षरस्य प्रशासने गार्गि सूर्याचंद्रमसौ विधृतौ तिष्ठत एतस्य वा अक्षरस्य प्रशासने गार्गि द्यावापृथिव्यौ विधृते तिष्ठत एतस्य वा अक्षरस्य प्रशासने गार्गि निमेषा मुहूर्ता अहोरात्राण्यर्धमासा मासा ऋतवः संवत्सरा इति विधृतास्तिष्ठन्त्येतस्य वा अक्षरस्य प्रशासने गार्गि प्राच्योऽन्या नद्यः स्यन्दन्ते श्वेतेभ्यः पर्वतेभ्यः प्रतीच्योऽन्या यां यां च दिशमन्वेतस्य वा अक्षरस्य प्रशासने गार्गि ददतो मनुष्याः प्रशंसन्ति यजमानं देवा दर्वीं पितरोऽन्वायत्ताः ॥९॥ यो वा एतदक्षरं गार्ग्यविदित्वाऽस्मिँल्लोके जुहोति यजते तपस्तप्यते बहूनि वर्षसहस्राण्यन्तवदेवास्य तद्भवति यो वा एतदक्षरं गार्ग्यविदित्वास्माल्लोकात्प्रैति स कृपणोऽथ य एतदक्षरं गार्गि

रहित, वायुरहित, आकाशरहित, संगरहित, रस–गंध–चक्षु–श्रोत्र–वाणी–मन–तेज–प्राण–मुख–मात्रा [माप]–अन्तर–बाह्यता यांनीं रहित आहे. तें कांहीं भक्षण करीत नाहीं, तें कोणाचें भक्ष्य नाहीं [सारांश, सर्वविशेषण-रहित आहे].८. गार्गि, या अ–क्षर ब्रह्माच्या नियंत्रणानें निर्माण केलेले सूर्य व चंद्र (नियमानुसार) वागतात; याच्याच नियंत्रणानें निर्माण केलेली द्यावापृथिवी (नियमानुसार) स्थित आहेत; याच्याच नियंत्रणानें निमेष, मुहूर्त, अहोरात्र, पक्ष, मास, ऋतु व संवत्सर हे स्थित आहेत; याच्याच नियंत्रणानें (हिमालयादि) श्वेत पर्वतांपासून कांहीं पूर्वगामी कांहीं पश्चिम-गामी व इतर देखील नद्या त्या त्या दिशांप्रत वहातात; याच्याच नियंत्रणानें मनुष्य दान देणाऱ्यांची व देव यजमानाची प्रशंसा करतात. तसेंच पितर दर्वी होमाची प्रशंसा करतात.९. या अ–क्षर ब्रह्माला न जाणतां जो या लोकीं हवन करतो, यज्ञ करतो, बहुत सहस्र वर्षें तप आचरतो तें त्याचें सर्व कर्म [=कर्माचें फळ] अन्तयुक्त होतें. याला न जाणतां जो या

विदित्वास्माल्लोकात्प्रैति स ब्राह्मणः ॥१०॥ तद्वा एतदक्षरं गार्ग्यदृष्टं द्रष्टृश्रुतꣳ श्रोत्रमतं मन्त्रविज्ञातं विज्ञातृ नान्यदतोऽस्ति द्रष्टृ नान्यदतोऽस्ति श्रोतृ नान्यदतोऽस्ति मन्तृ नान्यदतोऽस्ति विज्ञात्रेतस्मिन्नु खल्वक्षरे गार्ग्याकाश ओतश्च प्रोतश्चेति ॥११॥ सा होवाच ब्राह्मणा भगवन्तस्तदेव बहु मन्येध्वं यदस्मान्नमस्कारेण मुच्येध्वं न वै जातु युष्माकमिमं कश्चिद्ब्रह्मोद्यं जेतेति ततो ह वाचक्नव्युपरराम ॥१२॥ इति अष्टमं ब्राह्मणम् ॥८॥

अथ हैनं विदग्धः शाकल्यः पप्रच्छ कति देवा याज्ञवल्क्येति स हैतयैव निविदा प्रतिपेदे यावन्तो वैश्वदेवस्य निविद्युच्यन्ते त्रयश्च त्री च शता त्रयश्च त्री च सहस्रेत्योमिति होवाच कत्येव देवा याज्ञवल्क्येति त्रयस्त्रिंशदित्योमिति होवाच कत्येव देवा याज्ञवल्क्येति षडित्योमिति होवाच कत्येव देवा याज्ञवल्क्येति त्रय इत्योमिति हो-

लोकीं मरण पावतो तो कृपण [=केलेल्या कर्मांचाच केवळ भोक्ता=पुन्हां संसाराला येणारा] होय; जो याला जाणून मरण पावतो तो ब्राह्मण होय. १०. तें हें अ-क्षर अदृष्ट, पहाणारें; अश्रुत, श्रवण करणारें; अमत, मनन करणारें; अविज्ञात, विज्ञातृ असें आहे. याहून दुसरा कोणी द्रष्टा, श्रोता, मन्ता अथवा विज्ञाता नाहीं. गार्गि, यामध्यें आकाश ओत व प्रोत आहे." ११. "ब्राह्मणहो, याज्ञवल्क्याला नमस्कार करूनच तुह्मी मोकळे व्हाल हेंच पुष्कळ समजा. कारण, ब्रह्मज्ञानामध्यें याला तुह्मांपैकीं कोणी जिंकण्यास समर्थ नाहीं." तेव्हां वचक्नुकन्या स्तब्ध राहिली. १२.

नंतर शकलपुत्र विदग्ध ह्मणाला, "याज्ञवल्क्या, देव किती आहेत?" वैश्वदेव स्तोत्रामध्यें जितके सांगितले आहेत तितके त्याच मंत्रपदानें याज्ञवल्क्य सांगता झाला—" तीन आणि तीनशें; तीन आणि तीन हजार." "बरें, याज्ञवल्क्या, (पुन्हां) देव किती आहेत?" "तेहतीस." "बरें, देव किती आहेत?" "सहा." "बरें, देव किती आहेत?" "तीन." "बरें,

वाच कत्येव देवा याज्ञवल्क्येति द्वावित्योमिति होवाच कत्येव देवा याज्ञवल्क्येत्यध्यर्ध इत्योमिति होवाच कत्येव देवा याज्ञवल्क्येत्येक इत्योमिति होवाच कतमे ते त्रयश्च त्री च शता त्रयश्च त्री च सहस्रेति ॥१॥ स होवाच महिमान एवैषामेते त्रयस्त्रिंशत्त्वेव देवा इति कतमे ते त्रयस्त्रिंशदित्यष्टौ वसव एकादश रुद्रा द्वादशादित्यास्त एकत्रिंशदिन्द्रश्चैव प्रजापतिश्च त्रयस्त्रिंशाविति ॥२॥ कतमे वसव इत्यग्निश्च पृथिवी च वायुश्चान्तरिक्षं चादित्यश्च द्यौश्च चन्द्रमाश्च नक्षत्राणि चैते वसव एतेषु हीदꣳ सर्वꣳ हितमिति तस्माद्वसव इति ॥३॥ कतमे रुद्रा इति दशेमे पुरुषे प्राणा आत्मैकादशस्ते यदा-स्माच्छरीरान्मर्त्यादुत्क्रामन्त्यथ रोदयन्ति तद्यद्रोदयन्ति तस्माद्रुद्रा इति ॥४॥ कतम आदित्या इति द्वादश वै मासाः संवत्सरस्यैत आदित्या एते हीदꣳ सर्वमाददाना यन्ति ते यदिदꣳ सर्वमाददाना यन्ति तस्मा-दादित्या इति ॥५॥ कतम इंद्रः कतमः प्रजापतिरिति स्तनयित्नुरे-

देव किती आहेत ?'' ''दोन.'' ''बरें, देव किती आहेत ?'' ''दीड.'' ''बरें, देव किती आहेत ?'' ''एक.'' ''बरे, तीन आणि तीनशे तसेच तीन आणि तीन हजार देव कोणते ?''१. ''या देवांच्या विभूति होत. देव तेहतीसच आहेत.'' ''ते कोणते ?'' ''आठ वसु, अकरा रुद्र, बारा आदित्य असे एकतीस आणि इंद्र व प्रजापति मिळून तेहतीस.''२. ''वसु कोणते ?'' ''अग्नि, पृथिवी, वायु, अंतरिक्ष, आदित्य, द्यौ, चंद्रमा आणि नक्षत्रें हे वसु. यांमध्यें सर्व वास करतें ह्मणून हे वसु.''३. ''रुद्र कोणते ?'' ''शरीरामध्यें हीं दहा इंद्रियें आणि अकरावा आत्मा. हे जेव्हां या मर्त्य शरीरामधून वर जातात तेव्हां रडवण्यास लावतात ह्मणून हे रुद्र.'' ४. ''आदित्य कोणते ?'' ''संवत्सराचे बारा महिने हे आदित्य. हे हें सर्व घेऊन चालतात [आददाना यन्ति] ह्मणून यांना आदित्य ह्मणतात.'' ५. ''इंद्र कोणता ? प्रजापति कोणता ?'' गर्जना करणारा हा इंद्र

वैंद्रो यज्ञः प्रजापतिरिति कतमः स्तनयित्नुरित्यशनिरिति कतमो यज्ञ इति पशव इति ॥६॥ कतमे षडित्यग्निश्च पृथिवी च वायुश्चान्तरिक्षं चादित्यश्च द्यौश्चैते षडेते हीद॑ँ सर्व॑ँ षडिति ॥७॥ कतमे ते त्रयो देवा इतीम एव त्रयो लोका एषु हीमे सर्वे देवा इति कतमौ तौ द्वौ देवावित्यन्नं चैव प्राणश्चेति कतमोऽध्यर्ध इति योऽयं पवत इति ॥८॥ तदाहुर्यदयमेक इवैव पवतेऽथ कथमध्यर्ध इति यदस्मिन्निद॑ँ सर्वमध्यार्ध्नोत्तेनाध्यर्ध इति कतम एको देव इति प्राण इति स ब्रह्म त्यदित्याचक्षते ॥९॥ पृथिव्येव यस्यायतनमग्निर्लोको मनोज्योतिर्यो वै तं पुरुषं विद्यात्सर्वस्यात्मनः परायण॑ँ स वै वेदिता स्याद्याज्ञवल्क्य वेद वा अहं तं पुरुष॑ँ सर्वस्यात्मनः परायणं यमात्थ य एवाय॑ँ शारीरः पुरुषः स एष वदैव शाकल्य तस्य का देवतेत्यमृत-

आणि यज्ञ हा प्रजापति." "गर्जना करणारा ह्मणजे काय ?" "मेघांचा गडगडाट." "यज्ञ ह्मणजे काय ?" "पशु."६. "सहा देव कोणते ?" "अग्नि, पृथिवी, वायु, अंतरिक्ष, आदित्य आणि द्यौ हे सर्व मिळून सहा." ७. "तीन कोणते ?" "हे तीन लोक. यांमध्येंच हे सर्व देव आहेत." "दोन देव कोणते ?" "अन्न आणि प्राण." "दीड कोणता ?" "जो हा वहातो तो (वायु)."८. "हा (वायु) एकटाच वहातो असें ह्मणतात, मग हा दीड कसा ?" "याच्यामध्ये हें सर्व वृद्धि पावते [अधि आर्ध्नोत्=ऋद्धि प्राप्नोति] ह्मणून याला अध्यर्ध [=दीड] ह्मणतात." "एक देव कोणता ?" "प्राण. तो ब्रह्म होय. त्याला 'त्यत्' असे (परोक्ष रीतीनें) ह्मणतात.९. पृथिवी हा ज्याचा आश्रय आहे, अग्नि हा ज्याचा चक्षु आहे आणि मन हा ज्याचा संकल्प करणारा आहे अशा (कार्यकरणसंघातरूपी) सर्व आत्म्याचा परम आश्रय असलेल्या पुरुषाला जो जाणतो तोच पंडित होय." शाकल्य ह्मणाला,"याज्ञवल्क्या, तूं ज्याला सर्व आत्म्याचा परम आश्रय ह्मणतोस तो पुरुष मी जाणतों. जो हा शरीरी पुरुष आहे तोच हा होय."

मिति होवाच ॥१०॥ काम एव यस्यायतनꣳ हृदयं लोको मनो-
ज्योतिर्यो वै तं पुरुषं विद्यात्सर्वस्यात्मनः परायणꣳ स वै वेदिता
स्याद्याज्ञवल्क्य वेद वा अहं तं पुरुषꣳ सर्वस्यात्मनः परायणं यमात्थ
य एवायं काममयः पुरुषः स एष वदैव शाकल्य तस्य का देवतेति
स्त्रिय इति होवाच ॥११॥ रूपाण्येव यस्यायतनं चक्षुर्लोको मनो-
ज्योतिर्यो वै तं पुरुषं विद्यात्सर्वस्यात्मनः परायणꣳ स वै वेदिता
स्याद्याज्ञवल्क्य वेद वा अहं तं पुरुषꣳ सर्वस्यात्मनः परायणं यमात्थ
य एवासावादित्ये पुरुषः स एष वदैव शाकल्य तस्य का देवतेति
सत्यमिति होवाच ॥१२॥ आकाश एव यस्यायतनꣳ श्रोत्रं लोको
मनोज्योतिर्यो वै तं पुरुषं विद्यात्सर्वस्यात्मनः परायणꣳ स वै वेदिता
स्याद्याज्ञवल्क्य वेद वा अहं तं पुरुषꣳ सर्वस्यात्मनः परायणं यमात्थ

''शाकल्या, त्याची देवता कोण तें सांग.'' ''भक्षण केलेल्या अन्नाचा रस [अमृत].''१०. ''काम हा ज्याचा आश्रय आहे, हृदय हा ज्याचा चक्षु आहे आणि मन हा ज्याचा संकल्पक आहे अशा सर्व आत्म्याचा परम आश्रय असलेल्या पुरुषाला जो जाणतो तोच पंडित होय.'' ''याज्ञवल्क्या, तूं ज्याला सर्व आत्म्याचा परम आश्रय ह्मणतोस तो पुरुष मी जाणतों. जो हा काममय पुरुष आहे तोच हा होय.'' ''शाकल्या, त्याची देवता कोण तें सांग.'' ''स्त्रिया.''११. ''रूपें हा ज्याचा आश्रय आहे, चक्षु हा चक्षु आहे आणि मन हा संकल्पक आहे अशा सर्व आत्म्याचा परम आश्रय असलेल्या पुरुषाला जो जाणतो तोच पंडित होय.'' ''याज्ञवल्क्या, तूं ज्याला सर्व आत्म्याचा परम आश्रय ह्मणतोस तो पुरुष मी जाणतों. जो हा आदित्याचे ठिकाणीं पुरुष आहे तोच हा होय.'' ''शाकल्या, त्याची देवता कोण तें सांग.'' ''सत्य.''१२. ''आकाश हा ज्याचा आश्रय आहे, श्रोत्र हा चक्षु आहे आणि मन हा संकल्पक आहे अशा सर्व आत्म्याचा परम आश्रय असलेल्या पुरुषाला जो जाणतो तोच पंडित होय.'' ''याज्ञवल्क्या,

य एवायꣳ श्रौत्रः प्रातिश्रुत्कः पुरुषः स एष वदैव शाकल्य तस्य का देवतेति दिश इति होवाच ॥१३॥ तम एव यस्यायतनꣳ हृदयं लोको मनोज्योतिर्यो वै तं पुरुषं विद्यात्सर्वस्यात्मनः परायणꣳ स वै वेदिता स्याद्याज्ञवल्क्य वेद वा अहं तं पुरुषꣳ सर्वस्यात्मनः परायणं यमात्थ य एवायं छायामयः पुरुषः स एष वदैव शाकल्य तस्य का देवतेति मृत्युरिति होवाच ॥१४॥ रूपाण्येव यस्यायतनं चक्षुर्लोको मनोज्योतिर्यो वै तं पुरुषं विद्यात्सर्वस्यात्मनः परायणꣳ स वै वेदिता स्याद्याज्ञवल्क्य वेद वा अहं तं पुरुषꣳ सर्वस्यात्मनः परायणं यमात्थ य एवायमादर्शे पुरुषः स एष वदैव शाकल्य तस्य का देवतेत्यसुरिति होवाच ॥१५॥ आप एव यस्यायतनꣳ हृदयं लोको मनोज्योतिर्यो वै तं पुरुषं विद्यात्सर्वस्यात्मनः परायणꣳ स वै वेदिता स्याद्याज्ञवल्क्य

तूं ज्याला सर्व आत्म्याचा परम आश्रय ह्मणतोस तो पुरुष मी जाणतो. जो हा श्रवण–प्रतिश्रवणाचे ठिकाणीं पुरुष आहे तोच हा होय.'' ''शाकल्या, त्याची देवता कोण तें सांग.'' ''दिशा.''१३. ''तम हा ज्याचा आश्रय आहे, हृदय हा चक्षु आहे आणि मन हा संकल्पक आहे अशा सर्व आत्म्याचा परम आश्रय असलेल्या पुरुषाला जो जाणतो तोच पंडित होय.'' ''याज्ञवल्क्या, तूं ज्याला सर्व आत्म्याचा परम आश्रय ह्मणतोस तो पुरुष मी जाणतों. जो हा छायामय [अज्ञानमय] पुरुष आहे तोच हा होय.'' ''शाकल्या, त्याची देवता कोण तें सांग. ''मृत्यु.''१४. ''रूपें हा ज्याचा आश्रय आहे, चक्षु हा चक्षु आहे आणि मन हा संकल्पक आहे अशा सर्व आत्म्याचा परम आश्रय असलेल्या पुरुषाला जो जाणतो तोच पंडित होय. ''याज्ञवल्क्या, तूं ज्याला सर्व आत्म्याचा परम आश्रय ह्मणतोस तो पुरुष मी जाणतों. जो हा आरशामध्यें (प्रतिबिंबरूप) पुरुष दिसतो तोच हा होय. शाकल्या, त्याची देवता कोण तें सांग.'' ''प्राण.'' १५. ''उदक हा ज्याचा आश्रय आहे, हृदय हा चक्षु आहे आणि मन हा

वेद वा अहं तं पुरुषꣳ सर्वस्यात्मनः परायणं यमात्थ य एवायमप्सु पुरुषः स एष वदैव शाकल्य तस्य का देवतेति वरुण इति होवाच ॥१६॥ रेत एव यस्यायतनꣳ हृदयं लोको मनोज्योतिर्यो वै तं पुरुषं विद्यात्सर्वस्यात्मनः परायणꣳ स वै वेदिता स्याद्याज्ञवल्क्य वेद वा अहं तं पुरुषꣳ सर्वस्यात्मनः परायणं यमात्थ य एवायं पुत्रमयः पुरुषः स एष वदैव शाकल्य तस्य का देवतेति प्रजापतिरिति होवाच ॥१७॥ शाकल्येति होवाच याज्ञवल्क्यस्त्वाꣳ स्विदिमे ब्राह्मणा अंगारावक्षयणमक्रता३ इति ॥१८॥ याज्ञवल्क्येति होवाच शाकल्यो यदिदं कुरुपंचालानां ब्राह्मणानत्यवादीः किं ब्रह्म विद्वानिति दिशो वेद सदेवाः सप्रतिष्ठा इति यद्दिशो वेत्थ सदेवाः सप्रतिष्ठाः ॥१९॥ किंदेवतोऽस्यां प्राच्यां दिश्यसीत्यादित्यदेवत इति स आदित्यः कस्मिन् प्रतिष्ठित इति चक्षुषीति कस्मिन्नु चक्षुः प्रतिष्ठितमिति रूपेष्विति चक्षुषा हि रूपाणि पश्यति कस्मिन्नु रूपाणि प्रतिष्ठितानीति हृदय

संकल्पक आहे अशा सर्व आत्म्याचा परम आश्रय असलेल्या पुरुषाला जो जाणतो तोच पंडित होय." "याज्ञवल्क्या, तूं ज्याला सर्व आत्म्याचा परम आश्रय ह्मणतोस तो पुरुष मी जाणतों. जो हा उदकामध्यें पुरुष दिसतो तोच हा होय." "शाकल्या, त्याची देवता कोण तें सांग." "वरुण." ......१६.१७. याज्ञवल्क्य ह्मणाला, "शाकल्या, या ब्राह्मणांनीं तुला निखारे उचलण्याचा चिमटाच जणूं काय केला आहे." १८. शाकल्य ह्मणाला, "याज्ञवल्क्या, कुरु व पंचाल देशींच्या ब्राह्मणांना तूं असें बोलतोस तर तूं (तरी) ब्रह्म जाणतोस काय? देव व प्रतिष्ठा [आश्रय] यांच्यासह दिशांचें (आत्मस्वरूपानें) ज्ञान मला आहे. जर देव व प्रतिष्ठा यांसह दिशा तूं जाणीत असशील तर या पूर्व दिशेला तुझी देवता कोण आहे?" "आदित्य." "तो आदित्य कशामध्यें स्थित आहे?" "चक्षूमध्यें." "चक्षु कशामध्यें स्थित आहे?" "रूपामध्यें. कारण चक्षूनें मनुष्य रूपें पहातो."

इति होवाच हृदयेन हि रूपाणि जानाति हृदये ह्येव रूपाणि प्रतिष्ठितानि भवन्तीत्येवमेवैतद्याज्ञवल्क्य ॥२०॥ किंदेवतोऽस्यां दक्षिणायां दिश्यसीति यमदेवत इति स यमः कस्मिन्प्रतिष्ठित इति यज्ञ इति कस्मिन्नु यज्ञः प्रतिष्ठित इति दक्षिणायामिति कस्मिन्नु दक्षिणा प्रतिष्ठितेति श्रद्धायामिति यदा ह्येव श्रद्धत्तेऽथ दक्षिणां ददाति श्रद्धायाँ ह्येव दक्षिणा प्रतिष्ठितेति कस्मिन्नु श्रद्धा प्रतिष्ठितेति हृदय इति होवाच हृदयेन हि श्रद्धां जानाति हृदये ह्येव श्रद्धा प्रतिष्ठिता भवतीत्येवमेवैतद्याज्ञवल्क्य ॥२१॥ किंदेवतोऽस्यां प्रतीच्यां दिश्यसीति वरुणदेवत इति स वरुणः कस्मिन्प्रतिष्ठित इत्यप्स्विति कस्मिन्न्वापः प्रतिष्ठिता इति रेतसीति कस्मिन्नु रेतः प्रतिष्ठितमिति हृदय इति तस्मादपि प्रतिरूपं जातमाहुर्हृदयादिव सृप्तो हृदयादिव निर्मित इति हृदये ह्येव रेतः प्रतिष्ठितं भवतीत्येवमेवैतद्याज्ञवल्क्य

रूपें कशामध्यें स्थित आहेत ?" "हृदयामध्यें. कारण हृदयाने रूपें जाणतो. हृदयामध्येंच रूपें स्थित आहेत." "याज्ञवल्क्या, बरोबर, असेंच आहे." १९.२०. "या दक्षिण दिशेला तुझी देवता कोण आहे" "यम." "तो यम कशामध्यें स्थित आहे?" "यज्ञामध्यें." "यज्ञ कशामध्यें स्थित आहे?" "दक्षिणेमध्यें." "दक्षिणा कशामध्यें स्थित आहे ?" "श्रद्धेमध्यें. कारण श्रद्धा असते ह्मणून (यजमान) दक्षिणा देतो. श्रद्धेमध्येंच दक्षिणा स्थित आहे." "श्रद्धा कशामध्यें स्थित आहे ?" "हृदयामध्यें. कारण हृदयानें (मनुष्य) श्रद्धा जाणतो. हृदयामध्येंच श्रद्धा स्थित आहे." "याज्ञवल्क्या, बरोबर, असेंच आहे."२१. "या पश्चिम दिशेला तुझी देवता कोण आहे ?" "वरुण." "तो वरुण कशामध्यें स्थित आहे?" "उदकामध्यें." "उदक कशामध्यें स्थित आहे ?" "रेतामध्यें." "रेत कशामध्यें स्थित आहे ?" "हृदयामध्यें. ह्मणून—हा जणूं काय हृदयापासूनच निघाला, हृदयापासूनच उत्पन्न झाला—असें(पित्याच्या) अनुरूप झालेल्या पुत्राविषयीं

॥२२॥ किंदेवतोऽस्यामुदीच्यां दिश्यसीति सोमदेवत इति स सोमः कस्मिन्प्रतिष्ठित इति दीक्षायामिति कस्मिन्नु दीक्षा प्रतिष्ठितेति सत्य इति तस्मादपि दीक्षितमाहुः सत्यं वदेति सत्ये ह्येव दीक्षा प्रतिष्ठितेति कस्मिन्नु सत्यं प्रतिष्ठितमिति हृदय इति होवाच हृदयेन हि सत्यं जानाति हृदये ह्येव सत्यं प्रतिष्ठितं भवतीत्येवमेवैतद्याज्ञवल्क्य ॥२३॥ किंदेवतोऽस्यां ध्रुवायां दिश्यसीत्यग्निदेवत इति सोऽग्निः कस्मिन्प्रतिष्ठित इति वाचीति कस्मिन्नु वाक् प्रतिष्ठितेति हृदय इति कस्मिन्नु हृदयं प्रतिष्ठितमिति ॥२४॥ अहल्लिकेति होवाच याज्ञवल्क्यो यत्रैतदन्यत्रास्मन्मन्यासै यद्ध्येतदन्यत्रास्मत्स्याच्छ्वानो वैनदद्युर्वयांसि वैनद्विमथ्नीरन्निति ॥२५॥ कस्मिन्नु त्वं चात्मा च प्रतिष्ठितौ स्थ इति प्राण इति कस्मिन्नु प्राणः प्रतिष्ठित इत्यपान इति कस्मिन्न्वपानः

ह्मणतात. ह्मणून हृदयामध्येंच रेत स्थित आहे." "याज्ञवल्क्या, बरोबर, असेंच आहे."२२. या उत्तर दिशेला तुझी देवता कोण आहे?" "सोम." "तो सोम कशामध्यें स्थित आहे?" "(यज्ञाच्या) दीक्षेमध्यें." "दीक्षा कशामध्यें स्थित आहे?" सत्यामध्यें. ह्मणून—सत्य भाषण कर—असें दीक्षिताला ह्मणतात. सत्यामध्येंच दीक्षा स्थित आहे." "सत्य कशामध्यें स्थित आहे?" "हृदयामध्यें. कारण हृदयानें (मनुष्य) सत्य जाणतो. हृदयामध्येंच सत्य स्थित आहे." "याज्ञवल्क्या, बरोबर, असेंच आहे."२३. या (ऊर्ध्व) ध्रुवा दिशेला तुझी देवता कोण आहे?" "अग्नि." "तो अग्नि कशामध्यें स्थित आहे?" "वाणीमध्यें." "वाणी कशामध्यें स्थित आहे?" "हृदयामध्यें." "हृदय कशामध्यें स्थित आहे?"२४. "याज्ञवल्क्य ह्मणाला, "हृदयामध्येंच. हें (हृदय) याहून [शरीराहून] इतर ठिकाणीं आहे असें समजशील आणि (तसें) इतर ठिकाणीं असलें तर याला श्वान भक्षण करतील अथवा पक्षी याची उलथापालथ करतील [=आत्मा शरीराहून वेगळा रहात नाहीं]."२५. "तूं [शरीर] आणि आत्मा

प्रतिष्ठित इति व्यान इति कस्मिन्नु व्यानः प्रतिष्ठित इत्युदान इति कस्मिन्नूदानः प्रतिष्ठित इति समान इति स एष नेति नेत्यात्माऽगृह्यो न हि गृह्यतेऽशीर्यो न हि शीर्यतेऽसंगो न हि सज्यतेऽसितो न व्यथते न रिष्यति । एतान्यष्टावायतनान्यष्टौ लोका अष्टौ देवा अष्टौ पुरुषाः स यस्तान्पुरुषान्निरुह्य प्रत्युह्यात्यक्रामत्तं त्वौपनिषदं पुरुषं पृच्छामि तं चेन्मे न विवक्ष्यसि मूर्धा ते विपतीष्यतीति । तꣳ ह न मेने शाकल्यस्तस्य ह मूर्धा विपपातापि हास्य परिमोषिणोऽस्थीन्यपजह्रुरन्यन्मन्यमानाः ॥२६॥ अथ होवाच ब्राह्मणा भगवन्तो यो वः कामयते स मा पृच्छतु सर्वे वा मा पृच्छत यो वः कामयते तं वः पृ-

[हृदय] कशामध्यें स्थित आहां?" "प्राणामध्यें." "प्राण कशामध्यें स्थित आहे?" "अपानामध्यें." "अपान कशामध्यें स्थित आहे?" "व्यानामध्यें." "व्यान कशामध्यें स्थित आहे?" "उदानामध्यें." "उदान कशामध्यें स्थित आहे?" "समानामध्यें. (मधुकांडामध्यें) जो नेति नेति असा, घेतला जात नाहीं ह्मणून अग्राह्य, फाडला जात नाहीं ह्मणून अशीर्य, जोडला जात नाहीं ह्मणून असक्त, अबद्ध, व्यथा पावत नाहीं, विनाश पावत नाहीं अशा प्रकारें वर्णन केला आहे तो आत्मा हाच होय. हीं आठ आयतनें, आठ लोक, आठ देव आणि आठ पुरुष यांना निश्चयपूर्वक जाण्यास लावून पुन्हां हृदयामध्यें आणून जो उपाधिधर्मांच्या पलीकडे जातो अशा व उपनिषदांनीं ज्ञेय असलेल्या पुरुषाविषयीं मी तुला विचारतों. तुला सांगतां न आलें तर तुझें मस्तक तुटून पडेल." हें ज्ञान शाकल्याला नव्हतें. ह्मणून त्याचें शिर तुटून पडलें. (शिष्य) त्याच्या अस्थि (घेऊन चालले असतांना तें) इतर (धन आहे असें) समजून चोर त्या देखील घेऊन गेले.

२६. नंतर याज्ञवल्क्य ब्राह्मणांना ह्मणाला, तुमच्यापैकीं ज्याची इच्छा असेल त्यानें मला प्रश्न विचारावा; अथवा तुह्मी सर्वजण देखील विचारा. तुमच्यापैकीं ज्याची इच्छा असेल त्याला मी प्रश्न विचारतों; अथवा

च्छामि सर्वान्वा वः पृच्छामीति ते ह ब्राह्मणा न दधृषुः ॥२७॥ तान् हैतैः श्लोकैः पप्रच्छ ॥ यथा वृक्षो वनस्पतिस्तथैव पुरुषोऽमृषा ॥ तस्य लोमानि पर्णानि त्वगस्योत्पाटिका बहिः ॥ त्वच एवास्य रुधिरं प्रस्यन्दि त्वच उत्पटः ॥ तस्मात्तदातृण्णात्प्रैति रसो वृक्षादिवाहतात् ॥ मांसान्यस्य शकराणि किनाटं स्नाव तस्थिरम् ॥ अस्थीन्यंतरतो दारूणि मज्जा मज्जोपमा कृता ॥ यद्वृक्षो वृक्णो रोहति मूलान्नवतरः पुनः ॥ मर्त्यः स्विन्मृत्युना वृक्णः कस्मान्मूलात्प्ररोहति ॥ रेतस इति मा वोचत जीवतस्तत्प्रजायते ॥ धानारुह इव वै वृक्षोऽञ्जसा प्रेत्य संभवः ॥ यत्समूलमावृहेयुर्वृक्षं न पुनराभवेत् ॥ मर्त्यः स्विन्मृत्युना वृक्णः कस्मान्मूलात्प्ररोहति ॥ जात एव न जायते को न्वेनं जनयेत्पुनः ॥

सर्वांना विचारतों. पण त्या ब्राह्मणांचा (हें कबूल करण्यास) धीर झाला नाहीं.२७. त्यांना याज्ञवल्क्यानें पुढील श्लोकांनीं प्रश्न केला— ज्याप्रमाणें वनस्पति वृक्ष तसाच खरोखर हा पुरुष आहे. लोम हीं याचीं पानें आणि त्वचा ही याची साल. याच्या त्वचेपासूनच रुधिर वहातें आणि (वृक्षाच्या) सालीपासून डिंक वहातो. ह्मणून वृक्षाला मारलें असतां जसा रस बाहेर येतो त्याप्रमाणें याला मारलें असतां रुधिर बाहेर येतें. मांस हे याचे तुकडे होत आणि स्थिर स्नायु हा याचा गाभा होय. अस्थि हीं आंतलीं काष्ठें आणि मज्जा ही मज्जाच होय. वृक्ष तोडला असतां पुन्हां मूळामधून नवीन फुटतो तसा मृत्यूनें तोडलेला मनुष्य कोणत्या मूळामधून पुन्हां उत्पन्न होतो? 'रेतापासून' असें ह्मणूं नका, कारण तें जिवंत मनुष्यापासून उत्पन्न होतें. पण वृक्ष हा साक्षात् मेला तरी बीजापासून (दुसरा) उत्पन्न होतो. मूळ आणि बीज दोन्ही नष्ट केलीं तर वृक्ष पुन्हां उत्पन्न होत नाहीं. याकरितां मृत्यूनें मारलेला मनुष्य कोणत्या मूळापासून पुन्हां उत्पन्न होतो? "हा जन्मलेलाच आहे" असें तुह्मी ह्मणाल तर नव्हे. हा मेल्यावर देखील पुन्हां जन्माला येतो. तेव्हां याला मेल्यावर पुन्हां कोण जन्माला आणतो?

विज्ञानमानंदं ब्रह्म रातिर्दातुः परायणं तिष्ठमानस्य तद्विद इति ॥२८॥ इति नवमं ब्राह्मणम् ॥९॥ इति तृतीयोऽध्यायः ॥३॥

अथ चतुर्थोऽध्यायः ॥

ॐ जनको ह वैदेह आसांचक्रेऽथ ह याज्ञवल्क्य आवव्राज । तꣳ होवाच याज्ञवल्क्य किमर्थमचारीः पशूनिच्छन्नण्वन्तानिति । उभयमेव सम्राडिति होवाच ॥१॥ यत्ते कश्चिदब्रवीत्तच्छृणवामेत्यब्रवीन्मे जित्वा शैलिनिर्वाग्वै ब्रह्मेति यथा मातृमान्पितृमानाचार्यवान्ब्रूयात्तथा तच्छैलिनिरब्रवीद्वाग्वै ब्रह्मेत्यवदतो हि किꣳ स्यादित्यब्रवीत्तु ते तस्यायतनं प्रतिष्ठां न मेऽब्रवीदित्येकपाद्वा एतत्सम्राडिति स वै नो ब्रूहि याज्ञवल्क्य । वागेवायतनमाकाशः प्रतिष्ठा प्रज्ञेत्येनदुपासीत । का

(या प्रश्नाला कोणी उत्तर देऊं शकला नाहीं). ब्रह्म विज्ञानस्वरूप व आनंदस्वरूप आहे. धन दान करणाराचें परम प्राप्तव्य आणि हें (ब्रह्म) जाणून त्याचे ठिकाणीं (तद्रूप) रहाणाराचेंहि परम प्राप्तव्य हेंच होय.२८.

अध्याय चवथा.

विदेह देशींचा राजा जनक (भेटूं इच्छिणारांनीं भेट घ्यावी ह्मणून) बसला होता. त्याच्याकडे याज्ञवल्क्य आला. त्याला जनक ह्मणाला, याज्ञवल्क्या, (गाई इत्यादि) पशूंच्या इच्छेनें अथवा सूक्ष्म प्रश्न ऐकण्याच्या इच्छेनें तूं आला आहेस ? याज्ञवल्क्यानें उत्तर दिलें, "राजा, दोहोंच्याहि इच्छेनें आलों आहे.१. (पण) दुसऱ्या कोणीं (ज्ञात्यानें) तुला जें कांहीं सांगितलें असेल तेंहि मी ऐकेन." जनक ह्मणाला, "शिलिनीचा पुत्र जित्वन् मला ह्मणाला, वाणी हेंच ब्रह्म." याज्ञवल्क्य—"माता, पिता व आचार्य यांनीं (क्रमाने) उपदिष्ट असा (ज्ञानी) जसें बोलेल तसेंच तो बोलला. कारण ज्याला वाणी नाहीं त्याला काय आहे ? पण तुला त्या ब्रह्माचें शरीर व आश्रयस्थान त्यानें सांगितले काय ?" "मला सांगितले नाहीं." "राजा, (वाणी) हें ब्रह्म चतुर्थांश आहे." "मग याज्ञवल्क्या, तें (संपूर्ण) तूं मला सांग." "वाणी हें

प्रज्ञता याज्ञवल्क्य । वागेव सम्राडिति होवाच । वाचा वै सम्राड्बंधुः प्रज्ञायत ऋग्वेदो यजुर्वेदः सामवेदोऽथर्वांगिरस इतिहासः पुराणं विद्या उपनिषदः श्लोकाः सूत्राण्यनुव्याख्यानानि व्याख्यानानीष्टꣳ हुतमाशितं पायितमयं च लोकः परश्च लोकः सर्वाणि च भूतानि वाचैव सम्राट् प्रज्ञायन्ते वाग्वै सम्राट् परमं ब्रह्म नैनं वाग्जहाति सर्वाण्येनं भूतान्यभिक्षरन्ति देवो भूत्वा देवानप्येति य एवं विद्वानेतदुपास्ते । हस्त्यृषभꣳ सहस्रं ददामीति होवाच जनको वैदेहः । स होवाच याज्ञवल्क्यः पिता मेऽमन्यत नाननुशिष्य हरेतेति ॥२॥ यदेव ते कश्चिदब्रवीत्तच्छृणवामेत्यब्रवीन्म उदंकः शौल्बायनः प्राणो वै ब्रह्मेति यथा मातृमान्पितृमानाचार्यवान्ब्रूयात्तथा तच्छौल्बायनोऽब्रवी-

आयतन [शरीर], आकाश ही प्रतिष्ठा [सर्वकाळ आश्रयस्थान] होय; प्रज्ञा या रूपानें या ब्रह्माची उपासना करावी.'' ''याज्ञवल्क्या, प्रज्ञता कोणती?'' ''वाणी हीच. हिनेंच (मी तुझा) बंधु (आहें असें कोणीं सांगितलें असतां) जाणतां येतो; तसेच ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्वांगिरस, इतिहास, पुराण, ब्रह्मविद्या, उपनिषदें, श्लोक, सूत्रें, अनुव्याख्यानें, व्याख्यानें, यज्ञ, हवन, अन्नदान, उदकदान, इहलोक, परलोक, सर्व भूतमात्र हीं सर्व वाणीनेंच जाणतां येतात. वाणी हेंच परम ब्रह्म होय. या प्रकारें जाणून जो याची उपासना करतो त्याला वाणी सोडीत नाहीं, सर्व भूतें त्याच्यावर वर्षाव करतात आणि तो देव होऊन देवांप्रत जातो.'' ''ज्यांच्यामध्यें एक हस्तितुल्य ऋषभ आहे अशा हजार गाई तुला देतों.'' ''शिष्याला पूर्ण ज्ञान देण्यापूर्वीं त्याजपासून कांहीं घेऊं नये असा माझ्या पित्याचा अभिप्राय होता (व तसाच माझाहि आहे, ह्मणून मला इतक्यांत गाई नकोत).२. दुसऱ्या कोणीं तुला (आणखी) कांहीं सांगितलें असेल तेंहि मी ऐकेन.'' जनक ह्मणाला, ''शुल्बाचा पुत्र उदंक मला ह्मणाला, प्राण हेंच ब्रह्म.'' याज्ञवल्क्य— ''माता, पिता व आचार्य यांनीं (क्रमानें) उपदिष्ट असा (ज्ञानी) जसें

त्प्राणो वै ब्रह्मेत्यप्राणतो हि किं स्यादित्यब्रवीत्तु ते तस्यायतनं प्रतिष्ठां न मेऽब्रवीदित्येकपाद्वा एतत्सम्राडिति स वै नो ब्रूहि याज्ञवल्क्य प्राण एवायतनमाकाशः प्रतिष्ठा प्रियमित्येनदुपासीत का प्रियता याज्ञवल्क्य प्राण एव सम्राडिति होवाच प्राणस्य वै सम्राट् कामायायाज्यं याजयत्यप्रतिगृह्यस्य प्रतिगृह्णात्यपि तत्र वधाशंकं भवति यां दिशमेति प्राणस्यैव सम्राट् कामाय प्राणो वै सम्राट् परमं ब्रह्म नैनं प्राणो जहाति सर्वाण्येनं भूतान्यभिक्षरन्ति देवो भूत्वा देवानप्येति य एवं विद्वानेतदुपास्ते हस्त्यृषभं सहस्रं ददामीति होवाच जनको वैदेहः स होवाच याज्ञवल्क्यः पिता मेऽमन्यत नाननुशिष्य हरेतेति ॥३॥ यदेव ते कश्चिदब्रवीत्तच्छृणवामेत्यब्रवीन्मे बर्कुर्वार्ष्णश्चक्षुर्वै ब्रह्मेति

बोलेल तसेंच तो बोलला. कारण ज्याला प्राण नाहीं त्याला काय आहे? पण तुला त्या ब्रह्माचें शरीर व आश्रयस्थान त्यानें सांगितलें काय?" "मला सांगितले नाहीं." "राजा, हें ब्रह्म चतुर्थांश आहे." "मग याज्ञवल्क्या, ते (संपूर्ण) तूं मला सांग." "प्राण हें आयतन, आकाश ही प्रतिष्ठा होय; प्रिय या रूपानें या ब्रह्माची उपासना करावी." "याज्ञवल्क्या, प्रियता कोणती?" "प्राण हीच. प्राणाच्या इच्छेनें यज्ञ करण्यास लावतात; प्रतिग्रह घेण्याला अयोग्य अशा माणसाकडून देखील प्रतिग्रह [दान] घेतात; जिकडे जातात तिकडे आपला वध होईल कीं काय अशी भीति रहाते; प्राण हेंच परम ब्रह्म होय. याप्रकारें जाणून जो याची उपासना करतो त्याला प्राण सोडीत नाही, सर्व भूतें त्याच्यावर वर्षाव करतात आणि तो देव होऊन देवांप्रत जातो." "ज्यांच्यामध्यें एक हस्तितुल्य ऋषभ आहे अशा एक हजार गाई तुला देतों." "शिष्याला पूर्ण ज्ञान देण्यापूर्वीं त्याजपासून कांहीं घेऊं नये असा माझ्या पित्याचा अभिप्राय होता. ३. दुसऱ्या कोणीं तुला (आणखी) कांहीं सांगितलें असेल तेहि मी ऐकेन." "वृष्णाचा पुत्र बर्कु मला ह्मणाला, चक्षु हेंच ब्रह्म." याज्ञवल्क्य—"माता, पिता व

यथा मातृमान्पितृमानाचार्यवान्ब्रूयात्तथा तद्वार्ष्णोऽब्रवीच्चक्षुर्वै ब्रह्मेत्य-
पश्यतो हि किꣳ स्यादित्यब्रवीत्तु ते तस्यायतनं प्रतिष्ठां न मेऽब्रवीदि-
त्येकपाद्वा एतत्सम्राडिति स वै नो ब्रूहि याज्ञवल्क्य चक्षुरेवायतन-
माकाशः प्रतिष्ठा सत्यमित्येनदुपासीत का सत्यता याज्ञवल्क्य चक्षुरेव
सम्राडिति होवाच चक्षुषा वै सम्राट् पश्यन्तमाहुरद्राक्षीरिति स
आहाद्राक्षमिति तत्सत्यं भवति चक्षुर्वै सम्राट् परमं ब्रह्म नैनं चक्षु-
र्जहाति सर्वाण्येनं भूतान्यभिक्षरन्ति देवो भूत्वा देवानप्येति य एवं
विद्वानेतदुपास्ते हस्त्यृषभꣳ सहस्रं ददामीति होवाच जनको वैदेहः
स होवाच याज्ञवल्क्यः पिता मेऽमन्यत नाननुशिष्य हरेतेति ॥४॥
यदेव ते कश्चिदब्रवीत्तच्छृणवामेत्यब्रवीन्मे गर्दभीविपीतो भारद्वाजः
श्रोत्रं वै ब्रह्मेति यथा मातृमान्पितृमानाचार्यवान्ब्रूयात्तथा तद्भारद्वा-

आचार्य यांनीं (क्रमानें) उपदिष्ट असा (ज्ञानी) जसें बोलेल तसेंच तो बोलला. कारण ज्याला दिसत नाहीं त्याला काय आहे? पण तुला त्या ब्रह्माचें शरीर व आश्रयस्थान त्यानें सांगितलें काय?" "मला सांगितलें नाहीं." "राजा, हें ब्रह्म चतुर्थांश आहे." "मग याज्ञवल्क्या, तें (संपूर्ण) तूं मला सांग." "चक्षु हें आयतन, आकाश ही प्रतिष्ठा होय; सत्य या रूपानें या ब्रह्माची उपासना करावी." "याज्ञवल्क्या, सत्यता कोणती?" "चक्षु हींच. चक्षूनें पहाणाराला—पाहिलेंस काय?—ह्मणून विचारतात. तो ह्मणतो–पाहिलें–ते खरें असतें. चक्षु हेंच परम ब्रह्म होय. या प्रकारें जाणून जो याची उपासना करतो त्याला चक्षु सोडीत नाहीं, सर्व भूतें त्याच्यावर वर्षाव करतात आणि तो देव होऊन देवांप्रत जातो." "ज्यांच्या-मध्यें एक हस्तितुल्य ऋषभ आहे अशा एक हजार गाई तुला देतों." "शिष्याला पूर्ण ज्ञान देण्यापूर्वीं त्याजपासून कांहीं घेऊं नये असा माझ्या पित्याचा अभिप्राय होता.४. दुसऱ्या कोणीं तुला (आणखी) कांहीं सांगि-तलें असेल तेंहि मी ऐकेन." "भारद्वाजगोत्री गर्दभीविपीत मला ह्मणाला,

जोऽब्रवीच्छ्रोत्रं वै ब्रह्मेत्यशृण्वतो हि किꣲ स्यादित्यब्रवीत्तु ते तस्यायतनं प्रतिष्ठां न मेऽब्रवीदित्येकपाद्वा एतत्सम्राडिति स वै नो ब्रूहि याज्ञवल्क्य श्रोत्रमेवायतनमाकाशः प्रतिष्ठानंत इत्येनदुपासीत कानंतता याज्ञवल्क्य दिश एव सम्राडिति होवाच तस्माद्वै सम्राडपि यां कां च दिशं गच्छति नैवास्या अन्तं गच्छत्यनंता हि दिशो दिशो वै सम्राट् श्रोत्रꣲ श्रोत्रं वै सम्राट् परमं ब्रह्म नैनꣲ श्रोत्रं जहाति सर्वाण्येनं भूतान्यभिक्षरन्ति देवो भूत्वा देवानप्येति य एवं विद्वानेतदुपास्ते हस्त्यृषभꣲ सहस्रं ददामीति होवाच जनको वैदेहः स होवाच याज्ञवल्क्यः पिता मेऽमन्यत नाननुशिष्य हरेतेति॥५॥ यदेव ते कश्चिदब्रवीत्तच्छृणवामेत्यब्रवीन्मे सत्यकामो जाबालो मनो वै ब्रह्मेति यथा

श्रोत्र हेंच ब्रह्म." याज्ञवल्क्य—"माता, पिता व आचार्य यांनीं (क्रमानें) उपदिष्ट असा (ज्ञानी) जसें बोलेल तसेंच तो बोलला. कारण ज्याला ऐकूं येत नाहीं त्याला काय आहे? पण तुला त्या ब्रह्माचें शरीर व आश्रयस्थान त्यानें सांगितलें काय?" "मला सांगितलें नाहीं." "राजा, हें ब्रह्म चतुर्थांश आहे." "मग याज्ञवल्क्या, तें (संपूर्ण) तूं मला सांग." "श्रोत्र हें आयतन, आकाश ही प्रतिष्ठा; अनन्त या रूपानें या ब्रह्माची उपासना करावी." "याज्ञवल्क्या, अनन्तता कोणती?" "दिशा हीच. ह्मणून मनुष्य कोणत्याहि दिशेला गेला तरी तिच्या अंताला जाऊं शकत नाही. कारण दिशा अन्तरहित आहेत. दिशा हेंच श्रोत्र आणि श्रोत्र हेंच परम ब्रह्म होय. या प्रकारें जाणून जो याची उपासना करतो त्याला श्रोत्र सोडीत नाहीं, सर्व भूते त्याच्यावर वर्षाव करतात आणि तो देव होऊन देवांप्रत जातो." "ज्यांच्यामध्यें एक हस्तितुल्य ऋषभ आहे अशा एक हजार गाई तुला देतों." "शिष्याला पूर्ण ज्ञान देण्यापूर्वीं त्याजपासून कांहीं घेऊं नये असा माझ्या पित्याचा अभिप्राय होता.५. दुसऱ्या कोणीं तुला (आणखी) कांहीं सांगितलें असेल तेंहि मी ऐकेन." जबालापुत्र सत्यकाम मला ह्मणाला,

मातृमान्पितृमानाचार्यवान्ब्रूयात्तथा तज्जाबालोऽब्रवीन्मनो वै ब्रह्मेत्यमनसो हि किंं स्यादित्यब्रवीत्तु ते तस्यायतनं प्रतिष्ठां न मेऽब्रवीदित्येकपाद्वा एतत्सम्राडिति स वै नो ब्रूहि याज्ञवल्क्य मन एवायतनमाकाशः प्रतिष्ठानंद इत्येनदुपासीत का आनंदता याज्ञवल्क्य मन एव सम्राडिति होवाच मनसा वै सम्राट् स्त्रियमभिहार्यते तस्यां प्रतिरूपः पुत्रो जायते स आनन्दो मनो वै सम्राट् परमं ब्रह्म नैनं मनो जहाति सर्वाण्येनं भूतान्याभिक्षरन्ति देवो भूत्वा देवानप्येति य एवं विद्वानेतदुपास्ते हस्त्यृषभंं सहस्रं ददामीति होवाच जनको वैदेहः स होवाच याज्ञवल्क्यः पिता मेऽमन्यत नाननुशिष्य हरेतेति ॥६॥ यदेव ते कश्चिद्ब्रवीत्तच्छृणवामेत्यब्रवीन्मे विदग्धः शाकल्यो हृदयं वै ब्रह्मेति यथा मातृमान्पितृमानाचार्यवान्ब्रूयात्तथा तच्छाकल्यो-

मन हेंच ब्रह्म." याज्ञवल्क्य–"माता, पिता व आचार्य यांनीं (क्रमानें) उपदिष्ट असा (ज्ञानी) जसें बोलेल तसेंच तो बोलला. कारण ज्याला मन नाहीं त्याला काय आहे? परंतु तुला त्या ब्रह्माचें शरीर व आश्रयस्थान त्यानें सांगितलें काय?" "मला सांगितलें नाहीं." "राजा, हें ब्रह्म चतुर्थांश आहे." "मग याज्ञवल्क्या, तें (संपूर्ण) तूं मला सांग." "मन हें आयतन, आकाश ही प्रतिष्ठा; आनंद या रूपानें या ब्रह्माची उपासना करावी." "याज्ञवल्क्या, आनंदता कोणती?" "मन हीच. मनानें स्त्रीची प्रार्थना केली असतां आपल्यासारखा पुत्र उत्पन्न होतो. तोच आनंद. मन हेंच परम ब्रह्म होय. या प्रकारें जाणून जो याची उपासना करतो त्याला मन सोडीत नाहीं, सर्व भूतें त्याच्यावर वर्षाव करतात आणि तो देव होऊन देवांप्रत जातो." "ज्यांच्यामध्यें एक हस्तितुल्य ऋषभ आहे अशा एक हजार गाई तुला देतो." "शिष्याला पूर्ण ज्ञान देण्यापूर्वीं त्याजपासून कांहीं घेऊं नये असा माझ्या पित्याचा अभिप्राय होता. ६. दुसऱ्या कोणीं तुला (आणखी) कांहीं सांगितलें असेल तेंहि मी ऐकेन." "विद्वान् शाकल्य

ऽब्रवीद्धृदयं वै ब्रह्मेत्यहृदयस्य हि किँ स्यादित्यब्रवीत्तु ते तस्यायतनं प्रतिष्ठां न मेऽब्रवीदित्येकपाद्वा एतत्सम्राडिति स वै नो ब्रूहि याज्ञवल्क्य हृदयमेवायतनमाकाशः प्रतिष्ठा स्थितिरित्येनदुपासीत का स्थितता याज्ञवल्क्य हृदयमेव सम्राडिति होवाच हृदयं वै सम्राट् सर्वेषां भूतानामायतनँ हृदयं वै सम्राट् सर्वेषां भूतानां प्रतिष्ठा हृदये ह्येव सम्राट् सर्वाणि भूतानि प्रतिष्ठितानि भवन्ति हृदयं वै सम्राट् परमं ब्रह्म नैनँ हृदयं जहाति सर्वाण्येनं भूतान्यभिक्षरन्ति देवो भूत्वा देवानप्येति य एवं विद्वानेतदुपास्ते हस्त्यृषभँ सहस्रं ददामीति होवाच जनको वैदेहः स होवाच याज्ञवल्क्यः पिता मेऽमन्यत नाननुशिष्य हरेतेति ॥७॥ इति प्रथमं ब्राह्मणम् ॥१॥

जनको ह वैदेहः कूर्चादुपावसर्पन्नुवाच नमस्तेऽस्तु याज्ञव-

मला ह्मणाला, हृदय हेंच ब्रह्म.'' ''माता, पिता व आचार्य यांनीं (क्रमानें) उपदिष्ट असा (ज्ञानी) जसें बोलेल तसेंच तो बोलला. कारण ज्याला हृदय नाहीं त्याला काय आहे? परंतु तुला त्या ब्रह्माचे शरीर व आश्रयस्थान त्यानें सांगितलें काय?'' ''मला सांगितलें नाहीं.'' ''राजा, हें ब्रह्म चतुर्थांश आहे.'' ''मग याज्ञवल्क्या, तें (संपूर्ण) तूं मला साग.'' ''हृदय हें आयतन, आकाश ही प्रतिष्ठा; स्थिति या रूपानें या ब्रह्माची उपासना करावी.'' ''याज्ञवल्क्या, स्थितता कोणती?'' ''हृदय हीच. हृदय हेंच सर्व भूतांचें आयतन; हृदय हीच सर्व भूतांची प्रतिष्ठा; हृदयामध्येंच सर्व भूतें प्रतिष्ठित आहेत. हृदय हेंच परम ब्रह्म होय. या प्रकारें जाणून जो याची उपासना करतो त्याला हृदय सोडीत नाहीं, सर्व भूतें त्याच्यावर वर्षाव करतात आणि तो देव होऊन देवांप्रत जातो.'' ''ज्यांच्यामध्यें एक हस्तितुल्य ऋषभ आहे अशा एक हजार गाई तुला देतों.'' ''शिष्याला पूर्ण ज्ञान देण्यापूर्वीं त्याजपासून कांहीं घेऊं नये असा माझ्या पित्याचा अभिप्राय होता.''७.

ल्क्यानु मा शाधीति स होवाच यथा वै सम्राण्महान्तमध्वानमेष्यन् रथं वा नावं वा समाददीतैवमेवैताभिरुपनिषद्भिः समाहितात्माऽस्येवं वृंदारक आढ्यः सन्नधीतवेद उक्तोपनिषत्क इतो विमुच्यमानः क्व गमिष्यसीति नाहं तद्भगवन्वेद यत्र गमिष्यामीत्यथ वै तेऽहं तद्वक्ष्यामि यत्र गमिष्यसीति ब्रवीतु भगवानिति ॥१॥ इंधो ह वै नामैष योऽयं दक्षिणेऽक्षन्पुरुषस्तं वा एतमिंधꣳ सन्तमिंद्र इत्याचक्षते परोक्षेणैव परोक्षप्रिया इव हि देवाः प्रत्यक्षद्विषः ॥२॥ अथैतद्वामेऽक्षणि पुरुषरूपमेषास्य पत्नी विराट् तयोरेष संस्तावो य एषोंऽतर्हृदय आकाशोऽथैनयोरेतदन्नं य एषोंऽतर्हृदये लोहितपिंडोऽथैनयोरेतत्प्रावरणं यदेतदन्तर्हृदये जालकमिवाथैनयोरेषा सृतिः

विदेहराजा जनक कूर्चासनावरून उठून (याज्ञवल्क्याकडे येऊन) नमस्कार करून ह्मणाला, "याज्ञवल्क्या, मला शिकव." याज्ञवल्क्य— "राजा, ज्याप्रमाणें दूरच्या रस्त्याला [प्रवासाला] जाणारा (मनुष्य) रथ अथवा नाव घेतो त्याप्रमाणें तूं या उपनिषदांनीं युक्त असा झालेला आहेस. तसाच तूं पूज्य आणि संपन्न आहेस. वेदाध्ययन केलेला व (आचार्यांनीं) उपनिषदें सांगितलेला असा तूं या देहापासून सुटलास ह्मणजे कोठें जाशील ?" "भगवन्, मी कोठें जाईन हे मला माहीत नाहीं." "तूं कोठें जाशील तें आतां मी तुला सांगतो." "सांगा." १. "उजव्या नेत्राचे ठिकाणीं (चक्षुरूपी ब्रह्म ह्मणून मागें सांगितलेला) जो हा पुरुष आहे त्याचें नांव इंध. हा इंध [=दीप्तिमान्] आहे ह्मणून याला अप्रत्यक्षपणें इंद्र असें ह्मणतात. कारण देव जणूं काय परोक्षप्रिय व प्रत्यक्ष-द्वेष्टे आहेत. २. डाव्या नेत्राचे ठिकाणीं जे पुरुषरूप विराट् [=अन्न] ती याची पत्नी होय. हृदयाचे अंतर्भागीं जो आकाश आहे तो यांचा संस्ताव [एकत्र होणे] होय. हृदयांतील मांसपिंडामध्यें जो रक्ताचा पिंड आहे तो यांचें अन्न. हृदयामध्यें जाळयासारखें [नाड्या] आहे ते यांचें पांघरूण.

संचरणी यैषा हृदयादूर्ध्वा नाड्युच्चरति यथा केशः सहस्रधा भिन्न एवमस्यैता हिता नाम नाड्योऽन्तर्हृदये प्रतिष्ठिता भवन्त्येताभिर्वा एतदास्रवदास्रवति तस्मादेष प्रविविक्ताहारतर इवैव भवत्यस्माच्छारीरादात्मनः ॥३॥ तस्य प्राची दिक् प्रांचः प्राणा दक्षिणा दिग्दक्षिणे प्राणाः प्रतीची दिक् प्रत्यंचः प्राणा उदीची दिगुदंचः प्राणा ऊर्ध्वा दिगूर्ध्वाः प्राणा अवाची दिगवांचः प्राणाः सर्वा दिशः सर्वे प्राणाः स एष नेति नेत्यात्माऽगृह्यो न हि गृह्यतेऽशीर्यो न हि शीर्यतेऽसंगो न हि सज्यतेऽसितो न व्यथते न रिष्यत्यभयं वै जनक प्राप्तोऽसीति होवाच याज्ञवल्क्यः स होवाच जनको वैदेहोऽभयं त्वा गच्छताद्याज्ञवल्क्य यो नो भगवन्नभयं वेदयसे नमस्तेऽस्त्विमे विदेहा अयमहमस्मि ॥४॥ इति द्वितीयं ब्राह्मणम् ॥२॥

हृदयापासून वर जी नाडी जाते तो यांचा संचार करण्याचा मार्ग. एका केंसाचा एक सहस्रांश इतक्या सूक्ष्म अशा या देहाच्या हिता नामक नाड्या हृदयामध्यें असतात. त्यांचेमधून हें (अन्न) जात जात जातें. ह्मणून या शरीरापेक्षां अत्यंत सूक्ष्म आहार करणारें असें हें (लिंगशरीर) असतें.३. पूर्वदिशा हे त्याचे पूर्वेकडील प्राण. दक्षिण दिशा हे दक्षिणेकडील प्राण. पश्चिम दिशा हे पश्चिमेकडील प्राण. उत्तर दिशा हे उत्तरेकडील प्राण. ऊर्ध्व दिशा हे ऊर्ध्व प्राण. अधर दिशा हे अधर प्राण. सर्व दिशा हे सर्व प्राण. 'नेति नेति' असा सांगितलेला आत्मा तो हा. हा अगृह्य आहे, ग्रहण करतां येत नाहीं; अशीर्य आहे, फाडतां येत नाहीं; असंग आहे, जोडला जात नाहीं; असित आहे, व्यथा पावत नाहीं; विनाश पावत नाहीं; जनका, (हे जाणून) तूं अभय [ब्रह्म] पावला आहेस." "ज्या अर्थी आह्मांला तूं अभयाचें [ब्रह्माचे] ज्ञान करून देतोस त्या अर्थी तूं देखील अभय पाव. तुला नमस्कार असो. हा विदेह देश आणि हा मी तुझे (दास) आहोंत."४.

जनकꣳ ह वैदेहं याज्ञवल्क्यो जगाम स मेने न वदिष्य इत्यथ ह यज्जनकश्च वैदेहो याज्ञवल्क्यश्चाग्निहोत्रे समूदाते तस्मै ह याज्ञवल्क्यो वरं ददौ स ह कामप्रश्नमेव वव्रे तꣳ हास्मै ददौ तꣳ ह सम्राडेव पूर्वं पप्रच्छ ॥१॥ याज्ञवल्क्य किंज्योतिरयं पुरुष इति आदित्यज्योतिः सम्राडिति होवाचादित्येनैवायं ज्योतिषास्ते पल्ययते कर्म कुरुते विपल्येतीत्येवमेवैतद्याज्ञवल्क्य ॥२॥ अस्तमित आदित्ये याज्ञवल्क्य किंज्योतिरेवायं पुरुष इति चंद्रमा एवास्य ज्योतिर्भवतीति चंद्रमसैवायं ज्योतिषास्ते पल्ययते कर्म कुरुते विपल्येतीत्येवमेवैतद्याज्ञवल्क्य ॥३॥ अस्तमित आदित्ये याज्ञवल्क्य चंद्रमस्यस्तमिते किंज्योतिरेवायं पुरुष इत्यग्निरेवास्य ज्योतिर्भवतीत्यग्निनैवायं ज्योतिषास्ते पल्ययते कर्म कुरुते विपल्येतीत्येवमेवैतद्याज्ञवल्क्य ॥४॥ अस्तमित

याज्ञवल्क्य जनकाकडे (भेटीला) गेला. (या प्रसंगीं) आपण कांही (ज्ञान) सांगूं नये (केवळ भेट द्यावी) असा त्याचा विचार होता. (परंतु पूर्वी) अग्निहोत्रप्रसंगीं याज्ञवल्क्य आणि जनक यांचा संवाद झाला होता तेव्हां याज्ञवल्क्यानें (संतुष्ट होऊन) जनकाला वर दिला होता. जनकानें 'मीं वाटेल ते प्रश्न विचारावे' असा वर मागितला होता. याज्ञवल्क्यानें तो वर दिला होता. ह्मणून जनकानें प्रश्न केला—१. "याज्ञवल्क्या, या पुरुषाची (व्यवहाराला साधन अशी) ज्योति कोणती?" "आदित्य. आदित्य या ज्योतीचे योगानें मनुष्य बसतो, गमन करतो, काम करतो, परत येतो." "याज्ञवल्क्या, बरोबर आहे.२. आदित्य अस्त पावला ह्मणजे या पुरुषाची ज्योति कोणती?" "चंद्रमा. हा मनुष्य चंद्ररूपी ज्योतीचे योगानें बसतो, गमन करतो, काम करतो, परत येतो." "याज्ञवल्क्या, बरोबर आहे.३. आदित्य आणि चंद्र अस्त पावले ह्मणजे या पुरुषाची ज्योति कोणती?" "अग्नि. अग्निरूपी ज्योतीचे योगानें बसतो, गमन करतो, काम करतो, परत येतो." "याज्ञवल्क्या, बरोबर आहे.४. सूर्य व चंद्र अस्त पावले व अग्नि

आदित्ये याज्ञवल्क्य चंद्रमस्यस्तमिते शान्तेऽग्नौ किंज्योतिरेवायं पुरुष इति वागेवास्य ज्योतिर्भवतीति वाचैवायं ज्योतिषास्ते पल्ययते कर्म कुरुते विपल्येतीति तस्माद्वै सम्राडपि यत्र स्वः पाणिर्न विनिर्ज्ञायतेऽथ यत्र वागुच्चरत्युपैव तत्र न्येतीत्येवमेवैतद्याज्ञवल्क्य ॥५॥ अस्तमित आदित्ये याज्ञवल्क्य चंद्रमस्यस्तमिते शान्तेऽग्नौ शान्तायां वाचि किंज्योतिरेवायं पुरुष इत्यात्मैवास्य ज्योतिर्भवतीत्यात्मनैवायं ज्योतिषास्ते पल्ययते कर्म कुरुते विपल्येतीति ॥६॥ कतम आत्मेति योऽयं विज्ञानमयः प्राणेषु हृद्यन्तर्ज्योतिः पुरुषः स समानः सन्नुभौ लोकावनुसंचरति ध्यायतीव लेलायतीव स हि स्वप्नो भूत्वेमं लोकमतिक्रामति मृत्यो रूपाणि ॥७॥ स वा अयं पुरुषो जायमानः शरीरमभिसंपद्यमानः पाप्मभिः संसृज्यते स उत्क्रामन् म्रियमाणः पाप्मनो

शान्त झाला ह्मणजे या पुरुषाची ज्योति कोणती?'' ''वाक्. वाग्रूपी ज्योतीचे योगानें बसतो, गमन करतो, काम करतो, परत येतो. राजा, ह्मणून जेव्हां स्वतःचा हात देखील स्वतःला दिसत नसतो तेव्हां सुद्धां जेथें (कोणाचा) शब्द ऐकूं येत असेल तिकडे (मनुष्य) जातो.'' ''याज्ञवल्क्या, बरोबर आहे.५. सूर्य व चंद्र अस्त पावले, अग्नि व वाणी शान्त झाली ह्मणजे या पुरुषाची ज्योति कोणती?'' ''आत्मा हीच. आत्मरूपी ज्योतीचे योगानें बसतो, गमन करतो, काम करतो, परत येतो.''६. ''आत्मा कोणता?'' ''इंद्रियांमध्यें जो हा विज्ञानमय, हृदयामध्यें [=बुद्धीमध्यें] अंतर्ज्योति (अथवा स्वप्रकाश) व पूर्ण [=सर्वव्यापी=पुरुष] आहे तो. हा (सर्व इंद्रियांशीं) समान असून दोन्ही लोकांमध्यें अनुक्रमानें संचार करतो. हाच जणूं काय ध्यान करतो, चलनक्रिया करतो. हाच स्वप्नवृत्तिरूपी होऊन या लोकाचे [=लौकिक व्यवहाराचें] अतिक्रमण करतो. (अविद्यारूपी) मृत्यूच्या रूपांचें अतिक्रमण करतो.७. हाच पुरुष (आत्मा) शरीरभाव पावून जन्मास येतो व पापरूपी गुणागुणांनीं युक्त होतो. (शरीरांतून) निघून मरण पावल

विजहाति ॥८॥ तस्य वा एतस्य पुरुषस्य द्वे एव स्थाने भवत इदं च परलोकस्थानं च संध्यं तृतीयं स्वप्नस्थानं तस्मिन्संध्ये स्थाने तिष्ठन्नेते उभे स्थाने पश्यतीदं च परलोकस्थानं च। अथ यथाक्रमोऽयं परलोकस्थाने भवति तमाक्रमाक्रम्योभयान् पाप्मन आनंदांश्च पश्यति स यत्र प्रस्वपित्यस्य लोकस्य सर्वावतो मात्रामपादाय स्वयं विहत्य स्वयं निर्माय स्वेन भासा स्वेन ज्योतिषा प्रस्वपित्यत्रायं पुरुषः स्वयंज्योतिर्भवति ॥९॥ न तत्र रथा न रथयोगा न पंथानो भवन्त्यथ रथान्रथयोगान्पथः सृजते न तत्रानंदा मुदः प्रमुदो भवन्त्यथानंदान् मुदः प्रमुदः सृजते न तत्र वेशान्ताः पुष्करिण्यः स्रवन्त्यो भवन्त्यथ वेशान्तान् पुष्करिणीः स्रवन्तीः सृजते स हि कर्ता ॥१०॥ तदेते श्लोका भवन्ति ॥ स्वप्नेन शारीरमभिप्रहत्यासुप्तः सुप्तानभिचाकशीति ॥

ह्मणजे पापरूपी गुणागुणांचा त्याग करतो.८. त्या या पुरुषाचीं दोन स्थानें आहेत—एक हा जन्म हें आणि दुसरें परलोकांतील स्थान. तिसरें जें संधिस्थान तें स्वप्नस्थान होय. त्या संधिस्थानीं उभा राहून हा इतर दोन्ही स्थानें पहातो. ज्या (ज्ञानकर्मादि) साधनांनीं हा परलोकस्थानीं गेला असेल त्या साधनांच्या आश्रयानें (स्थित होत्साता) हा पापफल व पुण्यफल अशीं दोन्ही पहातो. जेव्हां हा निद्रा घेतो तेव्हां सर्व अवयवांनीं युक्त असा हा त्यापैकीं [जागृतावस्थेपैकीं] कांहीं भाग घेऊन त्याचा [वासनादेहाचा] नाश करतो व पुन्हां स्वतः (स्वप्नदेह) निर्माण करतो आणि स्वतःच्या तेजानें, स्वतःच्या प्रकाशानें निद्रा घेतो. तेव्हां हा पुरुष स्वयंज्योति होतो.९. तेथें रथ, अश्व अथवा मार्ग असत नाहींत; पण हा रथ, अश्व व मार्ग निर्माण करतो. तेथें आनंद, (लाभनिमित्त) हर्ष अथवा प्रहर्ष असत नाहींत; पण हा आनंद, हर्ष व प्रहर्ष निर्माण करतो. तेथे विहीरी, तलाव अथवा नद्या नसतात; पण हा विहीरी, तलाव व नद्या निर्माण करतो. हाच कर्ता होय.१०. याविषयीं पुढील मंत्र आहेत—स्वप्नभावानें शरीराला निश्चेष्ट करून स्वतः असुप्त असा

शुक्रमादाय पुनरैति स्थानꣳ हिरण्मयः पुरुष एकहंसः ॥११॥ प्राणेन रक्षन्नवरं कुलायं बहिष्कुलायादमृतश्चरित्वा ॥ स ईयतेऽमृतो यत्र कामꣳ हिरण्मयः पुरुष एकहंसः ॥१२॥ स्वप्नान्त उच्चावचमीयमानो रूपाणि देवः कुरुते बहूनि ॥ उतेव स्त्रीभिः सह मोदमानो जक्षदुतेवापि भयानि पश्यन् ॥१३॥ आराममस्य पश्यन्ति न तं पश्यति कश्चनेति । तं नायतं बोधयेदित्याहुः ॥ दुर्भिषज्यꣳ हास्मै भवति यमेष न प्रतिपद्यतेऽथो खल्वाहुर्जागरितदेश एवास्यैष इति यानि ह्येव जाग्रत्पश्यति तानि सुप्त इत्यत्रायं पुरुषः स्वयंज्योतिर्भ-

(आत्मा) सुप्त अशा इंद्रियांना भासमान करतो [अभिचाकशीति]. (सर्व अवस्थांमध्यें) एकरूपानें गमन करणारा हा चैतन्यप्रकाशस्वरूप (आत्मा आपलें) शुद्ध रूप घेऊनच पुन्हां जागारितस्थानाला येतो. ११. या अशुचि [अवरं] शरीराचें [शब्दशः घरट्याचें] पांच इंद्रियवृत्तींनीं रक्षण करीत (पण) स्वतः शरीराच्या बाहेर हिंडत हा मरणधर्मरहित, प्रकाशस्वरूप, एकरूपानें गमन करणारा आत्मा वाटेल त्या ठिकाणीं जातो. १२. स्वप्नामध्यें हा प्रकाशवान् आत्मा उत्तम अथवा अधम अशा स्वरूपांप्रत गमन करीत नाना रूपें धारण करतो; स्त्रियांबरोबर रममाण होतो; खातो; अथवा भयानक प्रकार पहातो. १३. यानें निर्माण केलेल्या (या वासनारूप) क्रीडा (लोक) पहातात, पण याला कोणी पाहूं शकत नाहीं. याकरितां निजलेल्या मनुष्याला अकस्मात् [आयतं] जागें करूं नये असें ह्मणतात [कारण त्याचा आत्मा शरीराच्या बाहेर संचार करीत असणें संभवनीय असतें]. ज्या इंद्रियद्वारानें तो बाहेर गेलेला असतो त्यानें तो (लवकर) परत न आला तर तो (आत्म्यानें रहित असलेला मनुष्य) औषध देऊन जिवंत करणें कठिणच होतें. दुसरे कोणी ह्मणतात कीं, स्वप्न हें याचें जागरितस्थानच आहे, कारण जाग्रदवस्थेंत हा जें पहातो तेंच स्वप्नामध्यें पहातो (पण जाग्रदवस्थेंत हा इंद्रियांनीं युक्त असतो स्वयंज्योति नसतो). ह्मणून या स्वप्नावस्थेमध्येंच हा स्वयंप्रकाश असतो."

वति सोऽहं भगवते सहस्रं ददाम्यत ऊर्ध्वं विमोक्षाय ब्रूहीति ॥१४॥ स वा एष एतस्मिन् संप्रसादे रत्वा चरित्वा दृष्ट्वैव पुण्यं च पापं च पुनः प्रतिन्यायं प्रतियोन्याद्रवति स्वप्नायैव स यत्तत्र किंचित्पश्यत्यनन्वागतस्तेन भवत्यसंगो ह्ययं पुरुष इत्येवमेवैतद्याज्ञवल्क्य सोऽहं भगवते सहस्रं ददाम्यत ऊर्ध्वं विमोक्षायैव ब्रूहीति ॥१५॥ स वा एष एतस्मिन् स्वप्ने रत्वा चरित्वा दृष्ट्वैव पुण्यं च पापं च पुनः प्रतिन्यायं प्रतियोन्याद्रवति बुद्धान्तायैव स यत्तत्र किंचित्पश्यत्यनन्वागतस्तेन भवत्यसंगो ह्ययं पुरुष इत्येवमेवैतद्याज्ञवल्क्य सोऽहं भगवते सहस्रं ददाम्यत ऊर्ध्वं विमोक्षायैव ब्रूहीति ॥१६॥ स वा एष एतस्मिन्बुद्धान्ते रत्वा चरित्वा दृष्ट्वैव पुण्यं च पापं च पुनः प्रतिन्यायं प्रतियोन्याद्रवति स्वप्नान्तायैव ॥१७॥ तद्यथा महामत्स्य उभे कूले

जनक— "(याप्रमाणें तुझ्याकडून ज्ञान प्राप्त झालेला) मी तुला सहस्र गाई देतों. आतां संसारांतून मुक्त होण्याचा उपाय सांग."१४. "तो हा (स्वयंप्रकाश आत्मा) या (स्वप्नरूपी) प्रसन्न अवस्थेमध्यें रममाण होऊन व संचार करून केवळ पापपुण्याचीं फळें पहात, आलेल्या मार्गानें पुन्हां आपल्या स्वप्नस्थानांप्रत परत येतो. हा तेथें जें जें पहातो त्याच्याशीं संबद्ध होत नाहीं. कारण हा हृदयस्थ आत्मा संगरहित आहे." "याज्ञवल्क्या, बरोबर आहे. मी तुला हजार गाई देतों. आतां संसारांतून मुक्त होण्याचा उपाय सांग." १५. "तो हा आत्मा या स्वप्नामध्यें रममाण होऊन व संचार करून केवळ पापपुण्याचीं फळे पहात, आलेल्या मार्गानें पुन्हां जागरितस्थानांत परत येतो. हा तेथें जें जें पहातो त्याच्याशीं संबद्ध होत नाहीं, कारण हा संगरहित आहे." "याज्ञवल्क्या, बरोबर आहे. मी तुला (आणखी) हजार गाई देतों. आतां संसारांतून मुक्त होण्याचा उपाय सांग."१६. "तो हा आत्मा या जागरितावस्थेमध्यें रममाण होऊन व संचार करून केवळ पापपुण्याचीं फळें पहात, आलेल्या मार्गानें पुन्हां स्वप्न-

अनुसंचरति पूर्वं चापरं चैवमेवायं पुरुष एतावुभावन्तावनुसंचरति स्वप्नान्तं च बुद्धान्तं च ॥१८॥ तद्यथास्मिन्नाकाशे श्येनो वा सुपर्णो वा विपरिपत्य श्रान्तः संहत्य पक्षौ संलयायैव ध्रियत एवमेवायं पुरुष एतस्मा अन्ताय धावति यत्र सुप्तो न कंचन कामं कामयते न कंचन स्वप्नं पश्यति ॥१९॥ ता वा अस्यैता हिता नाम नाड्यो यथा केशः सहस्रधा भिन्नस्तावताणिम्ना तिष्ठन्ति शुक्लस्य नीलस्य पिंगलस्य हारितस्य लोहितस्य पूर्णा अथ यत्रैनं घ्नन्तीव जिनन्तीव हस्तीव विच्छाययति गर्तमिव पतति यदेव जाग्रद्भयं पश्यति तदत्राविद्यया मन्यतेऽथ यत्र देव इव राजेवाहमेवेदꣳ सर्वोऽस्मीति मन्यते सोऽस्य परमो लोकः ॥२०॥ तद्वा अस्यैतदतिच्छन्दा अपहतपा-

स्थानांतच परत येतो.१७. ज्याप्रमाणें मोठा मासा (नदीच्या) दोन्ही तीरांपर्यंत संचार करतो, त्याप्रमाणें हा आत्मा स्वप्न व जागर या दोहोंच्या तीरांपर्यंत संचार करतो.१८. ज्याप्रमाणें श्येन पक्षी अथवा गरुडपक्षी आकाशांत पुष्कळ उडून दमला ह्मणजे पंख मिटून आपल्या घरट्याकडेच येतो त्याप्रमाणें हा पुरुष आपल्या त्या शेवटच्या (सुषुप्त) स्थानाप्रत [ह्मणजे आत्मस्वरूपाप्रत] परत येतो. या ठिकाणीं त्याला कोणतीहि इच्छा रहात नाहीं आणि त्याला कोणतेंहि स्वप्न दिसत नाहीं.१९. एका केंसाचे सहस्र भाग केले असतां ते जितके सूक्ष्म होतील तितक्या सूक्ष्मतेनें या पुरुषाच्या 'हिता' नामक नाडी आहेत. त्या नील, पिंगल, हिरवा व तांबडा या रंगांनीं पूर्ण आहेत. मला (कोणी तस्करादिक) मारतील, वश करतील, हत्ती ज्याप्रमाणें सर्वांना दूर पळवितो त्याप्रमाणें दूर पळवितील, मी गर्तेमध्यें जणूं काय पडत आहें, इत्यादि जें भय जाग्रदवस्थेमध्यें पहातो, तें सर्व अविद्येच्या योगानें होय. देवाप्रमाणें अथवा राजाप्रमाणें हें सर्व मीच आहें असें जेव्हां त्याला वाटल तेव्हां त्याला परम लोक प्राप्त झाला असें समजावें.२०. इच्छांच्या पलीकडे गेलेलें [अतिच्छंदं], (धर्म व अधर्म-

प्माभयं रूपम् । तद्यथा प्रियया स्त्रिया संपरिष्वक्तो न बाह्यं किंचन वेद नान्तरमेवमेवायं पुरुषः प्राज्ञेनात्मना संपरिष्वक्तो न बाह्यं किंचन वेद नान्तरं तद्वा अस्यैतदाप्तकाममात्मकाममकामं रूपꣳ शोकान्तरम् ॥२१॥ अत्र पिताऽपिता भवति माताऽमाता लोका अलोका देवा अदेवा वेदा अवेदाः । अत्र स्तेनोऽस्तेनो भवति भ्रूणहाऽभ्रूणहा चांडालोऽचांडालः पौल्कसोऽपौल्कसः श्रमणोऽश्रमणस्तापसोऽतापसोऽनन्वागतं पुण्येनानन्वागतं पापेन तीर्णो हि तदा सर्वाञ्छोकान्हृदयस्य भवति ॥२२॥ यद्वै तन्न पश्यति पश्यन्वै तन्न पश्यति न हि द्रष्टुर्दृष्टेर्विपरिलोपो विद्यतेऽविनाशित्वात् । न तु तद्द्वितीयमस्ति ततोऽन्यद्विभक्तं यत्पश्येत् ॥२३॥ यद्वै तन्न जिघ्रति जिघ्रन्वै तन्न जिघ्रति

रूपी) पापांनीं वर्जित आणि भयरहित असें हें [=सर्वात्मभाव] या पुरुषाचें रूप होय. स्वाभाविक अशा या आत्म्याशीं एकरूप झाला ह्मणजे हा बाह्य अथवा आन्तर कांहीं जाणत नाहीं. या आत्म्याचें हेंच रूप आप्तकाम [=सर्व कामांनीं युक्त], आत्मकाम [आत्मा हेच ज्याचे काम आहेत असें], कामरहित आणि शोकरहित असे आहे. २१. या (शेवटच्या सुषुप्त) स्थानामध्यें पिता अपिता होतो, माता अमाता होते, (भू आदि) लोक अलोक होतात, देव अदेव होतात, वेद अवेद होतात, स्तेन अस्तेन होतो, भ्रूणहा [ब्राह्मणाचें द्रव्य हरण करणारा] अभ्रूणहा होतो, चांडाल अचांडाल होतो, पौल्कस [शूद्र पिता व क्षत्रिय माता यांचें अपत्य] अपौल्कस होतो, श्रमण [संन्यासी] अश्रमण होतो, तापस [वानप्रस्थाश्रमी] अतापस होतो, पुण्य आणि पाप यांशीं संबंधरहित होतो आणि हृदयस्थ सर्व शोक तरून जातो. २२. (सुषुप्त स्थानामध्यें) तो जें पहात नाहीं तें (वास्तविक) पहात असून पहात नाहीं; कारण द्रष्ट्याच्या दृष्टीचा कांहीं लोप झालेला नसतो; त्या दृष्टीचा विनाश झालेला नसतो. त्याला पहातां येईल असे पण त्याच्याहून निराळें असें दुसरें कांहीं नसतें. २३. तो ज्याचा वास घेत नाहीं

न हि घ्रातुर्घ्रातेर्विपरिलोपो विद्यतेऽविनाशित्वान्न तु तद्द्वितीयमस्ति ततोऽन्यद्विभक्तं यज्जिघ्रेत् ॥२४॥ यद्वै तन्न रसयते रसयन्वै तन्न रसयते न हि रसयितू रसयतेर्विपरिलोपो विद्यतेऽविनाशित्वान्न तु तद्द्वितीयमस्ति ततोऽन्यद्विभक्तं यद्रसयेत् ॥२५॥ यद्वै तन्न वदति वदन्वै तन्न वदति न हि वक्तुर्वक्तेर्विपरिलोपो विद्यतेऽविनाशित्वान्न तु तद्द्वितीयमस्ति ततोऽन्यद्विभक्तं यद्वदेत् ॥२६॥ यद्वै तन्न शृणोति शृण्वन्वै तन्न शृणोति न हि श्रोतुः श्रुतेर्विपरिलोपो विद्यतेऽविनाशित्वान्न तु तद्द्वितीयमस्ति ततोऽन्यद्विभक्तं यच्छृणुयात् ॥२७॥ यद्वै तन्न मनुते मन्वानो वै तन्न मनुते न हि मन्तुर्मतेर्विपरिलोपो विद्यतेऽविनाशित्वान्न तु तद्द्वितीयमस्ति ततोऽन्यद्विभक्तं यन्मन्वीत ॥२८॥

त्यचा (वास्ताविक) वास घेत असून वास घेत नाहीं; कारण घ्रात्याच्या घ्रातृत्वाचा कांहीं लोप झालेला नसतो; घ्रातृत्वाचा विनाश झालेला नसतो. त्याला वास घेतां येईल असें पण त्याच्याहून निराळें असें दुसरें कांहीं नसते.२४. तो ज्याची चव घेत नाही त्याची (वास्तविक) चव घेत असून चव घेत नाहीं; कारण त्याच्या रसनत्वाचा कांहीं लोप झालेला नसतो; रसनत्वाचा विनाश झालेला नसतो. त्याला चव घेतां येईल असें पण त्याच्याहून निराळें असें दुसरें कांहीं नसतें.२५. तो जें बोलत नाहीं तें (वास्तविक) बोलत असून बोलत नाहीं; कारण त्याच्या वक्तृत्वाचा कांहीं लोप झालेला नसतो; वक्तृत्वाचा विनाश झालेला नसतो. त्याला बोलतां येईल असें पण त्याच्याहून निराळें असें दुसरें कांहीं नसतें.२६. तो जें ऐकत नाहीं तें (वास्तविक) ऐकत असून ऐकत नाहीं; कारण त्याच्या श्रुतीचा कांहीं लोप झालेला नसतो; श्रुतीचा विनाश झालेला नसतो. त्याला ऐकतां येईल असें पण त्याच्याहून निराळें असें दुसरें कांहीं नसतें.२७. तो जें मनन करीत नाहीं तें (वास्तविक) मनन करीत असून मनन करीत नाहीं; कारण त्याच्या मतीचा कांहीं लोप ·झालेला

यद्वै तन्न स्पृशति स्पृशन्वै तन्न स्पृशति न हि स्प्रष्टुः स्पृष्टेर्विपरिलोपो विद्यतेऽविनाशित्वान्न तु तद्द्वितीयमस्ति ततोऽन्यद्विभक्तं यत्स्पृशेत् ॥२९॥ यद्वै तन्न विजानाति विजानन्वै तन्न विजानाति न हि विज्ञातुर्विज्ञातेर्विपरिलोपो विद्यतेऽविनाशित्वान्न तु तद्द्वितीयमस्ति ततोऽन्यद्विभक्तं यद्विजानीयात् ॥३०॥ यत्र वा अन्यदिव स्यात्तत्रान्योऽन्यत्पश्येदन्योऽन्यज्जिघ्रेदन्योऽन्यद्रसयेदन्योऽन्यद्वदेदन्योऽन्यच्छृणुयादन्योऽन्यन्मन्वीतान्योऽन्यत्स्पृशेदन्योऽन्यद्विजानीयात् ॥३१॥ सलिल एको द्रष्टाऽद्वैतो भवत्येष ब्रह्मलोकः सम्राडिति हैनमनुशशास याज्ञवल्क्य एषास्य परमा गतिरेषास्य परमा संपदेषोऽस्य परमो लोक एषोऽस्य परम आनंद एतस्यैवानंदस्यान्यानि भूतानि मात्रामुपजी-

नसतो; मताचा विनाश झालेला नसतो. त्याला मनन करतां येईल असें पण त्याच्याहून निराळें असें दुसरें कांहीं नसतें.२८. तो ज्याला स्पर्श करीत नाहीं त्याला (वास्तविक) स्पर्श करीत असून स्पर्श करीत नाहीं; कारण त्याच्या स्पर्शत्वाचा कांहीं लोप झालेला नसतो; स्पर्शत्वाचा विनाश झालेला नसतो. त्याला ज्याला स्पर्श करतां येईल असें पण त्याच्याहून निराळें असें दुसरें कांहीं नसतें.२९. तो जें जाणीत नाहीं तें (वास्तविक) जाणीत असून जाणीत नाहीं; कारण त्याच्या विज्ञातृत्वाचा कांहीं लोप झालेला नसतो; विज्ञातृत्वाचा विनाश झालेला नसतो. त्याला जाणतां येईल असें पण त्याच्याहून निराळें असें दुसरें कांहीं नसतें.३०. जर (एक दुसऱ्याहून) निराळें असेल तर एक दुसऱ्याला पाहील, वास घेईल, चव घेईल, भाषण करील, ऐकेल, मनन करील, स्पर्श करील, जाणील.३१. उदकाप्रमाणें निर्मळ आणि एक [अविद्यारूपी द्वितीयानें रहित] असा (हा) द्रष्टा (याहून वेगळें असें द्रष्टव्य नसल्यामुळें) द्वैतरहित होतो. राजा, (हें अद्वैताचें ज्ञान) हाच ब्रह्मलोक होय.'' याप्रमाणें याज्ञवल्क्यानें राजाला ज्ञान सांगितलें. ''ही याची परम गति होय, ही परम संपत् होय, हा परम लोक होय, हा परम आनंद

वन्ति ॥३२॥ स यो मनुष्याणां राद्धः समृद्धो भवत्यन्येषामधिपतिः सर्वैर्मानुष्यकैर्भोगैः संपन्नतमः स मनुष्याणां परम आनंदोऽथ ये शतं मनुष्याणामानंदाः स एकः पितॄणां जितलोकानामानंदोऽथ ये शतं पितॄणां जितलोकानामानंदाः स एको गंधर्वलोक आनंदोऽथ ये शतं गंधर्वलोक आनंदाः स एकः कर्मदेवानामानंदो ये कर्मणा देवत्वमभिसंपद्यन्तेऽथ ये शतं कर्मदेवानामानंदाः स एक आजानदेवानामानंदो यश्च श्रोत्रियोऽवृजिनोऽकामहतोऽथ ये शतमाजानदेवानामानंदाः स एकः प्रजापतिलोक आनंदो यश्च श्रोत्रियोऽवृजिनोऽकामहतोऽथ ये शतं प्रजापतिलोक आनंदाः स एको ब्रह्मलोक आनंदो यश्च श्रोत्रियोऽवृजिनोऽकामहतोऽथैष एव परम आनंद एष ब्रह्मलोकः सम्राडिति होवाच

होय. या आनंदाच्या (केवळ) अंशाचाच उपभोग प्राण्यांना (इतर आनंदांपासून) मिळतो. ३२. मनुष्यांमध्यें जो कोणी सर्व अवयवांनीं युक्त, समृद्ध, इतरांचा अधिपति आणि सर्व मानुष उपभोगांनीं अत्यंत संपन्न असतो त्याला होणारा आनंद हा मनुष्यांचा परम आनंद होय. या आनंदाच्या शंभरपट आनद ह्मणजे (आपल्या कर्मांनीं) लोक प्राप्त करून घेतलेल्या पितरांचा एक आनंद होय. या आनंदाच्या शंभरपट आनंद ह्मणजे गंधर्वलोकींचा एक आनंद होय. या आनंदाच्या शंभरपट आनंद ह्मणजे कर्मानें देवत्व पावलेल्या कर्मदेवाचा एक आनंद होय. या आनंदाच्या शंभरपट आनंद ह्मणजे जन्मतः देव असलेल्या देवांचा एक आनंद होय. निष्पाप व निरिच्छ अशा श्रोत्रियाला असा आनंद होतो. या आनंदाच्या शंभरपट आनंद ह्मणजे प्रजापतीच्या लोकींचा एक आनंद होय. निष्काम व निरिच्छ श्रोत्रियाला असा आनंद होतो. या आनंदाच्या शंभरपट आनंद ह्मणजे ब्रह्मलोकींचा एक आनंद होय. निष्काम व निरिच्छ श्रोत्रियाला असा आनंद होतो. हाच परम आनंद होय; राजा, हाच ब्रह्मलोक [हा आनंद ह्मणजेच ब्रह्मलोकाची प्राप्ति] होय." याप्रमाणें याज्ञवल्क्यानें सांगि-

याज्ञवल्क्यः सोऽहं भगवते सहस्रं ददाम्यत ऊर्ध्वं विमोक्षायैव ब्रूही-
त्यत्र ह याज्ञवल्क्यो बिभयांचकार मेधावी राजा सर्वेभ्यो मांतेभ्य
उदरौत्सीदिति ॥३३॥ स वा एष एतस्मिन्स्वप्नान्ते रत्वा चरित्वा
दृष्ट्वैव पुण्यं च पापं च पुनः प्रतिन्यायं प्रतियोन्याद्रवति बुद्धान्तायैव
॥३४॥ तद्यथानः सुसमाहितमुत्सर्जद्यायादेवमेवायर्ँ शारीर आत्मा
प्राज्ञेनात्मनान्वारूढ उत्सर्जन्याति यत्रैतदूर्ध्वोच्छ्वासी भवति ॥३५॥
स यत्रायमणिमानं न्येति जरया वोपतपता वाणिमानं निगच्छति तद्य-
थाम्रं वोदुंबरं वा पिप्पलं वा बंधनात्प्रमुच्यत एवमेवायं पुरुष
एभ्योंऽगेभ्यः संप्रमुच्य पुनः प्रतिन्यायं प्रतियोन्याद्रवति प्राणायैव
॥३६॥ तद्यथा राजानमायान्तमुग्राः प्रत्येनसः सूतग्रामण्योऽन्नैः

तलें. राजा ह्मणाला, "मी आपणांला एक हजार गाई देतो. आतां या-पुढे संसारांतून मुक्त होण्याचा उपाय सांगा." आतां मात्र, सर्व प्रश्न हे आपल्या कामप्रश्नाचे भाग आहेत असें दाखवून हा बुद्धिमान् राजा आप-णांला सर्व निर्णयामध्यें अडवीत आहे असें जाणून याज्ञवल्क्याला भीति वाटली. ३३. "हा आत्मा या स्वप्नामध्यें रममाण होऊन व संचार करून आणि पुण्य व पाप हीं पाहून ज्याप्रमाणे आलेल्या रीतीनें व आलेल्या मार्गानें जागृतीप्रत परत येतो, त्याप्रमाणे हा देखील शरीरस्थ आत्मा –अतिशय सामा-नानें भरलेला गाडा आवाज करीत चालतो तद्वत्– परम आत्म्यानें अधिष्ठित [=प्रकाशित] होत्साता जेव्हां श्वास वरवर येत जातो तेव्हां [=मरणकालीं] आवाज करीत (देहांतून) जातो. ३४. ३५. ज्याप्रमाणे आम्र अथवा उंबर अथवा पिंपळ वृक्ष (आपल्या) देठाला कारण अशा रसापासून तुटून पडतो त्याप्रमाणें, जेव्हां हा (हस्तमस्तकादियुक्त) पिंड जरेनें अथवा ज्वरादिकांनीं कृश होतो तेव्हां या इंद्रियांपासून सुटून आलेल्या रीतीनें व आलेल्या मार्गानें पुन्हां दुसरा प्राण धारण करण्याकरितां परत जातो. ३६. ज्याप्रमाणें उग्र जातीचे लोक [बहुधा महार अथवा रामोशी], शिपाई, खटारेवाले आणि

पानैरावसथैः प्रतिकल्पन्तेऽयमायात्ययमागच्छतीत्येव४ँ हैवंविद४ँ सर्वाणि भूतानि प्रतिकल्पन्त इदं ब्रह्मायातीदमागच्छतीति ॥३७॥ तद्यथा राजानं प्रयियासन्तमुग्राः प्रत्येनसः सूतग्रामण्योऽभिसमायन्त्येवमेवेममात्मानमन्तकाले सर्वे प्राणा अभिसमायन्ति यत्रैतदूर्ध्वोच्छ्वासी भवति ॥३८॥ इति तृतीयं ब्राह्मणम् ॥३॥

स यत्रायमात्माऽबल्यं न्येत्य संमोहमिव न्येत्यथैनमेते प्राणा अभिसमायन्ति स एतास्तेजोमात्राः समभ्याददानो हृदयमेवान्ववक्रामति स यत्रैष चाक्षुषः पुरुषः पराङ् पर्यावर्ततेऽथारूपज्ञो भवति॥१॥ एकीभवति न पश्यतीत्याहुरेकीभवति न जिघ्रतीत्याहुरेकीभवति न रसयत इत्याहुरेकीभवति न वदतीत्याहुरेकीभवति न शृणोतीत्याहुरेकीभवति न मनुत इत्याहुरेकीभवति न स्पृशतीत्याहुरेकीभवति न

पाटील, राजा येत आहे असें पाहून त्याच्याकरितां पाण्याची, घराची वगैरे व्यवस्था करतात त्याप्रमाणें 'हें ब्रह्म येत आहे' असें ह्मणून सर्व इंद्रियें आपल्या कर्मांच्या भोक्त्याची [=आत्म्याची] मार्गप्रतीक्षा (व तरतूद) करतात.३७. ज्याप्रमाणें राजा जाऊं लागला असतां उग्र, शिपाई, रथवाले आणि पाटील त्याच्या पुढें चालूं लागतात त्याप्रमाणें अंतकाळीं जेव्हां श्वास वरवर जाऊं लागतो तेव्हां सर्व इंद्रियें आत्म्याच्या पुढें चालूं लागतात.३८.

हा आत्मा जेव्हां (देह बलरहित झाल्यामुळें) बलरहित होऊन संमूढ होतो तेव्हां हीं (वागादि) इंद्रियें त्याच्या पुढें चालूं लागतात. हा आत्मा हे तेजाचे अवयव [इंद्रियें] एकत्र करून हृदयाचे ठिकाणीं येतो. चाक्षुष पुरुष परत (आदित्याप्रत) जातो, तेव्हां [मरणकाळीं] हा पिंड रूपज्ञ असत नाहीं.१. सर्व इंद्रियसमुदाय आत्म्याशीं एकरूप होतो. 'याला दिसत नाहीं' असें इतर जन ह्मणतात. याला वास येत नाहीं, चव येत नाहीं, बोलतां येत नाहीं, ऐकतां येत नाहीं, मनन करतां येत नाहीं, स्पर्श करतां येत नाहीं, जाणतां

विजानातीत्याहुस्तस्य हैतस्य हृदयस्याग्रं प्रद्योतते तेन प्रद्योतेनैष आत्मा निष्क्रामति चक्षुष्टो वा मूर्ध्नो वाऽन्येभ्यो वा शरीरदेशेभ्यस्तमुत्क्रामन्तं प्राणोऽनूत्क्रामति प्राणमनूत्क्रामन्तं सर्वे प्राणा अनूत्क्रामन्ति सविज्ञानो भवति सविज्ञानमेवान्ववक्रामति । तं विद्याकर्मणी समन्वारभेते पूर्वप्रज्ञा च ॥२॥ तद्यथा तृणजलायुका तृणस्यान्तं गत्वाऽन्यमाक्रममाक्रम्यात्मानमुपसंहरत्येवमेवायमात्मेदꣳ शरीरं निहत्याविद्यां गमयित्वाऽन्यमाक्रममाक्रम्यात्मानमुपसंहरति ॥३॥ तद्यथा पेशस्कारी पेशसो मात्रामपादायान्यन्नवतरं कल्याणतरꣳ रूपं तनुत एवमेवायमात्मेदꣳ शरीरं निहत्याविद्यां गमयित्वान्यन्नवतरं कल्याणतरं रूपं कुरुते

येत नाहीं, असें ह्मणतात. याच्या हृदयाचा अग्रभाग [निर्गमद्वार] प्रकाशित होतो, त्यामधून हा आत्मा बाहेर पडतो, व चक्षु अथवा मस्तक अथवा इतर अवयवांमधून निघून जातो. तो निघून गेल्यावर प्राण निघून जातो, प्राणानंतर सर्व इंद्रियें निघून जातात. तेव्हां हा आत्मा विशिष्ट ज्ञानानें युक्त असतो (पण स्वतंत्र मात्र नसतो). (वासनादि) विशिष्ट ज्ञानासह तो जातो. ज्ञान, कर्म आणि पूर्वीं अनुभविलेली वासना हीं त्याच्या मागोमाग जातात. २. ज्याप्रमाणें तृणावरची जळू तृणाच्या अग्रापर्यंत जाऊन दुसऱ्या (तृणावरील) मार्गाचा आश्रय केल्यावर आपल्या इंद्रियांचा उपसंहार करते [=दुसऱ्या तृणाग्रावर आपले हात ठेवल्यावर मागचे पाय आंखडून पहिल्या तृणाचा त्याग करते व अशा रीतीनें जणूं काय आपला आत्मा कायम ठेवून एका तृणरूपी शरीराचा त्याग करून दुसऱ्या तृणरूपी शरीराचा आश्रय करते] त्याप्रमाणें हा आत्मा या शरीराचा व अविद्येचा नाश करून दुसऱ्या मार्गाचा अवलंब करतो व आपल्या इंद्रियादिकांचा उपसंहार करतो. ३. ज्याप्रमाणें सुवर्णकार सुवर्णाचा भाग घेऊन त्याचें दुसरें नवीन सुंदर रूप तयार करतो त्याप्रमाणें हा आत्मा या शरीराचा व अविद्येचा नाश करून दुसरें नवीन

पित्र्यं वा गांधर्वं वा दैवं वा प्राजापत्यं वा ब्राह्मं वान्येषां वा भूतानाम् ॥४॥ स वा अयमात्मा ब्रह्म विज्ञानमयो मनोमयः प्राणमयश्चक्षुर्मयः श्रोत्रमयः पृथिवीमय आपोमयो वायुमय आकाशमयस्तेजोमयोऽतेजोमयः काममयोऽकाममयः क्रोधमयोऽक्रोधमयो धर्ममयोऽधर्ममयः सर्वमयस्तद्यदेतदिदंमयोऽदोमय इति यथाकारी यथाचारी तथा भवति साधुकारी साधुर्भवति पापकारी पापो भवति पुण्यः पुण्येन कर्मणा भवति पापः पापेन ॥ अथो खल्वाहुः काममय एवायं पुरुष इति स यथाकामो भवति तत्क्रतुर्भवति यत्क्रतुर्भवति तत्कर्म कुरुते यत्कर्म कुरुते तदभिसंपद्यते ॥५॥ तदेष श्लोको भवति॥ तदेव सक्तः सह कर्मणैति लिंगं मनो यत्र निषक्तमस्य ॥ प्राप्यांतं कर्मणस्तस्य यत्किंचेह करोत्ययम् ॥ तस्माल्लोकात्पुनरैत्यस्मै लोकाय कर्मण इति नु कामयमानोऽ-

सुंदर पितराचें अथवा गंधर्वांचें अथवा देवांचें अथवा प्रजापतीचें अथवा ब्रह्मदेवाचें अथवा इतर भूतांचें रूप तयार करतो.४. तो हा आत्मा ब्रह्म होय. हा विज्ञानमय, मनोमय, प्राणमय, चक्षुर्मय, श्रोत्रमय, पृथिवीमय, आपोमय, वायुमय, आकाशमय, तेजोमय, अतेजोमय, काममय, अकाममय, क्रोधमय, अक्रोधमय, धर्ममय, अधर्ममय, सर्वमय, प्रत्यक्षमय, परोक्षमय असा आहे. तो जें पुण्यकर्म करील अथवा जें पापकर्म करील तसा होतो. पुण्यकर्म करणारा पुण्यवान् होतो, पापकर्म करणारा पापी होतो. ह्मणूनच "हा पुरुष काममय आहे" असें ह्मणतात. त्याला जशी इच्छा होईल तसा निश्चय [क्रतु] करतो, जसा निश्चय करतो तसें कर्म करतो, जसें कर्म करतो तसें फळ मिळतें.५. याविषयीं पुढील श्लोक आहे— (आसक्ति जाणण्याचें) साधन जें मन तें ज्या ठिकाणीं आसक्त झालें असेल त्या ठिकाणीं आसक्त होत्साता (तदनुरूप) कर्मांबरोबर [=कर्म करून] तेथेंच जातो [=तेंच फळ पावतो]. हा (प्राणी) या लोकीं जें कांहीं कर्म करतो त्याचें सर्व फल भोगल्यानंतर त्या लोकाहून परत या लोकीं (पुन्हां)

थाकामयमानो योऽकामो निष्काम आप्तकाम आत्मकामो न तस्य प्राणा उत्क्रामन्ति ब्रह्मैव सन्ब्रह्माप्येति ॥६॥ तदेष श्लोको भवति ॥ यदा सर्वे प्रमुच्यन्ते कामा येऽस्य हृदि श्रिताः। अथ मर्त्योऽमृतो भवत्यत्र ब्रह्म समश्नुत इति ॥ यद्यथाऽहिनिर्ल्वयनी वल्मीके मृता प्रत्यस्ता शयीतैवमेवेदँ शरीरँ शेतेऽथायमशरीरोऽमृतः प्राणो ब्रह्मैव तेज एव सोऽहं भगवते सहस्रं ददामीति होवाच जनको वैदेहः ॥७॥ तदेते श्लोका भवन्ति ॥ अणुः पंथा विततः पुराणो माँ स्पृष्टोऽनुवित्तो मयैव। तेन धीरा अपियन्ति ब्रह्मविदः स्वर्गं लोकमित ऊर्ध्वं विमुक्ताः ॥८॥ तस्मिञ्छुक्लमुत नीलमाहुः पिंगलं हरितं लोहितं च ॥ एष पंथा ब्रह्मणा हानुवित्तस्तेनैति ब्रह्मवित्पुण्यकृत्तैजसश्च ॥९॥

कर्म करण्याकरितां येतो. याप्रमाणें इच्छा करणारांची गति असते. आता जे इच्छारहित असतात त्यांची सांगतात— ज्याला इच्छा नाहींत, ज्याच्या इच्छा निघून गेल्या आहेत, ज्याच्या इच्छा पूर्ण झाल्या आहेत, आत्म्याचेच ठिकाणीं ज्याच्या इच्छा आहेत, त्याचे प्राण उत्क्रमण पावत नाहींत, तो ब्रह्मरूप होत्साता ब्रह्माप्रतच जातो.६. याविषयीं पुढील श्लोक आहे— हृदयामध्यें असलेल्या सर्व इच्छा जेव्हां नाहींशा होतात, तेव्हां मनुष्य मृत्युरहित होतो व ब्रह्म पावतो. ज्याप्रमाणें वारुळामध्यें सापानें टाकलेली कात असते त्याप्रमाणें हें शरीर (जीव गेला असतां) होतें. शरीराहून भिन्न व मृत्युरहित जो प्राण तो ब्रह्म होय, तो तेज होय." जनक ह्मणाला, "हे भगवन्, मी आपणांला सहस्र गाई देतों."७. "याविषयीं पुढील श्लोक आहेत— हा मार्ग सूक्ष्म असून विस्तृत आहे. हा प्राचीन आहे. हा मला प्राप्त झाला आहे. मी याच्या अंतापर्यंत गेलों आहें. ब्रह्मज्ञानी मनुष्य या शरीराच्या पतनानंतर मुक्त होत्साते याच मार्गानें स्वर्ग लोकाप्रत जातात.८. शुक्ल, नील, पिंगल, हरित व लोहित असे (इतर) मार्ग देखील मोक्षसाधनमार्गच होत असें कोणी ह्मणतात. पण तसें नव्हे. हाच एक मार्ग ब्रह्मानें पूर्ण आहे.

अंधं तमः प्रविशन्ति येऽविद्यामुपासते ॥ ततो भूय इव ते तमो य उ विद्यायां रताः ॥१०॥ अनंदा नाम ते लोका अंधेन तमसावृताः ॥ तांस्ते प्रेत्याभिगच्छन्त्यविद्वांसोऽबुधो जनाः ॥११॥ आत्मानं चेद्विजानीयादयमस्मीति पूरुषः । किमिच्छन्कस्य कामाय शरीरमनुसंज्वरेत् ॥१२॥ यस्यानुवित्तः प्रतिबुद्ध आत्माऽस्मिन्संदेह्ये गहने प्रविष्टः ॥ स विश्वकृत्स हि सर्वस्य कर्ता तस्य लोकः स उ लोक एव ॥१३॥ इहैव सन्तोऽथ विद्मस्तद्वयं न चेदवेदिर्महती विनष्टिः ॥ ये तद्विदुरमृतास्ते भवन्त्यथेतरे दुःखमेवापियन्ति ॥१४॥ यदैतमनुपश्यत्यात्मानं देवमंजसा ॥ ईशानं भूतभव्यस्य न ततो विजुगुप्सते ॥१५॥

ब्रह्मज्ञ, पुण्यकर्मी व तेजानें युक्त असा मनुष्य याच (एका) मार्गानें (ब्रह्माप्रत) जातो.९. (ज्ञानरहित होत्साते) जे केवळ कर्माचें अनुष्ठान करतात ते घोर अंधकारामध्यें प्रवेश करतात. जे केवळ ज्ञानामध्यें रत होऊन कर्मांचा त्याग करतात, ते त्यापेक्षांहि घोर अशा अंधकारामध्यें प्रवेश करतात.१०. जे अविद्वान् व अज्ञानी लोक असतात ते देहाचा त्याग केल्यानंतर अज्ञानरूपी अंधकारानें आच्छादिलेले जे सुखरहित लोक त्या लोकीं गमन करतात.११. 'हा मी आहें' असें जर मनुष्याला आत्म्याविषयीं ज्ञान होईल तर मग तो कशाकरितां शरीराच्या दुःखानें दुःखी होईल? १२. ('मी ब्रह्म आहें' अशा प्रकारें) ज्याला या संदेहरूपी गहन अरण्यामध्यें प्रविष्ट झालेल्या आत्म्याची उपलब्धि व ज्ञान झालें असेल तो विश्वकर्ताच होय, तो सर्वांचा कर्ता; सर्व त्याचाच आत्मा होय; तो सर्वांचा आत्मा होय.१३. तें हें ब्रह्म आह्मी येथेंच [इहलोकीं] जाणतों. आह्मीं जर हें जाणलें नसते तर मोठा नाश झाला असता. हें जे जाणतात ते मृत्युरहित होतात; न जाणणारे दुःखाप्रतच जातात.१४. (आपला) प्रकाशमान् आत्मा भूत व भविष्य यांचा स्वामी आहे असें (अनुभवपूर्वक ज्ञानानें) जेव्हां साक्षात् जाणील तेव्हां तो त्यापासून स्वतःला (वेगळा समजून) लप-

यस्मादर्वाक्संवत्सरोऽहोभिः परिवर्तते ॥ तद्देवा ज्योतिषां ज्योतिरायु-
र्होपासतेऽमृतम् ॥१६॥ यस्मिन्पंच पंचजना आकाशश्च प्रतिष्ठितः ॥
तमेव मन्य आत्मानं विद्वान्ब्रह्मामृतोऽमृतम् ॥१७॥ प्राणस्य
प्राणमुत चक्षुषश्चक्षुरुत श्रोत्रस्य श्रोत्रं मनसो ये मनो विदुः ॥ ते
निचिक्युर्ब्रह्म पुराणमग्र्यम् ॥१८॥ मनसैवानुद्रष्टव्यं नेह नानास्ति
किंचन ॥ मृत्योः स मृत्युमाप्नोति य इह नानेव पश्यति ॥१९॥
एकधैवानुद्रष्टव्यमेतदप्रमयं ध्रुवम् ॥ विरजः पर आकाशादज आत्मा
महान्ध्रुवः ॥२०॥ तमेव धीरो विज्ञाय प्रज्ञां कुर्वीत ब्राह्मणः ॥
नानुध्यायाद्बहूञ्छब्दान्वाचो विग्लापनꣳ हि तदिति ॥२१॥ स वा

विण्याची इच्छा करणार नाहीं.१५. संवत्सररूपी कालात्मा ज्याच्या तत्रानें परिवर्तन करतो असा जो (आदित्यादि सर्व) ज्योतींहून श्रेष्ठ ज्योतीरूप मृत्यु-रहित आत्मा त्याची देव उपासना करतात.१६. (गंधर्व, पितर, देव असुर व राक्षस असे) पांच जन आणि आकाश हीं ज्याच्यामध्यें स्थित आहेत तो आत्मा मीच आहे हें मी जाणतों. हें मृत्युरहित ब्रह्म मी जाणतों ह्मणून मी मृत्युरहितच आहें.१७. प्राणाचा प्राण, चक्षूचा चक्षु, श्रोत्राचें श्रोत्र आणि मनाचें मन हें (स्वतःचा) आत्माच होय असे जे जाणतात त्यांना चिरंतन व प्राचीन अशा ब्रह्माचे पूर्णत्वानें ज्ञान झालें असे समजावे.१८. येथें नाना प्रकारचें अगे कांहीहि नाहीं असें मनानेंच अनुभवपूर्वक जाणलें पाहिजे. या लोकीं नाना प्रकार आहेत असें जो पहातो त्याला मृत्यूनंतर मृत्यु अशी (संसाराची) परंपरा प्राप्त होते.१९. हें अप्रमेय व शाश्वत ब्रह्म (सर्वत्र) एकरूपानेंच आहे असें अनुभवपूर्वक जाणलें पाहिजे. मलरहित, आकाशाहून सूक्ष्म, जन्मरहित, महान् व शाश्वत असा हा आत्मा आहे.२०. धीमान् ब्राह्मणानें [ब्रह्मज्ञानें] याला जाणून याचें ज्ञान मिळवावें. पुष्कळ (व्यर्थ) शब्दांचें चिंतन करूं नये. कारण तें केवळ वाणीला श्रम देणारें आहे.२१. तो हा (तूं विचारलेला) महान्

एष महानज आत्मा योऽयं विज्ञानमयः प्राणेषु य एषोऽन्तर्हृदय आकाशस्तस्मिञ्छेते सर्वस्य वशी सर्वस्येशानः सर्वस्याधिपतिः स न साधुना कर्मणा भूयान्नो एवासाधुना कनीयानेष सर्वेश्वर एष भूताधिपतिरेष भूतपाल एष सेतुर्विधरण एषां लोकानामसंभेदाय तमेतं वेदानुवचनेन ब्राह्मणा विविदिषन्ति यज्ञेन दानेन तपसाऽनाशकेनैतमेव विदित्वा मुनिर्भवति । एतमेव प्रव्राजिनो लोकमिच्छन्तः प्रव्रजन्ति । एतद्ध स्म वै तत्पूर्वे विद्वांसः प्रजां न कामयन्ते किं प्रजया करिष्यामो येषां नोऽयमात्मायं लोक इति ते ह स्म पुत्रैषणायाश्च वित्तैषणायाश्च लोकैषणायाश्च व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरन्ति या ह्येव पुत्रैषणा सा वित्तैषणा या वित्तैषणा सा लोकैषणोभे ह्येते एषणे एव भवतः । स एष नेति नेत्यात्माऽगृह्यो न हि गृह्यतेऽशीर्यो न हि शीर्य-

व जन्मरहित आत्मा होय. इंद्रियांमध्ये विज्ञानमय हाच आहे. हृदयामध्ये असलेल्या आकाशामध्ये हा स्थित आहे. सर्व याच्या अधीन आहेत, हा सर्वांचा स्वामी आहे, सर्वांचा अधिपति आहे, पुण्यकर्मांनीं हा वाढत नाहीं अथवा पापकर्मांनीं लहान होत नाहीं. हा सर्वेश्वर, भूताधिपति व भूतपाल आहे. या (ब्रह्मलोकादि) लोकाचें मर्यादातिक्रमण होऊं नये याकरितां त्याना स्थिर ठेवणारा हा सेतु होय. वेदादिकांच्या अध्ययनानें, यज्ञानें, दानानें, तपानें, इच्छानिवृत्तीनें ब्राह्मण याला जाणण्याची इच्छा करतात. याला जाणतों तो मुनि होतो. हेंच फळ मिळण्याच्या इच्छेनें संन्यासी संन्यास घेतात. हे जे अगोदर जाणतात ते संततीची इच्छा करीत नाहींत. "हा आत्मा हाच ज्या आमचा लोक होय त्या आह्मांला परलोकसाधन अशी प्रजा काय करावयाची?" असा विचार करून ते पुत्रैषणा, वित्तैषणा व लोकैषणा यांना सोडून भिक्षाचर्य आचरण करतात. पुत्रैषणा ह्मणजेच वित्तैषणा व वित्तैषणा ह्मणजेच लोकैषणा. दोन्हीहि एषणाच होत. हा "असा नाहीं, तसा नाहीं" असा आत्मा तो हा. हा अग्राह्य आहे, ग्रहण करतां येत

तेऽसंगो न हि सज्यतेऽसितो न व्यथते न रिष्यत्येतमु हैवैते न तरत इत्यतः पापमकरवमित्यतः कल्याणमकरवमित्युभे उ हैवैष एते तरति नैनं कृताकृते तपतः ॥२२॥ तदेतदृचाभ्युक्तम् । एष नित्यो महिमा ब्राह्मणस्य न वर्धते कर्मणा नो कनीयान् । तस्यैव स्यात्पदवित्तं विदित्वा न लिप्यते कर्मणा पापकेनेति । तस्मादेवंविच्छान्तो दान्त उपरतस्तितिक्षुः समाहितो भूत्वाऽऽत्मन्येवात्मानं पश्यति सर्वमात्मानं पश्यति नैनं पाप्मा तरति सर्वं पाप्मानं तरति नैनं पाप्मा तपति सर्वं पाप्मानं तपति विपापो विरजोऽविचिकित्सो ब्राह्मणो भवत्येष ब्रह्मलोकः सम्राडेनं प्रापितोऽसीति होवाच याज्ञवल्क्यः सोऽहं भगवते विदेहान् ददामि मां चापि सह दास्यायेति ॥२३॥ स वा एष

नाहीं; अशीर्य आहे, फाडतां येत नाहीं; असंग आहे, जोडला जात नाहीं; असित, आहे व्यथा पावत नाहीं; विनाश पावत नाहीं. या (शरीरधारणा–) करितां मीं पाप केलें, याकरितां मीं पुण्य केलें, असा पश्चात्ताप किंवा हर्ष दोन्हीहि आत्मरूप झालेल्या ज्ञात्याला स्पर्श करीत नाहींत. ब्रह्मज्ञ हीं दोन्ही (पुण्यपापरूपी) कर्में तरून जातो. कृत आणि अकृत त्याला ताप देत नाहींत. २२. हें पुढील ऋचेनें सांगतात—शुभ कर्मानें वाढत नाहीं आणि अशुभ कर्मानें कमी होत नाहीं हा ब्रह्मज्ञाचा नित्य महिमा आहे. या महिम्याचें स्वरूप जाणावें. तें जाणल्यानें पापकर्मापासून (जाणणारा) अलिप्त असतो. ह्मणून हें जाणणारा शान्त, दान्त [दमयुक्त], उपरत, तितिक्षु, समाधानयुक्त होत्साता आपल्यामध्येंच आत्म्याचें स्वरूप पहातो. सर्व आत्मा आहे असें पहातो. याला कोणतेंहि पाप ताप देत नाहीं. सर्व पाप हा भस्म करतो. पापरहित, इच्छारहित व संशयरहित असा हा ब्रह्मज्ञ होतो. ब्रह्मलोक तो हाच. राजा, तूं या लोकीं आलेला आहेस." जनक ह्मणाला, "हे भगवन्, सहस्र गाई देतों व स्वतः मी आपला दास होतों."२३. हाच आत्मा महान्; जन्मरहित, (सर्व) अन्न भक्षण करणारा आणि (सर्व)

महानज आत्माऽन्नादो वसुदानो विन्दते वसु य एवं वेद ॥२४॥ स वा एष महानज आत्माजरोऽमरोऽमृतोऽभयो ब्रह्माभयं वै ब्रह्माभयꣳ हि वै ब्रह्म भवति य एवं वेद ॥२५॥ इति चतुर्थं ब्राह्मणम् ॥४॥

अथ ह याज्ञवल्क्यस्य द्वे भार्ये बभूवतुर्मैत्रेयी च कात्यायनी च तयोर्ह मैत्रेयी ब्रह्मवादिनी बभूव स्त्रीप्रज्ञैव तर्हि कात्यायन्यथ ह याज्ञवल्क्योऽन्यद्वृत्तमुपाकरिष्यन् ॥१॥ मैत्रेयीति होवाच याज्ञवल्क्यः प्रव्राजिष्यन्वा अरेऽहमस्मात्स्थानादस्मि हन्त तेऽनया कात्यायन्यांतं करवाणीति ॥२॥ सा होवाच मैत्रेयी यन्नु म इयं भगोः सर्वा पृथिवी वित्तेन पूर्णा स्यात्स्यां न्वहं तेनामृताहो३ नेति नेति होवाच याज्ञवल्क्यो यथैवोपकरणवतां जीवितं तथैव ते जीवितꣳ स्यादमृतत्वस्य तु नाशास्ति वित्तेनेति ॥३॥ सा होवाच मैत्रेयी येनाहं

प्राण्यांना (कर्माप्रमाणें) फळ देणारा आहे. हें जो जाणतो त्याला धनाची प्राप्ति होते.२४. हाच आत्मा महान्, जन्मरहित, मरणरहित, विनाशरहित व भयरहित असा ब्रह्मच होय. अभय हेंच ब्रह्म. हें जो जाणतो तो अभयरूपी ब्रह्म होतो.२५.

याज्ञवल्क्याला मैत्रेयी व कात्यायनी या नांवाच्या दोन बायका होत्या. त्यांपैकीं मैत्रेयी ब्रह्मज्ञानाची चर्चा करणारी होती. कात्यायनी त्या वेळीं इतर स्त्रियांप्रमाणेंच बुद्धि असलेली होती. पुढे याज्ञवल्क्याला (गृहस्थाश्रम सोडून) दुसरा (संन्यास) आश्रम धारण करण्याची इच्छा झाली.१. तो मैत्रेयीला ह्मणाला, मैत्रेयि, या ठिकाणाहून निघून मी संन्यास घेणार आहें. तेव्हां तूं आणि कात्यायनी याच्यामध्यें मी (द्रव्याची) विभागणी करून टाकतों.२. मैत्रेयी ह्मणाली, भगवन्, ही सर्व पृथिवी वित्तानें पूर्ण अशी मला मिळाली तर त्या योगें मी मृत्युरहित होईन काय ? याज्ञवल्क्य ह्मणाला, नाहीं. ज्याप्रमाणे सर्वसाधनसंपन्न मनुष्याचं जीवित असतें तसेंच तुझें जीवित होईल. वित्तानें कांहीं मृत्युरहितत्वाची आशा करूं नये.३. मैत्रेयी ह्मणाली, मी

नामृता स्यां किमहं तेन कुर्यां यदेव भगवान्वेद तदेव मे ब्रूहीति ॥४॥ स होवाच याज्ञवल्क्यः प्रिया वै खलु नो भवती सती प्रियमवृधद्धन्त तर्हि भवत्येतद्व्याख्यास्यामि ते व्याचक्षाणस्य तु मे निदिध्यासस्वेति ॥५॥ स होवाच न वा अरे पत्युः कामाय पतिः प्रियो भवत्यात्मनस्तु कामाय पतिः प्रियो भवति । न वा अरे जायायै कामाय जाया प्रिया भवत्यात्मनस्तु कामाय जाया प्रिया भवति । न वा अरे पुत्राणां कामाय पुत्राः प्रिया भवन्त्यात्मनस्तु कामाय पुत्राः प्रिया भवन्ति । न वा अरे वित्तस्य कामाय वित्तं प्रियं भवत्यात्मनस्तु कामाय वित्तं प्रियं भवति । न वा अरे पशूनां कामाय पशवः प्रिया भवन्त्यात्मनस्तु कामाय पशवः प्रिया भवन्ति । न वा अरे ब्रह्मणः कामाय ब्रह्म प्रियं भवत्यात्मनस्तु कामाय ब्रह्म प्रियं भवति । न वा अरे क्षत्रस्य कामाय क्षत्रं प्रियं भवत्यात्मनस्तु कामाय क्षत्रं प्रियं

मृत्युरहित व्हावें याकरितां काय करावे बरे? आपणांला जें (साधन) माहीत असेल ते मला सांगा.४. याज्ञवल्क्य ह्मणाला, तूं मला (पूर्वीपासून) प्रिय असून आतां मला अधिक प्रिय वाटत आहेस. ह्मणून तुला मी हे सांगतों. माझें भाषण लक्षपूर्वक ऐक.५. तो ह्मणाला, पतीच्या कामाकरितां (भार्येला) पति प्रिय वाटत नसतो, स्वतःच्याच कामाकरितां पति प्रिय वाटत असतो. भार्येच्या कामाकरितां (पतीला) भार्या प्रिय वाटत नसते, स्वतःच्याच कामाकरितां भार्या प्रिय वाटत असते. पुत्रांच्या कामाकरिता पुत्र प्रिय वाटत नसतात, स्वतःच्याच कामाकरितां पुत्र प्रिय वाटत असतात. वित्ताच्या कामाकरितां वित्त प्रिय वाटत नसतें, स्वतःच्याच कामाकरितां वित्त प्रिय वाटत असतें. पशूंच्या कामाकरितां पशु प्रिय वाटत नसतात, स्वतःच्याच कामाकरितां पशु प्रिय वाटत असतात. ब्राह्मणाच्या कामाकरितां ब्राह्मण प्रिय वाटत नसतात, स्वतःच्याच कामाकरितां ब्राह्मण प्रिय वाटत असतात. क्षत्रियांच्या कामाकरितां क्षत्रिय प्रिय वाटत नसतात, स्वतःच्याच कामाकरितां क्षत्रिय प्रिय वाटत

भवति । न वा अरे लोकानां कामाय लोका: प्रिया भवन्त्यात्मनस्तु कामाय लोका: प्रिया भवन्ति । न वा अरे देवानां कामाय देवाः प्रिया भवन्त्यात्मनस्तु कामाय देवा: प्रिया भवन्ति । न वा अरे वेदानां कामाय वेदा: प्रिया भवन्त्यात्मनस्तु कामाय वेदा: प्रिया भवन्ति । न वा अरे भूतानां कामाय भूतानि प्रियाणि भवन्त्यात्मनस्तु कामाय भूतानि प्रियाणि भवन्ति । न वा अरे सर्वस्य कामाय सर्वं प्रियं भवत्यात्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति । आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यो मैत्रेय्यात्मनि खल्वरे दृष्टे श्रुते मते विज्ञात इद॒ सर्वं विदितम् ॥६॥ ब्रह्म तं परादाद्योऽन्यत्रात्मनो ब्रह्म वेद क्षत्रं तं परादाद्योऽन्यत्रात्मन: क्षत्रं वेद लोकास्तं परादुर्योऽन्यत्रात्मनो लोकान्वेद देवास्तं परादुर्योऽन्यत्रात्मनो देवान्वेद

असतात. लोकांच्या कामाकरितां (स्वर्गादि) लोक प्रिय वाटत नसतात, स्वत:च्याच कामाकरितां लोक प्रिय वाटत असतात. देवांच्या कामाकरितां देव प्रिय वाटत नसतात, स्वत:च्याच कामाकरितां देव प्रिय वाटत असतात. वेदांच्या कामाकरितां वेद प्रिय वाटत नसतात, स्वत:च्याच कामाकरितां वेद प्रिय वाटत असतात. भूतांच्या कामाकरितां भूतें प्रिय वाटत नसतात, स्वत:च्याच कामाकरितां भूतें प्रिय वाटत असतात. कोणत्याहि वस्तूच्या कामाकरितां ती प्रिय वाटत नस्ते, स्वत:च्याच कामाकरितां सर्व प्रिय वाटत असतें. हे मैत्रेयि, या 'स्वत:'ला अर्थात् आत्म्याला पाहिलें पाहिजे, त्याचें श्रवण केलें पाहिजे, मनन केलें पाहिजे, निदिध्यासन केलें पाहिजे. आत्म्याचें दर्शन, श्रवण, मनन व विज्ञान झालें असतां हें (आत्म्याहून इतर) सर्व विज्ञात होतें.६. आत्म्याहून ह्मणजे स्वत:हून ब्राह्मण वेगळे आहेत असें जो समजतो त्याला ब्राह्मण दूर करतात. स्वत:हून क्षत्रिय वेगळे आहेत [=स्वत:ला पराक्रम नाहीं] असें जो समजतो त्याला क्षत्रिय दूर करतात. स्वत:हून लोक वेगळे आहेत असें जो समजतो त्याला लोक दूर

वेदास्तं परादुर्योऽन्यत्रात्मनो वेदान्वेद भूतानि तं परादुर्योऽन्यत्रात्मनो भूतानि वेद सर्वं तं परादाद्योऽन्यत्रात्मनः सर्वं वेदेदं ब्रह्मेदं क्षत्रमिमे लोका इमे देवा इमे वेदा इमानि भूतानीद्ँ सर्वं यदयमात्मा ॥७॥ स यथा दुंदुभेर्हन्यमानस्य न बाह्याञ्छब्दाञ्छक्नुयाद्ग्रहणाय दुंदुभेस्तु ग्रहणेन दुंदुभ्याघातस्य वा शब्दो गृहीतः ॥८॥ स यथा शंखस्य ध्मायमानस्य न बाह्याञ्छब्दाञ्छक्नुयाद्ग्रहणाय शंखस्य तु ग्रहणेन शंखध्मस्य वा शब्दो गृहीतः ॥९॥ स यथा वीणायै वाद्यमानायै न बाह्याञ्छब्दाञ्छक्नुयाद्ग्रहणाय वीणायै तु ग्रहणेन वीणावादस्य वा शब्दो गृहीतः ॥१०॥ स यथार्द्रैधाग्नेरभ्याहितस्य पृथग्धूमा विनिश्चरन्त्येवं वा अरेऽस्य महतो भूतस्य निश्वसितमेतद्यदृग्वेदो यजु-

करतात. स्वतःहून देव वेगळे आहेत असें जो समजतो त्याला देव दूर करतात. स्वतःहून वेद वेगळे आहेत असें जो समजतो त्याला वेद दूर करतात. स्वतःहून भूतें वेगळीं आहेत असें जो समजतो त्याला भूतें दूर करतात. स्वतःहून कोणतीहि वस्तु वेगळी आहे असें जो समजतो त्याला सर्व दूर करतात. हे ब्राह्मण, हे क्षत्रिय, हे लोक, हे देव, हे वेद, हीं भूतें, हें सर्व हा आत्माच होय.७. ज्याप्रमाणें दुंदुभि वाजविली जात असतां तिच्यांतून बाहेर निघणारे आवाज पकडतां येत नाहींत, (पण) दुंदुभि अथवा ती वाजविणारा यांनाच पकडलें ह्मणजे आवाज पकडल्यासारखें होतें; ज्याप्रमाणें शंख वाजविला जात असतां त्यांतून बाहेर निघणारे आवाज पकडतां येत नाहींत, (पण) शंख अथवा तो वाजविणारा यांनाच पकडलें ह्मणजे आवाज पकडल्यासारखें होतें; ज्याप्रमाणें वीणा वाजविली जात असतां तिच्यांतून बाहेर निघणारे आवाज पकडतां येत नाहींत, (पण) वीणा अथवा ती वाजविणारा यांनाच पकडले ह्मणजे आवाज पडल्यासारखें होतें; तद्वत् (आत्मा जवळ केला कीं सर्व जवळ आलें ह्मणून समजावें).८–१०. ओल्या इंधनांनीं पेटविलेल्या अग्नीपासून सर्वत्र धूर पसरतो त्याप्रमाणें हे महान् भूत जो पर-

वेदः सामवेदोऽथर्वांगिरस इतिहासः पुराणं विद्या उपनिषदः श्लोकाः सूत्राण्यनुव्याख्यानानि व्याख्यानानीष्टꣳ हुतमाशितं पायितमयं च लोकः परश्च लोकः सर्वाणि च भूतान्यस्यैवैतानि सर्वाणि निश्वसितानि ॥११॥ स यथा सर्वासामपाꣳ समुद्र एकायनमेवꣳ सर्वेषाꣳ स्पर्शानां त्वगेकायनमेवꣳ सर्वेषां गंधानां नासिके एकायनमेवꣳ सर्वेषां रसानां जिह्वैकायनमेवꣳ सर्वेषां रूपाणां चक्षुरेकायनमेवꣳ सर्वेषाꣳ शब्दानाꣳ श्रोत्रमेकायनमेवꣳ सर्वेषाꣳ संकल्पानां मन एकायनमेवꣳ सर्वासां विद्यानाꣳ हृदयमेकायनमेवꣳ सर्वेषां कर्मणाꣳ हस्तावेकायनमेवꣳ सर्वेषामानंदानामुपस्थ एकायनमेवꣳ सर्वेषां विसर्गाणां पायुरेकायनमेवꣳ सर्वेषामध्वनां पादावेकायनमेवꣳ सर्वेषां वेदानां वागेकायनम् ॥१२॥ स यथा सैंधवघनोऽनंतरोऽबाह्यः कृत्स्नो रसघन एवैवं वा अरेऽयमात्माऽनंतरोऽबाह्यः कृत्स्नः प्रज्ञानघन एवैतेभ्यो भूतेभ्यः समुत्थाय तान्येवानुविनश्यति न प्रेत्य संज्ञास्तीत्यरे

मात्मा त्याचे ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्वांगिरस, इतिहास, पुराण, ब्रह्मविद्या, उपनिषदें, (ब्राह्मणांतील) मंत्र, सूत्रें, मंत्रविवरणे, व्याख्याने [=अर्थ], इष्ट, हुत, आशित, पायित, इहलोक, परलोक आणि सर्व भूतें हीं सर्व निश्वास होत. ११. ज्याप्रमाणें सर्व उदकांचें समुद्र हें एकायन [प्राप्तव्य स्थान अथवा निवासस्थान], सर्व स्पर्शांचें त्वचा हे एकायन, सर्व गंधांचें नासिका हें एकायन, सर्व रसांचें जिह्वा हें एकायन, सर्व रूपांचें चक्षु हे एकायन, सर्व शब्दांचें श्रोत्र हें एकायन, सर्व संकल्पांचें मन हे एकायन, सर्व विद्यांचें हृदय हें एकायन, सर्व कर्मांचें हस्त हें एकायन, सर्व मार्गांचें पाय हें एकायन, सर्व वेदांचें वाणी हें एकायन, याप्रमाणे हा आत्मा (सर्व विश्वाचें एकायन) आहे. १२. तो जसा समुद्राप्रमाणें घन, अंतररहित, अबाह्य, पूर्ण, रसपूर्ण असतो, त्याप्रमाणेंच हा आत्मा [जीवात्मा] अंतररहित, अबाह्य, पूर्ण, ज्ञानपूर्ण असा आहे. हा या भूतांमधून निघून त्यांच्या मागें रहातो [देहाचा नाश झाल्यावर

ब्रवीमीति होवाच याज्ञवल्क्यः ॥१३॥ सा होवाच मैत्रेय्यत्रैव मा भगवान्मोहांतमापीपिपन्न वा अहमिमं विजानामीति स होवाच न वा अरेऽहं मोहं ब्रवीम्यविनाशी वा अरेऽयमात्मानुच्छित्तिधर्मा ॥१४॥ यत्र हि द्वैतमिव भवति तदितर इतरं पश्यति तदितर इतरं जिघ्रति तदितर इतरं रसयते तदितर इतरमभिवदति तदितर इतरꣳ शृणोति तदितर इतरं मनुते तदितर इतरꣳ स्पृशति तदितर इतरं विजानाति यत्र त्वस्य सर्वमात्मैवाभूत्तत्केन कं पश्येत्तत्केन कं जिघ्रेत्तत्केन कं रसयेत्तत्केन कमभिवदेत्तत्केन कꣳ शृणुयात्तत्केन कं मन्वीत तत्केन कꣳ स्पृशेत्तत्केन कं विजानीयाद्येनेदꣳ सर्वं विजानाति तं केन विजानीयात्स एष नेति नेत्यात्माऽगृह्यो न हि गृह्यतेऽशीर्यो न हि शीर्यतेऽ-

देखील असतो]. (देहामधून) निघाल्यावर याला (जीवात्मा असें पृथक्) नांव नाहीं. (हा परम आत्म्याशींच एकरूप होतो). असें याज्ञवल्क्यानें (मैत्रेयीला) सांगितलें. १३. मैत्रेयी ह्मणाली, हे भगवन्, मला मोहकारक ज्ञान सांगूं नका. हें मला समजलें नाहीं. याज्ञवल्क्य ह्मणाला, मी मोहाचें कांहीं सांगत नाहीं. हा आत्मा अविनाशी आहे. विनाश हें याचें लक्षण नाहीं. १४. जर द्वैत असेल तर एक दुसऱ्याला पाहील, एक दुसऱ्याचा वास घेईल, एक दुसऱ्याचा आस्वाद घेईल, एक दुसऱ्याला बोलेल, एक दुसऱ्याचें ऐकेल, एक दुसऱ्यासंबंधी मनन करील, एक दुसऱ्याला स्पर्श करील, एक दुसऱ्याला जाणील; परंतु हें सर्वच जेथें आत्मा आहे तेथें काय कशानें पहाणार? कशानें कशाचा वास घेणार? कशानें कशाचा आस्वाद घेणार? कशानें कोणाला बोलणार? कशानें काय श्रवण करणार? कशानें कोणाचें मनन करणार? कशानें कोणाला स्पर्श करणार? कशानें कोणाला जाणणार? ज्याचे योगानें हें सर्व जाणतां येतें त्याला कशानें जाणावयाचें? "असा नाहीं, तसा नाहीं" असा वर्णिलेला आत्मा तो हा. हा अग्राह्य आहे, ग्रहण करतां येत नाहीं; अशीर्य

संगो न हि सज्यतेऽसितो न व्यथते न रिष्यति विज्ञातारमरे केन विजानीयादित्युक्तानुशासनासि मैत्रेय्येतावदरे खल्वमृतत्वमिति होक्त्वा याज्ञवल्क्यो विजहार ॥१५॥ इति पंचमं ब्राह्मणम् ॥५॥

अथ वंशः पौतिमाष्यो गौपवनाद्गौपवनः पौतिमाष्यात्पौतिमाष्यो गौपवनाद्गौपवनः कौशिकात्कौशिकः कौंडिन्यात्कौंडिन्यः शांडिल्याच्छांडिल्यः कौशिकाच्च गौतमाच्च गौतमः ॥१॥ आग्निवेश्यादाग्निवेश्यो गार्ग्याद्गार्ग्यो गार्ग्याद्गार्ग्यो गौतमाद्गौतमः सैतवात्सैतवः पाराशर्यायणात्पाराशर्यायणो गार्ग्यायणाद्गार्ग्यायण उद्दालकायनादुद्दालकायनो जाबालायनाज्जाबालायनो माध्यंदिनायनान्माध्यंदिनायनः सौकरायणात्सौकरायणः काषायणात्काषायणः सायकायनात्सायकायनः कौशिकायनेः कौशिकायनिः ॥२॥ घृतकौशिकाद्घृतकौशिकः पाराशर्यायणात्पाराशर्यायणः पाराशर्यात्पाराशर्यो जातूकर्ण्याज्जातूकर्ण्य आसुरायणाच्च यास्काच्चासुरायणस्त्रैवणेस्त्रैवणिरौपजंधनेरौपजंधनिरासुरेरासुरिर्भारद्वाजाद्भारद्वाज आत्रेयादात्रेयो मांटेर्मांटिर्गौतमाद्गौतमो गौतमाद्गौतमो वात्स्याद्वात्स्यः शांडिल्याच्छांडिल्यः कैशोर्यात्काप्यात्कैशोर्यः काप्यः कुमारहारितात्कुमारहारितो गालवाद्गालवो विदर्भीकौंडिन्याद्विदर्भीकौंडिन्यो वत्सनपातो बाभ्रवाद्वत्सनपाद्बाभ्रवः पथः सौभरात्पंथाः सौभरोऽयास्यादांगिरसादयास्य आंगिरस आभूतेस्त्वाष्ट्रादाभूतिस्त्वाष्ट्रो विश्वरूपात्त्वाष्ट्राद्विश्वरूपस्त्वाष्ट्रोऽश्विभ्यामश्विनौ दधीच आथर्वणाद्दध्यङ्ङाथर्वणो दैवादथर्वा दैवो मृत्योः प्राध्वंसनान्मृत्युः प्राध्वंसनः प्रध्वंसनात्प्रध्वंसन एकर्षेरेकर्षिर्विप्रचित्तेर्विप्राचित्तिर्व्यष्टेर्व्यष्टिः

आहे, फाडतां येत नाहीं; असंग आहे, जोडला जात नाहीं; असित आहे, व्यथा पावत नाहीं, विनाश पावत नाहीं. (सर्वांचा) जो ज्ञाता त्याला कशानें जाणावयाचें ? हे मैत्रेयि, याप्रमाणें तुला ज्ञान सांगितलें. अमृतत्वस्थिति ती ही. याप्रमाणें ज्ञान सांगितल्यानंतर याज्ञवल्क्यानें संन्यास घेतला. १५.

सनारोः सनारुः सनातनात्सनातनः सनगात्सनगः परमेष्ठिनः परमेष्ठी ब्रह्मणो ब्रह्म स्वयंभु ब्रह्मणे नमः ॥३॥ इति षष्ठं ब्राह्मणम् ॥६॥ इति चतुर्थोऽध्यायः ॥४॥

अथ पंचमोऽध्यायः ॥

ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते ॥ पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ॥ ॐ३ खं ब्रह्म । खं पुराणं वायुरं खमिति ह स्माह कौरव्यायणीपुत्रो वेदोऽयं ब्राह्मणा विदुर्वेदैनेन यद्वेदितव्यम् ॥१॥ इति प्रथमं ब्राह्मणम् ॥१॥

त्रयाः प्राजापत्याः प्रजापतौ पितरि ब्रह्मचर्यमूषुर्देवा मनुष्या असुरा उषित्वा ब्रह्मचर्यं देवा ऊचुर्ब्रवीतु नो भवानिति तेभ्यो हैतदक्षरमुवाच द इति व्यज्ञासिष्टा३ इति व्यज्ञासिष्मेति होचुर्दाम्यतेति न आत्थेत्योमिति होवाच व्यज्ञासिष्टेति ॥१॥ अथ हैनं मनुष्या ऊचुर्ब्रवीतु नो भवानिति तेभ्यो हैतदेवाक्षरमुवाच द इति व्यज्ञासि-

## अध्याय पांचवा.

"आकाश हें ब्रह्म. आकाश ह्मणजे पुरातन परमात्माकाश. ज्याच्यामध्यें वायु असतो तें आकाश." असें कौरव्यायणीचा पुत्र ह्मणतो. हा (खं ब्रह्म हा मंत्र) ब्राह्मण जाणतात. जाणण्याला योग्य असें सर्व यानें जाणलें जातें. १.

देव, मनुष्य आणि असुर अशा प्रजापतीच्या तीन अपत्यांनीं आपला पिता जो प्रजापति त्याजवळ ब्रह्मचर्यानें वास केला. ब्रह्मचर्यानें वास केल्यानंतर देव ह्मणाले, भगवन्, आह्मांला आज्ञा करा. प्रजापतीनें त्यांना 'द' हें अक्षर सांगितलें व विचारलें कीं, तुह्मांला समजलें काय ? देव ह्मणाले, "समजलें. (द ह्मणजे) दमनयुक्त व्हा असें तुह्मीं आह्मांला सांगितलें." प्रजापति ह्मणाला, होय, तुह्मांला समजलें. १. नंतर मनुष्य ह्मणाले, आह्मांला आपण आज्ञा करा. प्रजापतीनें त्यांना 'द' हें अक्षर सांगितलें व

ष्टा३ इति व्यज्ञासिष्मेति होचुर्दत्तेति न आत्थेत्योमिति होवाच व्यज्ञाष्टेति ॥२॥ अथ हैनमसुरा ऊचुर्ब्रवीतु नो भवानिति तेभ्यो हैतदेवाक्षरमुवाच द इति व्यज्ञासिष्टा३ इति व्यज्ञासिष्मेति होचुर्दयध्वमिति न आत्थेत्योमिति होवाच व्यज्ञासिष्टेति तदेतदेवैषा दैवी वागनुवदति स्तनयित्नुर्द द द इति दाम्यत दत्त दयध्वमिति तदेतत्त्रयँ शिक्षेद्दमं दानं दयामिति ॥३॥ इति द्वितीयं ब्राह्मणम् ॥२॥

एष प्रजापतिर्यद् हृदयमेतद्ब्रह्मैतत्सर्वं तदेतत्त्यक्षरं हृदयमिति हृ इत्येकमक्षरमभिहरन्त्यस्मै स्वाश्चान्ये च य एवं वेद द इत्येकमक्षरं ददत्यस्मै स्वाश्चान्ये च य एवं वेद यमित्येकमक्षरमेति स्वर्गं लोकं य एवं वेद ॥१॥ इति तृतीयं ब्राह्मणम् ॥३॥

विचारलें कीं, तुह्मांला समजलें काय? मनुष्य ह्मणाले, "समजलें. (द ह्मणजे) द्या असें तुह्मीं आह्मांला सांगितलें." प्रजापति ह्मणाला, होय, तुह्मांला समजलें. (कारण मनुष्य लोभी असतात, त्यांना दान करण्यासच सांगितलें पाहिजे).२. नंतर असुर ह्मणाले, आह्मांला आपण आज्ञा करा. प्रजापतीनें त्यांना 'द' हें अक्षर सांगितलें व विचारलें कीं, तुह्मांला समजलें काय? असुर ह्मणाले, "समजलें. दया दाखवा असें तुह्मीं आह्मांला सांगितलें." ती ही दैवी वाणी ह्मणजे मेघगर्जना द द द अशी होते—दमयुक्त व्हा, दान करा आणि दया दाखवा. त्या या तीन गोष्टी दम, दान व दया शिकाव्या.३.

हें हृदय [=हृदयस्थ बुद्धि] हा प्रजापति होय. हीच ब्रह्म, हीच हें सर्व. तें हें हृदय तीन अक्षरी आहे. 'हृ' हें एक. (आपलीं इंद्रियें आणि इतर विषय या हृदयाकडे आपापलें कार्य आणतात). हें जो जाणतो त्याच्याकडे त्याचे स्नेही व इतर लोक (पदार्थ) आणतात. 'द' हें दुसरें अक्षर. हें जो जाणतो त्याला त्याचे व इतर लोक (पदार्थ) देतात. 'य' हें तिसरें अक्षर. हें जो जाणतो तो स्वर्गाप्रत जातो.१.

तद्वै तदेतदेव तदास सत्यमेव स यो हैतं महद्यक्षं प्रथमजं वेद सत्यं ब्रह्मेति जयतीमाल्लोकान् जित इन्न्वसावसद्य एवमेतं महद्यक्षं प्रथमजं वेद सत्यं ब्रह्मेति सत्यꣳ ह्येव ब्रह्म ॥१॥ इति चतुर्थं ब्राह्मणम्

आप एवेदमग्र आसुस्ता आपः सत्यमसृजन्त सत्यं ब्रह्म ब्रह्म प्रजापतिं प्रजापतिर्देवांस्ते देवाः सत्यमेवोपासते तदेतत्त्र्यक्षरꣳ सत्यमिति स इत्येकमक्षरं तीत्येकमक्षरं यमित्येकमक्षरं प्रथमोत्तमे अक्षरे सत्यं मध्यतोऽनृतं तदेतदनृतमुभयतः सत्येन परिगृहीतꣳ सत्यभूयमेव भवति नैनं विद्वांसमनृतꣳ हिनस्ति ॥१॥ तद्यत्तत्सत्यमसौ स आदित्यो य एष एतस्मिन्मंडले पुरुषो यश्चायं दक्षिणेऽक्षन्पुरुषस्तावेतावन्योन्यस्मिन्प्रतिष्ठितौ रश्मिभिरेषोऽस्मिन्प्रतिष्ठितः प्राणैरयममुष्मिन् स यदोत्क्रमिष्यन्भवति शुद्धमेवैतन्मंडलं पश्यति नैनमेते रश्मयः प्रत्यायन्ति

तेंच हें ब्रह्म 'सत्य' होय. 'सत्य ब्रह्म' अशा प्रकारें जो या पूज्य व प्रथमज ब्रह्माला जाणतो तो हे लोक जिंकतो; आणि शत्रु जिंकतो. ह्मणून सत्य हेंच ब्रह्म होय.

आरंभीं फक्त उदकच होतें. उदकानें सत्य निर्माण केलें. सत्यानें ब्रह्म, ब्रह्मानें प्रजापति आणि प्रजापतीनें देव निर्माण केले. ते देव सत्याचीच उपासना करतात. तें हें सत्य तीन अक्षरी आहे. 'स' हें एक अक्षर, 'त' हें दुसरें व 'य' हे तिसरें. पहिलें व तिसरें हीं अक्षरें सत्य. मधलें हें असत्य. हें असत्य दोहों बाजूंस सत्यानें वेष्टिलेलें असल्यामुळें बरेच अंशीं सत्य होतें. हें जो जाणता त्याला असत्य पीडा देत नाहीं. १. सत्य ह्मणजे तो (सदा प्रकाश पावणारा) आदित्य. या (आदित्य-) मंडलामध्ये जो पुरुष आहे व उजव्या डाळ्याचे ठिकाणीं जो पुरुष आहे ते दोघे एकमेकाचे ठिकाणीं स्थित आहत. (आदित्य) किरणांचे योगानें डोळ्यांतील पुरुषाचे ठिकाणीं स्थित आहे आणि प्राणांचे योगानें हा आदित्याचे ठिकाणीं स्थित आहे. जेव्हां मनुष्य उत्क्रमण करण्याची इच्छा करतो तेव्हां त्याला

॥२॥ य एष एतस्मिन्मंडले पुरुषस्तस्य भूरिति शिर एकꣳ शिर एकमेतदक्षरं भुव इति बाहू द्वौ बाहू द्वे एते अक्षरे स्वरिति प्रतिष्ठा द्वे प्रतिष्ठे द्वे एते अक्षरे तस्योपनिषदहरिति हन्ति पाप्मानं जहाति च य एवं वेद ॥३॥ योऽयं दक्षिणेऽक्षन्पुरुषस्तस्य भूरिति शिर एकꣳ शिर एकमेतदक्षरं भुव इति बाहू द्वौ बाहू द्वे एते अक्षरे स्वरिति प्रतिष्ठा द्वे प्रतिष्ठे द्वे एते अक्षरे तस्योपनिषदहमिति हन्ति पाप्मानं जहाति च य एवं वेद ॥४॥ इति पंचमं ब्राह्मणम् ॥५॥

मनोमयोऽयं पुरुषो भाःसत्यस्तस्मिन्नन्तर्हृदये यथा व्रीहिर्वा यवो वा स एष सर्वस्येशानः सर्वस्याधिपतिः सर्वमिदं प्रशास्ति यदिदं किंच ॥१॥ इति षष्ठं ब्राह्मणम् ॥६॥

विद्युद्ब्रह्मेत्याहुर्विदानाद्विद्युद्विद्यत्येनं पाप्मनो य एवं वेद विद्यु-

(आदित्याचें) मंडल शुद्धच दिसतें. त्याच्याकडून हे किरण परत जात नाहींत.२. या मंडलामध्यें जो (सत्य नामक) पुरुष आहे त्याचें भू (व्याहृति) हें शिर. शिर एक असतें, तसेंच हें अक्षरहि एक आहे. भुवः हे बाहू. बाहू दोन असतात तशींच हीं अक्षरें दोन आहेत. स्वर हे पाय. पाय दोन असतात तशींच हीं अक्षरें दोन आहेत. या सत्यरूपी ब्रह्माचें रहस्यनाम [उपनिषत्] 'अहर' हें होय. हें जो जाणतो तो पापाचा नाश करतो व त्याग करतो.३. उजव्या डोळ्याचे ठिकाणीं जो पुरुष आहे त्याचें भू हें शिर. शिर एक असतें तसेंच हें अक्षरहि एक आहे. भुवः हे बाहू. बाहू दोन असतात तशींच हीं अक्षरें दोन आहेत. स्वर हे पाय. पाय दोन असतात तशींच हीं अक्षरें दोन आहेत. याचें नांव 'अहं' हें होय. हें जो जाणतो तो पापाचा नाश करतो व त्याग करतो.४.

हा पुरुष [ब्रह्म] मनोमय व प्रकाशरूप आहे. हा तांदुळ अथवा यव यांच्याएवढा (सूक्ष्म) हृदयामध्यें आहे. हा सर्वांवर सत्ता चालविणारा, सर्वांचा स्वामी आहे. हें जें कांहीं आहे त्या सर्वांवर तो सत्ता चालवितो.१.

द्यतीति विद्युद्ध्येव ब्रह्म ॥१॥ इति सप्तमं ब्राह्मणम् ॥७॥

वाचं धेनुमुपासीत तस्याश्चत्वारः स्तनाः स्वाहाकारो वषट्कारो हन्तकारः स्वधाकारस्तस्यै द्वौ स्तनौ देवा उपजीवन्ति स्वाहाकारं च वषट्कारं च हन्तकारं मनुष्याः स्वधाकारं पितरस्तस्याः प्राण ऋषभो मनो वत्सः ॥१॥ इत्यष्टमं ब्राह्मणम् ॥८॥

अयमग्निर्वैश्वानरो योऽयमंतः पुरुषे येनेदमन्नं पच्यते यदिदमद्यते तस्यैष घोषो भवति यमेतत्कर्णावपिधाय शृणोति स यदोत्क्रमिष्यन्भवति नैनं घोषꣳ शृणोति ॥१॥ इति नवमं ब्राह्मणम् ॥९॥

यदा वै पुरुषोऽस्माल्लोकात्प्रैति स वायुमागच्छति तस्मै स तत्र विजिहीते यथा रथचक्रस्य खं तेन स ऊर्ध्व आक्रमते स आदित्यमागच्छति तस्मै स तत्र विजिहीते यथा लंबरस्य खं तेन स ऊर्ध्व

वीज हें ब्रह्म असेंहि ह्मणतात. (अंधकाराचा) नाश करते ह्मणून [विदानात्] वीज ह्मणतात. वीज हें ब्रह्म आहे असें जो जाणतो तो सर्व पापांचा नाश करतो. कारण वीज हें ब्रह्म आहे.१.

वाणीरूपी धेनूची उपासना करावी. स्वाहाकार, वषट्कार, हन्तकार आणि स्वधाकार असे तिचे चार स्तन आहेत. स्वाहाकार आणि वषट्कार या दोन स्तनाचा देव उपभोग घेतात. हन्तकाराचा मनुष्य उपभोग घेतात आणि स्वधाकाराचा पितर उपभोग घेतात. प्राण हा तिचा ऋषभ आणि मन हें वत्स.१.

या वैश्वानर अग्नीची उपासना करावी. हा या मनुष्याच्या आंत असतो. जें अन्न खाल्लें जातें तें हा (अग्नि) पचवितो. कान मिटले असता जो आवाज ऐकूं येतो तो याचा घोष होय. जेव्हां मनुष्य मरण पावूं लागतो तेव्हां हा घोष ऐकूं येत नाहीं.१.

जेव्हां मनुष्य या लोकामधून निघून जातो तेव्हां तो वायूप्रत जातो. रथचक्रामध्यें जेवढें छिद्र असतें तेवढ्या परिमाणाचें द्वार वायु त्याला करून

आक्रमते स चंद्रमसमागच्छति तस्मै स तत्र विजिहीते यथा दुंदुभेः खं तेन स ऊर्ध्व आक्रमते स लोकमागच्छत्यशोकमहिमं तस्मिन्वसति शाश्वतीः समाः ॥१॥ इति दशमं ब्राह्मणम् ॥१०॥

एतद्वै परमं तपो यद्व्याहितस्तप्यते परमꣳ हैव लोकं जयति य एवं वेदैतद्वै परमं तपो यं प्रेतमरण्यꣳ हरन्ति परमꣳ हैव लोकं जयति य एवं वेदैतद्वै परमं तपो यं प्रेतमग्नावभ्यादधति परमꣳ हैव लोकं जयति य एवं वेद ॥१॥ इति एकादशं ब्राह्मणम् ॥११॥

अन्नं ब्रह्मेत्येक आहुस्तन्न तथा पूयति वा अन्नमृते प्राणात्प्राणो ब्रह्मेत्येक आहुस्तन्न तथा शुष्यति वै प्राण ऋतेऽन्नादेते ह त्वेव देवते एकधाभूयं भूत्वा परमतां गच्छतस्तद्ध स्माह प्रातृदः पितरं किंस्वि-

देतो. त्या द्वारामधून तो वर आदित्यलोकाप्रत जातो. लंबरनामक वाद्याचे छिद्र जेवढें असते तेवढ्या परिमाणाचें द्वार त्याला आदित्य करून देतो त्यामधून तो चंद्रलोकाप्रत जातो. दुंदुभीचे छिद्र जेवढें (सूक्ष्म) असते तेवढ्या परिमाणाचें द्वार त्याला चंद्रमा करून देतो. त्यामधून तो शोकरहित व शारीरदुःखरहित अशा लोकाप्रत जातो. तेथे तो अनेक नित्य संवत्सरें [=कल्प] पर्यंत रहातो. १.

व्याधिग्रस्त मनुष्य जो ताप पावतो [जितकें दुःख होतें] ते परम तप होय. हें जो जाणतो [इतक्या दुःखाची कल्पना करतो] त्याला परम लोकाची प्राप्ति होते. मरण पावल्यावर अरण्यामध्ये नेतात तेंहि परम तप होय. हे जो जाणतो त्याला परम लोक प्राप्त होतो. प्रेताला अग्नीमध्ये ठेवतात तेंहि परम तप होय. हे जो जाणतो त्याला परम लोक प्राप्त होतो. १.

अन्न हेंच ब्रह्म असें कोणी ह्मणतात पण तें बरोबर नाहीं. कारण प्राण नसेल तर अन्नाचा पू होतो. प्राण हेंच ब्रह्म असें कोणी ह्मणतात पण तें बरोबर नाहीं. कारण अन्न नसेल तर प्राण शुष्क होतो. या दोन्ही देवता मिळून ब्रह्म होय. असा विचार करून प्रातृद नांवाचा ऋषि

देवैवं विदुषे साधु कुर्यां किमेवास्मा असाधु कुर्यामिति स ह स्माह पाणिना मा प्रातृद कस्त्वेनयोरेकधाभूयं भूत्वा परमतां गच्छतीति तस्मा उ हैतदुवाच वीत्यन्नं वै वि अन्ने हीमानि सर्वाणि भूतानि विष्टानि रमिति प्राणो वै रं प्राणे हीमानि सर्वाणि भूतानि रमन्ते सर्वाणि ह वा अस्मिन्भूतानि विशन्ति सर्वाणि भूतानि रमन्ते य एवं वेद ॥१॥ इति द्वादशं ब्राह्मणम् ॥१२॥

उक्थं प्राणो वा उक्थं प्राणो हीदꣳ सर्वमुत्थापयत्युद्धास्मादुक्थविद्वीरस्तिष्ठत्युक्थस्य सायुज्यं सलोकतां जयति य एवं वेद ॥१॥ यजुः प्राणो वै यजुः प्राणे हीमानि सर्वाणि भूतानि युज्यन्ते युज्यन्ते हास्मै सर्वाणि भूतानि श्रैष्ठ्याय यजुषः सायुज्यं सलोकतां जयति य

आपल्या पित्याला ह्मणाला, हें ज्ञान मजप्रमाणेंच जो जाणीत असेल त्याचें पूजन मीं कसें करावें ? [कारण तो सर्व जाणतोच आहे; त्याला अधिक ज्ञान काय द्यावयाचें ?] अथवा अपूजन तरी काय करावें ? पिता हातानें खूण करून ह्मणाला, प्रातृदा, असें बोलूं नकोस. अन्न व प्राण एकत्र झाल्यानें कोण मनुष्य ब्रह्माप्रत जातो ? [पुत्राला सांगतां आलें नाहीं]. वि ह्मणजे अन्न. कारण अन्नामध्यें हीं सर्व भूतें स्थित [विष्ट] आहेत. र ह्मणजे प्राण. कारण प्राणाचे ठिकाणीं सर्व भूतें रममाण होतात. हे जो जाणतो त्याच्या ठिकाणीं सर्व भूतें रममाण होतात व सर्व भूतें प्रवेश करतात. १.

(यज्ञांत प्रधान अशा) उक्थाची उपासना करावी. प्राण हेंच उक्थ होय. कारण प्राण हें सर्व उभें करतो [उत्थापयति इति उक्थं]. हें जाणणाऱ्या मनुष्याला प्राणवित् वीर पुत्र होतो. हें जो जाणतो त्याला प्राणाची सायुज्यता व सलोकता प्राप्त होते. १. यजु या रूपानें प्राणाची उपासना करावी. प्राण हाच यजु आहे. कारण प्राणाचे ठिकाणीं हीं सर्व भूतें युक्त आहेत. हें जो जाणतो त्याला सर्व प्राणी श्रेष्ठ समजतात; त्याला

एवं वेद ॥२॥ साम प्राणो वै साम प्राणे हीमानि सर्वाणि भूतानि सम्यंचि सम्यंचि हास्मै सर्वाणि भूतानि श्रैष्ठ्याय कल्पन्ते साम्नः सायुज्यꣳ सलोकतां जयति य एवं वेद ॥३॥ क्षत्रं प्राणो वै क्षत्रं प्राणो हि वै क्षत्रं त्रायते हैनं प्राणः क्षणितोः प्र क्षत्रमत्रमाप्नोति क्षत्रस्य सायुज्यꣳ सलोकतां जयति य एवं वेद ॥४॥ इति त्रयोदशं ब्राह्मणम् ॥१३॥

भूमिरंतरिक्षं द्यौरित्यष्टावक्षराण्यष्टाक्षरꣳ ह वा एकं गायत्र्यै पदमेतदु हैवास्या एतत्स यावदेषु त्रिषु लोकेषु तावद्ध जयति योऽस्या एतदेवं पदं वेद ॥१॥ ऋचो यजूंषि सामानीत्यष्टावक्षराण्यष्टाक्षरꣳह वा एकं गायत्र्यै पदमेतदु हैवास्य एतत्स यावतीयं त्रयी विद्या तावद्ध जयति योऽस्या एतदेवं पदं वेद ॥२॥ प्राणोऽपानो व्यान इत्यष्टाव-

प्राणाची सायुज्यता व सलोकता प्राप्त होते.२. साम या रूपानें प्राणाची उपासना करावी. प्राण हाच साम आहे. कारण प्राणाचे ठिकाणीं हीं सर्व भूते एकत्र येतात. हें जाणणारा आपल्यांतला श्रेष्ठ असें कबूल करण्यास एकत्र जमतात; हें जाणणाराला प्राणाची सायुज्यता व सलोकता प्राप्त होतात.३. क्षत्र या रूपानें प्राणाची उपासना करावी. प्राण हाच क्षत्र आहे. कारण प्राण या देहाला क्षतादिकांपासून (पुन्हां तेथें मांस भरून) तारतो. हें जो जाणतो त्याला प्राणाची सायुज्यता व सलोकता प्राप्त होतात.

"भूमि, अंतरिक्ष, द्यौः" हीं आठ अक्षरें. [द्यौःचीं दोन अक्षरें समजावयाचीं]. गायत्रीचें पहिलें पद आठ अक्षरांचें आहे. (भूमि वगैरे) हाच गायत्रीचा पहिला भाग. गायत्रीचें हे (त्रैलोक्यरूपी) पद जो जाणतो तो त्रैलोक्यामध्यें मिळविण्यासारखें असेल तें सर्व मिळवितो.१. "ऋचो यजूंषि सामानि" हीं आठ अक्षरें. गायत्रीचे दुसरें पद आठ अक्षरांचें आहे. हाच गायत्रीचा दुसरा भाग. गायत्रीचें हें त्रयी विद्यारूपी पद जो जाणतो तो ही सर्व त्रयी विद्या मिळवितो.२. "प्राण, अपान, व्यान"

क्षराण्यष्टाक्षरꣳ ह वा एकं गायत्र्यै पदमेतदु हैवास्या एतत्स यावदिदं प्राणि तावद्ध जयति योऽस्या एतदेवं पदं वेदाथास्या एतदेव तुरीयं दर्शतं पदं परोरजा य एष तपति यद्वै चतुर्थं तत्तुरीयं दर्शतं पदमिति ददृश इव ह्येष परोरजा इति सर्वमु ह्येवैष रज उपर्युपरि तपत्येवꣳ हैव श्रिया यशसा तपति योऽस्या एतदेवं पदं वेद ॥३॥ सैषा गायत्र्येतस्मिꣳस्तुरीये दर्शते पदे परोरजसि प्रतिष्ठिता तद्वै तत्सत्ये प्रतिष्ठितं चक्षुर्वै सत्यं चक्षुर्हि वै सत्यं तस्माद्यदिदानीं द्वौ विवदमानावेयातामहमदर्शमहमश्रौषमिति य एवं ब्रूयादहमदर्शमिति तस्मा एव श्रद्दध्याम तद्वै तत्सत्यं बले प्रतिष्ठितं प्राणो वै बलं तत्प्राणे प्रतिष्ठितं तस्मादाहुर्बलꣳ सत्यादोगीय इत्येवम्वेषा गायत्र्यध्यात्मं प्रतिष्ठिता सा हैषा गयांस्तत्रे प्राणा वै गयास्तत्प्राणांस्तत्रे तद्यद्गयांस्तत्रे तस्माद्गायत्री

हीं आठ अक्षरें. गायत्रीचें तिसरें पद आठ अक्षरांचें आहे. हाच गायत्रीचा तिसरा भाग. गायत्रीचें हें प्राणरूप पद जो जाणतो त्याला हें सर्व प्राणिजात वश होतें. (आकाशांत) हा जो तपन पावतो तो या मनुष्यांहून पलीकडे असलेला आदित्य तें स्पष्ट दिसणारें [दर्शतं] चवथे पद होय. 'परोरज' यांत रज ह्मणजे हा लोक. या लोकाच्या वर ह्मणजे परोरज. कारण आदित्य वर तपन पावतो. हे चवथें पद जो जाणतो तो श्री व यश यांनीं प्रकाशित होतो. ३. ती ही गायत्री या चवथ्या दृश्यमान व परोरज पदामध्यें स्थित आहे. तें पद सत्यामध्यें स्थित आहे. चक्षु हें सत्य. चक्षु हें सत्य ह्मणून जेव्हां दोघे वाद करीत असतां एक जण 'मीं अमुक पाहिलें' व दुसरा 'मीं अमुक ऐकलें' असें ह्मणतो तेव्हां 'मीं अमुक पाहिलें' असें ह्मणणारावर आपण विश्वास ठेवतों. तें हें सत्य बलाचे ठिकाणीं स्थित आहे. बल ह्मणजे प्राण. तें प्राणाचे ठिकाणीं स्थित आहे. ह्मणून ह्मणतात, बल सत्यापेक्षां तेजस्वी आहे. याच न्यायानें गायत्री अध्यात्मरूपी प्राणाचे ठिकाणीं स्थित आहे. प्राण [=इंद्रियें] हे गय. तिनें इंद्रियांचे रक्षण केलें.

नाम स यामेवामूꣳ सावित्रीमन्वाहैषैव सा स यस्मा अन्वाह तस्य प्राणांस्त्रायते ॥४॥ ताꣳ हैतामेके सावित्रीमनुष्टुभमन्वाहुर्वागनुष्टुबे-तद्वाचमनुब्रूम इति न तथा कुर्याद्गायत्रीमेव सावित्रीमनुब्रूयाद्यदि ह वा अप्येवंविद्बह्विव प्रतिगृह्णाति न हैव तद्गायत्र्या एकंचन पदं प्रति ॥५॥ स य इमांस्त्रीँल्लोकान्पूर्णान्प्रतिगृह्णीयात्सोऽस्या एतत्प्रथमं पद-माप्नुयादथ यावतीयं त्रयी विद्या यस्तावत्प्रतिगृह्णीयात्सोऽस्या एतद्-द्वितीयं पदमाप्नुयादथ यावदिदं प्राणि यस्तावत्प्रतिगृह्णीयात्सोऽस्या एतत्तृतीयं पदमाप्नुयादथास्या एतदेव तुरीयं दर्शतं पदं परोरजा य एष तपति नैव केनचनाप्यं कुत उ एतावत्प्रतिगृह्णीयात् ॥६॥ त-

यांचें त्राण केलें ह्मणून 'गायत्री.' (उपनीत शिष्याला) आचार्य जेव्हां या सवितृदेवतात्मक गायत्रीचा उपदेश करतो तेव्हां तो त्याच्या प्राणांचेंच रक्षण करतो.४. ही सावित्री [सवितृदेवतात्मक गायत्रीमंत्र] आपल्या शिष्यांना कोणी अनुष्टुप छंदांत सांगतात; कारण (त्यांचे मतें) वाक् अनु-ष्टुप आहे आणि (वाणी हीच शरीरांतील सरस्वती असल्यामुळें) वाणीला अनुसरून सावित्री सांगावी. पण असें करूं नये. गायत्री छंदांतच सावि-त्रीचा उपदेश करावा. गायत्री जाणणारानें इतर कुठलें ज्ञान कोणाकडून ग्रहण केलें तरी तें इतर ज्ञान गायत्रीच्या एका पादाच्याहि योग्यतेचें नाहीं. ५. हे (भू आदि) तीन लोक (सर्व ऐश्वर्यानें पूर्ण असे) गायत्री जाणणा-रानें दान घेतले [प्रतिग्रह] तर गायत्रीच्या एकपादज्ञानाचें फळ त्याला मिळालें असें होतें [ह्म० त्याचा दोष गायत्रीच्या एकपादज्ञानानें जातो]. त्रयी विद्येचा जो प्रतिग्रह घेईल त्याला गायत्रीच्या दुसऱ्या पादाचें फळ मिळालें असें होतें. जो या सर्व प्राणिमात्राचा प्रतिग्रह घेईल त्याला गाय-त्रीच्या तिसऱ्या पादाचें फळ मिळालें असें होतें. हा जो (आदित्य) तपन पावत आहे हा दृश्यमान व परोरज असा चवथा पाद होय. हा कोणालाहि मिळणें शक्य नाहीं. मग त्याचा प्रतिग्रह कोण घेणार ? ६. त्या गाय-

स्या उपस्थानं गायत्र्यस्येकपदी द्विपदी त्रिपदी चतुष्पद्यपदसि न हि पद्यसे । नमस्ते तुरीयाय दर्शताय पदाय परोरजसेऽसावदो मा प्रापदिति यं द्विष्यादसावस्मै कामो मा समृद्धीति वा न हैवास्मै स कामः समृध्यते यस्मा एवमुपतिष्ठतेऽहमदः प्रापमिति वा ॥७॥ एतद्ध वै तज्जनको वैदेहो बुडिलमाश्वतराश्विमुवाच यन्नु हो तद्गायत्रीविदब्रूथा अथ कथꣳ हस्तीभूतो वहसीति मुखꣳ ह्यस्याः सम्राण्न विदांचकारेति होवाच तस्या अग्निरेव मुखं यदि ह वा अपि बह्विवाग्नावभ्यादधति सर्वमेव तत् संदहत्येवꣳ हैवैवंविद्यपि बह्विव पापं कुरुते सर्वमेव तत्संप्साय शुद्धः पूतोऽजरोऽमृतः संभवति ॥८॥ इति चतुर्दशं ब्राह्मणम् ॥१४॥

त्रिचें उपस्थान [=समीप जाऊन नमस्कार करणें] पुढील मंत्रानें करावें— "गायत्र्यस्येक०" इत्यादि. अर्थ—तूं एकपद आहेस, द्विपद आहेस, त्रिपद आहेस, चतुष्पद आहेस. तथापि तूं पदरहित [=निरुपाधिक] आहेस. ह्मणून तुला जाणतां येत नाहीं. प्रत्यक्ष दिसणाऱ्या व परोरज अशा तुझ्या चवथ्या पदाला मी नमस्कार करतों. तुझ्या प्राप्तीला विघ्नरूप असा तो पापरूपी शत्रु मजप्रत न येवो. गायत्री जाणणाराचा जो द्वेष करील त्याचें काम कधीं पूर्ण करूं नकोस. याप्रमाणें उपस्थान केलें असतां शत्रूचें काम पूर्ण होत नाहींत व उपस्थान करणाराला ते काम प्राप्त होतात.७. या गायत्रीज्ञानाविषयीं अशी आख्यायिका सांगतात—विदेह देशाचा राजा जनक अश्वतराच्या बुडिल नामक पुत्राला ह्मणाला, 'मी गायत्रीविद् आहें' असें तूं ह्मणालास, पण मग असा हत्ती होऊन (भार–) वाहक कसा झालास ? [बुडिलाला प्रतिग्रहरूप दोषाच्या योगानें हत्तीचें रूप प्राप्त झालें होतें अशी आख्यायिका आहे]. तो ह्मणाला, राजा, गायत्रीचें मुख मीं जाणलें नव्हतें ह्मणून. अग्नि हें तिचें मुख. ज्याप्रमाणें अग्नीमध्यें पुष्कळ (इंधनादि) टाकलें असतां तें सर्व दहन होतें त्याप्रमाणें गायत्रीविदानें बहुत पातक केलें तरी

हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम् । तत्त्वं पूषन्नपावृणु सत्यधर्माय दृष्टये । पूषन्नेकर्षे यम सूर्य प्राजापत्य व्यूह रश्मीन् समूह । तेजो यत्ते रूपं कल्याणतमं तत्ते पश्यामि । योऽसावसौ पुरुषः सोऽहमस्मि । वायुरनिलममृतमथेदं भस्मांतꣳ शरीरम् । ॐ क्रतो स्मर कृतꣳ स्मर क्रतो स्मर कृतꣳ स्मर । अग्ने नय सुपथा राये अस्मान्विश्वानि देव वयुनानि विद्वान् । युयोध्यस्मज्जुहुराणमेनो भूयिष्ठां ते नमउक्तिं विधेम ॥१॥ इति पचदशं ब्राह्मणम् ॥१५॥ इति पंचमोऽध्याय. ॥५॥

अथ षष्ठोऽध्यायः ॥

त्या सर्वांचे भक्षण होऊन पुनीत, जरारहित व मृत्युरहित असाच तो होतो.८.

सुवर्णाप्रमाणें चकाकणाऱ्या पात्रानें ब्रह्माचें मुख झांकलेलें आहे. ब्रह्म हाच ज्याचा धर्म आहे असा जो मी त्या मला ब्रह्माची उपलब्धि होण्याकरितां, हे सूर्या, तूं तें झांकण दूर सार. जगाचें पोषण करणाऱ्या, एकटा गमन करणाऱ्या, सर्वांचें संयमन करणाऱ्या प्रजापतीच्या पुत्रा सूर्या, तूं आपले किरण पसर आणि तेज एकत्र कर. जें तुझें अत्यंत कल्याणकारक रूप तें माझ्या दृष्टीस पडो. तें असें कीं, आदित्यमंडलस्थ जो पुरुष तोच मी. (ज्ञान आणि कर्म यांच्या योगानें संस्कार पावलेला असा माझा हा) प्राण [वायुः] सर्वव्यापी [अनिलं] सूत्रात्मा [अमृतं] होवो. शरीराचें तर अखेरीस भस्मच व्हावयाचें. हे संकल्प करणाऱ्या प्राण्या, स्मरण करण्याला योग्य असें जें अग्निस्वरूपी ब्रह्म त्याचें स्मरण कर, केलेल्या कर्मांचें स्मरण कर. सर्व प्रकारचें कर्म आणि ज्ञान जाणणाऱ्या देवा अग्ने, (पुन्हां गमन आणि आगमन यांनीं वर्जित अशा) चांगल्या मार्गानें आह्मांला संपत्तीप्रत ह्मणजे अमृतत्वाप्रत ने. आह्मांला शत्रुरूपी असलेलें जें पाप त्याचा नाश कर. तुला आह्मी पुष्कळ नमस्कार करतों.

ॐ ॥ यो ह वै ज्येष्ठं च श्रेष्ठं च वेद ज्येष्ठश्च श्रेष्ठश्च स्वानां भवति प्राणो वै ज्येष्ठश्च श्रेष्ठश्च ज्येष्ठश्च श्रेष्ठश्च स्वानां भवत्यपि च येषां बुभूषति य एवं वेद ॥१॥ यो ह वै वसिष्ठां वेद वसिष्ठः स्वानां भवति वाग्वै वसिष्ठा वसिष्ठः स्वानां भवत्यपि च येषां बुभूषति य एवं वेद ॥२॥ यो ह वै प्रतिष्ठां वेद प्रतितिष्ठति समे प्रतितिष्ठति दुर्गे चक्षुर्वै प्रतिष्ठा चक्षुषा हि समे च दुर्गे च प्रतितिष्ठति प्रतितिष्ठति समे प्रतितिष्ठति दुर्गे य एवं वेद ॥३॥ यो ह वै संपदं वेद सꣳ हास्मै पद्यते यं कामं कामयते श्रोत्रं वै संपच्छ्रोत्रे हीमे सर्वे वेदा अभिसंपन्नाः सꣳ हास्मै पद्यते यं कामं कामयते य एवं वेद ॥४॥

## अध्याय सहावा.

ज्येष्ठ व श्रेष्ठ अशा प्राणाला जो जाणतो तो आपल्या समाजामध्यें ज्येष्ठ व श्रेष्ठ होतो. प्राण हाच (इंद्रियांमध्यें) ज्येष्ठ व श्रेष्ठ आहे हें जो जाणतो तो आपल्या समाजामध्ये ज्येष्ठ व श्रेष्ठ होतो; ज्यांच्यामध्यें ज्येष्ठ व श्रेष्ठ होण्याची इच्छा करतो त्यांच्यामध्यें देखील ज्येष्ठ व श्रेष्ठ होतो. १. धनवत्तम अशा वाणीला जो जाणतो तो आपल्या समाजामध्यें धनवत्तम होतो. वाणी हीच धनवत्तम आहे. हे जो जाणतो तो आपल्या समाजामध्यें धनवत्तम होतो; ज्यांच्यामध्ये धनवत्तम होण्याची इच्छा करतो त्यांच्यामध्यें देखील धनवत्तम होतो. २. प्रतिष्ठारूपी चक्षूला जो जाणतो तो सम आणि विषम अशा देशीं अथवा कालीं प्रतिष्ठा [स्थिरत्व] पावतो. चक्षु हीच प्रतिष्ठा होय. कारण चक्षूनेंच मनुष्य सम आणि विषम पाहून स्थित होतो. हें जो जाणतो तो सम आणि विषम अशा देशीं अथवा कालीं प्रतिष्ठा पावतो. ३. श्रोत्ररूपी संपत्तीला जो जाणतो त्याला ज्या ज्या कामाची इच्छा होते तो तो काम प्राप्त होतो. श्रोत्र हीच संपत्ति होय. कारण श्रोत्राचे ठिकाणी सर्व वेद संपन्न आहेत [वेद श्रवण करूनच पाठ करतात]. हें जो जाणतो त्याला ज्या ज्या कामाची इच्छा होते तो तो प्राप्त होतो. ४. मनोरूपी आयतन जो

यो ह वा आयतनं वेदायतनꣳ स्वानां भवत्यायतनं जनानां मनो वा आयतनमायतनꣳ स्वानां भवत्यायतनं जनानां य एवं वेद ॥५॥ यो ह वै प्रजातिं वेद प्रजायते ह प्रजया पशुभी रेतो वै प्रजातिः प्रजायते ह प्रजया पशुभिर्य एवं वेद ॥६॥ ते हेमे प्राणा अहंश्रेयसे विवदमाना ब्रह्म जग्मुस्तद्धोचुः को नो वसिष्ठ इति तद्धोवाच यस्मिन्व उत्क्रान्त इदꣳ शरीरं पापीयो मन्यते स वो वसिष्ठ इति ॥७॥ वाग्घोच्चक्राम सा संवत्सरं प्रोष्यागत्योवाच कथमशकत मदृते जीवितुमिति ते होचुर्यथाकला अवदन्तो वाचा प्राणन्तः प्राणेन पश्यन्तश्चक्षुषा शृण्वन्तः श्रोत्रेण विद्वांसो मनसा प्रजायमाना रेतसैवमजीविष्मेति प्रविवेश ह वाक् ॥८॥ चक्षुर्होच्चक्राम तत्संवत्सरं प्रोष्यागत्योवाच कथमशकत मदृते जीवितुमिति ते होचुर्यथांधा अपश्यन्तश्चक्षुषा प्राणन्तः प्राणेन

जाणतो तो आपल्या समाजाचें आयतन होतो. सर्व लोकांचें आयतन होतो. मन हेंच आयतन होय. हे जो जाणतो तो आपल्या समाजाचें व सर्व लोकांचे (देखील) आयतन [आश्रयस्थान] होतो.५,६. तीं हीं सर्व इंद्रियें आपणांमध्यें श्रेष्ठ कोण याविषयीं वाद करीत असतांना प्रजापतीकडे गेलीं व आपणांमध्यें श्रेष्ठ कोण असें त्यांनीं त्याला विचारलें. प्रजापतीनें उत्तर दिलें, तुमच्यापैकीं जो (शरीरांतून) निघून गेला असतां शरीर पापरूपी समजलें जातें तो तुमच्यामध्ये श्रेष्ठ होय.७. तेव्हां वाणी (शरीरामधून) निघून गेली. एक संवत्सरपर्यंत बाहेर राहून आल्यावर ती (इतर इंद्रियांना) ह्मणाली, तुह्मी मजवांचून कशीं राहूं शकलांत ? तीं ह्मणालीं, ज्याप्रमाणें मुके लोक वाणीनें न बोलतां, (पण) प्राणानें श्वास घेत, डोळ्यांनी पहात, कानांनीं ऐकत, मनानें ज्ञान घेत रहातात त्याप्रमाणें आह्मी राहिलों. तेव्हां वाणी (पुन्हां शरीरामध्यें) प्रवेश करती झाली.८. चक्षु निघून गेला. एक वर्ष बाहेर राहून आल्यावर तो ह्मणाला, तुह्मी मजवांचून कशीं राहूं शकलांत ? तीं ह्मणालीं, ज्याप्रमाणें अंधळे लोक चक्षूनें न पहातां, (पण)

वदन्तो वाचा शृण्वन्तः श्रोत्रेण विद्वांसो मनसा प्रजायमाना रेतसैवमजीविष्मेति प्रविवेश ह चक्षुः ॥९॥ श्रोत्रꣳ होच्चक्राम तत्संवत्सरं प्रोष्यागत्योवाच कथमशकत मदृते जीवितुमिति ते होचुर्यथा बधिरा अशृण्वन्तः श्रोत्रेण प्राणन्तः प्राणेन वदन्तो वाचा पश्यन्तश्चक्षुषा विद्वांसो मनसा प्रजायमाना रेतसैवमजीविष्मेति प्रविवेश ह श्रोत्रम् ॥१०॥ मनो होच्चक्राम तत्संवत्सरं प्रोष्यागत्योवाच कथमशकत मदृते जीवितुमिति ते होचुर्यथा मुग्धा अविद्वांसो मनसा प्राणन्तः प्राणेन वदन्तो वाचा पश्यन्तश्चक्षुषा शृण्वन्तः श्रोत्रेण प्रजायमाना रेतसैवमजीविष्मेति प्रविवेश ह मनः ॥११॥ रेतो होच्चक्राम तत्संवत्सरं प्रोष्यागत्योवाच कथमशकत मदृते जीवितुमिति ते होचुर्यथा क्लीबा अप्रजायमाना रेतसा प्राणन्तः प्राणेन वदन्तो वाचा पश्यन्तश्चक्षुषा शृण्वन्तः श्रोत्रेण विद्वांसो मनसैवमजीविष्मेति प्रविवेश ह रेतः ॥१२॥ अथ ह प्राण उत्क्रमिष्यन्यथा महासुहयः

प्राणाने श्वास घेत, वाणीने बोलत, कानानीं ऐकत, मनाने ज्ञान घेत रहातात त्याप्रमाणे आह्मी राहिलो. तेव्हा चक्षूने पुन्हा शरीरात प्रवेश केला.९. श्रोत्र निघून गेलें. एक वर्ष बाहेर राहून आल्यावर ते ह्मणाले. तुह्मी मजवांचून कशी राहूं शकलात? तीं ह्मणालीं, ज्याप्रमाणे बहिरे कानानीं न ऐकता. (पण) प्राणाने श्वास घेत, वाणीने बोलत, डोळ्यानी पहात, मनाने ज्ञान घेत रहातात त्याप्रमाणे आह्मी राहिलो. तेव्हा श्रोत्राने पुन्हा शरीरांत प्रवेश केला.१०. मन निघून गेले. एक वर्ष बाहेर राहून आल्यावर ते ह्मणाले, तुह्मी मजवांचून कशी राहू शकलात? तीं ह्मणालीं, ज्याप्रमाणे मढ मनाने न जाणतां, (पण) प्राणाने श्वास घेत, वाणीने बोलत, चक्षूने पहात, श्रोत्राने श्रवण करीत रहातात त्याप्रमाणे आह्मी राहिलो. तेव्हां मनान पुन्हा शरीरांत प्रवेश केला.११,१२. नंतर जेव्हां प्राण बाहेर जाऊ लागला तेव्हा जसा सिंधुनदीकाठचा मोटा घोडा पायातील बंधने वर

सैंधवः पड्वीशशंकून्संवृहेदेवꣳ हैवेमान्प्राणान्संववर्ह ते होचुर्मा भगव उत्क्रमीर्न वै शक्ष्यामस्त्वदृते जीवितुमिति तस्यो मे बलिं कुरुतेति तथेति ॥१३॥ सा ह वागुवाच यद्वा अहं वसिष्ठास्मि त्वं तद्व- सिष्ठोऽसीति यद्वा अहं प्रतिष्ठास्मि त्वं तत्प्रतिष्ठोऽसीति चक्षुर्यद्वा अहꣳ संपदस्मि त्वं तत्संपदसीति श्रोत्रं यद्वा अहमायतनमास्मि त्वं तदायतन- मसीति मनो यद्वा अहं प्रजाप्रतिरस्मि त्वं तत्प्रजापतिरसीति रेत- स्तस्यो मे किमन्नं किं वास इति यदिदं किंचा श्वभ्य आ कृमिभ्य आ कीटपतंगेभ्यस्तत्तेऽन्नमापो वास इति न ह वा अस्यानन्नं जग्धं भवति नानन्नं प्रतिगृहीतं य एवमेतदनस्यान्नं वेद तद्विद्वांसः श्रोत्रिया अशि- ष्यन्त आचामन्त्यशित्वाचामन्त्येतमेव तदनमनग्नं कुर्वन्तो मन्यन्ते ॥१४॥ इति प्रथमं ब्राह्मणम् ॥१॥

उचलतो त्याप्रमाणें त्यानें इतर इंद्रियांना वर उचललें. तेव्हां तीं ह्मणालीं, भगवन् प्राणा, आपण जाऊं नका. तुझ्यावांचून आह्मी जिवंत राहूं शकणार नाहीं. प्राण ह्मणाला, मला तुह्मी त्याबद्दल करभार द्या. तीं इंद्रियें ह्मणालीं, बरें आहे.१३. वाणी ह्मणाली, माझ्यामध्यें जें धनवत्तमत्व आहे तें तुझें आहे. चक्षु ह्मणाला, माझ्यामध्यें जी प्रतिष्ठा आहे ती तुझी आहे. श्रोत्र ह्मणालें, माझ्यामध्यें जी संपत्ति आहे ती तुझी आहे. मन ह्मणालें, माझ्या- जवळ जें आयतन आहे तें तुझें आहे. प्राण ह्मणाला, तर मग माझें अन्न कोणतें व वस्त्र कोणतें? तीं इंद्रियें ह्मणालीं, अश्वापासून, कृमींपर्यंत व कीटभुंगीपर्यंत जे जे प्राणी आहेत ते सर्व तुझें अन्न आणि उदक हें तुझें वस्त्र. हें प्राणाचें अन्न जो जाणतो त्यानें अन्न नव्हे असा कांहीं पदार्थ खाल्ला तरी तो त्याला अन्नच होतो [ह्म० पचतो] आणि प्रतिग्रह घेण्याला अयोग्य असा प्रतिग्रह घेतला तरी तो प्रतिग्रहच होतो. (उदक हें प्राणाचें वस्त्र आहे) ह्मणून विद्वान् श्रोत्रिय [वेदवेत्ते] ब्राह्मण भोजन करतांना उदक प्राशन करतात व भोजन झालें ह्मणजे उदक प्राशन करतात. याचे योगानें

श्वेतकेतुर्ह वा आरुणेयः पंचालानां परिषदमाजगाम स आजगाम जैवलिं प्रवाहणं परिचारयमाणं तमुदीक्ष्याभ्युवाद कुमार३ इति स भो३ इति प्रतिशुश्रावानुशिष्टोऽन्वासि पित्रेत्योमिति होवाच ॥१॥ वेत्थ यथेमाः प्रजाः प्रयत्यो विप्रतिपद्यन्ता३ इति नेति होवाच वेत्थो यथेमं लोकं पुनरापद्यन्ता३ इति नेति हैवोवाच वेत्थो यथासौ लोक एवं बहुभिः पुनः पुनः प्रयद्भिर्न संपूर्यता३ इति नेति हैवोवाच वेत्थो यतिथ्यामाहुत्याꣳ हुतायामापः पुरुषवाचो भूत्वा समुत्थाय वदन्ती३ इति नेति हैवोवाच वेत्थो देवयानस्य वा पथः प्रतिपदं पितृयाणस्य वा यत्कृत्वा देवयानं वा पंथानं प्रतिपद्यन्ते पितृयाणं वापि हि न ऋषेर्वचः श्रुतं द्वे सृती अशृणवं पितृणामहं देवानामुत मर्त्यानां ता-

प्राणाला आपण वस्त्र देतों असे ते मानतात. १४.

अरुणाचा पुत्र श्वेतकेतु पंचाल देशाच्या सभेमध्ये सेवकांकडून सेवा घेत असलेल्या जीवलपुत्र प्रवाहण नामक राजाकडे आला. (हा गर्विष्ठ आहे असें पूर्वींच जाणणाऱ्या) राजानें त्याला पाहिल्याबरोबर 'कुमार' असे संबोधून अभिवादन केलें. तो ऐटीनें ह्मणाला, 'हं.' राजा ह्मणाला, "पित्याकडून ज्ञान संपादन केलें आहेस काय?" श्वेतकेतु ह्मणाला, "होय."
१. राजा ह्मणाला, "हे लोक मरण पावले असतां निरनिराळ्या मार्गांनीं कसे जातात तें तूं जाणतोस काय?" "नाहीं." "पुन्हां या लोकीं कसे परत येतात तें तूं जाणतोस काय?" "नाहीं." "याप्रकारें पुष्कळ लोक मरण पावत असतां देखील तो परलोक कां भरून जात नाहीं तूं जाणतोस काय?" "नाहीं." "किती आहुति हवन केल्या असतां उदक बाहेर येऊन पुरुषवाणी बोलूं लागतें तें तूं जाणतोस काय?" "नाहीं." "देवयान मार्गाला जाण्याचें साधन अथवा पितृयाण मार्गाला जाण्याचें साधन —जेणेंकरून देवयान अथवा पितृयाण मार्गाला मनुष्य जातो— तें साधन [ह्म० कर्म] तूं जाणतोस काय? याविषयीं ऋषीचें

भ्यामिदं विश्वमेजत्समेति यदंतरा पितरं मातरं चेति नाहमत एकंचन वेदेति होवाच ॥२॥ अथैनं वसत्योपमंत्रयांचक्रेऽनादृत्य वसतिं कुमारः प्रदुद्राव स आजगाम पितरं तꣳ होवाचेति वाव किल नो भवान्पुरानुशिष्टानवोच इति कथꣳ सुमेध इति पंच मा प्रश्नान् राजन्यबंधुरप्राक्षीत्ततो नैकंचन वेदेति कतमे त इतीम इति ह प्रतीकान्युदाजहार ॥३॥ स होवाच तथा नस्त्वं तात जानीथा यथा यदहं किंच वेद सर्वमहं तत्तुभ्यमवोचं प्रेहि तु तत्र प्रतीत्य ब्रह्मचर्यं वत्स्याव इति भवानेव गच्छत्विति स आजगाम गौतमो यत्र प्रवाहणस्य जैवलेरास तस्मा आसनमाहृत्योदकमाहारयांचकाराथ हास्मा अर्घ्यं चकार तꣳ होवाच वरं भगवते गौतमाय दद्म इति ॥४॥ स होवाच प्रतिज्ञातो

वचन आह्मीं ऐकलें आहे तें असें— पितरांकडे नेणारा एक आणि देवांकडे नेणारा एक असे दोन मार्ग मनुष्यांना जाण्याला आहेत, असें मीं ऐकलें आहे. हें सर्व विश्व याच दोन मार्गांनीं जात जात एकत्र येतें. द्युलोक आणि पृथिवीलोक [पितरं मातरं च] यांच्या मध्यें हे दोन मार्ग आहेत." "या प्रश्नांपैकीं एका देखील प्रश्नाचें उत्तर मी जाणीत नाहीं."२. नंतर राजानें आपल्या येथें रहाण्याविषयीं सांगून श्वेतकेतूचें आदरातिथ्य केलें. परंतु आदरातिथ्याचा अनादर करून कुमार तेथून निघाला व पित्याकडे आला. पित्याला तो ह्मणाला, पूर्वीं (समावर्तनकालीं) सर्व विद्या पूर्ण झाल्या असें तुह्मीं आह्मांला कसें सांगितलें? पिता ह्मणाला, बुद्धिमन्ता बाळा, काय झालें? कुमार ह्मणाला, त्या मूर्ख राजानें मला पांच प्रश्न विचारले. पण त्यांपैकीं एकाचें देखील उत्तर मला माहीत नव्हतें. पिता ह्मणाला, ते प्रश्न कोणते? तेव्हां कुमारानें ते प्रश्न सांगितले.३. पिता ह्मणाला, वत्सा, तूं हें लक्षांत ठेव कीं, मला जेवढें कांहीं ज्ञान होतें तेवढें सर्व मीं तुला सांगितलें. ह्मणून चल आपण तेथें (राजाकडे) जाऊन शिष्यभावानें राहूं. कुमार ह्मणाला, तुह्मीच जा. तेव्हां तो गौतमगोत्री आरुणि प्रवाहण

म एष वरो यां तु कुमारस्यांते वाचमभापथास्तां मे ब्रूहीति ॥५॥ स होवाच दैवेषु वै गौतम तद्वरेषु मानुषाणां ब्रूहीति ॥६॥ स होवाच विज्ञायते हास्ति हिरण्यस्यापात्तं गोअश्वानां दासीनां प्रवाराणां परिदानस्य मा नो भवान् बहोरनंतस्यापर्यंतस्याभ्यवदान्यो भूदिति स वै गौतम तीर्थेनेच्छासा इत्युपैम्यहं भवन्तमिति वाचा ह स्मैव पूर्व उपयन्ति स होपायनकीर्त्योवास ॥७॥ स होवाच तथा नस्त्वं गौतम मापराधास्तव च पितामहा यथेयं विद्येतः पूर्वं न कस्मिंश्चन ब्राह्मण उवास तां त्वहं तुभ्यं वक्ष्यामि को हि त्वैवं ब्रुवन्तमर्हति

राजा जेथें होता तेथें आला. त्याला आसन आणून राजानें उदक आणविलें व अर्घ्य दिलें. राजा ह्मणाला, भगवन्, आपणांस काय पाहिजे असेल तें मी देतों.४. तो ह्मणाला, तुझा हा वर कायम ठेव. कुमाराला तूं जें प्रश्नरूप भाषण बोललास तें मला सांग.५. राजा ह्मणाला, गौतमा, तूं मागतोस हा वर देवांतला आहे. मनुष्यांतला एखादा वर माग.६. तो ह्मणाला, तुला माहीत आहेच कीं, मजजवळ सुवर्ण, गाई, घोडे, दासी, परिवार, वस्त्रें वगैरे पुष्कळ आहेत. मोठा, अनंतफलदायक व कधीं न संपणारा असा वर मला तूं न देणारा आहेस असें न होवो. राजा ह्मणाला, गौतमा, तूं शास्त्रविहित मार्गानें [तीर्थेन] मजपासून विद्या प्राप्त करून घेण्याची इच्छा कर. गौतम ह्मणाला, मी तुजपाशीं विद्या शिकण्याकरितां शिष्यभावानेंच आलों आहें. वरिष्ठ जातीचे लोक कनिष्ठ जातीच्या लोकांकडे विद्या शिकण्याकरितां जातात तेव्हां नुसते वाचेनेंच जातात [ह्मणजे विद्या शिकण्याकरितां आपण आलों आहों असें सांगितलें ह्मणजे उपायन, शुश्रूषा इत्यादिकांकरितां कांहीं कालपर्यंत गुरुगृहीं रहाण्याचें त्यांना कारण नाहीं]. ह्मणून मीं वाचेनेंच उपायनादिकांकरितां तुझ्या गृहीं वास केला आहे असें होतें.७. राजा ह्मणाला, तुझ्या पितामहानें माझ्या पितामहावर जसा क्रोध केला नाहीं त्याप्रमाणेंच तूं देखील मजवर क्रोध करूं

प्रत्याख्यातुमिति ॥८॥ असौ वै लोकोऽग्निर्गौतम तस्यादित्य एव समिद्रश्मयो धूमोऽहरर्चिर्दिशोऽगारा अवांतरदिशो विस्फुलिंगास्तस्मिन्नेतस्मिन्नग्नौ देवाः श्रद्धां जुह्वति तस्या आहुत्यै सोमो राजा संभवति ॥९॥ पर्जन्यो वा अग्निर्गौतम तस्य संवत्सर एव समिदभ्राणि धूमो विद्युदर्चिरशनिरंगारा ह्रादुनयो विस्फुलिंगास्तस्मिन्नेतस्मिन्नग्नौ देवाः सोमं राजानं जुह्वति तस्या आहुत्यै वृष्टिः संभवति ॥१०॥ अयं वै लोकोऽग्निर्गौतम तस्य पृथिव्येव समिदग्निर्धूमो रात्रिरर्चिश्चंद्रमा अंगारा नक्षत्राणि विस्फुलिंगास्तस्मिन्नेतस्मिन्नग्नौ देवा वृष्टिं जुह्वति तस्या आहुत्या अन्नꣳ संभवति ॥११॥ पुरुषो वा अग्निर्गौतम तस्य व्यात्तमेव समित्प्राणो धूमो वागर्चिश्चक्षुरंगाराः श्रोत्रं विस्फुलिंगास्त-

नकोस. ही विद्या यापूर्वी कोणत्याहि ब्राह्मणाचे ठिकाणीं नव्हती (क्षत्रियांचीच ही विद्या, ह्मणून मीं तुला इतर वर मागण्याविषयीं सांगितलें). मी (आतां) ही विद्या तुला सांगतों. अशा रीतीनें बोलणाऱ्या तुला 'मी विद्या सांगत नाहीं' असें ह्मणणें कोणीं तरी योग्य होईल काय? ८. गौतमा, हा लोक हाच अग्नि; आदित्य ही त्याची समिधा, आदित्याचे किरण हा धूम, दिशा हे निखारे आणि उपदिशा या ठिणग्या. त्या या अग्नीमध्यें देव श्रद्धेचें हवन करतात. ती आहुती दिली ह्मणजे सोम राजा उत्पन्न होतो. ९. गौतमा, पर्जन्य हा अग्नि; संवत्सर ही त्याची समिधा, अभ्रें हा धूम, वीज ही ज्वाळा, अशनि हे निखारे आणि मेघगर्जना या ठिणग्या. त्या या अग्नीमध्यें देव सोम राजाचें हवन करतात. ती आहुति दिली ह्मणजे वृष्टि होते. १०. गौतमा, हा लोक अग्नि; पृथिवी ही त्याची समिधा, अग्नि हा धूम, रात्रि ही ज्वाळा, चंद्र हे निखारे आणि नक्षत्रें या ठिणग्या. त्या या अग्नीमध्यें देव वृष्टीचें हवन करतात. ती आहुति दिली ह्मणजे अन्न उत्पन्न होतें. ११. गौतमा, पुरुष हा अग्नि; मुख ही त्याची समिधा, प्राण हा धूम, वाणी ही ज्वाळा, चक्षु हे निखारे आणि श्रोत्र या ठिणग्या. त्या या अग्नी-

स्मिन्नेतस्मिन्नग्नौ देवा अन्नं जुह्वति तस्या आहुत्यै रेतः संभवति ॥१२॥ अथैनमग्नये हरन्ति तस्याग्निरेवाग्निर्भवति समित्समिद्धूमो धूमोऽर्चिरर्चिरंगारा अंगारा विस्फुलिंगा विस्फुलिंगास्तस्मिन्नेतस्मिन्नग्नौ देवाः पुरुषं जुह्वति तस्या आहुत्यै पुरुषो भास्वरवर्णः संभवति ॥१४॥ ते य एवमेतद्विदुर्ये चामी अरण्ये श्रद्धाँ सत्यमुपासते तेऽर्चिरभिसंभवन्त्यर्चिषोऽहरह्न आपूर्यमाणपक्षमापूर्यमाणपक्षाद्यान्षण्मासानुदङ्ङादित्य एति मासेभ्यो देवलोकं देवलोकादादित्यमादित्याद्वैद्युतं तान्वैद्युतान्पुरुषो मानस एत्य ब्रह्मलोकान् गमयति ते तेषु ब्रह्मलोकेषु पराः परावतो वसन्ति तेषां न पुनरावृत्तिः ॥१५॥ अथ ये यज्ञेन दानेन तपसा लोकाञ्जयन्ति ते धूममभिसंभवन्ति धूमाद्रात्रिं रात्रेरपक्षीयमा-

मध्यें देव अन्नाचें हवन करतात.१२,१३. हा पुरुष मेला म्हणजे त्याला अग्नीप्रत नेतात. अग्नि हा त्याचा अग्नि होतो, समिधा या समिधा, धूम हा धूम, ज्वाळा या ज्वाळा, निखारे हे निखारे आणि ठिणग्या या ठिणग्या होत. त्या या अग्नीमध्यें देव पुरुषाची आहुति देतात. ती आहुति दिली म्हणजे अत्यंत दीप्तिमान् पुरुष उत्पन्न होतो.१४. हें (पंचाग्निदर्शन) जे जाणतात आणि जे (वानप्रस्थाश्रमी) अरण्यामध्यें श्रद्धायुक्त होत्साते सत्यरूपी ब्रह्माची उपासना करतात ते (संसाररहित होऊन) उत्तर मार्गाला नेणारें अर्चिस्वरूप पावतात. अर्चींमधून अहर्देवता, अहर्देवतेमधून शुक्ल पक्ष, शुक्ल पक्षामधून उत्तरायणाचे सहा महिने, या सहा महिन्यांमधून देवलोक, देवलोकामधून आदित्यलोक, आदित्यामधून वीज आणि नंतर ब्रह्मदेवाच्या मानस पुत्रांपैकीं कोणी तरी येऊन तो विजेमधून त्याला ब्रह्मलोकांप्रत नेतो. ते त्या ब्रह्मलोकांमध्यें अत्यंत श्रेष्ठ स्वरूप प्राप्त होत्साते बहुत कालपर्यंत रहातात. ते परत (जन्ममृत्यूप्रत) येत नाहींत.१५. आतां जे यज्ञ, दान, (चांद्रायणादि) तप यांनीं [म्हणजे केवल कर्मानें स्वर्गादि लोक मिळवितात ते धूमाप्रत जातात. धूमामधून रात्र, रात्रीमधून कृष्ण पक्ष, कृष्ण पक्षामधून

णपक्षमपक्षीयमाणपक्षाद्यान्षण्मासान्दक्षिणादित्य एति मासेभ्यः पितृलोकं पितृलोकाच्चंद्रं ते चंद्रं प्राप्यान्नं भवन्ति तांस्तत्र देवा यथा सोमं राजानमाप्यायस्वापक्षीयस्वेत्येवमेनांस्तत्र भक्षयन्ति तेषां यदा तत्पर्यवैत्यथेममेवाकाशमभिनिष्पद्यन्त आकाशाद्वायुं वायोर्वृष्टिं वृष्टेः पृथिवीं ते पृथिवीं प्राप्यान्नं भवन्ति ते पुनः पुरुषाग्नौ हूयन्ते ततो योषाग्नौ जायन्ते लोकान्प्रत्युत्थायिनस्त एवमेवानुपरिवर्तन्तेऽथ य एतौ पंथानौ न विदुस्ते कीटाः पतंगा यदिदं दंदशूकम् ॥१६॥ इति द्वितीयं ब्राह्मणम्

स यः कामयेत महत्प्राप्नुयामित्युदगयन आपूर्यमाणपक्षस्य पुण्याहे द्वादशाहमुपसद्व्रती भूत्वौदुंबरे कंसे चमसे वा सर्वौषधं फलानीति संभृत्य परिसमुह्य परिलिप्याग्निमुपसमाधाय परिस्तीर्यावृताज्यं

दक्षिणायनाचे सहा महिने, या सहा महिन्यांमधून पितृलोक, पितृलोकामधून चंद्रलोक; चंद्रलोकीं आल्यावर ते अन्नरूप होतात. यज्ञामध्यें ज्याप्रमाणें ऋत्विक् सोमाचें पानामागें पान करून त्याला संपवितात त्याप्रमाणें त्या ठिकाणीं देव त्यांना संपवितात [म्ह० त्यांच्या कर्माचा क्षय करतात]. जेव्हां त्यांचें ते (यज्ञादि) कर्म संपतें तेव्हां ते या आकाशाप्रतच येतात. आकाशामधून वायु, वायुमधून वृष्टि, वृष्टीमधून पृथिवी, या क्रमानें येऊन पृथ्वीवर आल्यावर अन्नरूप होतात. त्यांचें पुन्हां पुरुषरूपी अग्नीमध्यें हवन केलें जातें. नंतर (स्वर्गादि) लोकांमध्यें पुन्हां जाण्याकरितां स्त्रीरूपी अग्नीमध्यें ते जन्म घेतात. याप्रमाणें ते चक्रासारखे फिरत रहातात. हे दोन्ही मार्ग ज्यांना माहीत नाहींत ते कीट, पतंग, दंश करणारे मशक इत्यादि होतात. १६.

आपल्याला महत्त्व प्राप्त व्हावें अशी जो इच्छा करतो त्यानें उत्तरायणामध्यें शुक्ल पक्षांत शुभ दिवस पाहून बारा दिवस पर्यंत उपसद् नामक व्रत करावें [बारा दिवस क्रमानें कमी करीत दूध पिऊन रहावयाचें व पुढें क्रमानें अधिक करीत रहावयाचें]. उदुंबर वृक्षाच्या केलेल्या द्रोणांत अथवा चमच्यांत सर्व तऱ्हेच्या ओषधी व फळें मिळवून परिसमूहन व परिलेपन

संस्कृत्य पुंसा नक्षत्रेण मंथꣳ संनीय जुहोति । यावन्तो देवास्त्वयि जातवेदस्तिर्यंचो घ्नति पुरुषस्य कामान् । तेभ्योऽहं भागधेयं जुहोमि ते मा तृप्ताः सर्वैः कामैस्तर्पयन्तु स्वाहा । या तिरश्ची निपद्यतेऽहं विधरणी इति । तां त्वा घृतस्य धारया यजे संराधनीमहꣳ स्वाहा ॥१॥ ज्येष्ठाय स्वाहा श्रेष्ठाय स्वाहेत्यग्नौ हुत्वा मंथे संस्रवमवनयति प्राणाय स्वाहा वसिष्ठायै स्वाहेत्यग्नौ हुत्वा मंथे संस्रवमवनयति वाचे स्वाहा प्रतिष्ठायै स्वाहेत्यग्नौ हुत्वा मंथे संस्रवमवनयति चक्षुषे स्वाहा संपदे स्वाहेत्यग्नौ हुत्वा मंथे संस्रवमवनयति श्रोत्राय स्वाहायतनाय स्वाहेत्यग्नौ हुत्वा मंथे संस्रवमवनयति मनसे स्वाहा प्रजात्यै स्वाहेत्यग्नौ हुत्वा मंथे संस्रवमवनयति रेतसे स्वाहेत्यग्नौ हुत्वा मंथे संस्रवमवनयति ॥२॥ अग्नये स्वाहेत्यग्नौ हुत्वा मंथे संस्रवमवनयति सोमाय स्वाहेत्यग्नौ हुत्वा मंथे संस्रवमवनयति भूः स्वाहेत्यग्नौ हुत्वा मंथे संस्रवमवनयति भुवः स्वाहेत्यग्नौ हुत्वा मंथे संस्रवमवनयति स्वः स्वाहेत्यग्नौ हुत्वा मंथे संस्रवमवनयति भूर्भुवः स्वः स्वाहेत्यग्नौ हुत्वा मंथे संस्रवमवनयति ब्रह्मणे स्वाहेत्यग्नौ हुत्वा मंथे संस्रवमवनयति क्षत्राय स्वाहेत्यग्नौ हुत्वा मंथे संस्रवमवनयति भूताय स्वाहेत्यग्नौ हुत्वा मंथे संस्रवमवनयति भविष्यते स्वाहेत्यग्नौ हुत्वा मंथे संस्रवमवनयति विश्वाय स्वाहेत्यग्नौ हुत्वा मंथे संस्रवमवनयति सर्वाय स्वाहेत्यग्नौ हुत्वा मंथे संस्रवमवनयति प्रजापतये स्वाहेत्यग्नौ हुत्वा मंथे संस्रवमवनयति ॥३॥

करावीं. त्या भूमीवर अग्नि ठेवावा. परिस्तरणानंतर आज्याचा संस्कार करावा. पुरुषनक्षत्राचे योगावर (त्या सर्व ओषधींचा केलेला) मंथ मध्यें ठेवून (उदुंबराच्या चमच्यानें) "यावन्तो देवा०" इत्यादि मंत्रांनीं आहुति द्यावी. मंत्रांचा अर्थ– हे जातवेद [=सर्वज्ञ, उत्पन्न झालेलें सर्व जाणणारा] अग्ने, जे देव अथवा तिर्यक् योनीचे प्राणी मनुष्यांच्या कामांना विघ्न करणारे असतील त्या सर्वांचा भाग मी तुझ्यामध्यें हवन करीत आहें. तेणेंकरून तृप्त होत्साते

अथैनमभिमृशति भ्रमदसि ज्वलदसि पूर्णमसि प्रस्तब्धमस्येकसभमसि हिंकृतमसि हिंक्रियमाण मस्युद्गीथमस्युद्गीयमानमसि श्रावितमसि प्रत्याश्रावितमस्यार्द्रे संदीप्तमसि विभूरसि प्रभूरस्यन्नमसि ज्योतिरसि निधनमसि संवर्गोऽसीति ॥४॥ अथैनमुद्यच्छत्यामं स्यामं हि ते महि स हि राजेशानोऽधिपतिः स मां राजेशानोऽधिपतिं करोत्विति ॥५॥ अथैनमाचामति तत्सवितुर्वरेण्यम् । मधु वाता ऋतायते मधु क्षरन्ति सिंधवः । माध्वीर्नः सन्त्वोषधीर्भूः स्वाहा । भर्गो देवस्य धीमहि । मधु नक्तमुतोषसो मधुमत्पार्थिवं रजः मधु द्यौरस्तु नः पिता । भुवः स्वाहा धियो यो नः प्रचोदयान्मधुमान्नो वनस्पतिर्मधुमाँ अस्तु सूर्यः । माध्वीर्गावो भवन्तु नः । स्वः स्वाहेति । सर्वां च सावित्रीमन्वाह सर्वाश्च मधुमतीरहमेवेदꣳ सर्वं भूयासं भूर्भुवः स्वः स्वाहेत्यंतत आचम्य पाणी प्रक्षाल्य जघनेनाग्निं प्राक्शिराः संविशति प्रातरादित्य-मुपतिष्ठते दिशामेकपुंडरीकमस्यहं मनुष्याणामेकपुंडरीकं भूयासमिति यथेतमेत्य जघनेनाग्निमासीनो वंशं जपति ॥६॥ तꣳ हैतमुद्दालक आरुणिर्वाजसनेयाय याज्ञवल्क्यायांतेवासिन उक्त्वोवाचापि य एनꣳ शुष्के स्थाणौ निषिंचेज्जायेरञ्छाखाः प्ररोहेयुः पलाशानीति ॥७॥ एतमु हैव वाजसनेयो याज्ञवल्क्यो मधुकाय पैंग्यायांतेवासिन उक्त्वो-वाचापि य एनꣳ शुष्के स्थाणौ निषिंचेज्जायेरञ्छाखाः प्ररोहेयुः पला-शानीति ॥८॥ एतमु हैव मधुकः पैंग्यश्चूलाय भागवित्तयेऽतेवासिन उक्त्वोवाचापि य एनꣳ शुष्के स्थाणौ निषिंचेज्जायेरञ्छाखाः प्ररोहेयुः पलाशानीति ॥९॥ एतमु हैव चूलो भागवित्तिर्जानकय आयस्थू-णायांतेवासिन उक्त्वोवाचापि य एनꣳ शुष्के स्थाणौ निषिंचेज्जायेर-ञ्छाखाः प्ररोहेयुः पलाशानीति ॥१०॥ एतमु हैव जानकिरायस्थूणः

ते मला सर्व काम देवोत. यानंतर ६ व्या श्लोकापर्यंत आहुति सांगि-तल्या आहेत. १–६. नंतर या मंथाची परंपरा सांगितली आहे— अरुणपुत्र

सत्यकामाय जाबालायांतेवासिन उक्त्वोवाचापि य एनꣳ शुष्के स्थाणौ निषिंचेज्जायेरञ्छाखाः प्ररोहेयुः पलाशानीति ॥११॥ एतमु हैव सत्यकामो जाबालोऽन्तेवासिभ्य उक्त्वोवाचापि य एनꣳ शुष्के स्थाणौ निषिंचेज्जायेरञ्छाखाः प्ररोहेयुः पलाशानीति तमेतं नापुत्राय वानंतेवासिने वा ब्रूयात् ॥१२॥ चतुरौदुंबरो भवत्यौदुंबरः स्रुव औदुंबर इध्म औदुंबर्या उपमंथन्यौ दश ग्राम्याणि धान्यानि भवन्ति व्रीहियवास्तिलमाषा अणुप्रियंगवो गोधूमाश्च मसूराश्च खल्वाश्च खलकुलाश्च तान् पिष्टान्दधनि मधुनि घृत उपसिंचत्याज्यस्य जुहोति ॥१३॥ इति तृतीयं ब्राह्मणम् ॥३॥ ... इति चतुर्थं ब्राह्मणम् ॥४॥

अथ वंशः पौतिमाषीपुत्रः कात्यायनीपुत्रात् कात्यायनीपुत्रो गौतमीपुत्राद्गौतमीपुत्रो भारद्वाजीपुत्राद्भारद्वाजीपुत्रः पाराशरीपुत्रात्पाराशरीपुत्र औपस्वस्तीपुत्रादौपस्वस्तीपुत्रः पाराशरीपुत्रात्पाराशरीपुत्रः कात्यायनीपुत्रात्कात्यायनीपुत्रः कौशिकीपुत्रात्कौशिकीपुत्र आलंबीपुत्राच्च वैयाघ्रपदीपुत्राच्च वैयाघ्रपदीपुत्रः काण्वीपुत्राच्च कापीपुत्राच्च कापीपुत्रः ॥१॥ आत्रेयीपुत्रादात्रेयीपुत्रो गौतमीपुत्राद्गौतमीपुत्रो भारद्वाजीपुत्राद्भारद्वाजीपुत्रः पाराशरीपुत्रात्पाराशरीपुत्रो वात्सीपुत्राद्वात्सीपुत्रः पाराशरीपुत्रात्पाराशरीपुत्रो वार्कारुणीपुत्राद्वार्कारुणीपुत्रो वार्कारुणीपुत्राद्वार्कारुणीपुत्र आर्तभागीपुत्रादार्तभागीपुत्रः शौंगीपुत्रा-

उद्दालकानें हा वाजसनेय याज्ञवल्क्याला सांगितला व पुढें सांगितलें कीं, हा मंथ (याप्रमाणें संस्कार करून) शुष्क खांबावर टाकला तरी त्याला शाखा व पालवी फुटतील. याचीच पुढें परंपरा सांगितली आहे.७–१२. उदुंबराचे चार जिन्नस होतात, स्रुव, चमस, इध्म आणि उपमंथनी. ग्राम्य धान्यें दहा— तांदुळ, यव, तिळ, उडीद, अणु, प्रियंगु [कांगु], गहूं, मसूर, खल्व [वल्ल] आणि कुळीथ. हीं दहा धान्ये वांटून दहीं, मध व घृत यांमध्यें कालवून घृतासह हवन करावीं.१३.

च्छौंगीपुत्रः सांकृतीपुत्रात्सांकृतीपुत्र आलंबायनीपुत्रादालंबायनीपुत्र आलंबीपुत्रादालंबीपुत्रो जायन्तीपुत्राज्जायन्तीपुत्रो मांडूकायनीपुत्रान्मांडूकायनीपुत्रो मांडूकीपुत्रान्मांडूकीपुत्रः शांडिलीपुत्राच्छांडिलीपुत्रो राथीतरीपुत्राद्राथीतरीपुत्रो भालुकीपुत्राद्भालुकीपुत्रः क्रौंचिकीपुत्राभ्यां क्रौंचिकीपुत्रौ वैदभृतीपुत्राद्वैदभृतीपुत्रः कार्शकेयीपुत्रात्कार्शकेयीपुत्रः प्राचीनयोगीपुत्रात्प्राचीनयोगीपुत्रः सांजीवीपुत्रात्सांजीवीपुत्रः प्राश्नीपुत्रादासुरिवासिनः प्राश्नीपुत्र आसुरायणादासुरायण आसुरेरासुरिः॥२॥ याज्ञवल्क्याद्याज्ञवल्क्य उद्दालकादुद्दालकोऽरुणादरुण उपवेशेरुपवेशिः कुश्रेः कुश्रिर्वाजश्रवसो वाजश्रवा जिह्वावतो बाध्योगाज्जिह्वावान्बाध्योगोऽसिताद्वार्षगणादसितो वार्षगणो हरितात्कश्यपाद्धरितः कश्यपः शिल्पात्कश्यपाच्छिल्पः कश्यपः कश्यपान्नैध्रुवेः कश्यपो नैध्रुविर्वाचो वागंभिण्या अंभिण्यादित्यादादित्यानीमानि शुक्लानि यजूंषि वाजसनेयेन याज्ञवल्क्येनाख्यायन्ते ॥३॥ समानमा सांजीवीपुत्रात्सांजीवीपुत्रो मांडूकायनेर्मांडूकायनिर्मांडव्यान्मांडव्यः कौत्सात्कौत्सो माहित्थेर्माहित्थिर्वामकक्षायणाद्वामकक्षायणः शांडिल्याच्छांडिल्यो वात्स्याद्वात्स्यः कुश्रेः कुश्रिर्यज्ञवचसो राजस्तंबायनाद्यज्ञवचा राजस्तंबायनस्तुरात्कावषेयात्तुरः कावषेयः प्रजापतेः प्रजापतिर्ब्रह्मणो ब्रह्म स्वयंभु ब्रह्मणे नमः ॥४॥ इति पंचमं ब्राह्मणम् ॥५॥ इति षष्ठोऽध्यायः

इति शुक्लयजुर्वेदीया बृहदारण्यकोपनिषत्समाप्ता ॥

अनंतर ज्ञानप्राप्तीची वंशपरंपरा सांगतात— कात्यायनीपुत्रापासून गौतिमाषीपुत्राला, गौतमीपुत्रापासून कात्यायनीपुत्राला इत्यादि.

सार्थ उपनिषत्संग्रह भाग पहिला समाप्त.

# परिशिष्ट.

## गौडपादीयकारिका:

बहिष्प्रज्ञो विभुर्विश्वो ह्यन्त:प्रज्ञस्तु तैजस: घनप्रज्ञस्तथा प्राज्ञ एक एव त्रिधा स्मृत: ॥१॥ दक्षिणाभिमुखे विश्वो मनस्यन्तस्तु तैजस: । आकाशे च हृदि प्राज्ञस्त्रिधा देहे व्यवस्थित: ॥२॥ विश्वो हि स्थूलभुङ्नित्यं तैजस: प्रविविक्तभुक् । आनंदभुक्तथा प्राज्ञस्त्रिधा भोगं निबोधत ॥३॥ स्थूलं तर्पयते विश्वं प्रविविक्तं तु तैजसम् । आनंदश्च तथा प्राज्ञं त्रिधा तृप्तिं निबोधत ॥४॥ त्रिषु धामसु यद्भोज्यं भोक्ता यश्च प्रकीर्तित: । वेदैतदुभयं यस्तु स भुंजानो न

## मांडूक्योपनिषदावरील गौडपादकारिका.

### आगमप्रकरण.

बहिष्प्रज्ञ आत्म्याला विभु, अंत:प्रज्ञाला तैजस आणि घनप्रज्ञाला प्राज्ञ अशीं आत्म्याच्या तीन स्वरूपांना तीन नांवें आहेत. पण तीन स्वरूपांमध्यें असलेला हा (वास्तविक) एकच आहे.१. उजव्या डोळ्याचे ठिकाणीं विश्व असतो, मनामध्यें तैजस असतो आणि हृदयाकाशामध्यें प्राज्ञ असतो. याप्रमाणें देहाचे ठिकाणीं हा तीन प्रकारांनीं स्थित आहे.२. विश्व हा नेहमीं स्थूलाचा उपभोग घेणारा, तैजस सूक्ष्माचा उपभोग घेणारा, आणि प्राज्ञ आनंदाचा उपभोग घेणारा आहे. याप्रमाणें भोगाचे तीन प्रकार जाणा.३. स्थूलानें विश्वाची, सूक्ष्मानें तैजसाची आणि आनंदानें प्राज्ञाची तृप्ति होते. असे तृप्तीचे तीन प्रकार जाणा.४. (जागृति, स्वप्न व सुषुप्ति या) तीन अवस्थांमध्यें भोज्य कोण आणि भोक्ता कोण हीं

लिप्यते ॥५॥ प्रभवः सर्वभावानां सतामिति विनिश्चयः । सर्वं जनयति प्राणश्चेतोंशून्पुरुषः पृथक् ॥६॥ विभूतिं प्रसवं त्वन्ये मन्यन्ते सृष्टिचिन्तकाः । स्वप्नमायासरूपेति सृष्टिरन्यैर्विकल्पिता ॥७॥ इच्छामात्रं प्रभोः सृष्टिरिति सृष्टौ विनिश्चिताः । कालात्प्रसूतिं भूतानां मन्यन्ते कालचिन्तकाः ॥८॥ भोगार्थं सृष्टिरित्यन्ये क्रीडार्थमिति चापरे । देवस्यैष स्वभावोऽयमाप्तकामस्य का स्पृहा ॥९॥ निवृत्तेः सर्वदुःखानामीशानः प्रभुरव्ययः । अद्वैतः सर्वभावानां देवस्तुर्यो विभुः स्मृतः ॥१०॥ कार्यकारणबद्धौ ताविष्येते विश्वतैजसौ । प्राज्ञः कारणबद्धस्तु द्वौ तौ तुर्ये न सिध्यतः ॥११॥ नाऽऽत्मानं न परां-

दोन्ही ज्यास नीट समजलीं त्याला भोगांचा लेप लागत नाहीं.५. सर्व दृश्य वस्तु उत्पन्न झाल्या असें कोणी ह्मणतात. हाच प्राण ह्मणजे बीजात्मा पुरुष सर्व उत्पन्न करतो. हाच आपल्या चैतन्याचे जणूं काय किरणच असे (स्थूलसूक्ष्मादि) नानाविध भाव उत्पन्न करतो.६. दुसरे कोणी सृष्टि-विचारकर्ते ही सर्व सृष्टि हा ईश्वराचा विस्तार आहे (उत्पत्ति नव्हे) असें ह्मण-तात. ही सर्व सृष्टि स्वप्नाप्रमाणें माया आहे असेंहि कोणी ह्मणतात.७. प्रभूच्या केवळ इच्छामात्रानें ही सृष्टि निर्माण झाली असें कोणी ह्मणतात. सर्व भूतें कालापासून उत्पन्न झालीं असेंहि कोणी ह्मणतात.८. ही सृष्टि भोगाकरितां आहे असें कोणी, तर क्रीडेकरितां आहे असेंहि कोणी ह्मण-तात. कारण त्यांचे मतें देवाचा हा स्वभाव आहे; सर्व काम प्राप्त झालेल्या देवाला इच्छा कसली उरणार ! ९. वरील तीन अवस्थांतील सर्व दुः-खांची निवृत्ति करण्याला समर्थ जो तोच प्रभु, अव्यय, सर्व भावांच्या द्वैताचें निरसन करणारा, चवथा सर्वव्यापी देव आहे.१०. विश्व आणि तैजस हे (यथार्थज्ञानाचा अभाव आणि मिथ्या ज्ञान अशा) कार्यकारणांनीं बद्ध आहेत. प्राज्ञ हा कारणबद्ध आहे. हे सर्व तुरीयामध्यें ह्मणजे चवथ्यामध्यें असत नाहींत.११. प्राज्ञ स्वतः अथवा दुसरा, सत्य आणि असत्य हीं

श्चैव न सत्यं नापि चानृतम् । प्राज्ञः किंचन संवेत्ति तुर्यं तत्सर्वदृक्सदा ॥१२॥ द्वैतस्याग्रहणं तुल्यमुभयोः प्राज्ञतुर्ययोः । बीजनिद्रायुतः प्राज्ञः सा च तुर्ये न विद्यते ॥१३॥ स्वप्ननिद्रायुतावाद्यौ प्राज्ञस्त्वस्वप्ननिद्रया । न निद्रां नैव च स्वप्नं तुर्ये पश्यन्ति निश्चिताः ॥१४॥ अन्यथा गृह्णतः स्वप्नो निद्रा तत्त्वमजानतः । विपर्यासे तयोः क्षीणे तुरीयं पदमश्नुते ॥१५॥ अनादिमायया सुप्तो यदा जीवः प्रबुध्यते । अजमनिद्रमस्वप्नमद्वैतं बुध्यते तदा ॥१६॥ प्रपंचो यदि विद्येत निवर्तेत न संशयः । मायामात्रमिदं द्वैतमद्वैत परमार्थतः ॥१७॥ विकल्पो विनिवर्तेत कल्पितो यदि केनचित् ।

कांहींहि जाणीत नाहीं. तुरीय मात्र सर्व जाणतो. १२. प्राज्ञ आणि तुर्य या दोहोंनाहि द्वैताचें अग्रहण हे समान आहे. (पण मिथ्याज्ञानाच्या उत्पत्तीचें कारण अशा) बीजनिद्रेनें प्राज्ञ युक्त आहे; आणि तुर्यामध्यें निद्रा मुळींच नसते. १३. पहिले दोन विभु आणि तैजस (अन्यथाज्ञानाला कारण अशा) स्वप्नानें आणि निद्रेनें युक्त आहेत, आणि प्राज्ञ स्वप्नरहित निद्रेनें युक्त असतो. पण तुर्यामध्यें निद्रा नाहीं व स्वप्नहि नाहीं असें ज्ञात्यांनीं निश्चयपूर्वक पाहिलें आहे. १४. मनुष्य अन्यथाज्ञान ग्रहण करतो तेव्हां त्याच्या त्या ज्ञानाला स्वप्न ह्मणतात, आणि ज्ञान ज्याला मुळींच माहीत नाहीं त्याच्या त्या अज्ञानाला निद्रा ह्मणतात. (स्वप्न व निद्रा यांचा अशा) विपर्यास नष्ट झाला ह्मणजे मग तुरीय पद प्राप्त होतें. १५. अनादि अशा मायेनें निद्रावश झालेला जीव जेव्हां जागा होतो तेव्हां त्याला जन्मरहित, निद्रारहित व स्वप्नरहित अशा अद्वैताचें ज्ञान होतें. १६. जर प्रपंच (मूळांत) असेल तर त्याची निवृत्ति होईल अथवा करतां येईल याविषयीं संशय नाहीं. पण हें सर्व द्वैत केवळ माया आहे, वस्तुतः हें अद्वैतच होय. १७. जर एखाद्यानें विकल्पाची कल्पना केली तर ती निवृत्त होईल. (पण जर अमुक असेल तर तमुक होईल इत्यादि द्वैताचा)

प्रतिवुद्धश्च वै सर्वस्तस्मिन्देशे न विद्यते ॥२॥ अभावश्च रथादीनां श्रूयते न्यायपूर्वकम्। वैतथ्यं तेन वै प्राप्तं स्वप्न आहुः प्रकाशितम्॥३॥ अन्तःस्थानात्तु भेदानां तस्माज्जागरिते स्मृतम्। यथा तत्र तथा स्वप्ने संवृतत्वेन भिद्यते ॥४॥ स्वप्नजागरितस्थाने ह्येकमाहुर्मनीषिणः। भेदानां हि समत्वेन प्रसिद्धेनैव हेतुना ॥५॥ आदावन्ते च यन्नास्ति वर्तमानेऽपि तत्तथा। वितथैः सदृशाः सन्तोऽवितथा इव लक्षिताः ॥६॥ सप्रयोजनता तेषां स्वप्ने विप्रतिपद्यते। तस्मादाद्यन्तवत्त्वेन मिथ्यैव खलु ते स्मृताः ॥७॥ अपूर्वं स्थानिधर्मो हि यथा स्वर्गनिवासिनाम्। तानयं प्रेक्षते गत्वा यथैवेह सुशिक्षितः ॥८॥ स्वप्न-

असेहि नाहीं; आणि जागा झाल्यावर देखील पहावें तो मनुष्य त्या स्थानीं असत नाहीं (जागच्या जागींच असतो).२. स्वप्नामध्यें दिसणारे रथादि वास्तविक नसतात असें "न तत्र रथा०" [बृ.४.३.१०] इत्यादि श्रुतिवाक्यानें युक्तिपूर्वक सिद्ध केलें आहे. यामुळें स्वप्नामधलें वैतथ्य उघड होतें.३. अंतःकरणांत गूढ असणारे सर्व दृष्ट पदार्थ जसे मिथ्या असतात तसेच जागृतीमध्येंहि दृष्ट होणारे सर्व पदार्थ मिथ्याच होत.४. (दोन्ही ठिकाणीं पदार्थांचें) भिन्नत्व हा समान हेतु प्रसिद्ध असल्यामुळें स्वप्न व जागृति हीं दोन्ही स्थानें एकच आहेत असें ज्ञाते ह्मणतात.५. जें अगोदर नाहीं व अखेरीस नाहीं तें वर्तमानकाळीं देखील नाहींच (ह्मटलें पाहिजे). (मृगजलादि) असत्य पदार्थांप्रमाणेंच हे पदार्थ असतांहि त्यांना (मूढ जन) सत्य मानतात! ६. जागृतीमध्ये आणि स्वप्नामध्यें फलोत्पत्तीचें सहचरत्व आढळत नाहीं. या पदार्थांना आदि आहे व अंत आहे यामुळें ते मिथ्याच होत.७. ज्याप्रमाणें स्वर्गनिवासी लोकांचे स्थानी या नात्यानें कांहीं अपूर्व धर्म असतात, त्याचप्रमाणें जसा जागृतींत सुशिक्षित पुरुष स्थानिधर्माला अनुसरून पदार्थ पहातो तसाच स्वप्नामध्येंहि पहातो इतकेंच काय तें.८. पुन्हां दुसरें असें कीं, बाह्य इंद्रियांसह चि-

वृत्तावपि त्वन्तश्चेतसा कल्पितं त्वसत् । बहिश्चेतो गृहीतं सत् दृष्टं वैतथ्यमेतयोः ॥९॥ जाग्रद्वृत्तावपि त्वन्तश्चेतसा कल्पितं त्वसत् । बहिश्चेतो गृहीतं सद्युक्तं वैतथ्यमेतयोः ॥१०॥ उभयोरपि वैतथ्यं भेदानां स्थानयोर्यदि । क एतान्बुध्यते भेदान्को वै तेषां विकल्पकः ॥११॥ कल्पयत्यात्मनाऽऽत्मानमात्मा देवः स्वमायया । स एव बुध्यते भेदानिति वेदान्तनिश्चयः ॥१२॥ विकरोत्यपरान्भावानन्तश्चित्ते व्यवस्थितान् । नियतांश्च बहिश्चित्त एवं कल्पयते प्रभुः ॥१३॥ चित्तकाला हि येऽन्तस्तु द्वयकालाश्च ये बहिः । कल्पिता एव ते सर्वे विशेषो नान्यहेतुकः ॥१४॥ अव्यक्ता एव येऽन्तस्तु स्फुटा एव च ये बहिः । कल्पिता एव ते सर्वे विशेषस्त्विन्द्रियान्तरे ॥१५॥ जीवं

त्यानें ग्रहण करतां येणाऱ्या पदार्थांना सत् अथवा दृश्य ह्मणतात; पण स्वप्नामधले दृश्य पदार्थ तर अंतःकरणानें नुसते कल्पिलेलेच असतात. अर्थात् ते सत् ह्मणजे दृश्य नव्हेत. यावरून दोहोंचेंहि वैतथ्य सिद्ध होतें.९. जागृतीमध्यें देखील अंतःकरणानें कल्पिलेल्या पदार्थांस असत् ह्मणतात आणि बाह्येंद्रियांनीं ग्राह्य पदार्थांना सत् ह्मणतात. अर्थात् दोहोंचेंहि असत्यत्व बरोबर आहे.१०. जागृति व स्वप्न या दोन्ही स्थानांतील भेदांचें वैतथ्य जर सिद्ध आहे, तर हे भेद जाणतो कोण व त्यांची विकल्पना करणारा तरी कोण? ११. प्रकाशरूपी आत्मा आपल्या मायेच्या योगानें आपण स्वतःच स्वतःचे ठिकाणीं भेदांची कल्पना करतो. त्यालाच हे भेद माहीत असतात. हा वेदान्ताचा निश्चय आहे.१२. अंतःकरणामध्यें स्थित असणाऱ्या लौकिक पदार्थांना प्रभु अनेकत्व कल्पितो व बाह्य सृष्टींतील अस्थिर पदार्थांना देखील तोच नानात्व कल्पितो.१३. कल्पनाकालीं अस्तित्व असणारे जे आंतर पदार्थ व ज्यांचें अस्तित्व परस्परांवर अवलंबून आहे असे [द्वयकालाः] बाह्य पदार्थ हे दोघेहि भिन्न असले तरी कल्पितच होत.१४. आंतर पदार्थ अस्पष्टच असतात आणि बाह्य पदार्थ स्पष्ट असतात. परंतु दोघेहि कल्पनेंतलेच होत.

कल्पयते पूर्वं ततो भावान्पृथग्विधान्। बाह्यानाध्यात्मिकांश्चैव यथाविद्यस्तथा स्मृतिः ॥१६॥ अनिश्चिता यथा रज्जुरन्धकारे विकल्पिता। सर्पधारादिभिर्भावैस्तद्वदात्मा विकल्पितः ॥१७॥ निश्चितायां यथा रज्ज्वां विकल्पो विनिवर्तते। रज्जुरेवेति चाद्वैतं तद्वदात्मविनिश्चयः ॥१८॥ प्राणादिभिरनन्तैश्च भावैरेतैर्विकल्पितः। मायैषा तस्य देवस्य यथा संमोहितः स्वयम् ॥१९॥ प्राण इति प्राणविदो भूतानीति च तद्विदः। गुणा इति गुणविदस्तत्त्वानीति च तद्विदः ॥२०॥ पादा इति पादविदो विषया इति तद्विदः। लोका इति लोकविदो देवा इति च तद्विदः। २१॥ वेदा इति वेदविदो यज्ञा इति च त-

दोहोंमध्यें भेद दिसतो तो केवळ इंद्रियांमुळें दिसतो.१५. प्रथमतः जीव हा एक स्वतंत्र भिन्न पदार्थ आहे अशी कल्पना होते. या कल्पनेपासून पुढें नानातऱ्हेच्या बाह्य व आध्यात्मिक पदार्थांची कल्पना होते. सर्व कल्पनांचें अधिष्ठान झालेल्या या जीवाला जशी विद्या ह्मणजे बुद्धि प्राप्त होते तशी त्याची कल्पना धांवते.१६. अंधकारामध्यें ज्याप्रमाणें रज्जूचे ठिकाणीं सर्प, धारा इत्यादि पदार्थांची अनिश्चित स्वरूपामुळें कल्पना होते त्याप्रमाणें आत्म्याचे ठिकाणीं निरनिराळी कल्पना होत असते.१७. ही रज्जु आहे असा निश्चय झाला ह्मणजे जसें विकल्पाचेंच निवारण होतें व एकच स्वरूप शिल्लक रहातें त्याप्रमाणें आत्म्याच्या पदार्थस्वरूपाचा निश्चय झाला ह्मणजे (विकल्प जाऊन) अद्वैतच शिल्लक रहातें.१८. त्या ईश्वराच्या मायेनें प्राणादि अनंत भावांचा या आत्म्यावर विकल्प केला जातो. फार काय, या मायेनें स्वतः ईश्वर देखील मूढ होतो.१९. ज्यांना प्राणच सर्वस्व दिसतें ते ह्मणतात, आत्मा हा प्राणच. दुसरे ह्मणतात, आत्मा हा भूतें. तिसरे ह्मणतात, आत्मा ह्मणजे गुण. चवथे ह्मणतात, आत्मा ह्मणजे (आत्मा, अविद्या व शिव हीं तीन) तत्त्वें.२०. याचप्रमाणे (विश्व, तैजस इत्यादि चार) पाद, विषय, लोक, देव, वेद,

द्विदः । भोक्तेति च भोक्तृविदो भोज्यमिति च तद्विदः ॥२२॥ इति सूक्ष्मविदः स्थूल इति च तद्विदः । मूर्त इति मूर्तविदोऽमूर्त इति च तद्विदः ॥२३॥ काल इति कालविदो दिश इति च तद्विदः । वादा इति वादविदो भुवनानीति तद्विदः ॥२४॥ मन इति मनोविदो बुद्धिरिति च तद्विदः । चित्तमिति चित्तविदो धर्माधर्मौ च तद्विदः ॥२५॥ पंचविंशक इत्येके षड्विंश इति चापरे । एकत्रिंशक इत्याहुरनन्त इति चापरे ॥२६॥ लोकाँल्लोकविदः प्राहुराश्रमा इति तद्विदः । स्त्रीपुंनपुंसकं लैंगाः परापरमथापरे ॥२७॥ सृष्टिरिति सृष्टिविदो लय इति च तद्विदः । स्थितिरिति स्थितिविदः सर्वे चेह तु सर्वदा ॥२८॥ यं भावं दर्शयेद्यस्य तं भावं स तु पश्यति । तं चावति स भूत्वाऽसौ तद्ग्रहः समुपैति तम् ॥२९॥ एतैरेषोऽपृथग्भावैः पृथगेवेति लक्षितः । एवं यो वेद तत्त्वेन कल्प-

यज्ञ, भोक्ता, भोज्य, सूक्ष्म, स्थूल, मूर्त, अमूर्त, काल, दिशा, (धातुवाद, मंत्रवाद इत्यादि) वाद, भुवनें, मन, बुद्धि, चित्त, धर्म, अधर्म इत्यादि प्रकारें निरनिराळे लोक आत्म्याचें निरनिराळें स्वरूप सांगतात. २१–२५. तसेच कोणी पंचवीस तत्त्वें [सांख्य], कोणी सव्वीस [पातंजल], कोणी एकतीस [पाशुपत], आणि कोणी अनंत तत्त्वें असें आत्मस्वरूप सांगतात.२६. तसेंच कोणी लोक ह्मणतात, कोणी आश्रय ह्मणतात, लैंग ह्मणतात कीं स्त्री-पुं-नपुंसक हीं लिंगे हेंच आत्मस्वरूप; कोणी ह्मणतात, परब्रह्म व अपरब्रह्म हीं दोन आत्म्याचीं स्वरूपें.२७. सृष्टि, लय, स्थिति हींहि आत्मस्वरूपेंच होत असेंहि ह्मणतात. सारांश, हीं सर्व व इतरहि आत्म्याचेंच स्वरूप होय असें ते ते लोक ह्मणतात.२८. ज्याला जें तत्त्व दाखवावें त्याला तेंच आत्मतत्त्व वाटतें. तेंच तत्त्व आत्मा होऊन त्याचे रक्षण करतें व त्याच भावानें त्याला दर्शन देते.२९. वास्तविक आत्म्याहून भिन्न नसणाऱ्या या भावांनीं जरी आत्म्याची कल्पना

आत्मा ह्याकाशवज्जीवैर्घटाकाशैरिवोदितः । घटादिवच्च संघातैर्जातावेतन्निदर्शनम् ॥३॥ घटादिषु प्रलीनेषु घटाकाशादयो यथा । आकाशे संप्रलीयन्ते तद्वज्जीवा इहाऽऽत्मनि ॥४॥ यथैकस्मिन्घटाकाशे रजोधूमादिभिर्युते । न सर्वे संप्रयुज्यन्ते तद्वज्जीवाः सुखादिभिः ॥५॥ रूपकार्यसमाख्याश्च भिद्यन्ते तत्र तत्र वै । आकाशस्य न भेदोऽस्ति तद्वज्जीवेषु निर्णयः ॥६॥ नाऽऽकाशस्य घटाकाशो विकारावयवौ यथा । नैवाऽऽत्मनः सदा जीवो विकारावयवौ तथा ॥७॥ यथा भवति बालानां गगनं मलिनं मलैः । तथा भवत्यबुद्धानामात्माऽपि मलिनो मलैः ॥८॥ मरणे संभवे चैव गत्यागमनयोरपि । स्थितौ

शासारखा आहे; तो घटाकाशाप्रमाणें जीवरूपानें होतोसा दिसतो. घटादिकांनीं जसें घटाकाश उत्पन्न हो तें तसा शरीरादि कारणसंघातांनीं जीव उत्पन्न होतो. आत्म्याला जन्म आहे असें ह्मटलें ह्मणजे हीच उपपत्ति होय.३. घटादिकांचा नाश झाला ह्मणजे घटाकाशादि ज्याप्रमाणें आकाशांत लय पावतात त्याप्रमाणें जीव (नष्ट झाल्यावर) या आत्म्यामध्यें लय पावतात.४. ज्याप्रमाणें एखादें घटाकाश धुळीनें अथवा धुरानें व्याप्त झालें असतां सर्व घटाकाशें (धुळीनें अथवा धुरानें) व्याप्त होत नाहींत, त्याप्रमाणें एका जीवाला सुखादिक प्राप्त झालें असतां इतर जीवांना तसें प्राप्त होत नाहीं.५. (निरनिराळ्या घटाकाशामध्यें) रूप, कार्य व नांव हीं भिन्न असलीं तरी आकाशामध्यें ज्याप्रमाणें भेद होत नाहीं त्याचप्रमाणें जीवांचे संबंधानें निर्णय जाणावा.६. ज्याप्रमाणें घटाकाश हें आकाशाचा विकार नाहीं अथवा अवयवहि नाहीं, त्याप्रमाणेंच जीव हा आत्म्याचा केव्हांहि विकार नाहीं अथवा अवयवहि नाहीं.७. ज्याप्रमाणें (हवेंत धूमादि) मळ उडाला असला ह्मणजे आकाश मलिन आहे असें बालक ह्मणतात, त्याप्रमाणेंच (दुःखादिक) मलामुळें आत्मा देखील मलिन आहे असें अज्ञ जनांना वाटतें.८. मरण, उत्पत्ति; गमन, आगमन,

सर्वशरीरेषु आकाशेनाविलक्षणः ॥९॥ संघाताः स्वप्नवत्सर्वे आत्ममायाविसर्जिताः । आधिक्ये सर्वसाम्ये वा नोपपत्तिर्हि विद्यते ॥१०॥ रसादयो हि ये कोशा व्याख्यातास्तैत्तिरीयके । तेषामात्मा परो जीवः खं यथा संप्रकाशितः ॥११॥ द्वयोर्द्वयोर्मधुज्ञाने परं ब्रह्म प्रकाशितम् । पृथिव्यामुदरे चैव यथाऽऽकाशः प्रकाशितः ॥१२॥ जीवात्मनोरनन्यत्वमभेदेन प्रशस्यते । नानात्वं निन्द्यते यच्च तदेवं हि समंजसम् ॥१३॥ जीवात्मनोः पृथक्त्वं यत्प्रागुत्पत्तेः प्रकीर्तितम् । भविष्यद्वृत्त्या गौणं तन्मुख्यत्वं हि न युज्यते ॥१४॥ मृल्लोहविस्फुलिङ्गाद्यैः सृष्टिर्या चोदिताऽन्यथा । उपायः सोऽवताराय नास्ति

अथवा स्थिति यांचे ठिकाणीं आत्मा हा सर्व शरीरांमध्यें आकाशाप्रमाणेंच कोणताहि भेद न पावणारा आहे.९. सर्व संघात आत्म्याच्या मायेनें उत्पन्न केलेले अतएव स्वप्नवत् आहेत. कारण संघात अधिक असो, समान असो, ते कांहीं आत्म्याचे अस्तित्व सिद्ध करूं शकत नाहींत.१०. तैत्तिरीय उपनिषदामध्यें रस आदि जे पांच कोश सांगितले आहेत त्या कोशांचा परम जीव आत्मा होय. आकाशाचा दृष्टान्त देऊन आह्मीं जो आत्मा सिद्ध केला आहे तो हाच.११. (बृहदारण्यकांत) मधुब्राह्मणामध्ये आधिदैविक व आध्यात्मिक स्वरूपांचें आणि तसेंच जीवात्मा व परमात्मा यांचें परब्रह्म स्वरूप स्पष्ट सांगितलें आहे. ज्याप्रमाणें पृथिवींतील व उदरांतील आकाश एकच होय तद्वत्.१२. जीव आणि आत्मा हे एक आहेत, भिन्न नाहींत, असें जे सांगतात आणि नानात्वाची जी निंदा करतात, तें याप्रमाणें युक्त आहे.१३. आत्म्यापासून जीव उत्पन्न झाला असें पूर्वी सांगितल्यामुळें जरी दोहोंचें पृथक्त्व सांगितलें असें वाटलें तरी तें पुढील विवेचनावरून गौण ठरतें. तें मुख्य विवेचन समजणें युक्त नव्हे.१४. माती, लोखंड, ठिणग्या इत्यादि प्रकारांनीं सृष्टीचें जें भेदयुक्त वर्णन केलें तें (वर्णन एकत्व सिद्ध करण्याचें) साधन ह्मणून होय. येथें भिन्नत्व मुळींच

भेदः कथंचन ॥१५॥ आश्रमास्त्रिविधा हीनमध्यमोत्कृष्टदृष्टयः । उपासनोपदिष्टेयं तदर्थमनुकंपया ॥१६॥ स्वसिद्धान्तव्यवस्थासु द्वैतिनो निश्चिता दृढम् । परस्परं विरुध्यन्ते तैरयं न विरुध्यते ॥१७॥ अद्वैतं परमार्थो हि द्वैतं तद्भेद उच्यते । तेषामुभयथा द्वैतं तेनायं न विरुध्यते ॥१८॥ मायया भिद्यते ह्येतन्नान्यथाऽजं कथंचन । तत्त्वतो भिद्यमाने हि मर्त्यताममृतं व्रजेत् ॥१९॥ अजातस्यैव भावस्य जातिमिच्छन्ति वादिनः । अजातो ह्यमृतो भावो मर्त्यतां कथमेष्यति ॥२०॥ न भवत्यमृतं मर्त्यं न मर्त्यममृतं तथा । प्रकृतेरन्यथाभावो न कथंचिद्भविष्यति ॥२१॥ स्वभावेनामृतो यस्य भावो गच्छति मर्त्यताम् । कृतकेनामृतस्तस्य कथं स्थास्यति निश्चलः ॥२२॥

नाहीं.१५. हीन दृष्टि, मध्यम दृष्टि आणि उत्कृष्ट दृष्टि असे आश्रमपरंपरेनें चालणाऱ्या लोकांमध्ये तीन प्रकार आहेत. त्यांच्या अनुकंपेनें हें ज्ञान इतक्या निरनिराळ्या तऱ्हेनें येथें सांगितलें आहे.१६. सर्व प्रकारचे द्वैती आपापल्या सिद्धान्ताला चिकटून असतात व परस्परांशी विरोध करीत असतात. परंतु तेणेंकरून आमच्या या अद्वैतसिद्धान्ताला (वास्तविक) विरोध मुळींच नाहीं.१७. अद्वैत हें सत्य आहे. द्वैत त्यापासून भिन्न आहे. अर्थात् द्वैत्यांचें परस्परभिन्नत्व हे एक द्वैत व अद्वैतापासून भिन्नत्व हें दुसरें द्वैत. तेव्हां जें द्वैत तें अद्वैताशीं विरोध कसा करणार? १८. या ब्रह्माचे भेद होतात ते मायेनेंच केवळ होतात, दुसऱ्या कशानेंहि नाहीं. जर हे भेद खरे मानले तर जें अमर तें मर्त्य झाले असें ह्मणावें लागेल. १९. जो भाव जन्मला नाहीं त्याचा जन्म झाला असा वादी वाद करतात. पण जो जन्मरहित व मरणरहित भाव तो (जात अथवा) मर्त्य कसा होऊं शकेल? २०. जें अमर तें मर्त्य होत नाहीं, मर्त्य तें अमर होत नाहीं. प्रकृतिस्वभावाच्या उलट स्थिति होणें कधीं शक्य नाहीं.२१. वभावत: अमर असा भाव देखील मर्त्य होतो असें ह्मणून उपासनेनें जो

भूततोऽभूततो वाऽपि सृज्यमाने समा श्रुतिः । निश्चितं युक्तियुक्तं च यत्तद्भवति नेतरत् ॥२३॥ नेह नानेति चाऽऽम्नायादिंद्रो मायाभिरित्यपि । अजायमानो बहुधा मायया जायते तु सः ॥२४॥ संभूतेरपवादाच्च संभवः प्रतिषिध्यते । को न्वेनं जनयेदिति कारणं प्रतिषिध्यते ॥२५॥ स एष नेति नेतीति व्याख्यातं निह्नुते यतः । सर्वमग्राह्यभावेन हेतुनाऽजं प्रकाशते ॥२६॥ सतो हि मायया जन्म

त्याला पुन्हां अमर करूं इच्छितो त्याचें ते अमरत्व स्वाभाविक नसल्यामुळें कायम कसें टिकणार ? २२. सृष्टि भूतजन्य आहे आणि भूतजन्य नाहीं अशी दोन्ही प्रकारची श्रुति (वास्तविक) समानच आहे. (श्रुतीचा तो कांहीं तात्पर्यार्थ नव्हे). श्रुतीने निश्चित सांगितलेलें व युक्तीनें सिद्ध होणारें असें तत्त्वच केवळ सत्य होय.२३. "नेह नानास्ति किंचन०" [बृ.४.४.१९] आणि "इंद्रो मायाभिः०" [ऋ.६.४७.१८] आणि "अजायमानो बहुधा विजायते०" [ ] इत्यादि श्रुतीवरून (आत्मा जन्म पावत नाहीं), मायेमुळें जन्म पावतोसा वाटतो हे निश्चित आहे.२४. आत्मा जन्म पावत नाहीं* [न जायते.बृ.३.९.२८] असें सांगितल्यामुळें जन्माचा निषेध झाला. "को न्वेनं जनयेत्०" [बृ.३.९.२८] या वाक्यानें कारणाचा निषेध झाला.२५. "स एष नेति नेति०" [बृ.४.५.१५] इत्यादि वचनाने आत्म्याचे शाब्दिक स्वरूप श्रुति झांकून टाकते. त्याचा अर्थ कोणत्याहि भावानें आत्म्याचें ग्रहण करतां येत नाहीं. अर्थात् या कारणामुळें आत्मा अज आहे हें सिद्ध होतें.२६. जी वस्तु सर्वदा सत् आहे तिचा जन्म झाला ह्मणावयाचा

* ईशावास्यांतील मंत्राला अनुलक्षून ही कारिका आहे असें भाष्यामध्यें ह्मटलें आहे. परंतु ईशावास्यांतील संभूति शब्दाचा अर्थ 'जन्म' असा नाही व भाष्यांत दाखल केलेल्या मूळ वचनांत संभूति शब्द नसून 'असंभूति' आहे. अर्थात् आह्मीं वर दिलेल्या 'न जायते' याच श्रुतीला अनुलक्षून कारिका आहे असें आह्मांस वाटतें.

युज्यते न तु तत्त्वतः । तत्त्वतो जायते यस्य जातं तस्य हि जायते ॥२७॥ असतो मायया जन्म तत्त्वतो नैव युज्यते । वन्ध्यापुत्रो न तत्त्वेन मायया वाऽपि जायते ॥२८॥ यथा स्वप्ने द्वयाभासं स्पन्दते मायया मनः । तथा जाग्रद्द्वयाभासं स्पन्दते मायया मनः ॥२९॥ अद्वयं च द्वयाभासं मनः स्वप्ने न संशयः । अद्वयं च द्वयाभासं तथा जाग्रन्न संशयः ॥३०॥ मनोदृश्यमिदं द्वैतं यत्किंचित्सचराचरम् । मनसो ह्यमनीभावे द्वैतं नैवोपलभ्यते ॥३१॥ आत्मसत्यानुबोधेन न संकल्पयते यदा । अमनस्तां तदा याति ग्राह्याभावे तदग्रहम् ॥३२॥ अकल्पकमजं ज्ञानं ज्ञेयाभिन्नं प्रचक्षते । ब्रह्मज्ञेयमजं नित्यमजेनाजं विबुध्यते ॥३३॥ निगृहीतस्य मनसो निर्वि-

तर तो मायिक जन्म होय तात्त्विक नव्हे हें उघड आहे; (एरवीं तिला सत् हें नांव कसें मिळणार?) जर तात्त्विक जन्म होतो असें ह्मटलें, तर जात वस्तुच पुन्हां जन्मास आली असें ह्मणावें लागेल (कारण अज वस्तूचा जन्मच होऊं शकत नाहीं).२७. जी वस्तु असत् आहे तिचा तर मायिक जन्महि कधीं होत नाहीं, व तात्त्विकहि नाहीं. वंध्यापुत्र कधीं तत्त्वानें जन्माला येतो काय? अथवा मायेनें तरी येतो काय? २८. ज्याप्रमाणें स्वप्नामध्यें द्वैताचा आभास मन मायेनें उत्पन्न करतें, त्याप्रमाणेंच जागृतीमध्येंहि द्वैताचा आभास मन मायेनें उत्पन्न करते.२९. वस्तुतः द्वैतरहित मन स्वप्नामध्यें द्वैताचा आभास करतें, तसेंच जागृतीमध्येंहि वस्तुतः द्वैतरहितच असलेलें मन द्वैताचा आभास करतें.३०. चराचर वस्तूंमध्ये जें द्वैत दिसतें तें मनामुळें दिसतें. मनाचा मनोभाव नष्ट झाला ह्मणजे द्वैत दिसत नाहीं.३१. आत्मा सत्य आहे असें ज्ञान झाल्यावर संकल्प नष्ट होतात आणि मग मनोभावाचा नाश होतो. मग त्याला ग्राह्य कांहीं न उरल्यामुळें तें कांहीं ग्रहण करीत नाहीं.३२. संकल्परहित, जन्मरहित व ज्ञानस्वरूपी असा हा आत्मा आहे. हा ज्ञेय ब्रह्माहून भिन्न नाहीं. ज्ञेय ब्रह्म देखील नित्य व जन्मरहित

कल्पस्य धीमतः । प्रचारः स तु विज्ञेयः सुषुप्तेऽन्यो न तत्समः ॥३४॥ लीयते हि सुषुप्ते तन्निगृहीतं न लीयते । तदेव निर्भयं ब्रह्म ज्ञानालोकं समन्ततः ॥३५॥ अजमनिद्रमस्वप्नमनामकमरूपकम् । सकृद्विभातं सर्वज्ञं नोपचारः कथंचन ॥३६॥ सर्वाभिलापविगतः सर्वचिन्तासमुत्थितः । सुप्रशान्तः सकृज्ज्योतिः समाधिरचलोऽभयः ॥३७॥ ग्रहो न तत्र नोत्सर्गश्चिन्ता यत्र न विद्यते । आत्मसंस्थं तदा ज्ञानमजातिसमतां गतम् ॥३८॥ अस्पर्शयोगो वै नाम दुर्दर्शः सर्वयोगिभिः । योगिनो बिभ्यति ह्यस्मादभये भयदर्शिनः ॥३९॥ मनसो निग्रहायत्तमभयं सर्वयोगिणाम् । दुःखक्षयः प्रबोधश्चाप्यक्षया शान्तिरेव च ॥४० उत्सेक उदधेर्यद्वत्कुशाग्रेणैकबिन्दुना । मनसो

आहे. तेव्हां जन्मरहित ब्रह्माचें जन्मरहित आत्म्यालाच ज्ञान होतें.३३. निगृहीत, निर्विकल्प व विवेकी मनाचा प्रचार जाणला पाहिजे. सुषुप्तीसारखा ज्ञानी मनाचा प्रचार नसतो.३४. सुषुप्तीमध्यें मन लय पावतें. पण निगृहीत (ज्ञानयुक्त) मन लय पावत नाहीं. (आत्मस्वरूपच असतें). सर्वत्र ज्ञान पहाणारें हें (मनच) भयरहित ब्रह्म होय.३५. हें ब्रह्म जन्मरहित, निद्रारहित, स्वप्नरहित, नामरहित, रूपरहित, नित्यप्रकाश व सर्वज्ञ आहे. याच्या प्राप्तीला (कर्मोपासनादि) कोणत्याहि उपचाराची आवश्यकता नाहीं.३६. जेथून वाणी गेली, चिंता नाहींशी झाली, अशी ही समाधि, प्रशान्त, सर्वदा प्रकाशस्वरूप, स्थिर व भयरहित असते.३७. जेथें चिंतेचें ह्मणजे विचाराचें कारण उरलें नाहीं, तेथें कोणत्याहि वस्तूचें ग्रहण नाहीं आणि त्याग नाहीं. तेथें ज्ञान आत्मस्वरूप पावतें, अर्थात् ज्ञान आत्म्याहून भिन्न असें उरत नाहीं.३८. योग्यांना दुःखानें प्राप्त होणाऱ्या या योगाला अस्पर्शयोग ह्मणतात. अभय ब्रह्माचें ज्यांना भय वाटतें असे योगी या योगाला भितात.३९. मनाच्या निग्रहानें सर्व योग्यांना अभय प्राप्त होतें, दुःखाचा क्षय होतो, आत्मज्ञान प्राप्त होतें आणि अक्षय अशी शान्ति

निग्रहस्तद्वद्भवेदपरिखेदतः ॥४१॥ उपायेन निगृह्णीयाद्विक्षिप्तं कामभोगयोः । सुप्रसन्नं लये चैव यथा कामो लयस्तथा ॥४२॥ दुःखं सर्वमनुस्मृत्य कामभोगान्निवर्तयेत् । अजं सर्वमनुस्मृत्य जातं नैव तु पश्यति ॥४३॥ लये संबोधयेच्चित्तं विक्षिप्तं शमयेत्पुनः । सकषायं विजानीयात्समप्राप्तं न चालयेत् ॥४४॥ नाऽऽस्वादयेत्सुखं तत्र निःसङ्गः प्रज्ञया भवेत् । निश्चलं निश्चरच्चित्तमेकीकुर्यात्प्रयत्नतः ॥४५॥ यदा न लीयते चित्तं न च विक्षिप्यते पुनः । अनिङ्गनमनाभासं निष्पन्नं ब्रह्म तत्तदा ॥४६॥ स्वस्थं शान्तं सनिर्वाणमकथ्यं सुखमुत्तमम् । अजमजेन ज्ञेयेन सर्वज्ञं परिचक्षते ॥४७॥

प्राप्त होते.४०. ज्याप्रमाणें एकेक बिंदूनें देखील चतुर मनुष्य समुद्राचें शोषण करील, त्याप्रमाणें दृढ निश्चयानें मनाचा निग्रह होऊं शकतो.४१. काम आणि भोग यांमध्यें गुरफटलेल्या मनाचा उपायानें निग्रह करावा. तसेंच (सुषुप्तीमध्यें) लय पावणाऱ्या मनाचाहि निग्रह करावा. जसा काम तसाच लय जाणावा.४२. सर्व प्रकारच्या दुःखांकडे लक्ष देऊन कामभोगांपासून मन निवृत्त करावें. सर्व (विश्वरूपी) ब्रह्म अज आहे असें ध्यान केलें ह्मणजे ब्रह्म जन्म पावलें अशी दृष्टि उरणार नाहीं.४३. (सुषुप्तींत) लय पावलेल्या चित्ताला जागृत करावें, (भोगांमध्यें) गुरफटलेल्या चित्ताला शान्त करावें. मन हें मलिन आहे असें जाणावें. मात्र सम झालें ह्मणजे त्याला चाळवूं नये.४४. त्या समस्थितींत सुखाचा उपभोग घेऊं नये. ज्ञानाच्या साहाय्यानें निःसंग असावें. निश्चल चित्त जर पुन्हां विषयभ्रष्ट होऊं लागेल तर प्रयत्न करून तें एकरूप करावें.४५. जेव्हां चित्ताचा लय होत नाहीं, विक्षेप होत नाहीं, विषयशून्य व आभासशून्य होतें तेव्हां तें ब्रह्मस्वरूप झालें असें समजावें.४६. स्वस्थ, शान्त, मोक्षयुक्त, अकथ्य, उत्तम, अज ब्रह्माबरोबर अज, सर्वज्ञ ब्रह्माबरोबर सर्वज्ञ, असणें हें (ब्रह्मरूप मनाचें) लक्षण होय.४७. सारांश, कोणताहि जीव जन्म

न कश्चिज्जायते जीवः संभवोऽस्य न विद्यते । एतत्तदुत्तमं सत्यं यत्र किंचिन्न जायते ॥४८॥

ज्ञानेनाऽऽकाशकल्पेन धर्मान्यो गगनोपमान् । ज्ञेयाभिन्नेन संबुद्धस्तं वन्दे द्विपदां वरम् ॥१॥ अस्पर्शयोगो वै नाम सर्वसत्त्वसुखो हितः । अविवादोऽविरुद्धश्च देशिकस्तं नमाम्यहम् ॥२॥ भूतस्य जातिमिच्छन्ति वादिनः केचिदेव हि । अभूतस्यापरे धीरा विवदन्तः परस्परम् ॥३॥ भूतं न जायते किंचिदभूतं नैव जायते । विवदन्तो द्वया ह्येवमजातिं ख्यापयन्ति ते ॥४॥ ख्याप्यमानामजातिं तैरनुमोदामहे वयम् । विवदामो न तैः सार्धमविवादं निबोधत ॥५॥ अजातस्यैव धर्मस्य जातिमिच्छन्ति वादिनः । अजातो ह्यमृतो धर्मो

पावत नाहीं, त्याला जन्म देणारा कोणी नाहीं. या जगांत कांहींहि जन्म पावत नाहीं हें अत्यंत सत्य होय.४८.

## ४. अलातशान्तिप्रकरण.

ज्ञेयाशीं एकरूप व आकाशासारख्या अशा ज्ञानानें ज्याला आकाशासारखे महान् धर्म समजतात त्या नरश्रेष्ठाला मी वंदन करतों.१. सर्व जीवांस सुखकारक, कल्याणकारण, ज्यामध्यें वाद नाहीं आणि ज्याचा कोणाशीं विरोध नाहीं असा अस्पर्शयोग नांवाचा योग ज्याच्या योगानें कळतो त्या शास्त्राला मी नमस्कार करतों २. ज्या ह्मणून दृश्य वस्तु आहेत त्या सर्व उत्पन्न होतात असें कोणी द्वैतवादी ह्मणतात, कोणी ह्मणतात अजात वस्तुच उत्पन्न होतात. याप्रमाणे परस्पर वादविवाद करीत असतात. ३. आहे ती वस्तु उत्पन्न होत नाहीं व नाहीं ती वस्तु उत्पन्न होत नाहीं असे याच एकमेकांचे उलट वाद असतात. अर्थात् वास्तविक हे अद्वैतीच होतात व अजन्मच सिद्ध करतात.४. दोघांनीं (याप्रमाणें) सिद्ध केलेल्या अजातिसिद्धान्ताला आमची मान्यता आहे. त्यांच्याशीं वादाचें कारणच रहात नाहीं, हें निर्विवाद जाणा.५. जी वस्तु उत्पन्न झालेली नाहीं ती उ-

मर्त्यतां कथमेष्यति ॥६॥ न भवत्यमृतं मर्त्यं न मर्त्यममृतं तथा। प्रकृतेरन्यथाभावो न कथंचिद्भविष्यति ॥७॥ स्वभावेनामृतो यस्य धर्मो गच्छति मर्त्यताम्। कृतकेनामृतस्तस्य कथं स्थास्यति निश्चलः ॥८॥ सांसिद्धिकी स्वाभाविकी सहजा अकृता च या। प्रकृतिः सेति विज्ञेया स्वभावं न जहाति या ॥९॥ जरामरणनिर्मुक्ताः सर्वे धर्माः स्वभावतः। जरामरणमिच्छन्तश्च्यवन्ते तन्मनीषया ॥१०॥ कारणं यस्य वै कार्यं कारणं तस्य जायते। जायमानं कथमजं भिन्नं नित्यं कथं च तत् ॥११॥ कारणाद्यद्यनन्यत्वमतः कार्यमजं यदि। जायमानाद्धि वै कार्यात्कारणं ते कथं ध्रुवम् ॥१२॥ अजाद्वै जायते यस्य दृष्टान्तस्तस्य नास्ति वै। जाताच्च जायमानस्य न व्यवस्था प्रसज्यते॥ १३॥ हेतो-

त्पन्न होतें असें कोणी वादी ह्मणतात. परंतु ज्याला जन्म नाहीं त्याला मरणहि नाहीं. त्याला मर्त्यत्व कसें प्राप्त होणार? ६. अमर मर्त्य होत नाहीं, मर्त्य अमर होत नाहीं, प्रकृतिस्वभाव केव्हांहि उलट होत नाहीं. ७. वस्तूचा स्वभावतः अमर असणारा धर्म मर्त्य होतो असें जे ह्मणतात, त्यांना असें समजत नाहीं कीं, (स्वभावतः अमर नसतां) अमर केलेला धर्म तसाच ह्मणजे अमर काय ह्मणून टिकेल? ८. जी तर्कानें सिद्ध होते, जी स्वाभाविक, सहज व अकृत आहे तिला प्रकृति असें ह्मणावें. (कारण) ती आपला स्वभाव सोडीत नाहीं. ९. सर्व जीव जरा व मरण यांपासून मुक्त आहेत. जरामरणाच्या कल्पनेनें ते जरामरणयुक्त होतात व त्याच कल्पनेने ते च्युत होतात. १०. कारणाचेंच कार्य होतें असें जे ह्मणतात, त्यांच्या ह्मणण्याप्रमाणें कारण जन्म पावतें असें होतें. मग जें जन्म पावतें तें अज कसें? व जें भिन्न तें नित्य तरी कसें? ११. जर कारण व कार्य एक मानावें तर कार्यहि अज होईल! आणि जन्म पावणाऱ्या कार्याशीं जर कारण एक, तर तें कारण अज कसें होईल? १२. अज वस्तूपासून दुसरी उत्पन्न होते ह्मटलें तर दृष्टान्त सांपडत नाहीं; आणि जात वस्तूपासून उत्पन्न

रादिः फलं येषामादिर्हेतुः फलस्य च । हेतोः फलस्य चानादिः कथं तै-रुपवर्ण्यते ॥१४॥ हेतोरादिः फलं येषामादिर्हेतुः फलस्य च । तथा जन्म भवेत्तेषां पुत्राज्जन्म पितुर्यथा ॥१५॥ संभवे हेतुफलयोरेषितव्यः क्रमस्त्वया । युगपत्संभवे यस्मादसंबन्धो विषाणवत् ॥१६॥ फलादुत्पद्यमानः सन्न ते हेतुः प्रसिध्यति । अप्रसिद्धः कथं हेतुः फलमुत्पादयिष्यति ॥१७॥ यदि हेतोः फलात्सिद्धिः फलसिद्धिश्च हेतुतः । कतरत्पूर्वनिष्पन्नं यस्य सिद्धिरपेक्षया ॥१८॥ अशक्तिरपरिज्ञानं क्रमकोपोऽथ वा पुनः । एवं हि सर्वथा बुद्धैरजातिः परिदीपिता ॥१९॥ बीजांकुराख्यो दृष्टान्तः सदा साध्यसमो हि सः । न हि साध्यसमो हेतुः सिद्धौ साध्यस्य युज्यते ॥२०॥ पूर्वापराप-

होते ह्मटलें तर त्याचीहि व्यवस्था लागत नाहीं.१३. हेतूचें कारण फल आहे असें, आणि फलाचें कारण हेतु आहे असें जे ह्मणतात, ते हेतूचें व फलाचें दोहोंचेंहि अनादित्व सांगतात तरी कसें?१४. हेतूचें कारण फल आहे व फलाचें कारण हेतु आहे असें ह्मणणें ह्मणजे पुत्रापासून पित्याचा जन्म होतो ह्मणण्यासारखेंच होय.१५. हेतु व फल हीं उत्पन्न होतात ह्मटलें तर त्यांचा क्रम सांगितला पाहिजे. दोन्ही एककालीं जन्माला येतात ह्मणाल तर दोन शिंगें जशीं एकदम उत्पन्न होतात तसेंच हें होय व मग या एकमेकांमध्यें संबंध कांहीं असणार नाहीं.१६. फलापासून हेतूची उत्पत्ति ह्मणावी तर ती सिद्ध होत नाहीं. अर्थात् सिद्ध न झालेला हेतु फल कसें उत्पन्न करणार?१७. फलावरून हेतु सिद्ध होतो व हेतूवरून फल सिद्ध होतें असें ह्मणाल तर हीं जीं दोन्ही परस्परापेक्षेनें सिद्ध होतात त्यांपैकीं प्रथम उत्पन्न होणारें कोणतें?१८. अशक्यत्व, अज्ञान, आणि क्रमाचा विपर्यास असे दोष वरील विवेचनावरून उत्पन्न होतात. ह्मणून हें जाणणारांनीं (हे दोष ज्यामध्यें नाहीत असा) अजातिवाद ग्राह्य धरला आहे.१९. कारण बीजांकुराचा दृष्टान्त घेतला ह्मणजे हेतु व साध्य एकच

विज्ञानमजातेः परिदीपकम् । जायमानाद्धि वै धर्मात्कथं पूर्वं न गृह्यते ॥२१॥ स्वतो वा परतो वाऽपि न किंचिद्वस्तु जायते । सदसत्सदसद्वाऽपि न किंचिद्वस्तु जायते ॥२२॥ हेतुर्न जायतेऽनादेः फलं चापि स्वभावतः । आदिर्न विद्यते यस्य तस्य ह्यादिर्न विद्यते ॥२३॥ प्रज्ञप्तेः सनिमित्तत्वमन्यथा द्वयनाशतः । संक्लेशस्योपलब्धेश्च परतन्त्रास्तिता मता ॥२४॥ प्रज्ञप्तेः सनिमित्तत्वमिष्यते युक्तिदर्शनात् । निमित्तस्यानिमित्तत्वमिष्यते भूतदर्शनात् ॥२५॥ चित्तं न संस्पृशत्यर्थं नार्थाभासं तथैव च । अभूतो हि यतश्चार्थो नार्थाभासस्ततः पृथक् ॥२६॥ निमित्तं न सदा चित्तं संस्पृशत्यध्वसु त्रिषु । अनि-

होतात. साध्य सिद्ध करतांना साध्याशीं समान असा हेतु घेणें बरोबर नाहीं.२०. पूर्वींचें कोणतें व पश्चात्चें कोणतें याचें अज्ञान अजाति सिद्धान्त सिद्ध करतें. कारण जो धर्म उत्पन्न झाला त्याला पूर्वकारण नाहीं असें होणें नाहीं.२१. ह्मणून कोणतीहि वस्तु स्वतःपासून अथवा इतरापासून उत्पन्न होत नाहीं. सत्, असत् किंवा सदसत् कोणतीहि वस्तु केव्हांहि उत्पन्न होत नाहीं.२२. फल अनादि असेल तर त्यापासून हेतु उत्पन्न होणार नाहीं आणि फल तर स्वभावतःच अनादि आहे. अर्थात् ज्याला (उत्पत्तीचें) कारण नाहीं, त्याला उत्पत्ति नाहींच.२३. यावर "विषयाची प्रतीति कारणासहवर्तमान होते, नाहीं तर प्रत्यक्ष दिसणाऱ्या द्वैताचा नाश ह्मणावा लागेल, शिवाय (अग्नि आदि) बाह्य कारण नाहीं ह्मटलें तर (दाहादि) क्लेश प्रत्यक्ष होतात, ह्मणून ज्ञान व ज्ञानबाह्य पदार्थ असें द्वैत आहेच" (असें कोणी द्वैती ह्मणेल तर त्यावर आह्मी उत्तर देतों कीं,) प्रज्ञप्ति ही सनिमित्त आहे असें युक्तीनें तुह्मी ह्मणतां खरें, पण वस्तूचें यथार्थ ज्ञान झालें ह्मणजे निमित्ताचें निमित्तत्वच नाहींसें होतें.२५. अर्थाचा किंवा अर्थाभासाचा चित्ताला स्पर्श होत नाहीं. कारण अर्थ हा अभूत आहे, व अर्थाभास त्याहून निराळा नाहीं.२६. तिन्ही काळांमध्यें विष-

मित्तो विपर्यासः कथं तस्य भविष्यति ॥२७॥ तस्मान्न जायते चित्तं चित्तदृश्यं न जायते । तस्य पश्यन्ति ये जातिं खे वै पश्यन्ति ते पदम् ॥२८॥ अजातं जायते यस्मादजातिः प्रकृतिस्ततः । प्रकृतेरन्यथाभावो न कथंचिद्भविष्यति ॥२९॥ अनादेरन्तवत्त्वं च संसारस्य न सेत्स्यति । अनंतता चादिमतो मोक्षस्य न भविष्यति ॥३०॥ आदावन्ते च यन्नास्ति वर्तमानेऽपि तत्तथा । वितथैः सदृशाः सन्तोऽवितथा इव लक्षिताः ॥३१॥ सप्रयोजनता तेषां स्वप्ने विप्रतिपद्यते । तस्मादाद्यन्तवत्त्वेन मिथ्यैव खलु ते स्मृताः ॥३२॥ सर्वे धर्मा मृषा स्वप्ने कायस्यान्तर्निदर्शनात् । संवृतेऽस्मिन्प्रदेशे वै भूतानां दर्शनं कुतः ॥३३॥ न युक्तं दर्शनं गत्वा कालस्यानियमाद्गतौ ।

याचा चित्ताला स्पर्श होत नाहीं. विषय नसल्यावर मग त्या चित्ताचा विपर्यास कसा होणार?२७. ह्मणून चित्त उत्पन्न होत नाहीं, चित्ताचें दृश्य ह्मणजे विषय उत्पन्न होत नाहीं. हीं उत्पन्न होतात असें जे मानतात ते आकाशांत (ढग हे माणसाचीं) पाऊलें (आहेत असें) मानणारे ह्मटले पाहिजे.२८. ज्याच्यापासून अजात ब्रह्म झालें त्याच्यापासूनच अजात प्रकृति झाली (ह्मणजे ब्रह्म व प्रकृति दोन्ही अजात आहेत). प्रकृति आपला स्वभावधर्म केव्हांहि सोडीत नाहीं.२९. संसार अनादि आहे असें मानलें तर त्याचा अंत होणार नाहीं असें ह्मणावें लागेल; आणि मोक्षाला जन्म आहे असें ह्मटलें तर त्याला अंत आहे असें ह्मणावें लागेल.३०. जें भूतकाळीं नाहीं व भविष्यकाळीं नाहीं तें वर्तमानकाळींहि नसणारच. (मृगजलादि) असत्य पदार्थांप्रमाणेंच हे पदार्थ असतांहि त्यांना (मूढ जन) सत्य मानतात.३१. जागृतीमध्यें आणि स्वप्नामध्यें फलोत्पत्तीचें सहचरत्व आढळत नाहीं. या पदार्थांना आदि आहे व अंत आहे यामुळें हे मिथ्याच होत.३२. शरीराच्या आंत दृष्टीस पडतात ह्मणून स्वप्नांतले सर्व धर्म मिथ्या होत. एवढ्याशा लहान प्रदेशांत सत्य वस्तूंचें दर्शन कसें

प्रतिबुद्धश्च वै सर्वस्तस्मिन्देशे न विद्यते ॥३४॥ मित्राद्यैः सह संमन्त्र्य संबुद्धो न प्रपद्यते । गृहीतं चापि यत्किंचित्प्रतिबुद्धो न पश्यति ॥३५॥ स्वप्ने चावस्तुकः कायः पृथगन्यस्य दर्शनात् । यथा कायस्तथा सर्वं चित्तदृश्यमवस्तुकम् ॥३६॥ ग्रहणाज्जागरितवत्तद्धेतुः स्वप्न इष्यते । तद्धेतुत्वात्तु तस्यैव सज्जागरितमिष्यते ॥३७॥ उत्पादस्याप्रसिद्धत्वादजं सर्वमुदाहृतम् । न च भूतादभूतस्य संभवोऽस्ति कथंचन ॥३८॥ असज्जागरिते दृष्ट्वा स्वप्ने पश्यति तन्मयः । असत्स्वप्नेऽपि दृष्ट्वा च प्रतिबुद्धो न पश्यति ॥३९॥ नास्त्यसद्धेतुकमसत्सदसद्धेतुकं तथा । सच्च सद्धेतुकं नास्ति सद्धेतुकमसत्कुतः

व्हावें ?३३. कालाचा नियम चुकतो ह्मणून मनुष्य स्वप्नांत दिसणाऱ्या ठिकाणीं मनुष्य प्रत्यक्ष जातो असें ह्मणणें शक्य नाहीं. तसेंच जागा झाला ह्मणजे मनुष्य कोणत्याहि ठिकाणीं गेलेला नसतो असें जाणतो. ३४. स्वप्नांमध्यें मित्रादिकांबरोबर विचार केला तरी जागा झाल्यावर तो अनुभवास येत नाहीं, स्वप्नांत कांहीं घेतलें असलें तरी तें जागेपणीं मिळत नाहीं. ३५. स्वप्नांतलें शरीर वास्तविक नसतें, कारण त्याचें प्रत्यक्ष शरीर एकाच ठिकाणीं पडलेलें असतें. ज्याप्रमाणें स्वप्नांत शरीर खोटें त्याचप्रमाणें स्वप्नांत चित्ताला ज्या ज्या वस्तु दिसल्या त्या त्या खोट्याच होत. ३६. जागृत स्थितीमध्यें दिसणाऱ्या वस्तूप्रमाणें स्वप्नांतल्या वस्तु दिसतात ह्मणून स्वप्नाचें जागृति हें कारण होय. (पण) या कारणामुळें स्वप्नस्थ मनुष्याच्याच दृष्टीनें त्याचे जागृतींतले व्यवहार सत्य असतात. ३७. उत्पत्ति कोणत्याहि प्रकारें सिद्ध होत नाहीं ह्मणून हें सर्व अज आहे असें ह्मटलें आहे. जें उत्पन्न झालें त्याच्यापासून जें उत्पन्न झालें नाहीं त्याची केव्हांहि उत्पत्ति होणें शक्य नाहीं. ३८. जागृतीमध्यें मिथ्या वस्तु पाहून तन्मय होत्साता मनुष्य स्वप्नामध्यें ती पहातो; परंतु मिथ्या वस्तु स्वप्नांत पाहिली तरी ती जागृतीमध्यें त्याला दिसत नाहीं. ३९. असतापासून असत् उत्पन्न होत

॥४०॥ विपर्यासाद्यथा जाग्रदचिन्त्यान्भूतवत्स्पृशेत्। तथा स्वप्ने विपर्यासाद्धर्मांस्तत्रैव पश्यति ॥४१॥ उपलम्भात्समाचारादस्तिवस्तुत्ववादिनाम्। जातिस्तु देशिता बुद्धैरजातेस्त्रसतां सदा ॥४२॥ अजातेस्त्रसतां तेषामुपलम्भाद्वियन्ति ये। जातिदोषा न सेत्स्यन्ति दोषोऽप्यल्पो भविष्यति ॥४३॥ उपलम्भात्समाचारान्मायाहस्ती यथोच्यते। उपलम्भात्समाचारादस्तिवस्तु तथोच्यते ॥४४॥ जात्याभासं चलाभासं वस्त्वाभासं तथैव च। अजाचलमवस्तुत्वं विज्ञानं शान्तमद्वयम् ॥४५॥ एवं न जायते चित्तमेवं धर्मा अजाः स्मृताः। एवमेव विजानन्तो न पतन्ति विपर्यये ॥४६॥ ऋजुवक्रादिकाभास-

नाहीं, असतापासून सत् उत्पन्न होत नाहीं, सतापासूनहि सत् उत्पन्न होत नाहीं; तर सतापासून असत् कसें उत्पन्न होणार?४०. जागृत मनुष्य ज्याप्रमाणें भ्रमानें मिथ्या वस्तु सत्य समजतो त्याप्रमाणेंच स्वप्नामध्यें देखील मनुष्य भ्रमानें मिथ्या वस्तु पहातो.४१. अजातिवादाला भिणारे व वस्तूचें अस्तित्व सत्य मानणारे असे (अज्ञ) लोक आहेत, व त्यांचा आचार चांगला रहावा ह्मणून ज्ञात्यांनीं (श्रुतिस्मृत्यादिकांमध्यें विश्वाची) उत्पत्ति सांगितली आहे.४२. अजातिवादाला भिणाऱ्या या लोकांच्या उपलब्धीमुळें जे (आपणहि भिऊन अजातिवादापासून) च्युत होतात, (त्यांच्याकरितां वरील जातिवाद सांगितला तरी तेवढ्यावरून त्या) जातिवादामध्यें दोष आहेत असें सिद्ध होत नाहीं; (व अजातिवादहि चुकीचा ठरत नाहीं). (अशा) जातिवादामध्यें दोषहि अल्प आहे.४३. (दृष्टीला) उपलब्धि होते ह्मणून, व (चार लोक) सत्य मानतात ह्मणून, ज्याप्रमाणें मायानिर्मित हत्ती सत्य भासतो, त्याप्रमाणेंच हा सर्व संसार आहे असाच लोक समजतात.४४. उत्पन्न होतें असें भासणारें, चल आहे असें भासणारें व वस्तुयुक्त भासणारें विज्ञान वस्तुतः अज, अचल, निर्गुण, शांत व एकस्वरूपी आहे.४५. याप्रमाणें चित्त उत्पन्न होत नाहीं, याप्र-

मलातस्पन्दितं यथा। ग्रहणग्राहकाभासं विज्ञानस्पन्दितं तथा ॥४७॥ अस्पन्दमानमलातमनाभासमजं यथा । अस्पन्दमानं विज्ञानमनाभासमजं तथा ॥४८॥ अलाते स्पन्दमाने वै नाभासा अन्यतोभुवः। न ततोऽन्यत्र निस्पन्दान्नालातं प्रविशन्ति ते ॥४९॥ न निर्गता अलातात्ते द्रव्यत्वाभावयोगतः। विज्ञानेऽपि तथैव स्युराभासस्याविशेषतः ॥५०॥ विज्ञाने स्पन्दमाने वै नाऽऽभासा अन्यतोभुवः । न ततोऽन्यत्र निस्पंदान्न विज्ञानं विशन्ति ते ॥५१॥ न निर्गतास्ते विज्ञानात् द्रव्यत्वाभावयोगतः । कार्यकारणताभावाद्यतोऽचिन्त्याः सदैव ते ॥५२॥ द्रव्यं द्रव्यस्य हेतुः स्यादन्यदन्यस्य चैव हि । द्रव्यत्वमन्यभावो वा धर्माणां नोपपद्यते ॥५३॥ एवं न चित्तजा धर्माश्चित्तं वाऽपि न धर्मजम् । एवं हेतुफलाजातिं प्रविशन्ति मनीषिणः

माणें सर्व धर्म अज आहेत हें जे जाणतात ते भ्रम पावत नाहींत.४६. कोलीत फिरविलें असतां ज्याप्रमाणें त्याचा सरळ अथवा वांकडा आकार दिसतो त्याप्रमाणें विज्ञानाच्या स्पंदनामुळें ग्रहण व ग्राहक यांचा आभास होतो.४७. कोलीत स्थिर असलें ह्मणजे ज्याप्रमाणें ज्वाला निघत नाहीं व त्याचाहि आभास होत नाहीं त्याप्रमाणें विज्ञान स्थिर असलें ह्मणजे तें अज व अनाभास होतें.४८. कोलीत फिरविलें ह्मणजे होणारे आभास दुसरीकडून आलेले नसतात, व स्थिर झालें ह्मणजे ते दुसरीकडे जात नाहींत, ते त्यांत प्रवेश करीत नाहींत.४९. द्रव्य नसल्यामुळें हे आभास त्या अलातापासून उत्पन्न होत नाहींत. विज्ञानाचे आभास देखील असेच मिथ्या होत.५०. विज्ञानाचे आभास देखील दुसरीकडून आलेले नसतात, ते दुसरीकडे जात नाहींत, ते त्यांत प्रवेश करीत नाहींत.५१. आभास द्रव्य नसल्यामुळें विज्ञानापासून उत्पन्न होत नाहींत. कारण दोहोंमध्यें कार्यकारणभाव नाहीं. ह्मणून हे आभास नेहमीं अचिंत्य होत.५२. एक द्रव्य दुसऱ्या द्रव्याचें कारण असतें. पण धर्म हे द्रव्य नाहींत. किंवा

॥५४॥ यावद्धेतुफलावेशस्तावद्धेतुफलोद्भवः क्षीणे हेतुफलावेशे नास्ति हेतुफलोद्भवः ॥५५॥ यावद्धेतुफलावेशः संसारस्तावदायतः । क्षीणे हेतुफलावेशे संसारं न प्रपद्यते ॥५६॥ संवृत्या जायते सर्वं शाश्वतं नास्ति तेन वै। सद्भावेन ह्यजं सर्वमुच्छेदस्तेन नास्ति वै ॥५७॥ धर्मा य इति जायन्ते जायन्ते ते न तत्त्वतः । जन्म मायोपमं तेषां सा च माया न विद्यते ॥५८॥ यथा मायामयाद्बीजाज्जायते तन्मयोऽङ्कुरः । नासौ नित्यो न चोच्छेदी तद्वद्धर्मेषु योजना ॥५९॥ नाजेषु सर्वधर्मेषु शाश्वताशाश्वताभिधा । यत्र वर्णा न वर्तन्ते विवेकस्तत्र नोच्यते ॥६०॥ यथा स्वप्ने द्वयाभासं चित्तं चलति मायया। तथा जाग्रद्द्वयाभासं चित्तं चलति मायया ॥६१॥ अद्वयं च द्वया-

अद्वयहि नाहींत.५३. याप्रकारें धर्म चित्तापासून उत्पन्न होत नाहींत. चित्त धर्मापासून उत्पन्न होत नाहीं. याप्रमाणें ज्ञाते हेतु व फल हीं अज आहेत असें जाणतात.५४. जोंपर्यंत हेतूचा व फलाचा भास असतो तोंपर्यंत हेतु व फल यांचें अस्तित्व. हेतु व फल यांचा आभास नष्ट झाला ह्मणजे ते नाश पावतात. ५५. हेतु व फल यांचा भास असतो तोंपर्यंत या संसाराचा विस्तार. हेतु व फल यांचा भास गेला ह्मणजे संसार संपलाच.५६. आभासानें सर्व उत्पन्न होतें, त्यानें कांहीं शाश्वत उत्पन्न होत नाहीं. पण खरोखर हें सर्व अज आहे. यामुळें त्याचा उच्छेदहि केव्हां होणार नाहीं.५७. जे धर्म उत्पन्न होतात असें ह्मणतात ते तत्त्वतः उत्पन्न होत नाहींत. त्यांचा जन्म मायेसारखाच आहे आणि माया तर मुळीं नाहींच.५८. मायामय बीजापासून जसा मायामयच अंकुर निघतो, (ह्मणजे) तो नित्य नव्हे व विनाशीहि नव्हे, त्याप्रमाणें धर्मासंबंधानें जाणावें.५९. जे धर्म अज, त्याविषयीं शाश्वत अथवा अशाश्वत कांहींच बोलतां येत नाहीं. जेथें कांहीं स्वरूपच नाहीं तेथें त्यासंबंधाचा विचार कसला असणार ?६०. जसें स्वप्नामध्यें द्वैताचा आभास पावणारें चित्त मायेनें चलन पावतें; तसेंच

भासं चित्तं स्वप्ने न संशयः । अद्वयं च द्वयाभासं तथा जाग्रन्न संशयः ॥६२॥ स्वप्नदृक्प्रचरन्स्वप्ने दिक्षु वै दशसु स्थितान् । अंडजान्स्वेदजान्वाऽपि जीवान्पश्यति यान् सदा ॥६३॥ स्वप्नदृक्चित्तदृश्यास्ते न विद्यन्ते ततः पृथक् । तथा तद्दृश्यमेवेदं स्वप्नदृक्चित्तमिष्यते ॥६४॥ चरञ्जागरिते जाग्रद्दिक्षु वै दशसु स्थितान् । अंडजान्स्वेदजान्वाऽपि जीवान्पश्यति यान्सदा ॥६५॥ जाग्रच्चित्तेक्षणीयास्ते न विद्यन्ते ततः पृथक् । तथा तद्दृश्यमेवेदं जाग्रतश्चित्तमिष्यते ॥६६॥ उभे ह्यन्योन्यदृश्ये ते किं तदस्तीति नोच्यते । लक्षणाशून्यमुभयं तन्मतेनैव गृह्यते ॥६७॥ यथा स्वप्नमयो जीवो जायते म्रियतेऽपि च । तथा जीवा अमी सर्वे भवन्ति न भवन्ति च ॥६८॥ यथा मायामयो जीवो जायते म्रियतेऽपि च । तथा जीवा अमी सर्वे

जागृतीमध्यें द्वैताचा आभास पावणारें चित्त मायेनें चलन पावतें.६१. (वास्तविक) अद्वैत असें चित्त स्वप्नांत द्वैताचा आभास पावतें, तसेंच जागृतीमध्येंहि अद्वैत चित्तच द्वैताचा आभास पावतें.६२. स्वप्न पहाणारा मनुष्य जसा दाही दिशांमध्ये स्थित असे जे अंडज अथवा स्वेदज जीव पहातो ते आपल्या चित्तानें मात्र पहातो, त्याच्या चित्ताहून ते वेगळे नसतात, तसेंच त्याचें चित्त देखील त्यालाच दृश्य असत.६३.६४. याप्रमाणेच जागृतावस्थेंत मनुष्य दाही दिशांमध्यें स्थित असे जे अंडज अथवा स्वेदज जीव पहातो ते तो आपल्या चित्तानें मात्र पहातो. त्याच्या चित्ताहून ते वेगळे नसतात. तसेंच त्याचें चित्त देखील त्यालाच दृश्य असतें.६५.६६. कारण ते चित्त व तो जीव अन्योन्यदृश्य आहेत. तर मग तें काय आहे, तर सांगतों कीं, दोन्ही (चित्त व जीव) लक्षणाशून्य आहेत. दोघांचेंहि आभासानेंच ग्रहण होतें.६७. स्वप्नमय जीव जसा उत्पन्न होतो व मरण पावतो त्याचप्रमाणे हे सर्व जीव उत्पन्न होतात व मरण पावतात.६८. मायामय जीव जसा उत्पन्न होतो व मरण पावतो

भवन्ति न भवन्ति च ॥६९॥ यथा निर्मितको जीवो जायते म्रियतेऽपि वा। तथा जीवा अमी सर्वे भवन्ति न भवन्ति च ॥७०॥ न कश्चिज्जायते जीवः संभवोऽस्य न विद्यते। एतत्तदुत्तमं सत्यं यत्र किंचिन्न जायते ॥७१॥ चित्तस्पन्दितमेवेदं ग्राह्यग्राहकवद्द्वयम्। चित्तं निर्विषयं नित्यमसङ्गं तेन कीर्तितम् ॥७२॥ योऽस्ति कल्पितसंवृत्त्या परमार्थेन नास्त्यसौ। परतन्त्राभिसंवृत्त्या स्यान्नास्ति परमार्थतः ॥७३॥ अजः कल्पितसंवृत्त्या परमार्थेन नाप्यजः। परतन्त्राभिनिष्पत्त्या संवृत्त्या जायते तु सः ॥७४॥ अभूताभिनिवेशोऽस्ति द्वयं तत्र न विद्यते। द्वयाभावं स बुद्ध्वैव निर्निमित्तो न जायते ॥७५॥ यदा न लभते हेतूनुत्तमाधममध्यमान्। तदा न जायते चित्तं हेत्वभावे फलं कुतः ॥७६॥ अनिमित्तस्य चित्तस्य याऽनुत्प-

त्याचप्रमाणें हे सर्व जीव उत्पन्न व मरण पावतात.६९. (कांहीं युक्तीनें) निर्माण केलेला जीव जसा उत्पन्न होतो व मरण पावतो त्याचप्रमाणें हे सर्व जीव उत्पन्न होतात व मरण पावतात.७०. कोणताहि जीव उत्पन्न होत नाहीं, त्याला जन्म नाहीं. 'कांहींहि उत्पन्न होत नाहीं' हेंच अत्यंत सत्य होय.७१. ग्राह्य व ग्राहक हे द्वैत चित्तस्फुरणच होय. ह्मणून चित्त निर्विषय, नित्य व असंग असें ह्मटलें आहे. ७२. कल्पनेच्या आभासानें ज्याला अस्तित्व त्याचें तें अस्तित्व खरें नव्हे. त्याचें अस्तित्व परतंत्र होय, वास्तविक नाहीं.७३. ब्रह्म अज आहे हा देखील कल्पनेचा आभास होय. वास्तविक अजहि नाहीं. त्याचें हें अजत्व देखील परतंत्रच होय, व त्याचा जन्महि परतंत्रच होय. ह्मणजे वस्तुतः ब्रह्म जन्मरहित नाहीं व जन्मयुक्तहि नाहीं. ७४. जे नाहीं त्याच्या अभिमानानें सर्व आभास होतो. वास्तविक द्वैत नाहीं. द्वैताचा अभाव जाणून जो निर्निमित्त झाला त्याला जन्म रहात नाहीं.७५. उत्तम, अधम अथवा मध्यम हेतु नाहींत तेव्हां चित्तहि

त्तिः समाऽद्वया । अजातस्यैव सर्वस्य चित्तदृश्यं हि तद्यतः ॥७७॥ बुद्ध्वाऽनिमित्ततां सत्यां हेतुं पृथगनाप्नुवन् । वीतशोकं तथा काममभयं पदमश्नुते ॥७८॥ अभूताभिनिवेशाद्धि सदृशे तत्प्रवर्तते । वस्त्वभावं स बुद्ध्वैव निःसङ्गं विनिवर्तते ॥७९॥ निवृत्तस्याप्रवृत्तस्य निश्चला हि तदा स्थितिः । विषयः स हि बुद्धानां तत्साम्यमजमद्वयम् ॥८०॥ अजमनिद्रमस्वप्नं प्रभातं भवति स्वयम् । सकृद्विभातो ह्येवैष धर्मो धातुस्वभावतः ॥८१॥ सुखमाव्रियते नित्यं दुःखं विव्रियते सदा । यस्य कस्य च धर्मस्य ग्रहेण भगवानसौ ॥८२॥ अस्ति नास्त्यस्ति नास्तीति नास्ति नास्तीति वा पुनः । चलस्थिरोभयाभावैरावृणोत्येव बालिशः ॥८३॥ कोट्यश्चतस्र एतास्तु ग्रहै-

जन्म पावत नाहीं. हेतु नसेल तर फल कोठून ? ७६. निमित्तरहित चित्ताची जी अजत्वास्थिति ती एकरूप आणि द्वैतरहित असते. कारण सर्व चित्तदृश्य अजात जीवालाच होतें.७७. आपलें चित्त खरोखर निर्निमित्त आहे असें ज्ञान झालें, ह्मणजे मग कांहीं निराळा हेतु न उरल्यामुळें, मनुष्य शोकरहित, व इच्छारहित व भयरहित असे (शाश्वत) पद पावतो.७८. मिथ्या वस्तूच्या अभिनिवेशानें मनुष्य तत्सदृश मिथ्या गोष्टींकडे प्रवृत्त होतो. वस्तूचें मिथ्यात्व जाणलें ह्मणजे निःसंग होत्साता निवृत्त होतो.७९. निवृत्त व (अर्थात्) प्रवृत्तिरहित झाला ह्मणजे त्याची निश्चल स्थिति असते. हें अज व अद्वय समत्व हा ज्ञात्यांचा विषय आहे.८०. त्यांचें चित्त अज, अनिद्र, अस्वप्न व स्वयंप्रकाश असते. कारण त्यांचें चित्त ह्मणजे आत्मा हा स्वभावतःच सर्वदा प्रकाशमान असतो.८१. (या आत्म्याला) एखाद्या धर्माचा जर अभिमान उत्पन्न झाला, तर तो त्यानें सहज आच्छादित होतो व तें आच्छादन दूर होणें कठिण जातें.८२. आहे, नाहीं, आहे–नाहीं, अथवा नाहीं–नाहीं, इत्यादि चल, स्थिर, उभय, व दोन्हीविरहित अशा प्रकारच्या

यासां सदाऽऽवृतः । भगवानाभिरस्पृष्टो येन दृष्टः स सर्वदृक् ॥८४॥ प्राप्य सर्वज्ञतां कृत्स्नां ब्राह्मण्यं पदमद्वयम् । अनापन्नादिमध्यान्तं किमतः परमीहते ॥८५॥ विप्राणां विनयो ह्येष शमः प्राकृत उच्यते । दमः प्रकृतिदान्तत्वादेवं विद्वाञ्शमं व्रजेत् ॥८६॥ सवस्तु सोपलम्भं च द्वयं लौकिकमिष्यते । अवस्तु सोपलम्भं च शुद्धं लौकिकमिष्यते ॥८७॥ अवस्त्वनुपलम्भं च लोकोत्तरमिति स्मृतम् । ज्ञानं ज्ञेयं च विज्ञेयं सदा बुद्धैः प्रकीर्तितम् ॥८८॥ ज्ञाने च त्रिविधे ज्ञेये क्रमेण विदिते स्वयम् । सर्वज्ञता हि सर्वत्र भवतीह महाधियः ॥८९॥ हेयज्ञेयाप्यपाक्यानि विज्ञेयान्यग्रयाणतः । तेषामन्यत्र विज्ञेयादुपलम्भस्त्रिषु स्मृतः ॥९०॥ प्रकृत्याऽऽकाशवज्ज्ञेयाः सर्वे धर्मा अना-

कल्पनांनी अज्ञ मनुष्याचा आत्मा आच्छादित होतो.८३. आत्मा या चार कोट्यांनीं सदा आच्छादित असतो (असा भासतो). भगवान् आत्मा यांनीं संस्पृष्ट नाहीं असें जो प्रत्यक्ष अनुभवतो तो सर्वज्ञ होय.८४. सर्व प्रकारची सर्वज्ञता प्राप्त झाल्यावर, व आदि–मध्य–अंत–रहित असें अद्वय ब्रह्मपद प्राप्त झाल्यावर मग जास्त इच्छा कसली उरणार ?८५. ब्राह्मणांचा विनय हाच, स्वभावसिद्ध शम हाच, व प्रकृतीचें दमन करणारा दम हाच. हें ज्ञान झाल्यावर ज्ञाता शांति पावतो.८६. व्यावहारिक द्वैत वस्तु व वस्तुदर्शन यांसह असतें; व्यावहारिक शुद्ध द्वैत वस्तुरहित पण वस्तुदर्शनानें युक्त असतें.८७. वस्तुरहित व वस्तुदर्शनरहित जें द्वैत तें लोकोत्तर ह्मणजे अव्यावहारिक होय. ज्ञान, ज्ञेय आणि विज्ञेय हीं अशा प्रकारें ज्ञात्यांनीं सांगितलीं आहेत.८८. त्रिविध ज्ञान व ज्ञेय हीं क्रमानें जाणलीं ह्मणजे तो ज्ञाता, या लोकीं सर्व होतो.८९. प्रथमतः हेय, ज्ञेय, आप्य आणि पाक्य हीं समजून घ्यावीं. यांपैकीं ज्ञेयाहून इतर ज्ञानरूप नसतील तेव्हां तीं उपलंभनीय आहेत असें समजावें.९०. सर्व धर्म ह्मणजे जीव स्वभावतः आकाशासारखे व अनादि आहेत. त्यांच्यामध्यें कोठेंहि कसलेंहि

दयः । विद्यते न हि नानात्वं तेषां क्वचन किंचन ॥९१॥ आदिबुद्धाः प्रकृत्यैव सर्वे धर्माः सुनिश्चिताः । यस्यैवं भवति क्षान्तिः सोऽमृतत्वाय कल्पते ॥९२॥ आदिशान्ता ह्यनुत्पन्नाः प्रकृत्यैव सुनिर्वृताः । सर्वे धर्माः समाभिन्ना अजं साम्यं विशारदम् ॥९३॥ वैशारद्यं तु वै नास्ति भेदे विचरतां सदा । भेदनिम्नाः पृथग्वादास्तस्मात्ते कृपणाः स्मृताः ॥९४॥ अजे साम्ये तु ये केचिद्भविष्यन्ति सुनिश्चिताः । ते हि लोके महाज्ञानास्तच्च लोको न गाहते ॥९५॥ अजेष्वजमसंक्रांतं धर्मेषु ज्ञानमिष्यते । यतो न क्रमते ज्ञानमसंगं तेन कीर्तितम् ॥९६॥ अणुमात्रेऽपि वैधर्म्ये जायमानेऽविपश्चितः । असंगता सदा नास्ति किमुताऽऽवरणच्युतिः ॥९७॥ अलब्धावरणाः सर्वे धर्माः प्रकृतिनिर्मलाः । आदौ बुद्धास्तथा मुक्ता बुध्यन्त इति नायकाः ॥९८॥ क्रमते न हि बुद्धस्य ज्ञानं धर्मेषु तापिनः । सर्वे

नानात्व नाहीं.९१. स्वभावतः सर्व जीव प्रथमपासून ज्ञानस्वरूपी आहेत, हें निश्चित आहे. याप्रमाणें ज्याला शांति प्राप्त झाली तो मोक्ष पावतो.९२. हें ब्रह्म अज, सम, आणि शुद्ध आहे ह्मणून सर्व जीव देखील पूर्णपणें शान्त, अज व स्वभावतःच समाधानी आहेत.९३. सर्वदा भेददर्शनें व्यवहार करणारांची चित्तशुद्धि होत नाहीं. द्वैताचा वाद करणारे लोक द्वैतामध्येंच बुडून जातात, ह्मणून ते कृपण ह्मणजे दीन होत. परंतु अज व सम अशा ब्रह्माच्या ठिकाणीं जे निश्चित झाले ते या लोकामध्यें महाज्ञानी होत, त्यांचें ज्ञान इतरांना कळणें शक्य नाहीं.९५. अज धर्मांत अज ज्ञान स्वभावतः असतें; तें दुसरीकडे जात नाहीं ह्मणून तें ज्ञान असंग आहे असें ह्मणतात.९६. परंतु जर मूढ मनुष्याला अणुमात्र वैधर्म्य होईल तर त्याचें असंगत्व नष्ट होतें, व मग त्याच्या बंधाचा नाश होत नाहीं.९७. सर्व जीव मायेंत न गुरफटलेले व स्वभावतः शुद्ध व प्रथमपासून ज्ञानी असे असतात. हें ज्ञान ज्ञानी पुरुषांस असतें.९८.

धर्मास्तथा ज्ञानं नैतद् बुद्धेन भाषितम् ॥९९॥ दुर्दर्शमतिगम्भीरमजं साम्यं विशारदम् । बुद्ध्वा पदमनानात्वं नमस्कुर्मो यथाबलम् ॥१००॥

इति गौडपादाचार्यकृता मांडूक्योपनिषत्कारिकाः समाप्ताः ॥

---

ज्ञात्याचें ज्ञान जीवांमध्यें संक्रमण पावत नाहीं. त्याचप्रमाणें सर्व जीव याप्रमाणेंच होत. बुद्धानें हें ज्ञान सांगितलें नाहीं. ९९. दिसण्यास कठिण, अति गंभीर, अज, सम, शुद्ध व नाना भेदरहित असें आत्मपद जाणून त्याला आह्मी यथाशक्ति नमस्कार करतों. १००.

# पहिल्या भागांतील दहा उपनिषदांवरील टीपा.

## १. ईशावास्योपनिषत्.

हें उपनिषत् शुक्ल यजुर्वेदामधील वाजसनेयि शाखेच्या संहितेंतलें आहे. इतर सर्व उपनिषदें वेदांपैकीं ब्राह्मणें किंवा आरण्यकें यांतलीं असतात. हें एकच उपनिषत् संहितेमधलें आहे हा याचा विशेष आहे.

भगवान् व्यासांनी आपल्या पैल, वैशंपायन, जैमिनि आणि सुमंतु या चार शिष्यांस अनुक्रमें ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद पढविले. या शिष्यांनीं आपापले वेद पुढें आपल्या शिष्यांस पढविले. यांपैकीं वैशंपायनाचे याज्ञवल्क्य प्रभृति अनेक शिष्य होते. एकदां मेरु पर्वतावर ऋषींचा समाज जमला होता. या प्रसंगीं जे ऋषि गैरहजर रहातील त्यांना पातक लागेल असें ऋषींनीं ठरविलें. या प्रसंगीं वैशंपायन गैरहजर होता. ह्मणून त्याच्या या पातकाच्या निवृत्त्यर्थ त्याच्या शिष्यांनीं उग्र तप आरंभलें. 'यांच्या तपानें काय होणार? मी तप आचरतों' असें बोलून याज्ञवल्क्यानें आपल्या गुरुबंधूंचा अपमान केला. तो सहन न होऊन वैशंपायनानें 'माझा वेद टाक' असें ह्मटलें. तेव्हां शिकलेला यजुर्वेद याज्ञवल्क्यानें ओकून टाकला. तो कांहीं ऋषींनीं तित्तिरि पक्ष्याचें रूप धारण करून ग्रहण केला त्यांची तैत्तिरीय शाखा झाली. इकडे याज्ञवल्क्यानें पुन्हां वेदप्राप्तीसाठीं चतुर्वेदांचा ईश्वर जो सूर्यनारायण त्याची उपासना केली. सूर्यनारायणानें प्रसन्न होऊन याज्ञवल्क्याला पांढरीं यजुषें दिलीं तेव्हांपासून याज्ञवल्क्य शुक्ल यजुर्वेदाचा आचार्य झाला. सूर्यानें अश्वरूप धरून हीं यजुषें दिलीं ह्मणून या शाखेला वाजसनेयि शाखा ह्मणतात. याज्ञवल्क्यानें हा शुक्ल यजुर्वेद, कण्व, मध्यंदिन

इत्यादि आपल्या पंधरा शिष्यांना पढविला, व त्यांच्या पंधरा शाखा झाल्या. वैशंपायनाचा मूळ यजुर्वेद यानंतर कृष्णयजुर्वेद या नांवानें यामुळें प्रसिद्ध झाला.

या उपनिषदाला पहिल्या मंत्राच्या आरंभींच्या शब्दावरून ईशोपनिषत् अथवा ईशावास्योपनिषत् असें ह्मणतात. तसेंच वाजसनेयिसंहितोपनिषत् असेंहि याला नांव आहे.

भगवान् शंकराचार्यांनीं व इतर आचार्यांनीं ज्या प्रसिद्ध दहा उपनिषदांवर भाष्यें लिहिलीं त्यांपैकीं ईशावास्योपनिषत् आहे. या दहा उपनिषदांचीं नांवें पुढील श्लोकांत एकत्र केलेलीं आहेत तीं अशीं—"ईशकेनकठप्रश्नमुंडमांडूक्यतित्तिरिः। ऐतरेयं च छांदोग्यं बृहदारण्यकं तथा ॥" या श्लोकांतील क्रमाप्रमाणेंच आह्मीं यांचा क्रम धरला आहे.

'उपनिषत्' शब्दाचा मूळ अर्थ 'जवळ बसणें' अर्थात् 'ज्ञानी गुरूच्या सन्निध बसून प्राप्त झालेलें रहस्य अथवा गूढ विद्या' असा असावा. शंकराचार्यांनीं 'अविद्येचा नाश करून संसारबीज नष्ट करणारी विद्या' अथवा 'ब्रह्मप्राप्ति करून देणारी विद्या' असे अर्थ सांगितले आहेत [कठोपनिषद्भाष्याचा आरंभ पहा].

१–२. पहिल्या व दुसऱ्या मंत्रांत ईश्वरार्पणबुद्धीनें कर्म करण्याचाच उपदेश केला आहे, व असें केले असतां मनुष्याला कर्मांचा लेप लागत नाहीं असें ह्मटले आहे. परंतु श्रीशंकराचार्यांनीं यांचा जो अर्थ लावला आहे त्याचें तात्पर्य असें—"सर्वच हें परमेश्वर होय. तेव्हां तूं सर्व पुत्रैषणा व लोकैषणा व वित्तैषणा या तीन एषणांचा त्याग कर. आपणच जर हें सर्व आहों तर घेणार तरी काय? ह्मणून मिथ्याविषय अशी तृष्णा सोड. ह्मणजे तुला कर्मांचा अधिकार रहात नाहीं, एषणासंन्यासाचाच अधिकार येतो. असा संन्यास करण्याची जर तुझी शक्ति नसेल तर तूं शास्त्रविहित कर्में जन्मभर कर." रामचंद्रपंडितांनीं आपल्या ईशावास्यविवृतीमध्यें ह्मटलें आहे—"एवं निष्कामकर्माणि कुर्वतः तव कर्मफललेपो न स्यात्। किंतु

चित्तशुद्धिद्वारा अधिकारसंपत्त्या ज्ञानसिद्ध्या मुक्तिरेव स्यादिति भावः अनंताचार्यांनीं तर आपल्या ईशावास्यभाष्यांत स्पष्टच लिहिलें "तत एवं कर्म कुर्वतो जिजीविषतो मुक्तिरस्तीति शेषः । इतः प्रकारादन्यथा प्रकारान्तरेण मुक्तिर्नास्तीत्ययमभिप्रायः । स्वर्गादिप्राप्तौ यथा नानोपायाः सन्ति न तथा मुक्तावित्यर्थः । ब्रह्मार्पणबुद्ध्या कृतकर्मणा श्रद्धांतःकरणस्यैव मुक्तिरिति भावः ।"

६. 'विजुगुप्सते' याच्या ऐवजीं क्वचित् 'विचिकित्सति' असा पाठ आहे.

८. पर्यगात् परि समंतादगात् ज्ञानवान् आकाशवद्व्यापीत्यर्थः ।

९. कर्म न करतां केवळ ज्ञानांत गढलेल्या लोकांना येथें अधिक दोष दिला आहे. याचें कारण ज्ञानी लोकांनीं कर्तव्य करून अज्ञान्यांस धडा घालून दिला नाहीं तर त्यांच्याकडे त्यांच्या ज्ञानामुळेंच अधिक दोष येतो, असा येथें श्रुतीचा स्पष्ट अभिप्राय दिसतो. ज्ञानी पुरुषानें आपल्या ज्ञानाचा जगाला उपयोग करून दिला पाहिजे, एरवीं तें ज्ञान जगाच्या दृष्टीनें फुकट आहे, असें यावरून उघड होतें. येथें 'विद्या' शब्दाचा अर्थ शंकराचार्यांनीं 'ज्ञान' असा न करितां 'देवताज्ञान' असा केला आहे.

११. या मंत्रांत ज्ञान आणि कर्म यांचा समुच्चय स्पष्ट सांगितला आहे, व दोघांचाहि उपयोग सांगितला आहे. 'विद्ययामृतमश्नुते' यामध्यें 'अमृत' असा शब्द आहे. या शब्दाचा अमृतत्व=मरणराहित्य=जन्ममृत्यु-नाश=मोक्ष असा नेहमींचा अर्थ आहे व तो सोडून देण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं. ९ च्या मंत्रावरील आपल्या अर्थाला अनुसरून शंकराचार्यांनीं या ठिकाणीं 'अमृतं देवतात्मभावं अश्नुते' असा अर्थ केला आहे. इतर टीकाकारांनीं सरळ अर्थच केला आहे. उवटाचार्य आपल्या भाष्यांत म्हणतात—"आत्मज्ञानं च अविद्यां कर्म च यस्तदुभयं वेद जानाति सह एकीभूतं कर्मकांडं ज्ञानकांडस्य गुणभूतमथ कर्मकांडं ज्ञानकांडं च एकीकृत्य

अविद्यया कर्मकांडेन मृत्युं तीर्त्वोर्त्तीर्य कृतकृत्यो भूत्वा विद्यया ब्रह्मपरिज्ञानेनामृतत्वं मोक्षमश्नुते प्राप्नोति ॥''

जर्मन प्रोफेसर डायसेन यांनीं ९–११ मंत्रांचा वेगळाच अर्थ केला आहे. तो असा—

Other than that to which knowledge leadeth
Is that to which leadeth ignorance!
Thus have we received the teaching from our forefathers.
He who recognises both wisdom and ignorance (as insufficient)
He through both overpasses death and wins immortality.

परंतु हा अर्थ चुकला आहे असें ह्मणावें लागतें. 'अविद्यया मृत्युं तीर्त्वा विद्ययामृतमश्नुते' याचा सरळ अन्वय सोडून अविद्यया विद्यया (च) मृत्युं तीर्त्वा अमृतमश्नुते असा अन्वय लावणें कोणीहि चूकच ह्मणणार. अविद्या आणि विद्या या दोघांचाहि निषेध कां केला याचा उलगडा करण्यासाठीं प्रो. डायसेन यांनीं हा अन्वय लावला असावा. परंतु मूळ मंत्रांत केवळ कर्माचा आणि केवळ ज्ञानाचा निषेध केला आहे हें लक्षांत आणलें ह्मणजे ११ व्या मंत्राची अशी ओढाताण करण्याचें कारण नाहीं. या संबंधानें टिळकांनीं गीतारहस्यांत विवेचन केलें आहे तें वाचकांनीं पहावें. [गीतारहस्य पृ. ३५७ व पुढें].

१२–१४. या मंत्रांत ९–११ याच मंत्रांचा अनुवाद केला आहे असें वाटतें. पण प्रो. डायसेन यांनीं ब्रह्म एकरूप आहे, कधीं बदलत नाहीं हें सिद्ध करण्याकरितां या मंत्रांचा पुढीलप्रमाणें अर्थ दिला आहे. तो एक तऱ्हेनें चातुर्याचा वाटल्यामुळें येथें देतों. प्रोफेसर ह्मणतात—

An emphatic repudiation of becoming is contained in a passage that has been misunderstood by both Indian and European commentators, Isha 12–14—

Into dense darkness he enters
Who has conceived becoming to be naught,

Into yet denser he
Who has conceived becoming to be aught.
Different is it from coming into being,
Different also from not coming into being;
Thus have we from the ancient seers
Received the doctrine.
He who knows (as non-existent)
Both becoming and not becoming,
He passes through both
Beyond death, and has immortality.

१५. या मंत्रापासून पुढें अंतकालाची प्रार्थना आहे. 'अंतकाले प्राप्ते सति आत्मानं आत्मनः प्राप्तिद्वारं याचते हिरण्मयेन पात्रेण'–शंकराचार्य.

१६. कांहीं प्रतींत हा मंत्र अजीबात गाळला असून जवळचे इतर मंत्र मागें पुढें केले आहेत.

---

## २. केनोपनिषत्.

सामवेदान्तर्गत तलवकार शाखेचें हें उपनिषत् आहे. या शाखेला जैमिनीय शाखा असेंहि दुसरें नांव आहे. प्रारंभींच्या 'केन' शब्दावरूनच याला केनोपनिषत् हें नांव पडलें असलें पाहिजे. शाखेवरून तलवकारोपनिषत् असेंहि या उपनिषदाला नांव आहे. शंकराचार्य आपल्या भाष्यांत ह्मणतात—(तलवकार) ब्राह्मणाच्या नवव्या अध्यायापासून या उपनिषदाला आरंभ झाला आहे. या पूर्वींच्या आठ अध्यायांत कर्मे, प्राणाची उपासना, गायत्रसाम आणि वंश हीं सांगितलीं आहेत. परंतु डा० बर्नेल यांना उपलब्ध झालेल्या प्रतींत चवथ्या अध्यायाच्या नवव्या अनुवाकापासून या उपनिषदाचा प्रारंभ आहे.

४.५. या मंत्रांचा अर्थ मला बरोबर लागला नाहीं. आनंदगिरि ह्मणतो—"एतत्प्रकृतं ज्योतीरूपं ब्रह्म प्रति मदीयं मनो गच्छद्वर्तते इति

चिंतयेदिति य उपदेशः स आध्यात्मिकोऽभीक्ष्णं पौनःपुन्येन मम मनसः संकल्पो ब्रह्मविषय एवेति ध्यायतः प्रत्यग्भूतब्रह्माभिव्यक्तिः स्यात् । प्रो. डायसेन यांनीं ४.४. व ४.५ यांचा मजेदार अर्थ केला आहे तो असा—

"Concerning it this explanation is given. That which in the lightening makes it lighten, and men cry 'ah' and shut their eyes,— this, that men cry 'ah' (is its explanation) in relation to the godhead. Now in relation to the self. When something enters as it were into the soul, so that thereby a man is reminded of something in an instant, this idea (is its explanation)."... Taken together, their aim is to lay stress upon his instantaneousness in time, that is in figurative language his timelessness."

---

## ३. कठोपनिषत्.

सर्व उपनिषदांमध्यें कठोपनिषत् हें पाश्चात्य देशांमध्ये अधिक प्रसिद्ध आहे व याचीं निरनिराळ्या भाषांत भाषांतरेंहि अधिक झालीं आहेत. कठ ही एक यजुर्वेदाची शाखा आहे. हें उपनिषत् कृष्ण यजुर्वेदाचें आहे. आथर्वण उपनिषदांमध्येंहि याची गणना करतात. यजुर्वेदाच्या तैत्तिरीय ब्राह्मणामध्यें [३.१.८] नचिकेतसाची गोष्ट आहे ती या उपनिषदांतील गोष्टीपेक्षां थोडी भिन्न आहे. ती येणेंप्रमाणें—

वाजश्रवसानें यज्ञ करून आपलें सर्व धन दान दिलें. गाई दान देण्याकरितां आणल्या तेव्हां त्याचा मुलगा नचिकेतस् जवळ होता त्यानें पित्याला प्रश्न केला, "बाबा, माझें दान तूं कोणाला करणार ?" दोनतीनदां हाच प्रश्न विचारल्यावर बाप ह्मणाला, मी तुझें मृत्यूला दान करणार आहें.

इतक्यांत आकाशवाणीनें गौतमाला ह्मणजे नचिकेताला सांगितलें कीं, तुझ्या बापानें तुला मृत्यूला दिला आहे. तेव्हां मृत्यु घरीं नाहीं असें पाहून तूं त्याच्याकडे जा आणि तीन रात्रींपर्यंत कांहीं न खातां तेथें रहा.

तूं किती रात्री येथें आहेस असें मृत्यु परत आल्यावर तुला विचारील तेव्हां सांग कीं, तीन रात्री. पहिल्या रात्रीं तूं काय खाल्लेंस, असा प्रश्न मृत्यु विचारील तेव्हां सांग, तुझे पुत्र. दुसऱ्या रात्रीं तूं काय खाल्लेंस, असा प्रश्न विचारील तेव्हां सांग, तुझे पशु. तिसऱ्या रात्रीं तूं काय खाल्लेंस, असा प्रश्न विचारील तेव्हां सांग, तुझीं पुण्यकर्मे.

नचिकेतसानें याप्रमाणें केलें. तेव्हां मृत्यु ह्मणाला, वर माग. तेव्हां नचिकेतस् ह्मणाला, मी जिवंत आपल्या बापाकडे जावें. मृत्यु ह्मणाला, आणखी एक वर माग. नचिकेतस् ह्मणाला, माझीं पुण्यकर्मे नाश पावणार नाहींत असा उपाय सांग. तेव्हां मृत्यूनें त्याला नाचिकेत अग्नीचें हवन सांगितलें, व आणखी एक वर माग असें ह्मटलें. नचिकेतस् ह्मणाला, मृत्यूवर जय कसा मिळवावयाचा? तेव्हां मृत्यूनें त्याला या मुख्य नाचिकेत अग्नीचें ज्ञान सांगितलें. या ज्ञानानें त्यानें मृत्यु जिंकला.

१.१. उशन् कामयमानः यज्ञफल जें स्वर्गादि तें मिळण्याची इच्छा करणारा.

१.१६. यामध्यें यमानें नचिकेताला एक माळ दिली ती तीन वरांत अंतर्भूत नसतां अधिकच दिलेली आहे. सृंका शब्दाचा अर्थ शंकराचार्यांनीं प्रथमतः 'शब्दवतीं रत्नमयीं मालां' असा करून नंतर ह्मटलें आहे–यद्वा सृंकां अकुत्सितां गतिं कर्ममयीं गृहाण। अन्यदपि कर्मविज्ञानमनेकफलहेतुत्वात्स्वीकुरु इत्यर्थः॥ यावरून शंकराचार्यांना मध्येंच यमानें माळ कसली दिली याची शंका आली असावी असें दिसतें. बाकीच्या आचार्यांनीं तर शंकराचार्यांचाच अर्थ लिहिण्यापलीकडे माळेचा उलगडा केला नाहीं. १६–१८ मंत्र मागाहून कोणीं तरी घातले असावेत अशी प्रो. मॅक्समुलर यांना शंका आली आहे, परंतु उपनिषदांच्या मंत्रांसंबंधीं तसें ह्मणण्याचें धाष्टर्य कोणीं एकदम करूं नये अशी त्यांची शिफारस आहे.

२.३. येथें सृंका शब्दाचा अर्थ सृति=मार्ग एवढाच आहे. १.

१६ मधली शंका ती ही नव्हे हें उघड आहे.

२.८. या मंत्राच्या अर्थासंबंधानें फार घोटाळा आहे. ह्मणून येथें सर्व अर्थ देतों. प्रथमतः शंकराचार्यांचे अर्थ सांगतों.

(१) सामान्य मनुष्यानें या आत्म्याचें ज्ञान सांगितलें असतां याचें चांगलें ज्ञान होत नाहीं; कारण (कर्ता–अकर्ता, शुद्ध–अशुद्ध इत्यादि) नाना प्रकारांनीं वादी याचा विचार करतात. मीच ब्रह्म आहें असें ज्ञान प्राप्त झालेल्या अर्थात् ब्रह्मात्मभूत आचार्यांनें आत्म्याचें ज्ञान सांगितलें असतां या आत्म्याविषयींचे (अस्ति–नास्ति इत्यादि नाना तऱ्हेचे) विचार नष्ट होतात, (व त्याचें यथार्थ ज्ञान होतें). एरवीं हा अत्यंत सूक्ष्म पदार्थाहून देखील सूक्ष्म असतो, आणि तर्कानें समजण्यास अशक्य होतो. [अनन्य-प्रोक्ते अनन्येनापृथग्दर्शिना आचार्येण प्रतिपाद्यब्रह्मात्मभूतेन प्रोक्ते उक्ते आत्मनि गतिरनेकधाऽस्तिनास्तीत्यादिलक्षणा चिंता गतिरत्रास्मिन्नात्मनि नास्ति न विद्यते].

(२)......आपणच आत्मा झाल्यावर त्याचे संबंधानें दुसरें ज्ञानच उरत नाहीं, कारण मग ज्ञेय असें कांहींच शिल्लक रहात नाहीं. [स्वात्मभूतेऽनन्यस्मिन्नात्मनि प्रोक्तेऽनन्यप्रोक्ते गतिरत्रान्यावगतिर्नास्ति ज्ञेयस्यान्यस्याभावात्। ज्ञानस्य ह्येषा परा निष्ठा यदात्मैकत्वविज्ञानम्। अतोऽवगंतव्याभावान्न गतिरत्रावशिष्यते।].

(३)...आपणच आत्मा आहों असें ज्ञान झाल्यावर मग संसारगति उरत नाहीं. [संसारगतिर्वात्र नास्ति अनन्ये आत्मनि प्रोक्ते].

(४)...ब्रह्मात्मभूत आचार्यानें ज्ञान सांगितल्यावर या आत्म्याविषयीं अज्ञान शिल्लक रहात नाहीं. [प्रोच्यमानब्रह्मात्मभूतेनाचार्येण प्रोक्ते आत्मन्यगतिरनवबोधोऽपरिज्ञानमत्र नास्ति]. या अर्थीं "अनन्यप्रोक्तेऽगतिरत्र नास्ति" असा पाठ घ्यावा लागतो.

आतां मॅक्समुल्लरांचें भाषांतर पहा—

That (Self), when taught by an inferior man, is not easy to be known, even though often thought upon; unless it be taught by another, there is no way to it, for it is inconceivably smaller than what is small.

प्रो. डायसेन यांचें 'अनन्यप्रोक्ते गतिरत्र नास्ति' याचें भाषांतर असें आहे—

"Apart from the teacher, there is no access here."

रामानुजांनीं 'अनन्येन' याचा अर्थ 'ब्रह्मसाक्षात्कारिणा' असा करून इतरत्र शंकराचार्यांचाच अर्थ स्वीकारला आहे. माध्व अर्थ अगदींच विचित्र असल्यामुळें जमेंत धरण्यासारखा नाहीं.

२.१०. या मंत्राच्या शेवटच्या 'नित्यं' पदाचा अर्थ शंकराचार्यांनीं 'आपेक्षिकं नित्यं' असा घेतला आहे. पण आमच्या मतें नित्यं हें क्रियाविशेषण घेतलें असतां बरें. मॅक्समुल्लरसाहेबांनीं तर हा श्लोक यमाचा न समजतां नचिकेतसाचाच समजून भाषांतर केलें आहे !

२.१८,१९. अशाच अर्थाचे बहुतेक याच शब्दांत भगवद्गीतेमधील२.२० व १९ हे श्लोक आहेत. असेच आणखी इतरहि श्लोक आढळतात. उपनिषदांतील अध्यात्मज्ञान गीतेमध्यें सांगितलें आहे. सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनंदनः। पार्थो वत्सः सुधीर्भोक्ता दुग्धं गीतामृतं महत् ॥ हा गीताध्यानांतील श्लोक सर्वांच्या परिचयाचा आहेच.

२.२०. शंकराचार्यांनीं धातुप्रसादात् असा पाठ घेतला आहे व त्याचप्रमाणे आम्हीं भाषांतर केलें आहे. याखेरीज धातुः प्रसादात् असाहि पाठ आहे.

३.१४. प्राप्य वरान्निबोधत या पदांचा अर्थ टिळकांनीं "हे वर समजून घ्या" असा गीतारहस्याच्या प्रस्तावनेंत दिला आहे व तोच अर्थ आम्हीं दिलेल्या अर्थापेक्षां चांगला आहे असें आम्हांस वाटतें. कारण टिळकांच्या भाषांतरांत 'वर' शब्दाचा अर्थ सोडावा लागत नाहीं.

४.१३. ज्योतिरिवाधूमकः याचा अर्थ 'धूमरहित अग्नीसारखा' असाहि होईल.

६.१३. प्रो. डायसेन यांचें भाषांतर—

'He is !' thus may he be apprehended,
So far as he is the reality of both;
'He is !' who has thus apprehended him,
To him his essential nature becomes manifest.

---

## ४. प्रश्नोपनिषत्.

या उपनिषदाच्या नांवाचें कारण अगदीं उघड आहे.

३.६. या मंत्राप्रमाणें सर्व नाडींची बेरीज केली असतां अशी होते— १०१+१०१X१००+१०१X१००X७२०००=७२७२१०२०१ इतकी प्रत्येक मनुष्याच्या शरीरांतील नाड्यांची संख्या झाली. कठ. ६.१६ मध्यें १०१ नाड्यांचा उल्लेख आहे. मैत्रायण्युपनिषदांत पांढऱ्या, निमपांढऱ्या, काळ्या, पिवळ्या, तांबड्या इत्यादि अनंत नाड्या आहेत असें ह्मटलें आहे. शरीरांत एकंदर नाड्या ७२००० असून त्यांपैकीं १०१ मुख्य आहेत असें क्षुरिकोपनिषदांत ह्मटलें आहे. यांपैकीं १०१ वी सुषुम्ना नाडी होय, तिच्या सभोंवतीं सर्व नाड्या पसरलेल्या असतात व या सुषुम्नेमधून योगी ब्रह्माप्रत जातो. ७२००० नाड्यांचा भेद करून मस्तकांतील नाडींत ॐ अक्षर जातें, व तेथून ती नाडी आदित्याप्रत गेली असल्यामुळें योगी आदित्याप्रत जाऊन ब्रह्म पावतो असें ब्रह्मविद्योपनिषदांत ह्मटलें आहे. छांदोग्य ८.६.६ मध्यें एकशें एक नाड्यांचा उल्लेख आहे. या सर्वांचा तज्ज्ञांनीं शोध लावला पाहिजे.

---

## ५. मुंडकोपनिषत्.

या उपनिषदाचें नांव मुंडकोपनिषत् असें पडण्याचें कारण समजत

नाहीं. शिरोव्रत घेतल्यानंतर या उपनिषदाचें अध्ययन करावयाचें याकरितां याला मुंडकोपनिषत् असें नांव आहे असें नारायणानें आपल्या दीपिकेंत लिहिलें आहे [चीर्णे शिरोव्रतेऽध्येयं तेन मुंडकमुच्यते]. मानसिक दोषांचें मुंडन करतें ह्मणून याचें नांव मुंडकोपनिषत् असेंहि कोणी ह्मणतात. याच उपनिषदांतले ३.२.१० व ३.२.११ हे मंत्र पहा. यांवरील टीकेंत नारायणानें "शिरोव्रतं शिरसि अग्निधारणलक्षणं प्रसिद्धं व्रतं" असें ह्मटलें आहे.

३.२.९ हें उपनिषत् संन्यासपर आहे, तरी देखील संन्यास घेण्यापूर्वीं प्रत्येकानें गृहस्थाश्रम करून कर्मे केलींच पाहिजेत, असें या व पुढील मंत्रावरून स्पष्ट होतें. ब्रह्मचर्याश्रमानंतर संन्यास घेण्यास येथें सांगितलें नाहीं. 'नास्याब्रह्मवित्कुले भवति' या पदांवरून हें सिद्ध होतें.

---

## ६. मांडूक्योपनिषत्.

मांडूक्य हें नांव शाखेवरून पडलें असावें. या उपनिषदाच्या स्पष्टीकरणार्थ शंकराचार्यांचे आजेगुरु गौडपादाचार्य यांनीं कारिका केल्या आहेत. या कारिकांची योग्यता उपनिषदाइतकीच समजतात. शंकराचार्यांनीं कारिकांवर भाष्य केलेलें आहे. या कारिका आह्मीं मागें परिशिष्टरूपानें भाषांतरासह दिल्या आहेत.

---

## ७. तैत्तिरीयोपनिषत्.

तैत्तिरीयोपनिषत् हें तैत्तिरीय आरण्यकांतील आहे. पहिले सहा प्रपाठक आरण्यकाचे आहेत. पुढील तीन ह्मणजे ७–९ प्रपाठक तैत्तिरीयोनिषत् होत. शेवटचा ह्मणजे १० वा प्रपाठक नारायणोपनिषत् अथवा महानारायणोपनिषत् होय. शिक्षाध्यायावर सायणाचार्यांचें भाष्य आहे. तेथें त्यांनीं शिक्षाध्यायाला संहितोपनिषत् ह्मटलें असून आपल्या भाष्याला शिक्षाभाष्य असें नांव दिलें आहे. दुसऱ्या दोन वल्लींना सायणांनीं वारु-

ण्युपनिषत् असें नांव दिलें आहे.

आपल्या देशामध्यें सर्व उपनिषदांमध्यें तैत्तिरीयोपनिषत् अधिक प्रसिद्ध आहे. तैत्तिरीय शाखेचें हें उपनिषत् असलें तरी यांतील बहुमोल उपदेशामुळें इतरशाखीयांस देखील हें मान्य आहे. विशेषतः शिक्षाध्यायांतील ११ व्या अनुवाकांतला उपदेश या उपनिषदाला इतक्या प्रसिद्धीस आणण्यास कारण झाला असावा.

१.११.१. 'आचार्याय प्रियं धनं आहृत्य प्रजातंतु मा व्यवच्छेत्सीः' या पदांचा आम्ही जरा वेगळा अर्थ केला आहे.

२.६. या ठिकाणीं सत्=दृश्य, डोळ्यापुढचें आणि त्यत् म्हणजे त्यापलीकडचें अदृश्य.

२.७. या ठिकाणीं देखील असत्=अव्यक्त आणि तत्=दृश्य सृष्टि असा अर्थ आहे.

## ८. ऐतरेयोपनिषत्.

हें उपनिषत् म्हणजे ऋग्वेदाच्या ऐतरेयब्राह्मणारण्यकापैकीं दुसऱ्या आरण्यकाचे चार, पांच व सहा हे तीन अध्याय होत. या तीन अध्यायांचे पांच खंड व अखेरचा शान्तीचा एक खंड मिळून सहा खंड होतात, यामुळें या उपनिषदाला आत्मषट्क असेंहि एक नांव आहे. ऐतरेय ब्राह्मणाला बह्वृचब्राह्मण असें दुसरें नांव असल्यामुळें या उपनिषदाला बह्वृचब्राह्मणोपनिषत् असेंहि म्हणतात.

ऐतरेय ब्राह्मण आणि ऐतरेय आरण्यक यांचा कर्ता महिदास ऐतरेय नांवाचा ऋषि होता. महिदास ऐतरेय हें नांव छांदोग्योपनिषदांत [३.१६.७] देखील आलेलें आहे. हा ऐतरेय ११६ वर्षें जगला अशी आख्यायिका आहे. सायणांनीं पुढील गोष्ट दिली आहे. एका ऋषीला अनेक बायका

होत्या. त्यांपैकीं इतरा नांवाच्या स्त्रीचा महिदास हा पुत्र होता. एके दिवशी यज्ञशाळेंत पित्यानें इतर मुलांना मांडीवर घेतल्यामुळें महिदास आपल्या मातेकडे जाऊन रडूं लागला. मातेनें आपली कुलदेवता जी भूमि तिची प्रार्थना केली. तेव्हां भूमिदेवी दिव्य स्वरूपानें प्रगट होऊन तिनें महिदासाला सिंहासनावर बसविलें व त्याला ब्रह्मज्ञान शिकविणारें एक आरण्यक व एक ब्राह्मण हीं अर्पण केलीं.

ऐतरेय आरण्यकापैकीं पहिलीं तीन आरण्यकें महिदास ऐतरेयाचीं आहेत आणि पुढील दोन शौनक अथवा शौनकाचा शिष्य आश्वलायन यांचीं आहेत.

१.१. आत्मा. शंकराचार्य ह्मणतात—आत्माऽऽप्नोतेरत्तेरततेर्वा. यावर आनंदगिरि आणि विद्यारण्य यांनीं स्मृतीचा ह्मणून पुढील श्लोक दिला आहे—यच्चाप्नोति यदादत्ते यच्चात्ति विषयानिह। यच्चास्य संततो भावस्तस्मादात्मेति कीर्त्यते ॥

३.१४. परोक्षप्रिया इव हि देवाः यासंबंधानें विद्यारण्य ह्मणतात–सर्व देव अथवा पूज्य पुरुष आपलें नांव गुप्त राखून उपाध्याय, आचार्य इत्यादि परोक्ष नांव धारण करण्यांतच [इव=एव] आनंद मानतात.

---

## ९. छांदोग्योपनिषत्.

हें सामवेदांतर्गत उपनिषत् आहे. सामवेद गायनाचा आहे. अर्थात् छंदोग ह्मणजे सामवेदी यांचें उपनिषत् ह्मणून याचें नांव छांदोग्य असावें. छांदोग्यब्राह्मणाच्या तिसऱ्या अध्यायापासून या उपनिषदाला आरंभ आहे. छांदोग्यब्राह्मणाच्या पहिल्या अध्यायांत आठ सूत्रें असून त्यांमध्यें विवाहप्रसंगीं अग्नीला आहुति, वधूवरांचें दीर्घायुष्य, संतति व संपत्ति मिळण्याविषयीं प्रार्थना, वधूवरांची शपथ, अग्नि–वायु–चंद्रमा–सूर्य यांची बलवान् संतति व संपत्ति देण्याविषयीं प्रार्थना इत्यादि आहेत.

दुसऱ्या अध्यायांत उपदेवतांच्या आहुति, कृमिकीटकांना शाप आणि अखेरीस विवाहमंत्र हीं आहेत. वधूवरांनीं उच्चारावयाची शपथ वर सांगितली ती अशी आहे—यदेतत् हृदयं तव तदस्तु हृदयं मम । यादद हृदयं मम तदस्तु हृदयं तव ॥ यावरून विवाहाला आह्मी आर्यलोक प्राचीन काळापासून किती पवित्र मानीत आलों आहों हें दिसतें. असो. यापुढें तिसऱ्या अध्यायापासून उपनिषदाला प्रारंभ झाला आहे.

उपनिषदांत बरेच ठिकाणीं यज्ञकर्मासंबंधाची भाषा वापरलेली असते ती अलीकडे आपणांस यज्ञांची माहिती नसल्यामुळें समजेनाशी झाली आहे. हा प्रकार छांदोग्योपनिषदांत पुष्कळच आढळतो.

---

## १०. बृहदारण्यकोपनिषत्.

हें प्रसिद्ध व मोठें उपनिषत् शुक्लयजुर्वेदाचें असून शतपथ ब्राह्मणांतील आहे. कण्व आणि माध्यंदिन अशा दोन शाखांचे या उपनिषदाचे दोन पाठ आहेत. शंकराचार्यांनीं कण्व पाठांचाच स्वीकार केला आहे व आह्मीहि शंकराचार्यांच्याच पाठाप्रमाणें उपनिषत् दिलें आहे.

२.५.१. या मंत्राचे तात्पर्यासंबंधानें प्रो. मॅक्समुल्लर यांनीं पुढील खुलासा केला आहे—

"Madhu, honey, seems to be taken here as an instance of something which is both cause and effect, or rather of things which are mutually dependent on each other, or cannot exist without one other. As the bees make the honey, and the honey makes or supports the bees, bees and honey are both cause and effect, or at all events are mutually dependent on one other. In the same way the earth and all living beings are looked upon as mutually dependent, living beings presupposing the earth, and the earth presupposing living beings."

परंतु हा खुलासा आमच्या मतें अपुरा राहिला आहे. प्रो० डाय-सेन यांनीं या मंत्राचें भाषांतर पुढीलप्रमाणें केलें आहे—

"This earth is the honey of all living creatures, is the honey of all living creatures; but that which on the earth that mighty immortal spirit is, and that which in relation to the self that corporal mighty immortal spirit is, it is even that which is the soul (atman) here. This is the immortal, this is Brahman, this the universe."

सारांश, पृथ्वी ही सर्व भूतांना सारसर्वस्व आहे. पृथिवी नसेल तर सर्व भूतांना अस्तित्वच नाहींसें होईल. त्याप्रमाणेंच सर्व भूतें हींहि पृथ्वीचें सर्वस्व होय. कारण उघडच आहे. पृथ्वीवर भूतें नसलीं तर नुसत्या दगडमातीचा काय उपयोग? अर्थात् दोन्ही एकमेकांवर अव-लंबून आहेत. या दोघांच्या परस्परांवर अवलंबून असणाऱ्या स्थितीला कारण दोघांमधलें चैतन्य एकच आहे हें होय. पृथिवीमधलें चैतन्य जो तेजोमय, शाश्वत पुरुष अथवा आत्मा आणि भूतांमधलें चैतन्य जो तेजो-मय शाश्वत पुरुष अथवा आत्मा तो एकच आहे. सर्व विश्वाचा आत्मा तो हाच, याचेंच नाव ब्रह्म. हे एक सर्वत्र भरलेलें असल्यामुळें सगळ्या विश्वाचें जीवन चालू आहे. पुढील अध्यायांत याज्ञवल्क्यानें जें अंतर्यामि-ब्राह्मण [बृ.३.७] सांगितलें आहे त्याचा व या मधुब्राह्मणाचा भावार्थ एकच आहे.

३.३.१. मद्रदेश हा उत्तरेस पंजाबच्या पश्चिमभागांत होता.

५.१३. ही अंतकाळची प्रार्थना ईशावास्योपनिषदामध्यें पूर्वीं अशीच आलेली आहे.

